मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक ३२ वें.

# दोन घटका मनोरंजन.

संपादक

श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र.

[ प्रथमावृत्ति. ]

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी,

गिरगांव, मुंबई.

किंमत १-४-०. ] सर्व हक्क स्वाधीन. [ जानेवारी १९०८.

# अनुक्रमणिका.


| | नांव. | पृष्ठ. |
|---|---|---|
| गोष्ट १ ली, | हिंमत बहादर. ... ... ... ... | १ |
| गोष्ट २ री, | थोर हृदय. ... ... ... ... ... | १५ |
| गोष्ट ३ री, | पास कीं नापास. ... ... ... .... | २० |
| गोष्ट ४ थी, | राणी रूपसुंदरी. ... ... ... ... | २४ |
| गोष्ट ५ वी, | अभिमान. ... ... ... ... .... | २८ |
| गोष्ट ६ वी, | निरभिमानता. ... ... ... ... | ३९ |
| गोष्ट ७ वी, | गुप्त पोलिस.... ... ... ... ... | ४३ |
| गोष्ट ८ वी, | मनाचा मोठेपणा. ... ... ... ... | ४९ |
| गोष्ट ९ वी, | माझ्या मामांची एक वाईट खोड. ... ... | ५१ |
| गोष्ट १० वी, | नवरे कसे तयार करावे. ... ... ... | ६१ |
| गोष्ट ११ वी, | यमीची गोष्ट. ... ... ... ... | ६३ |
| गोष्ट १२ वी, | मी चतुर्भुज कसा झालों. ... ... ... | ६६ |
| गोष्ट १३ वी, | एका सद्गुणी मुलीची गोष्ट. ... ... ... | ७६ |
| गोष्ट १४ वी, | मोगरीची ही माळा देऊं. ... ... ... | ९४ |
| गोष्ट १५ वी, | माझ्या भाच्यांचा एक खेळ. ... ... | १०० |
| गोष्ट १६ वी, | खानसाबका टट्टू और आरबकी घोडी. ... | १०६ |
| गोष्ट १७ वी, | आणि अखेरीस घडलेंहि पण तसेंच.... ... | ११२ |
| गोष्ट १८ वी, | वा: ग्रंथकार. ... ... ... ... | ११६ |
| गोष्ट १९ वी, | फुलजानि बेगम. ... .... ... ... | १४६ |
| गोष्ट २० वी, | आवडती ताईत. ... ... ... ... | १५३ |
| गोष्ट २१ वी, | कोणी एवढी मेहरबानी करील. ... ... | १६१ |
| गोष्ट २२ वी, | एक चित्र. ... ... ... ... ... | १७२ |
| गोष्ट २३ वी, | ब्युबॉनिक प्लेग. ... ... ... ... | १७७ |
| गोष्ट २४ वी, | बिचारी आनंदीबाई.... ... ... ... | १९० |
| गोष्ट २५ वी, | आनंदकुमारी. ... ... ... ... | १९८ |

| | नांव. | पृष्ठ. |
|---|---|---|
| गोष्ट २६ वी, | अभागी यमुना. ... ... ... ... | २०७ |
| गोष्ट २७ वी, | संसार असार. ... ... ... .... | २२३ |
| गोष्ट २८ वी, | महर्षि रत्नमाला. ... ... ... ... | २३३ |
| रत्न १ लें, | देवर्षि नारद. ... ... ... ... | २३३ |
| रत्न २ रें, | महर्षि अगस्त्य. ... ... ... ... | २४४ |
| रत्न ३ रें, | महर्षि कश्यप. ... ... ... ... | २५४ |
| रत्न ४ थें, | महर्षि वसिष्ठ. ... ... ... ... | २६१ |
| रत्न ५ वें, | देवाचार्य बृहस्पति. ... ... ... ... | २८० |
| रत्न ६ वें, | महर्षि कपिल. ... ... ... ... | २९० |
| रत्न ७ वें, | महर्षि गौतम. ... ... ... ... | २९६ |
| गोष्ट २९ वी, | अखेरीस निश्चय ढांसळला. ... ... ... | ३०३ |
| गोष्ट ३० वी, | मातृचुंबन. ... .... ... ... ... | ३११ |
| गोष्ट ३१ वी, | शेवट तर गोड झाला. ... ... ... | ३२२ |
| गोष्ट ३२ वी, | आमचीं पत्रें.... ... ... ... ... | ३३१ |

# प्रकाशकांचे दोन शब्द.

---

मासिक मनोरंजनाचें १ लें, २ रें, आणि ३ रें हीं तीन पुस्तकें मनोरंजनाच्या बऱ्याच वाचकांच्या संग्रहास नसल्यामुळें तीं पुनः प्रसिद्ध करण्याविषयीं पुष्कळांकडून आज कित्येक वर्षें सारखा आग्रह होत होता. मनोरंजनाच्या वाचकांच्या इच्छेला मान देऊन सदर्हु तीन्ही पुस्तकांतील निवडक गोष्टी आज स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध करित आहों. ह्या प्रयत्नास पूर्ण उत्तेजन मिळाल्यास मनोरंजनाच्या पुढील वर्षांतील निवडक गोष्टी व महत्त्वाचे लेख असेच क्रमाक्रमानें स्वतंत्र पुस्तक रूपानें प्रसिद्ध करण्याचा मानस आहे.

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीचें
कार्यालय, गिरगांव-मुंबई,
ता. ३१ जानेवारी १९०८.

काशीनाथ रघुनाथ मित्र,
व्यवस्थापक म. ग्रं. प्र. मंडळी.

# दोन घटका मनोरंजन.

## हिंमत बहादर.

मी जरासा भित्रा आहे. कांहीं अगदींच भित्रा नव्हे हो! अंगांत हिंमत खूब आहे, पण कधीं कधीं थोडीशी गडबड उडून जाते एवढेंच. ठाकूरद्वाराजवळ एका लहानशा वाडींत एका दुमजली घरांत आमचें बिऱ्हाड असे. माझे मेहुणे दिनकरपंत नाईक आपल्या कुटुंबासह आमच्या शेजारींच राहत. माझ्या मामांचा मुलगा विनु, येथील एलफिस्टन कॉलेजांत शिकत होता, तोहि आमच्या इकडेच असे. दिनकरपंतांचें आणि आमचें बिऱ्हाड माडीवरच होतें. दोन स्वयंपाकघरें आणि एका थोरल्या दिवाणखान्याशिवाय तीन स्वतंत्र खोल्या होत्या. आमच्या प्रत्येकाच्या ताब्यांत एकेक खोली होती यामुळें भाडेंहि माफकच पडे. मी ' प्रभाकर ' नामक दैनिक वर्तमानपत्राचा रिपोर्टर आणि सब एडिटर होतों. दिनकरपंत कोटांतील एका देशी व्यापारी कंपनीचे दुय्यम म्यानेजर होते.

रिपोर्टरचें काम काय असतें, हें बहुतकरून सर्वांना माहित असेलच. शहरांतील लहानमोठ्या सभा, पोलिस कोर्ट, स्मॉल कॉझिस कोर्ट इत्यादि ठिकाणीं आह्मांला वारंवार फेरी मारावी लागते. नित्याप्रमाणें गेल्या १८ वीला एस्प्लनेड पोलिस कोर्टांत मी रिपोर्ट घेत होतों. या वेळीं एका गलेलठ्ठ धटिंगणाचा खटला चालला होता. दोघां शिपायांनीं त्याचे दोन्ही हात चट्ट पकडून त्याला माजिस्त्रेटासमोर पिंजऱ्यांत उभें केलें होतें. त्याच्यावर एक फार घाणेरडा आरोप होता. अपराधाची शाबिती

झाल्यावरून माजिस्त्रेटानें त्याला ५० रुपये दंडाची शिक्षा ठोठावली. माझें काम मीं उरकलें. खटल्याची समग्र हकीगत टिपून घेतली. पुढें विशेष महत्वाचे खटले नसल्यामुळें पेन्सिल, नोटबुक खिशांत टाकून मोठ्या ऐटीनें कर–कर बूट वाजवित जिन्यावरून उतरूं लागलों. पांचदहा पायऱ्या उतरलों असेन नसेन, इतक्यांत मघाचा तो आरोपी माझ्याजवळ आला "व माझ्याविषयींची हकीगत वर्तमान पत्रांतून येईल तर खबरदार!" असें मला त्यानें एकदम दरडावून सांगितलें.

मीहि मोठ्या दिमाखानें बोललों "ठीक आहे, आह्मांला योग्य वाटेल त्याप्रमाणें व्यवस्था होईल!"

माझें हें उत्तर ऐकतांच तो दांतओंठ खात ह्मणाला "बच्चाजी, याद राखून ठेव, माझ्याशीं गांठ आहे! हड्डीहड्डी नरम करीन तरच नांवाचा सोकाजी!"

गणपतराव जवळच होते, ते ह्मणाले "जाऊंद्याना यशवंतराव! तो आहे छाकटा. उगीच भलतेंसलतें करील तर विनाकारण फजिती मात्र व्हावयाची! मरूंदे त्याला, त्याच्या वाटेला जाऊं नका तुह्मी!"

मी मनांतून एकदम कचरलों. तरी मी घाबरलों असें न दाखवितां गणपतरावांनां ह्मणालों "ह्यः! असल्या फुसक्या दरडावणीला भीक घालतो आहे कोण? हूं कीं चूं करूं दे तर खरा, बेट्याला दाखवीन कसें काय आहे तें!"

भीत भीत मी एकदाचा खालीं उतरलों व ट्रॅमामधें बसून तडक ऑफिसांत आलों. त्या धटिंगणाची केस छापावी कीं नाहीं याचा मला मोठा विचार पडला. न जागो, बोलल्याप्रमाणें एखादे वेळीं ठोकील बिकील तर! बरें न छापावी, तर 'आपल्या दरडावणीला भ्याला' असें त्याला वाटून तो शेफारेल असेंहि वाटूं लागलें. अशा दोहों प्रकारच्या विचारांचें बराच वेळ माझ्या मनांत तुंबळ युद्ध चाललें होतें. अखेरीस भीत भीत एकदा मजकूर तर लिहून दिला, व पुढें काय होईल तें होवो असा मनाचा निर्धार केला.

एक आठवडा लोटला, एवढ्या अवकाशांत ह्मणण्यासारखें कांहींएक घडलें नाहीं. तथापि मला प्रांजलपणें येथें हें सांगितलें पाहिजे कीं, माझ्या मानेवर बसून मला कोणी मारित आहे, अशीं स्वप्नें पडल्या वांचून माझी एकहि रात्र गेली नाहीं ! मी ट्र्याममधूनच नेहमीं जात येत असें, तथापिहि गाडींतल्या गाडींतसुद्धां मला कोणी मारणार नाहीं ना? अशी नेहमीं भीति वाटे, व छाती नेहमीं धडधडत असे. या आठ दिवसांत झोंपमध्यें मी दहापांचदांतरी ओरडलों असेन! माझ्या पत्नीची वारंवार झोंपमोड होऊं लागल्यामुळें पुढें पुढें मी ओरडतांच ती मला हळूच चिमटा घेई व 'काय पोरासारखें रोज रोज ओरडतां!' असा टोमणा मारी. मग मी शुद्धिवर येऊन फार खजील होत असें.

वरील प्रकारास आतां चांगले दहाबारा दिवस होत आले. उद्यां शनिवार असल्यामुळें आमच्या पत्राचा अंक डबल निघावयाचा होता. त्यामुळें प्रुफें वगैरे वाचीपर्यंत चांगले अकरा साडे अकरा झाले. वद्य पक्षांतील दिवस, चांदणें वगैरे नव्हतें. रात्र बरीच झाल्यामुळें डोळेहि चुरचरुं लागले होते. झोंपेच्या गुंगींत अडखळत अडखळत मी घरीं येत होतों, इतक्यांत गु ा ाट रोडच्या सुमारास माझ्यामागून कोणी तरी जलद चालून येत आहे, असा मला भास झाला. माझ्या छातींत एकदम धडकी भरली, हातपाय लटलटूं लागले, दरदरून घाम सुटला, पाऊलहि पुढें टाकवेना! जवळच २५।३० कदमांच्या अंतरावर कोणी उभें असल्याचें मला दिसून आलें. आतां मात्र माझी अगदींच बोबडी वळून गेली. "आईग !" मी एकाएकीं ओरडलों. त्या लुच्चानें मला मारविण्याकरितां याला माझ्या पाळतीवर ठेविलें नसेलना ? माझी छाती अधिकाधीकच धडकूं लागली. ओरडत ओरडत मी एकसारखा जो धूम पळत सुटलों तो श्वास टाकित टाकित जीव घेऊन एकदाचा घरीं येऊन पडलों ! खोलींत शिरतांच आंतून दारास घट्ट कड्या लावून घेतल्या. थोड्या वेळानें धीर करून खिडकीच्या बारीक फटींतून बाहेर पाहूं लागलों तों तो मनुष्य माझ्यामागोमाग येऊन आमच्या

वाडीमध्यें येरझारा करित होता. दोनतीनदा असें केल्यावर त्यानें खिशांतून घड्याळ काढून पाहिलें व "ओ हो, फार उशीर झाला!" असें कांहींसें पुटपुटून तो चालता झाला. माझी ती रात्र कशी गेली, असेल याची वाचकांनीं कल्पनाच करावी !

शुक्रवार रात्रीं हा प्रकार घडला; परंतु ही गोष्ट मीं कधीं कोणाला सांगितली नाहीं. माझ्या पत्नीसहि यांतील कांहींच प्रकार मीं कळूं दिला नाहीं. तथापि रात्रंदिवस तो मनुष्य माझ्या डोळ्यांपुढें दिसूं लागला. अन्नपाणी गोड लागेना. तो काळ पुन्हा येतो कीं काय हें पहाण्यासाठीं दुसऱ्या दिवशीं रात्रीं मी मुद्दाम टपत बसलों. पुनःहि तो आल्याचें पाहून माझी खात्री होऊन चुकली कीं, आमची पुरी कंबख्ती भरली ! बरोबर कालच्याच वेळीं, आणि थेट तीच मूर्ती, माझ्या दृष्टीस पडली ! मी बारकाईनें पहात होतों. कालच्याचप्रमाणें त्यानें बराच वेळ फेऱ्या केल्यावर खिशांतून घड्याळ काढलें व तें पाहिल्यासारखें करून तो निघून गेला. माझी बालंबाल खात्री होऊन चुकली कीं, त्या हरामखोरानेंच याला माझ्या पाळतीवर ठेविलें आहे.

दुसऱ्या दिवशीं मी कामावर गेलों खरा, पण मन कशावरच लागेना. ही मुंबई सोडावी, चारसहा महिने बाहेर कोठेंतरी काढावे, असेंहि क्षणोक्षणीं वाटूं लागलें. कुठची झक मारली आणि मी या रिपोर्टरच्या धंद्यांत पडलों, असें मला यावेळीं वाटूं लागलें! संध्याकाळीं फारशी रात्र होण्याच्या अगोदरच घरीं जावें असा विचार करून मी ऑफिसांतून लवकरच निघालों. बाहेर झिम् झिम् पाऊस पडत होता. साधारण काळोखहि झाला होता. लगबगीनें मी तडक घरचा रस्ता धरला. दरवाजांत पाय ठेवितों आहें मात्र, इतक्यांत एकाएकीं पिस्तुलाचा बार माझ्या कपाळावर झाला. त्यावेळेची आठवण झाली ह्मणजे अझूनसुद्धां मला कांपरें भरतें ! "धावा धावा—मेलों—मेलों—ठार मेलों !" मीं एकदम किंकाळी ठोकली. दिनकरपंत, विनू वगैरे मंडळी खदखदा हंसूं लागली.

माझी पत्नीहि हंसूंच लागली; पण माझी तर भयानें अगदीं गाळण उडाली होती!

त्या तिघांसहि मीं एकंदर प्रकार निवेदन केला; परंतु आश्चर्याची गोष्ट कीं, माझ्या त्या सांगण्यापासून कोणासहि यत्किंचितसुद्धां भय न वाटतां बाहेरून मात्र तीं भ्यालयाचें सोंग घेऊं लागलीं. शेवटीं चोरास पकडावें असा आह्मा सर्वांचा बेत ठरला. माझा फाणस दरवाजाबाहेर पेटत होता, तो आणण्यास दिनकरपंतांस मीं विनंति केली; परंतु त्यांनीं माझी विनवणी साफ नाकारली.

"यशवंतराव! तुह्मींच आणाना जाऊन!" दिनकरपंत ह्मणाले. "अगोदर कालपासून आमच्या ऑफिसचे म्यानेजर थोडेसे आजारी आहेत, आणि तशांत मीहि गेलों, मग सारा कारभार आटोपलाच ह्मणावयाचा! आणि शिवाय तो फाणस कांहीं माझा नाहीं, तुमचाच आहे! तेव्हां ज्याचा त्यानें आणावा हें रास्त आहे."

"कोणापाशीं सोटा आहे?" मीं यावेळीं उसनें अवसान आणलें.

"होय, हा घे !" विनूनें एक भला मोठा सोडगा माझ्या हातांत आणून दिला. आह्मीं तिघांनीं नंतर सारें घर धुंडाळलें, पण फुकट! शेवटीं सर्वजण आपापल्या खोल्यांत जाऊन निजले; पण, निद्रादेवी आज माझ्या वाऱ्यासहि उभी राहीना!

पहांटे पहांटे जरासा डोळा लागत होता इतक्यांत "अजून उठायचं नाहीं का झालं? बाहेर ऊशीर कितीतरी झाला!" असे गोड शब्द माझ्या कानीं आले. तुकतेंच मला कालच्या प्रकाराचें स्वप्न पडत होतें व तो बार पुनः नुकताच झाला होता. इतक्यांत मी खडबडून जागा झालों.

"बाहेर आला आहे तो," माझी पत्नी ह्मणाली.

"आं-अ-आं ! क—क-काय ? त-त-तो खा-खालीं आहे ?" माझी बोबडी वळली.

" असं वेड्यासारखं काय करायचं ? बोहरी आला आहे, झटलं त्याच्याकडून रात्रीं फाटलेला नळ नीट करून घ्यावा."

बोहरी वर आला. माझ्या पत्नीनें नळ कुठें फाटला होता तो त्याला दाखविला. मीहि मागोमाग गेलों. अरे नशिबा ! एकाएकीं मी शुद्धीवर आलों.

" नळ फाटतो त्यावेळीं मोठा आवाज होतो काय आदमजी ?" बोहऱ्यास मीं प्रश्न केला.

" हां सेट ! कोय वकतूला तो असा अवाज शेनी होते, के, कोनी कहेल बंदुकच फोरला !" बोहरी ह्मणाला.

अरे बापरे! माझ्या फजितीस आतां पारावार नव्हता ! विनु,दिनकरपंत तर हंसतां हंसतां कासावीस झाले. माझी पत्नीहि तोंडावर पदर घेऊन पोट धरधरून हंसूं लागली.

पण माझ्या पाळतीवर असलेला कोण होता ?

दुसरे दिवशीं संध्याकाळीं मी घरीं येत होतों इतक्यांत समोरून येत असलेला एक तरुण मनुष्य मला एकदम विचारूं लागला " कसें काय रिपोर्टरसाहेब ! आजहि नाहीं पळून जात ?"

मी चकित झालों. सदर्हू इसम एक विद्यार्थी असून दररोज रात्रीं अभ्यास आटोपल्यावर गल्लींतून एकदोन फेऱ्या मारून नंतर निजावें, असा त्याचा क्रम होता.

# थोर हृदय.

छत्रपति शिवाजीमहाराजांनीं आपलें तेज नुकतेंच कोठें प्रगट केलें होतें, आणि कल्याणभिंवडीपर्यंत आपला अम्मल बसविला होता. त्या सुमारास एकदा अशी गोष्ट घडली कीं, कल्याणचा सुभेदार आपल्या सुभ्याची खंडणी विजापुर येथें बादशहाकडे रवाना करित आहे, ही बातमी निळो सोनदेव (यालाच आबाजी सोनदेव असेंहि म्हणत) याला लागतांच त्यानें पाळत राखून मोठ्या शिताफीनें खंडणी नेणाऱ्या स्वारांवर एकाएकीं छापा घातला, आणि त्यांची अगदीं धुळदाण उडवून खंडणीचा एकंदर ऐवज हिसकावून घेतला. त्या लुटींत त्या सुभेदाराची अत्यंत लावण्यवती, सोळा वर्षांची तरुण कन्याहि आबाजीच्या हातीं लागली. निळो सोनदेव हा गडी अगदीं पापभीरू आणि स्वामिनिष्ठ होता. फक्त निळोपंतच कां, त्यावेळच्या बहुतेक मराठ्यांच्या हाडामासांत वरील प्रकारचे अनेक थोर सद्गुण अगदीं खिळून गेलेले होते, व ह्मणूनच त्यांनीं एवढा थोर दिग्विजय करून आपलें नांव गाजविलें. त्या तरुण सरदार कन्येचें अनुपमेय लावण्य पाहून निळोजींचे डोळे दिपून गेले; आणि जरी तो अत्यंत पापभीरू होता, तरीहि आपल्या धन्यावर असलेल्या त्याच्या निस्सीम प्रेमामुळें महाराजांच्या पदरीं असलें रत्न असावें, अशी इच्छा त्याला उत्पन्न झाली. त्यानें तिची जतन फार काळजीनें करून महाराज रायगडीं असत तिकडे मोठ्या बंदोबस्तानें तिला नेलें. या वेळीं शिवाजी महाराज बाहेरप्रांतीं कसल्याशा स्वारीवर गुंतले होते. ते कांहीं दिवसांनीं रायगडप्रांतीं परत आल्यावर निळोपंतांनीं त्यांना एकांतांत गांठून मोठ्या आनंदानें आपण आणलेली लूट त्यांच्यापुढें ठेविली, आणि एकंदर हकीगत निवेदन करून त्या सरदार कन्येच्या नवयौवनाचें, तिच्या सुंदर आणि मोहक स्वरूपाचें, तसेंच तिच्या निर्मळ आणि शुद्ध आचरणाचें व गुणांचें मोठ्या मार्मिक आणि चित्तवेधक शब्दांनीं मोह पडण्याजोगें बरेंच वर्णन केल्यावर "महा-

राजांच्या रंगमहालांत असण्यास ही पात्र आहे; शिवाय यायोगें शत्रूच्या दुःखावरहि डाग दिल्यासारखें होणार आहे," असें सांगून तिचा स्वीकार करण्याविषयीं महाराजांस आग्रह केला.

* निळोपंतांसारख्या सच्छील आणि निमकहलाल मराठ्यानें शिवाजी महाराजांस अशा प्रकारची सल्ला द्यावी, हें पाहून आमच्या वाचकबंधूंस आणि प्रिय भगिनींस महदाश्चर्य वाटलें असेल, आणि त्यांनीं मनांतून निळोपंतांची नीच पुरुषांत गणना केली असेल; परंतु निळोपंत कांहीं इतका पापी पुरुष नव्हता. त्याच्यासारख्या अत्यंत पापभीरु मनुष्यासहि मोठा त्वेष यावा, व अंगावर कांटा उभा राहण्याजोगें अनन्वित कृत्य करण्यासहि त्यानें मागेंपुढें पाहूं नये, अशा प्रकारचा दुःसह जाच त्यावेळीं यवनांनीं चालविला होता. त्या वेळच्या छळास कांहीं सीमा नव्हती. कोणत्याहि गोष्टीची अति झाली, ह्मणजे कितीहि सोशिक मनुष्य असला तरी तो मग देहभान विसरतो, हें साहजिक आहे. आमच्या निळोपंतांची अवस्था कांहींशी अशाच प्रकारची झाली होती. एरवीं या महाराष्ट्र-भूषणाच्या तोंडून वरील प्रकारचे अभद्र शब्द कधींहि निघाले नसते.

श्रीशिवाजी महाराजांनीं कांहीं क्षुल्लक विषयोपभोगाकरितां अवतार धारण केलेला नव्हता. तरुणपणच्या ताज्या व जोरदार रक्तांत जो एक प्रकारचा अनिवार्य मदांधपणा असतो, आणि त्या धुंदींत विकारवश होऊन मनुष्य पापाचरण करण्यास प्रवृत्त होतो व आपल्या निर्मल यशास बट्टा लावून तोंडास आजन्म काळीमा लावून घेतो, तशा प्रकारच्या दुर्गुणांनीं, देशप्रीति आणि देशाभिमान यांनीं ओतप्रोत भरलेल्या श्रीशिवाजी महाराजांच्या निष्पाप आणि सुनिर्मल अंतःकरणांत बिलकूल प्रवेश केलेला नव्हता. निळोजींची भयंकर सल्ला ऐकतांच भयानें अगदीं गर्भगलित झालेली, व घामानें दरदरून गेलेली ती गरीब बापडी सरदारकन्या व तिची यवन दासी, महाराजांच्या तोंडून आतां काय उद्गार बाहेर पडतात, आणि आपल्या जन्माची व अब्रूची राखरांगोळी होते कीं काय, या चिंतेनें अतिशयित दुःखी आणि अधीर होऊन

महाराजांच्या सुशांत आणि गंभीर चेहऱ्याकडे दुःखाश्रूंनीं भरलेल्या आपल्या त्या हरिण नयनांनीं एकसारखी टकमक पाहूं लागली.

महाराज आश्चर्ययुक्त मुद्रेनें हंसून निळोजींस ह्मणाले "निळोपंत! तुह्मी मला अद्याप ओळखित नाहीं काय? अशा प्रकारें नीच कर्म करून मीं आपल्या कुळास लांच्छन लावावें, असें का तुह्मी मला सांगतां? अहो, असें अकर्म करून दुष्कीर्तीनें आपलें नांव इतिहासांत नमूद करण्याकरितांच माझा जन्म आहे असें तुह्मांला वाटतें? शिव शिव! असें कुकर्म करणारा रौरव नरकांत पडो! निळोपंत, तुमच्या तोंडून काय अभद्रवाणी निघाली ही? अहो, विचार करा. आम्ही असे अन्यायानें विषयसुखाचा उपभोग घेत बसलों तर आमच्या लोकांनां कधीं तरी ऊर्जितावस्था प्राप्त होईल काय? आमची सांप्रतची स्थिति आहे काय, पूर्वीं होती कशी, हें अहार्निश ध्यानांत बाळगून आपली अवनति दूर करून उन्नति करून घ्यावी एवढ्याकरितांच ईश्वरानें आम्हांला निर्माण केलें आहे; तें अशा नीच आचरणानें सिद्धीस जाईल असें तुम्हांला वाटतें? आर्य देश, आणि आर्य लोक यांचा उद्धार करावा एवढेंच फक्त मी जाणतों. मला अशा प्रकारचे चाळे बिलकूल आवडत नाहींत, समजलां? अहो, आपले पूज्य गुरुजी दादाजी हे वारंवार सांगतांना तुम्हीं ऐकलें नाहीं काय, कीं, इंद्रियाधीन पुरुष आपलें स्वतःचें किंवा दुसऱ्यांचें कधींहि कल्याण करूं शकत नाहीं! असें असतां मी इंद्रियाधीन होऊन अन्यथा आचरण करीन असें तुम्हांला वाटलें तरी कसें? तुमच्या तोंडून हे अमंगल शब्द ऐकून मला कसेंसेंच वाटलें!"

निळोपंत ओशाळे होऊन ह्मणाले "पण हें तसेंच अलौकिक रत्न आहे, ह्मणून मीं महाराजांस विनंति केली होती. अशी खुबसुरत सुंदरी लाखांत एखादीच सांपडेल!"

"निळबा, खुबसुरत खुबसुरत काय घेऊन बसलां आहां?" "अहो, आमची माई (जिजाबाई) जर या माईसारखीच रूपसंपन्न असती, तर आम्ही नाहीं का इच्याप्रमाणेंच खुबसुरत झालों असतों?"

ती मुसलमान तरुणी भुईकडे नजर लावून दुःखी आणि भयभीत होऊन एका कोपऱ्यांत उभी होती. तिनें महाराजांचें हें सुधातुल्य प्रेमळ भाषण ऐकतांच तिचें निर्मळ अंतःकरण आनंदातिशयानें सद्गदित झालें. देहभान विसरून, आणि भीडमर्यादा व पडदपोशी सारी एकीकडे गुंडाळून ठेवून एकदम धावत जाऊन महाराजांचे चरणांवर तिनें आपली डोई ठेविली, व दयार्द्र स्वरानें ह्मटलें "ओ मेरे प्यारे भाई, परवरदिगार तेरा भला करेगा!"

त्या बिचाऱ्या तरुणीची ती बापुडवाणी मुद्रा पाहून शिवाजीचा कंठहि गहिंवरून आला. तिला उठवून आणि तिच्या पाठीवरून हात फिरवून महाराज म्हणाले "माई! तूं मला माझ्या बहिणीसमान आहेस. हें घर तुझें आहे. तूं मला आपल्या भावाजागीं समज. येथें तुझ्या केंसालाहि कोणी धक्का लावण्यास समर्थ नाहीं. तूं घाबरूं नको. जा, खुशाल ऐस. लवकरच तुला तुझ्या बापाच्या घरीं पाठवून देऊं."

मरणोन्मुख झालेल्यास अमृताप्रमाणें आल्हाद देणारें हें प्रेमळ आश्वासन मिळतांच त्या मुसलमान तरुणीच्या आनंदास काय विचारतां! तिनें त्या आनंदाच्या भरांत या राजाचें अखंड कल्याण होवो, आणि अल्ला याला उदंड आयुष्य देवो, अशा प्रकारचे कितीतरी आशीर्वाद दिले.

तदनंतर महाराज निळोजीकडे वळून ह्मणाले, "निळोपंत! तुम्ही कष्टी होऊं नका. झालें तें झालें. मी तुमच्यावर रागावलों आहें असें तुह्मी समजूं नका. परंतु 'दुःखावर डाग देण्याजोगें नीच कर्म सहसा कोणींहि आचरूं नये,' असें माझें तुम्हां सर्वांनां मनापासून सांगणें आहे. शस्त्रानें सर्वांगावरहि घाय झालेला शत्रु जगूं शकतो, पण विनयानें—उपकारानें मारलेला मनुष्य कधींहि वांचत नाहीं, हें पक्कें ध्यानांत ठेवा. आपल्या शत्रूचा असा दगलबाजीनें सूड उगविण्यापेक्षां त्याची आवडती कन्या एकंदर द्रव्यासहित सुरक्षितपणें परत करावी, हीच कडक शिक्षा त्याला पुरे, असें मला वाटतें."

असें ह्मणून तेव्हांचे तेव्हां महाराजांनीं त्या तरुणीस आपल्या विश्वासू माणसांच्या ताब्यांत देऊन, लुटीच्या एकंदर ऐवजासह तिला तिच्या बापाच्या घरीं सहीसलामत पाठवून दिली. आपली प्रिय कन्या पुन्हा दृष्टीस पडलेली पाहून तिच्या शोकातुर आईबापांनां किती आनंद झाला असेल, आणि त्यांनीं परमेश्वरापाशीं शिवाजीविषयीं कसें अभिष्ट चिंतिलें असेल, त्याची कल्पना आमच्या वाचकांस सहज करतां येईल.

शिवाजीमहाराज असे जितेंद्रिय आणि नीतिनिपुण होते ह्मणूनच त्यांनीं एवढें प्रचंड राज्य स्थापून आपली कीर्ति दिगंत गाजविली. त्यांनीं आपल्या एकंदर अमदानींत नीतिन्यायाविरुद्ध दगलबाजीनें कोणतेंहि कृत्य केलें नाहीं. मात्र ते प्रसंग पाहून जशास तसें आपलें आचरण ठेवित असत. त्यांनीं दगा देऊन कोणालाहि कधींहि फसविलें नाहीं. आतां "शिवाजी हा चोर, बंडखोर, लुटारू, दगलबाज, खुनशी, क्रूर असा होता," असें आमच्या लहानलहान अर्भकांस आणि विशेषतः मुसलमानांस सांगून, आणि त्याचप्रमाणें "औरंगजेबासारखा क्रूर, छलक, हिंदुद्वेष्टा, जुलमी राजा आजपर्यंत झाला नाहीं," असें हिंदूंस भासवून एकमेकांच्या मनांत एकमेकांविषयीं मुळापासूनच वैषम्य सुरू करण्याची कित्येक इंग्रज इतिहासकारांची 'पॉलिसी' असल्यामुळें त्यांच्या एकतर्फी व पक्षपाती लेखांवर कितपत विश्वास ठेवावा, हें सांगावयास नको. शिवाजीमहाराजांविषयीं जी भलतीसलती माहिती या दीर्घसूत्री लोकांनीं लिहून ठेविली आहे ती अगदीं निराधार, अविश्वसनीय आणि निव्वळ खोटी आहे.

महाराजांच्या या छोट्या परंतु मोठ्या मनाच्या रमणीय गोष्टीवरून पुष्कळ प्रकारें बोध घेण्याजोगा आहे.

# पास कीं नापास ?

एखाद्या परीक्षेच्या निकालाचा दिवस जसजसा जवळ येत जातो तसतशी त्या परीक्षेस बसणाऱ्या उमेदवाराच्या मनाची काय स्थिति होत असते, हें, मला वाटतें, स्वानुभवाशिवाय कळणें कठीण आहे. आणि तशांतून एकदोनदा नापास झालेल्या उमेदवाराची तर जी काय तारांबळ उडत असेल, त्याची इतरांनीं नुसती कल्पनाच करावी !

गेल्या वर्षीं मी बी. ए. च्या परीक्षेला बसलों होतों. दुर्दैवानें या खेपेला यश आलें नाहीं. घरची तर फारच गरिबी, अगदीं आणी-बाणीचा प्रसंग! या वर्षींहि जर का परीक्षेंत खो मिळाला, तर कॉलेजाला, युनिव्हर्सिटीला आणि सगळ्या पोपटपंची विद्याभ्यासाला रजा द्यावी लागणार, अशी रात्रंदिवस माझ्या कानांत गुणगुण होत होती. यंदाहि परीक्षेंत नापास झालों, तर मनांतील साऱ्या थोर आशा पार नष्ट होऊन पोटाच्या सोईकरितां कोठेंतरी गुलामगिरी पत्करण्याचा प्रसंग आपल्या-वर खास येणार, अशी माझी अगदीं पक्की खात्री होती. मग अशा वेळीं माझ्या मनाची काय बरें स्थिति झाली असेल ? शिवाय, ह्यावर्षीं माझ्या आश्रयदात्यानें तर मला अगदीं निक्षून सांगितलें होतें कीं, यंदा नापास होऊन कांहीं उपयोगाचें नाहीं ? आणि परीक्षा तर फारच कठीण झालेली ! एकदोन पेपर तर इतके बिकट गेले होते कीं, त्यांत पास होण्याबद्दल पुष्कळांनां दुभरंवसा ! व त्या 'पुष्कळांत' आम्हीहि पण होतों ! असो.

अखेरीस एकदाचा निकालाचा दिवस आला. या दिवशीं तर मला फारच चिंता उत्पन्न झाली. पास होण्याविषयींची सर्व आशा या दिवशीं अगदीं पार नाहींशी झाली, आणि आपण खात्रीनें नापास होणार, असें वाटूं लागलें. निकाल लागणाऱ्या दिवशीं मी ठाणें येथें होतों. अर्थात् रिझल्ट इकडे मुंबईस लागल्याबरोबर कोणींतरी तार केल्यावांचून मला कळणें शक्य नव्हतें. तार करण्याच्या भानगडींत

पडा, असें मीं कोणालाहि सांगितलें नव्हतें. हो, रिकामी ऐट मारा कशाला ? पास होईन कीं नाहीं याचीच मुळीं शंका, तेव्हां तार निबीर उगीच हवी कशाला ? ह्मणून त्या खटपटींत मी मुळींच पडलों नाहीं ! फक्त ठाण्यांतीलच एका मित्राजवळ माझा नंबर दिला होता व त्याला निकाल पहाण्यासाठीं मुद्दाम जाण्याला सांगितलें होतें.

निकालाच्या दिवशीं मीं लवकरच जेवून घेतलें. कारण, गेल्यासालीं जेव्हां मी नापास झालों तेव्हां मला इतकें कांहीं वाईट वाटलें होतें कीं, त्या रात्रीं जेवलों नाहीं एवढेंच केवळ नव्हे, तर दुसऱ्या दिवशीं दोन वाजेपर्यंतहि मी उपाशींच होतों! दुर्दैवानें यंदाहि जर तसेंच कांहीं घडलें, तर गुदस्तांप्रमाणें फार्स करणें कांहीं बरें नाहीं, असें वाटल्यावरून मीं ती व्यवस्था केली होती.

झालें. संध्याकाळ झाला. माझा मित्र येण्याची वेळहि झाली. सात वाजले, साडेसात झाले, आणि आठांचे ठोकेहि माझ्या कानांवर येऊन आदळले, तरी कोणाचाच ठिकाण नाहीं ! आतां मात्र धडगत नाहीं, असें मला अगदीं खात्रीनें वाटूं लागलें. विचारांच्या तरंगांनीं तर काय अगदीं पिच्छा पुरविला होता! इतक्यांत माझा दुसरा एक मित्र आमच्याकडे आला. त्याच्याजवळ मीं माझा नंबर दिला नव्हता व त्याला त्या दिवशीं मुंबईस जावयाचेंहि पण नव्हतें. तो आला तो एकदम माझ्या खोलींत आला. तेथें पाहतो तों जिकडे तिकडे काळोख ! मी आपल्या विचाराच्या नादांत इतका घोंटाळून गेलों होतों कीं, खोलींत दिवाबत्ती करण्याची मला शुद्धीच नव्हती ! माझा मित्र आल्या-बरोबर त्यानें दिवाबिवा लावला. त्याचें तोंड अगदीं उतरलेलें दिसत होतें. त्याच्या मनांतून कांहीं सांगावयाचें आहे, परंतु त्याच्यानें तसें करवत नाहीं, असें त्याचें तोंडच मुळीं सांगत होतें! त्याच्या मनाची ही चलबिचल पाहून माझ्यानें स्वस्थ बसवेना! मीं म्हटलें "काय नाना! रिझल्ट लागला ?"

"अं—अं—हो—अ—य लागला, असें मला त्या गोविंदरावानें सांगितलें खरें!"

"मी नापास वाटतें?"

"काय—बु—अ—आ सांगतां येत नाहीं! त्यानें तर मला सांगितलें कीं, आपल्या ठाण्यांतला अवघा एकच इसम पास झाला, आणि तोहि तो आपला विनायकराव लघाटे!"

मोठ्या कष्टानें मी ह्मणालों "मग मी नापास हें सांगायलाच तूं इकडे बुध्या आलास वाटतें?"

माझ्या कठोर शब्दांनीं नानास काय वाटलें असेल, हें कळून घेण्याचा त्या वेळीं मीं प्रयत्नच केला नाहीं. बापडा नाना खजील होऊन मागल्यापायीं घरीं गेला, आणि मीहि माझ्या खोलींत एकसारखा शोक करित बसलों. आतां आपल्याला कॉलेज खास सोडावें लागेल; आजवर केलेली सारी उरस्फोड अगदीं पाण्यांत गेली; साधारण सर्वधाशांतच आपला आतां समावेश होणार; आतां वकिलीची तर आशा करावयासच नको, इत्यादि इत्यादि सर्व गोष्टींचें चित्र त्यावेळीं माझ्यापुढें मूर्तिमंत उभें राहिलें. खरोखर, कोठेंतरी तोंड घेऊन निघून जावें, असेंहि वाटूं लागलें! या दिवशींच्यासारखा मला माझ्या जिवाचा कंटाळा आजपर्यंत कधींहि आला नव्हता. मन अतीशयच संतप्त झालें होतें. नऊ झाले असतील इतक्यांत माझा मित्र आला. तो येतांच मीं त्याला एकदम विचारलें "काय बुवा! आमचें नशीब फुटकेंचना?"

"ह्मणजे! तूं नापास झालास कीं काय? कोणीं सांगितलें तुला?"

"तर मग काय मी पास आहें?" मोठ्या उत्कंठेनें मीं प्रश्न केला.

"खरें ह्मणशील, तर मला आज मुळीं तिकडे जावयाची आठवणसुद्धां राहिली नाहीं! पण तुला हें सांगितलें कोणीं?"

त्याची ही लटपटीत सबब ऐकून तर माझी पुरीच खात्री होऊन चुकली कीं, आह्मी नापास झालों खास! परंतु माझ्या मित्रानें आपण तिकडे खरोखरच गेलों नाहीं असें शपथ घेऊन सांगितल्यावरून मला

पुन्हा थोडीशी धुगधुगी वाटूं लागली. नानानें आणलेला निकाल खोटा असण्याचा संभव आहे, असेंहि आतां मला वाटूं लागलें. ताबडतोब रामाला पाठवून मीं नानास बोलावून आणऊं.

“ दुसऱ्या कोणीं सगळा रिझल्ट आणला आहे काय ? ” नाना येतांच त्याला मीं प्रश्न केला.

तो बापडा शरमला होता. मला बरें वाटावें ह्मणून तो दुसऱ्या एकदोन इसमांच्या घरीं रात्रीं साडेदहा वाजतां जाऊन आला, परंतु जाऊन खबर आणली काय ? तर ‘ आम्हांला कांहीं बरोबर माहित नाहीं असें ते ह्मणतात ’ हीच ! ही रडकथा सांगतां सांगतां त्याला तिसऱ्या एका गृहस्थाची आठवण झाली. तो रिझल्टचा कागद आणणार होता; पण आतां रात्रीं अकरा वाजतां भेटतो कसा? हा विचार पुढें आलाच ! अखेरीस तशा रात्रीं त्या गृहस्थाकडे जाण्याचा नानानें निर्धार तर केलाच. मीहि बरोबर गेलों. कर्मधर्मसंयोगानें तो गृहस्थाहि रिझल्टशीट हातांत घेऊन गप्पा मारित बसला होता.

नानानें कागद घेऊन पाहिला तों त्यांत माझा नंबर होता, आणि तोहि सेकंड क्लासांत !

# राणी रूपसुंदरी.

प्रसंगीं धैर्य धरणें मोठें उपयोगी आहे. धैर्य संकटांत साऱ्या विपत्तींचा नाश करून शेवटीं मनुष्याला चांगले दिवस दाखवितें. धैर्यवान मनुष्यास जगांत श्रेष्ठता मिळून तो सुखी होतो. धैर्यानें दुःखाचा लय होतो, व सर्व कांहीं धैर्यानेंच साध्य होतें. महान संकटावस्थेंतहि यत्किंचितसुद्धां न डगमगतां दगडासारखें अंतःकरण घट्ट करून प्राप्त झालेली विपत्ति सहन करून शेवटीं सुखाचे दिवस पाहणाऱ्या अनेक स्त्रीपुरुषांचीं उदाहरणें बहुतेकांस माहित असतीलच. अशा प्रकारच्याच गंभीर, धीर मनुष्यश्रेष्ठांपैकीं राणी रूपसुंदरी ही एक होती.

धैर्याचा केवळ मेरूच अशी ही रूपसुंदरी पंचासरचा राजा जयशिखर याची पट्टराणी होती. कल्याणचा राजा भुवडजी याच्या लष्करानें पंचासर नगरास वेढा देऊन जयशिखराचा अगदीं पराजय केला, आणि लढाईंत त्याला ठार मारिलें. जयशिखरास ठार केल्यावर भुवडजीनें एकंदर राजकुळाचा संहार चालविला. राजघराण्यांतील एकूनएक स्त्रीपुरुषांची आणि बिचाऱ्या निर्दोष लहानलहान कोमल अर्भकांचीसुद्धां त्या मांगहृदयी चांडाळानें मोठ्या निर्दयतेनें कत्तल उडविली. बापड्या रूपसुंदरीची अवस्था यावेळीं काय विचारावी! पूर्ण नवमास भरले असल्यामुळें गर्भाच्या असह्य भारानें श्रांत झालेली ती राजकांता हा भयंकर प्रकार पाहतांच दुस्तर संकटसागरांत अगदीं बुडून गेली! आपल्या प्रिय पतीचा निर्दय वैऱ्यानें घात केला असून राजकुळाचाहि तो भयंकर रीतीनें फडशा पाडीत आहे, हें प्रत्यक्ष स्वनेत्रांनीं पाहतांना तिच्या मनाची स्थिति कशी झाली असावी, याची कल्पना वाचकांनींच करावी! आणखी एकदोन पळांच्या आंत आपल्यावरहि तोच प्रसंग खास गुदरणार असें समजतांच ती अतिशय चिंतातुर व विव्हल तर झालीच, परंतु भयानें गर्भगलित न होतां व त्या मोठ्या आणीबाणीच्या

प्रसंगीं यत्किंचितहि न डगमगतां धीर धरून, मोठें प्रसंगावधान राखून, प्राप्त झालेल्या त्या दारूण प्रसंगांतून राणी रूपसुंदरीनें आपला निभाव करून घेतला. मागेंपुढें न पाहतां व कसल्याहि विचारांत न पडतां तिनें एकदम आपला वेष पालटला, आणि इकडेतिकडे न गुटमळतां तडक एकदम ती बाहेर पडली. राजमंदिरांतून ती जी निघाली ती मध्यंतरी कोठेंहि न थांबतां एका भयाण अरण्यांत येऊन दाखल झाली, आणि तेथें भिल्ल व कोळी लोकांच्या झोंपड्यांत लपून राहून प्राप्त झालेले विपत्तीचे दिवस महत्संकटानें कंठूं लागली. पाठलाग करित असलेला शत्रु आतां घटकेनें गांठून आपल्याला ठार करतो कीं काय, अशा भयंकर चिंतेंत निमग्न झालेली रूपसुंदरी त्या निर्जन वनांत, जेथें व्याघ्र सिंहादि हिंस्र श्वापदांच्या कानठाळया बसवून टाकणाऱ्या भयंकर गर्जना एकसारख्या चालल्या आहेत व त्यांच्या भक्ष्यस्थानीं आपण पडतों कीं काय अशी भीति क्षणोक्षणीं उत्पन्न होत आहे अशा अत्यंत करुणाजनक स्थितींत, पर्वतांच्या आणि जुनाट वृक्षांच्या ढोलींतून लपत छपत मोठ्या संकटानें ती काळ क्रमित असतां आणखीहि एक घोर संकट उद्भवलें. एका काळोख्या भर मध्यरात्रीं, तिला प्रसुतीच्या असह्य वेदना होऊं लागून ती फारच व्याकुळ झाली व थोडक्याच अवकाशांत एक सुंदर पुत्ररत्न प्रसवली.

दैवाची गति कशी विलक्षण आहे पहा! हजारो दासदासी जिचा शब्द झेलण्या[स] सदैव तत्पर असावयाच्या, अशा त्या सार्वभौम राजाच्या पट्टराणीवर, [निर्ज]न वनांत, जेथें बसण्यास धड सपाट जागाहि नाहीं, इतकेंच केव[ळ न]व्हे, तर एकीकडून व्याघ्रसिंहादि हिंस्र पशूंची उडी पडण्याची भी[ति] येऊन ठेपली आहे, व दुसरीकडून पाठलाग करित असलेल्या प्र[त्यक्ष] काळरूपी वैऱ्याची मूर्ति क्षणोक्षणीं डोळ्यांपुढें उभी राहिली [आ]हे, अशा कष्टतर स्थितींत प्रसूतीचा प्रसंग यावा व ती विव्हळ होऊन [वना]ंत एकटी पडावी, यापरती आणखी संकटाची सीमा ती कोठवर [व्हाव]याची? रूपसुंदरी अधीर अंतःकरणाची असती तर

त्या असह्य विपत्तीस कंटाळून उद्विग्न होऊन तिनें जिवाचा त्याग केला असता व आज तिचें नांवसुद्धां कोणाला ऐकूं आलें नसतें. परंतु राणी रूपसुंदरी त्या वर्गांतली नव्हती. स्त्रीजातीस खरोखरच ती एक भूषणभूत होऊन गेली. वैऱ्याचेंहि अंतःकरण हळहळेल अशा त्या महान करुणाजनक स्थितींतसुद्धां ती न डगमगतां आपल्या पुत्राचें तें अनुपमेय तेजस्वी मुखकमल पाहून कृतार्थ झाली, आणि आनंदित होऊन हाच आपला धीर असें समजून सर्वस्वी परमेश्वरावर भरंवसा ठेवून मोठ्या धैर्यानें कालक्रमणा करूं लागली.

मध्यान्हींचा जठराग्नि शमविण्याकरितां भिल्ल कोळ्यांच्या घरीं मोलमजुरी करण्याचा प्रसंग राणी रूपसुंदरीसारख्या सार्वभौम राजाच्या पट्टराणीवर यावा, हें अत्यंत शोचनीय तर खरें; परंतु राणी रूपसुंदरी त्याबद्दल कधींहि कष्टी झाली नाहीं. ती मनांत नेहमीं ह्मणत असे कीं, " ईश्वरास जें आवडलें त्याला आपण कधींहि कंटाळतां कामा नये. तो जें जें कांहीं करितो तें तें न्यायाला अनुसरूनच करित असतो. आपल्या दृष्टीनें जरी तें वाईट दिसत असलें, तरी तें चांगलेंच असलें पाहिजे व आपण त्याच्यावर भरवंसा ठेवून त्याच्या इच्छेस मान्य झालें पाहिजे. " असा पोक्त विचार करून प्राप्त स्थितीविषयीं उदास न होतां तिनें मोठ्या काळजीनें आपल्या मुलाची जोपासना केली. हळुहळू त्या बालराजकुमाराचें तेज शुक्लपक्षांतल्या चंद्रकलेप्रमाणें प्रकाश पावत गेलें व अल्पावकाशांतच वनराज या नांवानें प्रख्यातीस येऊन तो मोठा पराक्रमी राजा झाला, आणि आपल्या बापाच्या वैऱ्याचा सूड उगवून त्यानें वडिलांची गादी पुन्हा प्राप्त करून घेतली. वनराजानें पुढें अणहिलपुर पाटण हें शहर वसवून ती आपली राजधानी केली व अनंत संकटें आणि कष्ट सोसून परमेश्वरावर भरिभार ठेवून धैर्यानें कालक्रमण केलेल्या आपल्या मातोश्रीस आनंदवून त्यानें मोठ्या ऐश्वर्यानें एकंदर राज्यकारभार चालविला, आणि संकटांत न डगमगतां प्रसंगीं धैर्य धरिल्यानें शेवटीं सुखाचे दिवस कसे येतात हें एकंदर जगाच्या निदर्शनास आणून

मातुश्री महासाध्वी श्री जनकनंदिनी हीहि मोठी धैर्यशालिनी होती. महादुष्ट दशाननानें पापबुद्धीनें तिचें हरण केलें, त्या प्रसंगीं अशोकवनांत या महा पतिव्रतेनें अंःतकरण दृढ करून जें प्रशंसनीय धैर्य व्यक्त केलें, त्याबद्दल एकंदर लोक अद्यापपर्यंत चकित होत आहेत. त्याप्रमाणेंच निषेधेश्वर पुण्यश्लोक नलराज याची पत्नी जगविख्यात पतिव्रता श्री दमयंती हीहि एक खरोखर मोठ्या धीराचीच बायको होती. नलानें भर मध्यरात्रीं तिचा अवचित त्याग केला असतां महा विपत्ती व दुःखें कंठून, कित्येक दिवसपर्यंत रानावनांतून भ्रमण करित करित मोठ्या संकटानें ती आपल्या बापाच्या नगरीं गेली, आणि शेवटीं पतीचा लाभ होऊन सुखाप्रत पावली.

धीर स्त्रियांचीं अशींच आणखीहि अनेक उदाहरणें आहेत. प्रसंगीं न डगमगतां धैर्य धरून कालक्रमण केलें असतां साऱ्या विपत्ति नष्ट होऊन शेवटीं त्याचा परिणाम चांगलाच होतो, हें या अल्प कथानकांवरून कळून येतें, व तेंच आपण गृहण केलें पाहिजे. जेव्हां जेव्हां आपल्यापुढें विपत्ति उभ्या राहतील व आपण अगदीं गलित होऊं, तेव्हां तेव्हां जर राणी रूपसुंदरीसारख्या स्त्रीश्रेष्ठांच्या चारित्रांकडे आपलें लक्ष्य जाईल तर त्याचा परिणाम कांहींतरी चांगला झाल्याविना रहाणार नाहीं.

# अभिमान.

" गडे, आपलं प्रेम सदोदित असंच राहील तर आपण किती बरं सुखी होऊं! देवा, आमच्या प्रेमांत कधींहि ताटातूट करूं नकोस, एवढंच माझं तुझ्याकडे पदर पसरून मागणं आहे."

वाचक हो, त्या प्रसंगाची आठवण होतांच माझें सर्व शरीर कसें रोमांचित होतें! माझी हृदयरंजिनी प्राणवल्लभा रमा, माझ्या गळयांत हात घालून प्रेमयुक्त शब्दांनीं याप्रमाणें वारंवार बोले, आणि वेळोवेळीं मीहि तिला धीर देत असें कीं, " रमे, तुला वाटतें काय, कीं, माझें प्रेम तुझ्यावरून कधीं तरी कमी होईल ह्मणून? खचित सांगतों, तूं जवळ नसलीस ह्मणजे मला एकेक पळ युगाप्रमाणें भासतें. तुझ्या सहवासासारखें प्रिय मला या जगांत दुसरें कांहींहि नाहीं! पूर्वजन्मीं मीं असें कोणतें महत्पुण्य केलें होतें नकळे, कीं, तुझ्यासारखें सद्गुणी स्त्रीरत्न मला लाधलें आहे!" आणि नंतर आह्मी उभयतां प्रेमरसांत तल्लिन होऊन क्षणभर इतर स्मृति विसरून जाऊं!

आमचें लग्न होऊन फक्त एक वर्षच झालें होतें. रमेची आणि माझी लग्नापूर्वीं पुष्कळ दिवसांपासून प्रीति जडली होती. आह्मी उभयतां लहानपणापासूनच एका जागींच वाढलोंखेळलेलों. आह्मां उभयतांचीं घरेंहि जवळ जवळच होतीं. माझे सासरे गोविंदराव आणि आमचे बाबा बाळस्नेही असून 'एकाच ऑफिसांतील नोकर असल्यामुळें उभयतांचा पुष्कळ वर्षांपासून अगदीं घरोबा असे. त्याचप्रमाणें रमेची आई आनंदीबाई इचा आणि आमच्या आईचा स्नेहहि घनदाट होता. कोणी ह्मणेल जशा सख्या बहिणीच! जेवणखाण आटोपतांच उभयतांनीं कशिदा वगैरे काढित किंवा कांहींतरी वाचित जें बसावें, तें अगदीं स्वयंपाकाची वेळ होईपर्यंत एकमेकींस सोडून जाऊं नये! गोविंदरावांस जशी एकुलती एक रमाच होती, तसाच मीहि माझ्या आईबापांचा एकुलता एकच होतों. दोघांहि मातापितरांचें आपापल्या लेंकरांवर

अप्रतिम प्रेम असे. माझ्या आणि रमेच्या वयांत पांचसहा वर्षांचें अंतर असल्यामुळें उभय स्नेह्यांनीं परस्पर व्याही बनण्याचा मूळपासूनच संकेत करावा, हेंहि स्वाभाविकच होतें. गोविंदराव मला नेहमीं जांवई-बुवा या नांवानें हांक मारित आणि माझी आईहि रमेला सूनबाई असें कौतुकानें ह्मणे. यामुळें लहानपणापासूनच आमच्या ठायीं परस्परांविषयीं साहजिकच प्रेमांकुर उत्पन्न झाला होता. वाचक हो, तुमचें कसेंहि मत असो, प्रौढविवाहाचें तुम्ही खुशाल हवें तेवढें माहात्म्य गा, पण माझ्या स्वतःच्या अनुभवावरून मी बिनदिक्कत सांगूं शकतों कीं, बाळ-पणीं विवाहसंकेत झाल्यापासून दम्पत्यामध्यें जसें अकृत्रिम प्रेम वसत असतें तसें इतर विवाहांत क्वचितच आढळेल ! हा माझा नवरा व ही माझी बायको असा लहानपणापासूनच मुलामुलींच्या मनाचा निर्धार झाल्याच्या योगानें त्यांच्या मनाची बिलकूल चलबिचल होत नसते व तीं आपापल्या ठिकणींच तुष्ट असतात. असो. ह्या वादाशीं मला या ठिकाणीं कांहीं कर्तव्य नाहीं. आपली गोष्टच मला पुढें चालवूं द्या.

रमेचा आणि माझा बाळपणापासून स्नेह जडल्यामुळें आह्मी परस्परांस जीवप्राण करित असूं. रमा जवळ नसली तर मला कांहींएक सुचूं नये व मी जवळ नसलों ह्मणजे रमेचीहि तीच अवस्था व्हावी. याप्रमाणें लग्न होण्याच्या अगोदरपासूनच आह्मां उभयतांनां परस्परांचा लळा लागला होता. माझा मराठीचा अभ्यास आटोपतांच मी हायस्कुलांत व तदनंतर कॉलेजांत जाऊं लागलों. रमाहि मराठी संपवून इंग्लिश शिकूं लागली. घरीं रमेचा शिक्षक मीच असें. आणि तिला शिकवितांना मला मोठा हर्ष वाटे. माझी मैत्रीण ह्मणून मी तिला मोठ्या आस्थेनें शिकवीं व तीहि मोठ्या उत्सुकतेनें माझ्यापाशीं बसून अभ्यास करी. लवकरच ती म्याट्रिकची परीक्षा पास झाली, व मीहि इतक्यांत बी. ए. ची डिग्री घेऊन कॉलेज सोडलें. आमचा शिक्षणक्रम पुरा झाला असें आमच्या आईबापांनां वाटतांच त्यांनीं गुदस्तांच मोठ्या थाटानें आमचें लग्न केलें होतें. त्या दिवसापासून आह्मीं उभयतांनीं आपले दिवस जसे

आनंदांत घालविले, त्या आनंदाची नुसती कल्पना, मला वाटतें हजारांतून एकतरी करूं शकेल कीं नाहीं याचा संशयच आहे! भरपूर संपत्ति, प्रेमळ आईबापें, निरोगी प्रकृति, तरूण वय आणि सुंदर, सद्गुणी व सुविद्य भार्या, इतक्यांचा मला एकसमयावच्छेदेंकरून लाभ झाला असल्यामुळें मी माझ्यासारखा भाग्यवान त्रिभुवनांत कोणीहि नसेल असें समजत होतों. परंतु हाय हाय! तें आमचें सुख चिरकाळ टिकलें नाहीं! लवकरच त्याचा भंग झाला!

एके दिवशीं दुपारीं चार वाजण्याच्या सुमारास संस्कृत शाकुंतल नाटकांतील कांहीं भाग मी मोठ्या प्रेमानें रमेस समजावित होतों. वाचतां वाचतां कण्वऋषींच्या आश्रमाहून ऋषीशिष्यांबरोबर पुत्रासमवेत शकुंतला दुष्यंत राजाच्या नगरींत आली आहे, हा कथाभाग आला. या ठिकाणीं दुष्यंतानें शकुंतलेशीं केलेल्या अनुचित आचरणासंबंधीं आह्मां उभयतांत तक्रार चालू झाली. मीं दुष्यंताचें वकीलपत्र घेतलें व रमेनें शकुंतलेचा पक्ष उचलला. घटकाभर आह्मी दुष्यंतशकुंतलाच बनलों ह्मणाना!

“खरोखर!” रमा आवेशानें ह्मणाली “तुह्मा पुरुषांसारखे कठोर हृदयी कोणीहि नाहींत! बापड्या भोळ्या शकुंतलेला त्या मेल्यानें नाहींनाहीं ती मोहिनी घालून फशीं पाडली व आज तोच निलाजरा तिच्याशीं असा अधमपणा करितो आहेना? धिक्कार असो तुह्मा पुरुषांच्या स्वभावाला!”

या वेळीं रमेला खरोखरच स्फुरण चढलें होतें; आणि मीहि गप्प बसतों थोडाच! मुळापासूनच माझा स्वभाव आपलें ह्मणणेंच खरें ठरविण्याचा अर्थात् थोडासा हेकेखोर होता. रमेचें मी थोडेंच चालूं देणार! डोळे लाल करून मी ह्मणालों “नाहीं नाहीं, तुह्मी बायकाच मोठ्या दुष्ट आहां! दुष्यंतानें घटकाभर अविचार केला ह्मणून त्या दुष्टेनें त्याला हवें तसें टाकून बोलावें? भर सभेंत त्याचा पाण-उतार करावा? दुष्यंताच्या जागीं मी असतों तर तेथल्या तेथेंच त्या चांडाळणीला ठार केली असती!”

"आपणहि त्याच माळेचे मणी !" रमा किंचित् विनोदानें पण टोंचून बोलली.

"खबरदार जास्त बडबडशील तर! होय होय, मीहि त्यांतलाच आहें, समजलीस ?" मी रागानें ह्मणालों.

"मला नाहीं बाई असलं बोलणं खपायचं!" मानी रमा रडकुंडें तोंड करून ह्मणाली. "मेला मजकडून अपराध तो कसला घडला आणि इतकं रागवायचं तें काय ह्मणून ?" असें ह्मणून खरोखरच ती डोळे पुसूं लागली.

माझी तब्यत ( मनांतून नव्हे हो ! बाहेरून ) अधिकच गरम झाली व त्या रागाच्या भरांत मी तिच्या मनास झोंबण्यासारखे आणखीहि कित्येक शब्द बोलून गेलों. उभयतांचाहि स्वभाव मानी! दोघांनींहि आजपर्यंत कोणाकडूनहि कधीं सट् कीं फट् ह्मणून घेतलें नव्हतें; तेव्हां माघार घेण्यास कोणींहि तयार न व्हावें, हें स्वाभाविकच होतें. रमेनें एकीकडे तोंड करून ती डोळे पुसूं लागली व मीहि हातांत उगाच पुस्तक धरून दुसरीकडे पुढा केला. ही कुरापत आह्मा दोघांमध्यें पहिलीच होती, यामुळें ती आह्मांला फारच कठीण वाटूं लागली. एखादे वेळीं उभयतांची परस्पर नजरानजर होतांच आह्मीं उभयतांनींहि तिरस्कारयुक्त नजरेनें दुसरीकडे पुढा करावा; याप्रमाणें बराच वेळ लोटला. माझ्या डोक्यांत जेवढा ताठा भरला होता तेवढाच रमेच्या डोक्यांतहि होता. ती वाट पहात होती कीं, मी माझ्या अपराधाबद्दल तिच्यापाशीं क्षमा मागेन नंतर आपण बोलूं. मीहि मनांत समजत होतों कीं अखेरीस थकून तीच माझी समजूत करावयास येईल व मग आपण तिची माफी मागूं. याप्रमाणें बराच वेळपावेतों हूं कीं चूं केल्यावांचून आह्मी दोघेंहि आपापल्या कुऱ्यांतच राहिलों. आह्मीं उभयतां मोठ्या, कुऱ्यानें एकमेकांकडे दृष्टि जातांच जरी तोंड फिरवित होतों, तरी आंतून आमची स्थिति कशी होत होती, हें आमचें आह्मांलाच ठाऊक.

झालें. घड्याळांत पांचांचे ठोके पडले. "रमा, खालीं ये बाळ ! ह्या पहा आनंदीबाई तुला भेटायला आल्या आहेत," असे माझ्या आईचे शब्द ऐकतांच "आल्यें," असें ह्मणून पदरानें डोळे पुशित व रागानें मजकडे नजर फेंकित रमा खालीं गेली.

आमचा हा ताठा दिवसेंदिवस वाढतच गेला. एक दिवस झाला, दोन झाले, चार, आठ, पंधरा हळु हळू महिनाहि होत आला, तरीहि दोघांतून कोणीच माघार घेईना ! जिला दररोज तास दोन तास संगतीं घेऊन मोठ्या प्रेमानें कांहींना कांहीं शिकविण्याचा माझा नित्य क्रम असे, जिच्याशीं हास्यविनोद केल्यावांचून माझें एक पळहि गेलें नाहीं, व जिच्या सान्निध्यानें मला अपरिमित आनंद होई, ती माझी प्रिय रमा आतांशा खोलींत पाय व ठेवीनाशी झाल्यामुळें माझ्या अंतःकरणाची स्थिति काय झाली होती, ह्याची वाचकांस अनुभवाविना कधींहि कल्पना व्हावयाची नाहीं. मी नेहमीं उदास झालेला असें. कोणा एखाद्यावर महान दुःख येऊन कोसळल्यामुळें त्याच्या अंतःकरणाची जशी स्थिति व्हावी, तद्वत् माझी अवस्था झाली होती. अन्नपाणी मुळींच गोड लागेना. एकांतामध्यें मी नेहमीं उसासे टाकीं, हळहळें, पण ताठा ह्मणून सोडला नव्हता! रमा माझ्या खोलींत यावी, तिच्याशीं विनोदपर भाषण करावें, तिला कांहींतरी नवीन शिकवावें, अशी मनांतून फार इच्छा, पण तसें घडावें कसें ? तीहि माझ्यापेक्षां अभिमानी ! 'बापसे बेटा सवाई' ह्मणतात, तशांतली गत. बरें, तिची तरी माझ्या समागमाविषयींची उत्कंठा कमी झाली होती, असें मुळींच नाहीं. आणि कशी होईल? स्वयंपाकघरांत किंवा दिवाणखान्यांत एकलीच बसून तासांचे तास डोळे पुसतांना मी तिला कैक वेळां पाहत होतों, पण दुष्ट ताठ्याचा अम्मल दोघांवरहि भरपूर होता.

आमचा हा रुसवा आतां घरांतील सगळ्या मंडळींसहि कळला होता. माझ्या आईनें व मामींनें असें घडण्याचें कारण रमेला खोदूनखोदून विचारल्यावरून तिनें भीत भीत खरा प्रकार सर्वांनां विदित केला. त्यांनां

फार वाईट वाटलें; परंतु या बाबींत माझ्याशीं कोणींहि चकार शब्द काढला नाहीं. तरी आमचा लवकर समेट व्हावा, अशाविषयीं कोणतीतरी युक्ति योजण्याचा त्यांचा एकसारखा बेत चालला होता. अखेरीस आमच्या मामीनें आपल्या नवऱ्याकडून मला आपल्या घरीं एक दिवस जेवायास बोलावून नेलें. सासरचें आमंत्रण आणि आईचा व बाबांचा जाण्याविषयीं मला फार आग्रह. त्यांनीं तसा घाट बुध्याच जमवून आणला होता. करतां काय, निमूटपणें गेलों. जेवणाचा थाट अपूर्व होता. आतां जाऊन पाटावर बसणार इतक्यांत आमची आई दारावर येऊन उभी राहिली. माझे श्वशुर गोविंदराव, मी व रमा दिवाणखान्यांतून माजघरांत येत होतों; परंतु आईनें दार अडविलें, ती पुढें जाऊं देईना! गोविंदराव ह्मणाले "काय पार्वतीबाई! तुमचं ह्मणणं तरी काय? आह्मांला भूक लागली आहे, सोडा एकदा वाट!"

"ह्मणजे! तुम्ही कोण तें सांगितल्यावांचून का जेवायला जाणार? नांव सांगायला लाजतां कां? सांगा, अन् जा!"

"असें होय? विष्णूपंत, करा बुवा मातोश्रींची हौस पुरी. आपल्या तोंडून सुनेचें नांव ऐकावें अशी त्यांची इच्छा आहे. हं, आटपा बघूं कसें लवकर! दहा झाले, मग उशीर होतो!" गोविंदराव मला अनुलक्षून ह्मणाले.

"ह्मणजे? तुह्मी तरी बरे सांगतां जांवईबुवांनां!" रमेची आई ह्मणाली. "पुरुषांनीं का अगोदर बायकोचं नांव घ्यायचं? अगोदर तुमच्या लेकीकडूनच सुरुवात झाली पाहिजे!"

"बरें आहे, तसें का होईना! रमा, सोड आह्मांला झटपट. नवऱ्याचें नांव घ्यायला लाज ती कसली? घे सगळ्यांसमक्ष! सासूबाई सांगत आहेत." गोविंदराव कौतुकानें ह्मणाले.

लाजत लाजत होय नाहीं करित मोठ्या आवडीनें रमा ह्मणाली "पायांत तोडे चालूं कशीं, गळ्यांत हार लवूं कशी, नि विष्णुपंत विनाकारण रुसले त्यांची मर्जी राखूं कशी?"

आतां अर्थात् आमची पाळी आली. माझ्या तोंडांतून कांहींकेल्या शब्द निघेना. माझी आई, मामी आणि गोविंदराव, मी कसें आवडीनें नांव घेतों तें ऐकण्यास अतिशय उत्सुक झालीं होतीं. पण मला तर अधिकाधिकच संकोच वाटूं लागला. शेवटीं नाइलाजानें "रुप्याची पंचपात्री झोंकून देवोत का फेंकून देवोत, परंतु माझ्या रमेचे भलतेच ढंग लवकर जावोत!" असें मीं हंसत हंसत ह्मटलें.

मी हें माझ्या मतें विनोदानें बोललों होतों; परंतु त्यापासून कोणा-एकासच समाधान झाल्याचें दिसलें नाहीं. रमेचे तर पाय खचल्या-सारखेच झाले, तोंड काळेंठिक्कर पडलें, व तिनें मान खालीं घातली.

अरेरे, मी केवढा चांडाळ, घातकी! मला दुष्टाला त्यावेळीं कांहींच कल्पना झाली नाहीं कीं, या माझ्या वर्मी भाषणानें बिचाऱ्या रमेच्या अंतःकरणास केवढी जबर दुखापत होईल ती! तिच्या गुलाबी गालांवरील रक्तिमा एकदम उडून गेला व हरिणीप्रमाणें मोहक अशा तिच्या नेत्रांतून लगेच खळखळ अश्रुप्रवाह सुरू झाला. मला हें पाहून अतिशय वाईट वाटलें. पण त्याचा काय उपयोग!

जेवणखाण उरकलें, सर्व मंडळी आपापल्या कामास लागली. मीहि घरीं आलों. पण रमा अत्यंत उदास झाली. आतां आपल्याला सुखाचे दिवस लाधणें कठीण होय, असा मनाचा निर्धार करून ती फारच दुःखी झाली.

मला आतां पुरती शिक्षा मिळाली होती. माझें मन मला खाऊं लागलें. जिवास एकसारखी हुरहुर लागली. कसेंहि करून रमेचें सांत्वन करावें व तिला संतुष्ट करावी, असा मीं निश्चय केला. गांवांत नुकतीच किर्लोस्कर संगीत मंडळी आली होती व मंडळीच्या लोकप्रिय सौभद्र नाटकाची वाखाणणी घरोघर होत होती. आमच्या बाबांनींहि घरांतील मंडळीस एकदा नाटक दाखवून ये, ह्मणून मला सांगितलें होतें. आतांशा आमच्या येथें गांवाहून माझी मामे बहीण कृष्णा व मावस बहीण यमुना आली होती. नाटक मंडळींतल्या एका इसमाची व माझी

कॉलेजांतली ओळख होती व त्यानें आज बुध्या मला रिझर्व्हड् बॉक्सच्या चार तिकिटा पाठविल्या होत्या. ही संधी छान आहे, असा मीं स्वतःशीं विचार केला व दोन तिकिटा खिशांत घालून दोन हातांत घेऊन दिवाणखान्यांत जेथें कृष्णा, यमुना व रमा एका कोचावर कांहीं वाचित बसल्या होत्या, तेथें गेलों.

"आजचें नाटक मोठें मजेदार आहे हो ! कोल्हापुरचे महाराज आज खेळ पहावयास यावयाचे असल्यामुळें तर आज खूप भपका करण्यांत येणार आहे. चला, आज कोण कोण येणार?" दोन तिकिटा दाखवून मीं प्रश्न केला.

कृष्णीनें आणि यमूनें हात वर केला व मीं एकेक तिकीट त्यांच्या हवालीं केली. रमा किंचित् खालीं मान करून परंतु टंवकारून मजकडे पहात होती. नंतर तिच्याकडे पुढा करून मी चावत चावत ह्मणालों " दुसरें कोणी येणार आहे? माझ्याजवळ अजून दोन तिकिटा आहेत!" असें ह्मणून खिशांतून एक तिकीट काढून ती मीं रमेच्या हातांत दिली.

पण रमा यावेळीं फारच खवळली होती. तिकीट हातांत मिळतांच तिचा चुराडा करून मोठ्या फणकाऱ्यानें तिनें ती कोनांत फेंकून दिली व वाघिणीसारखी क्रुद्ध मुद्रा करून ती मजकडे पाहूं लागली. मी दंगच होऊन गेलों ! माझे पाय लटलटूं लागले. अत्यंत खजील होऊन नंतर मी तेथून चालता झालों. त्या दिवशीं कसलें नाटक आणि कसलें काय! ही गोष्ट घडल्या दिवसापासून तर मला रमेचें दर्शनहि बंद झालें. सतत तीन महिने आह्मी दोघेंहि मनांतल्या मनांत एकसारखीं झुरत होतों.

एक दिवस जेवणखाण आटोपल्यावर मी सहज शतपावली करित होतों, इतक्यांत पोष्टाच्या शिपायानें माझ्या हातांत एक लखोटा आणून दिला. त्यांत सेक्रेटरीच्या आफिसांत १५० रुपये दरमहाची मला नोकरी मिळाल्याबद्दल मजकूर असून आजच्या आज ११ वाजतां कामावर हजर होण्याविषयीं हुकूम होता. ही खबर ऐकतांच सर्व मंडळीस फार आनंद झाला. लगेच मी जाऊन कामावर रुजू झालोंहि, परंतु

माझ्या मनाला कांहीं ह्मणण्यासारखें समाधान झालें नाहीं. मनांतून मी अत्यंत खिन्न झालों होतों. पांच वाजतांच कष्टी मुद्रेनें घरीं परतलों. बाहेरून घरीं पाय टाकतांच माझ्या खोलींत जाण्याचा माझा क्रम असे व याच ठिकाणीं माझी रमा माझ्या येण्याची मोठ्या उत्सुकतेनें वाट पाही; परंतु आतांशा त्या सुखास मी अंतरलों होतों. असो. घरांत येतांच मी जिन्यावरून धडधड पाय वाजवित माझ्या खोलींत गेलों. मन फार उद्विग्न झालें होतें. मनांत वाटलें कीं, आजच्या या आनंदाच्या दिवशीं माझी प्रिया माझ्यापाशीं येऊन बसली असती, तर मला किती समाधान वाटलें असतें ! मला मोठ्या पगाराची नोकरी मिळाल्याबद्दल तिला केवढा आनंद झाला असता? अरेरे, तें सुख आज माझ्या दैवीं नाहींना ? असा विचार करून कष्टी मुद्रेनें कपाळावर हात टेंकून उसासे टाकित बसलों आहें, इतक्यांत टेबलावर एक सुंदर तुरा आणि त्याच्या शेजारींच एक पत्र माझ्या दृष्टीस पडलें. पत्र उचललें तों तें माझ्या नांवचेंच होतें. उघडून पाहिलें तों माझ्या प्रियेचें सुंदर हस्ताक्षर दिसून आलें. त्यांत पुढीलप्रमाणें लिहिलें होतें:—

" प्रिय प्राणनाथ,

आपल्या सुखाचीं सुंदर स्वप्नें जीं मला पूर्वी वारंवार पडत होतीं, त्यांना आतांशा मीं अगदींच मुकलें आहें! ही चांडाळीण आपल्या मर्जीतून उतरली आहे. मी जाणत आहें कीं, त्याचा सगळा दोष माझ्याकडेसच आहे. माझ्या सहवासानें आपल्याला आतां सुखप्राप्ति होण्याची कांहींच आशा राहिली नाहीं. माझ्या दुष्टपणाच्या वर्तनानें आपल्याला आणखीहि दुःखी करण्याची माझी इच्छा नसल्यामुळें मी आज माहेरीं कायम राहण्यास गेलें आहें. मज अभागिनीशीं संबंध करण्याऐवजीं आपण दुसऱ्या कुणास वरलें असतें, तर खचित सुखी झालां असतां. पण दैवयोग विचित्र असल्यामुळें आपल्याला दुःख देण्याकरितांच ही चांडाळीण आपल्या पदरीं पडली ! आजपर्यंत मीं आपल्याला पुष्कळ दुःख दिलें त्याबद्दल मला फार वाईट वाटतें व अंतःकरणापासून मी आपली क्षमा

मागतें. माझ्या दैवीं देवानें सुखाचे दिवस लिहिलेच नाहींत! पण देव आपल्यास सुखी ठेवो, एवढेंच आपला शेवटचा निरोप घेतांना मीं त्याजपाशीं मागणें मागतें.

आपली
एक वेळ लाडकी असलेली,
पण सांप्रत नावडती
**रमा.**"

रमेचें तें पत्र वाचतांच माझ्या अंतःकरणाची जी काय स्थिति झाली तिचें वर्णन करणें अशक्य आहे! डोळ्यांतून घळघळ अश्रु वाहूं लागले. कागद खालीं पडला व एकदम डोळ्यांपुढें चक्कर आल्यासारखें होऊन मी जवळच्या कोचावर अंग टाकलें. थोड्या वेळानें सावध होतांच मी स्वतःशीं बडबडूं लागलों "रमे! अग म्यां दुष्टानें तुझा किती छळ केला? तुझा यत्किंचितहि वांक नसतां तुझ्याशीं मी केवढ्या निष्ठुरतेनें वागलों? तुझ्याशीं केवढा दीर्घ अबोला धरला? अरेरे! म्यां दुष्टानें तुझ्या मनाला केवढी भयंकर जखम केली? माझ्यासारखा घातकी कोणीहि नसेल! रमे! आतां मी तुला कोणच्या तोंडानें बोलावून आणूं? मला सोडून तूं गेलीसना? माझा तुला इतका राग आला? कां न यावा? म्यां चांडाळानें तुझा काय थोडा छळ केला आहे? तुझ्यावांचून मला सगळें व्यर्थ आहे! तूं लवकर ये! रागावूं नको! हा बघ मी तुझ्या पायां पडतों, मला क्षमा कर!"

त्या दुःखाच्या भरांत मी याप्रमाणें स्वतःशींच बडबडत आणि डोळ्यांतून एकसारखे अश्रु गाळित आहें तोंच "गडे!" असा मंजुळ ध्वनि माझ्या कानीं आला. चकित होऊन पाहतों तों रमा माझ्यापुढें उभी! एकदम तिला दृढालिंगन देऊन गाहिंवरून मी ह्मणालों:—

**"मज बहु कथीं तव करपाशीं सखि! कोपें न कधीं तिळ तुजशीं!**
**आनंदसिंधु निर्जल झाला, पाहुनी सखे! त्वत्खेदाला!**
**अविचारी माझें हें हृदय तुजशीं झालें गे किति अदय!**
**बोललों शब्द तुज कोपानें, तो मातें किति अनुतापाने!**

या क्षमा करीं अपराध्याला! हा बद्ध तुझपुढें लीन झाला!
एका शब्दें त्वत्प्रीतिलता सखि! दूर न होऊं देउं अतां!
तुजविणें राहतां आयुष्य होईल सर्वथा दुःखमय!
तीं सुखें सखे! माझीं सगळीं राहती येउनी तुजजवळीं!
अभिमान शिकिव मज जिंकाया, दुखविलें जयानें तुज वायां!
सखि! हास्य करीं तूं मजसंगें, दूर कां अशी जाशी रागें?
मज बद्ध करीं तव करपाशीं सखि! कोपें न कधीं तिळ तुजशीं!
आनंदसिंधु निर्जल झाला पाहुनी सखे! त्वत्खेदाला."

रमेनें लवकरच सगळ्या गोष्टींचा खुलासा केला. "माहेरीं जाण्याचा निश्चय करून हा तुरा व पत्र टेबलावर ठेवित्यें आहें, इतक्यांत जिन्यांत आपले पाय वाजले. त्याबरोबर घाबरून पत्र तसंच टाकून मी या कोचाखालीं लपल्यें होतें. पुढील प्रकार इकडे ठाऊकच आहे!"

# निरभिमानता.

निरभिमानता हा कुलीन मनुष्याचा लाक्षणिक गुण आहे. अकुलीन मनुष्य संपत्ति आणि अधिकारमद यांनीं उन्मत्त होतो. आपल्याहून कमी दर्जाच्या मनुष्याशीं संभाषण करणें, किंवा त्याच्याशीं सहवास करणें, हें त्याला आपली योग्यता कमी करून घेण्यासारखें वाटतें, व ह्मणून या लोकांपासून तो नेहमीं लांब लांब रहाण्याविषयीं प्रयत्न करित असतो, त्यांचा तिरस्कार करतो; परंतु जात्या जे कुलीन असतात, कित्येक पिढ्यांपर्यंत ज्यांच्या घरीं लक्ष्मी नांदत आलेली असते, व जे मनाचे खरे थोर व श्रेष्ठ असतात त्यांच्या ठायीं ही अहंता मुळींच वास करित नाहीं. दुसऱ्याशीं ममत्वबुद्धीनें वागण्यांत त्यांना कमीपणा वाटत नाहीं, किंवा त्या वर्तनानें त्यांची मानहानीहि पण होत नाहीं. अशा प्रकारच्या कुलीन पुरुषांपैकींच जर्मनीचे बादशाह दुसरे जोसफ हे एक होते.

दुसरे जोसफ इ. स. १७८९ च्या जुलै महिन्यांत कांहीं कारणानिमित्त ब्रुसेल्स शहरीं गेले होते. दररोज सांजसकाळ मोकळ्या हवेवर जाण्याची त्यांची संवय असे. एके दिवशीं सायंकाळीं साडे सहांचा सुमार झाला होता. आपल्या दोन घोड्यांच्या गाडींत बसून जोसफ बादशहा शहराकडे परत येत होते. इतक्यांत असा सोसाट्याचा तुफानी वारा सुटला कीं, रस्त्यावरून चालण्याची सोय राहिली नाहीं. हांहां ह्मणतां मुसळधारांनीं पाऊसहि पडूं लागला व अगदीं थोडक्या वेळांत जिकडेतिकडे चिखल होऊन गेला. जोसफ बादशहा लोंकरीचे गरम कपडे अंगाभोंवतीं गुरफटून गाडीच्या एका कोंपऱ्यांत स्वस्थ बसले होते. गाडी आस्ते आस्ते चालली होती. थोड्याशा अंतरावर ती येतांच एका झाडाशीं थंडीनें कांकडत असलेला एक गृहस्थ धापा टाकित टाकित त्या गाडीपाशीं आला. तो अगदीं कंगालावस्थेंतील असावा असें त्याच्या चर्येवरून दिसत होतें. साधेच व तेहि जीर्ण कपडे त्याच्या अंगावर होते. दारिद्र्याचा पूर्ण कृपाप्रसाद त्याच्यावर असून शिवाय वृद्धावस्थेस येऊन

पोंचला असल्यामुळें तो अगदीं अशक्त झाला होता. यावेळीं त्याची स्थिति अगदीं बापुडवाणी दिसत होती. अशा भयंकर वादळांतून सुरक्षितपणें घरीं जाणें त्याला बरेंच अवघड होतें, व कोणाच्या तरी मदतीची तो वाट पहात होता. त्याच्या दृष्टीस ही गाडी पडतांच काठी टेंकित टेंकित मोठ्या लगबगीनें तो जवळ आला, आणि कोणी तरी सामान्य गृहस्थच असेल असें समजून मोठ्या मिन्नतवारीनें आंतील इसमास ह्मणाला "महाराज ! मीं अगदीं वृद्ध आणि अशक्त माणूस आहें. अशा तुफानांत सांपडून मोठ्या पंचाइतींत पडलों आहें. आपली गाडी मोठी आहे. चार माणसें मावण्याजोगी तींत जागा आहे, आणि येथें तर आपण एकटेच आहां. तेव्हां कृपा करून मला जर आंत बसवाल तर आपले मजवर फार उपकार होतील. मी परमेश्वरापाशीं आपल्यास दुवा मागेन. मला आंत घेण्याची मेहेरबानी करा!"

बादशहास त्या ह्मातार्‍याची कींव येऊन त्याचा धिक्कार न करितां मोठ्या आदरानें त्यानें त्याला गाडींत घेतलें. त्याची एकंदर हकीगत समजून घेऊन लवकरच तो त्याच्याशीं मोकळ्या मनानें बोलूं लागला. राजेपणाच्या अहंतेचा यावेळीं त्यानें अगदीं त्याग केला होता. ह्मातारें माणूस आणि त्याला बोलण्याचा कंटाळा, अशी विपरीत गोष्ट कधीं घडेल तरी ? त्यांत दारिद्र्यानें पिडलेल्या वृद्ध मनुष्यांस तर विशेषच बोलण्याची संवय असते. कारण, त्यांनां दुसर्‍यांची खुशामत करून त्यांची मर्जी संपादावयाची असते. आमचे ह्मातारेबोवांची स्थिति अशीच कांहींशी होती. शिवाय, त्यांचा स्वभाव फार गमत्या असे. गाडींतील गृहस्थ आपल्याशीं मोकळेपणानें बोलतो, तेव्हां हे बरे उगी बसायचे ! तशांत, यांच्यावर त्याचे थोडेसे उपकाराहि झाले होते. यामुळें त्याला खूष करण्याकरितां एकेक गमतीदार गोष्ट काढून यांनीं जी आपल्या तोंडाची सारखी टकळी लाविली, तिनें गाडींतील इसमास ( बादशहास ) हंसतां हंसतां पुरे वाट झाली. एकसारख्या बराचे वळपावेतों टाळ्या देण्याघेण्याचा विधि चालला होता. बिचा-

त्यास हा बादशहा आहे हें काय माहीत ? गप्पा मारतां मारतां गाडी शहराच्या नाक्यावर येऊन पोहोंचली. येथून राजा ज्या बंगल्यांत उतरला होता तेथें जाण्याचा रस्ता आला. यावेळीं पाऊस बराच थांबला होता व वाराहि पडला होता. बादशहानें आपल्या सोबत्याला विचारलें "आपण कोणच्या गल्लींत राहतां ?"

म्हातारा म्हणाला "माझें रहाण्याचें ठिकाण येथून बरेंच लांब आहे. आतां पाऊस वगैरे कमी झाला असल्यामुळें मी तेथपर्यंत पायीं चालत जाईन. आपण मला येथवर आणून पोंचविलें, याबद्दल मी आपला फार आभारी आहें."

असें म्हणून गाडीचें दार उघडून तो खालीं उतरूं लागला; परंतु बादशहानें त्याचा हात धरून त्याला बळेंच खालीं बसविलें व "कांहीं हरकत नाहीं. आपण त्या वाटेनेंच जाऊं," असें म्हणून त्यानें गाडीवाल्यास म्हाताऱ्याच्या घराकडे गाडी हांकण्यास आज्ञा केली. बादशहाची गाडी लहान गल्लींतून जातांना पाहून रस्त्यांतून जाणारे येणारे लोक मोठ्या अदबीनें त्याला लवून मुजरा करूं लागले. तें पहातांच आपल्यावर उपकारकर्ता कोणी सामान्य मनुष्य नसून प्रत्यक्ष आपला बादशहा दुसरा जोसफ हाच आहे, हें त्या वृद्ध मनुष्यास कळून आलें. मग काय विचारतां ? स्वारीची जी कांहीं घाबरगुंडी उडाली, ती सांगतां येत नाहीं! बादशहाशीं हवेंतसें अद्वातद्वा बोलल्याबद्दल त्याच्या जिवास फारच खाऊं लागलें. तो अत्यंत खजील झाला व कांपत कांपत त्यानें आपल्या अपराधाची जोसफकडे क्षमा मागितली. महान् जोसफनें उत्तर केलें "माझ्या म्हाताऱ्या मित्रा, तूं बिलकूल कष्टी होऊं नकोस. तुझ्याकडून यत्किंचितहि अपराध घडलेला नाहीं. तूं माझ्याशीं सलगीनें वागलास यांत मला कांहींच वाईट वाटलें नाहीं. उलट, त्यापासून मला मोठा आनंदच झाला. मनुष्यें तेवढीं सारीं एका परमेश्वराचींच लेंकरें आहेत. त्यांच्या ठायीं उच्चनीच हा कांहींएक भेद नाहीं. मी मोठा आणि तो लहान असा अभिमान कोणींहि बाळगूं नये," असें म्हणून

त्यानें त्या म्हाताऱ्याला स्वतः त्याच्या घरीं पोंचविलें व आपण पुनः मागें वळून आपल्या बंगल्यावर निघून गेला.

बादशहाची ही गोष्ट शहरांत पसरतांच ज्याच्या त्याच्या तोंडून त्याची कीर्ति ऐकूं येऊं लागली व त्याचेवर लोक पूर्वीपेक्षां फार प्रेम करूं लागले. लोकप्रीति संपादन करण्यास राजाच्या अंगीं अशाच प्रकारचे कित्येक गुण असावे लागतात. दुसऱ्या जोसफच्या ह्या निरभिमानतेच्या गोष्टीकडे लक्ष्य देऊन वाचकांनीं बऱ्याच गोष्टी शिकण्याजोग्या आहेत. दुसऱ्याचा तिरस्कार केल्यानें आपली योग्यता वाढेल असें जर कोणाला वाटत असेल, तर तो त्याचा निव्वळ भ्रम आहे. खरी योग्यता वाढण्यास अंगीं निरभिमानताच असली पाहिजे.

# गुप्त पोलीस.

गिरगांवांत फ्रेंच पुलाच्या उत्तरेच्या बाजूस एक लहानशी बंगली मीं भाड्यानें घेतली होती. घरांत आठवा महिना चालला असून जवळ कोणी मायेचें मनुष्य नसल्यामुळें चार दिवसांची रजा काढून माणसांस घरीं पोंचविण्याचा निश्चय केला. एकंदर सामानासुमानाची बांधाबांध करून बुधवारीं रात्रीं साडे आठ वाजतां बोरीबंदरावर जाण्यास निघालों. वाटेंत त्रास होऊं नये ह्मणून वरच्या रामा गड्यासाहे बरोबर घेतलें होतें. आह्मी सर्वच तिकडे जावयास निघालों, तेव्हां अर्थातच बंगलीस कुलूप ठोकून जावें लागलें. पण जाते वेळीं मीं एकंदर बंदोबस्त करावयास कांहींएक कसूर केली नव्हती. ओरियंटल ब्यांकेनें काखा वर केल्यामुळें सर्व ब्यांकांवरून माझा विश्वास उडाला होता व आपल्या पाशीं जी कांहीं थोडीशी पुंजी असेल ती दुसऱ्याच्या हातीं देऊन मागाहून त्याच्या तोंडाकडे पाहत रहावें त्यापेक्षां व्याज न मिळालें तरी बेहत्तर, पण आपला विषय आपल्यापाशींच असावा, असा मनाचा निर्धार करून त्याप्रमाणें १०,००० चें रोख सोनें घेऊन घरींच जवळ बाळगिलें होतें. या सोन्याच्या लगडींवर माझा सारा जीव असे. घरीं जाते वेळीं सदहू लगडी कितीतरी जतनेनें मीं तिजोरींत घालून ठेविल्या. तिजोरीस घट्ट चावी केली. किल्ली बरोबर झाली आहे कीं नाहीं हें पाहण्याकरितां तीनतीनदा तपासून पाहिलें. पुढें किल्लीच्या तोंडावर एक कागदाची चिठ्ठी बसविली. सर्व दारें, खिडक्या लावून घेतलीं व बाहेरच्या दारास मोठें थोरलें विलायती कुलूप लावून व त्यावर लाखेचें सील करून बाहेरून निर्धास्तपणें पण मनांतून भीत भीत कुटुंबास पोंचविण्याकरितां मी खटावास निघून गेलों.

तिकडून चार दिवसांनी परत आल्यावर पाहतों, तों आमच्या बंगलीचें दार आरपार उघडें असून एकंदर सामान अस्ताव्यस्त पडलें आहे. अगोदर मी धावत धावत जाऊन तिजोरी पाहिली तों छातींत

घस्स झालें! तीहि उघडीच होती व आंत कांहीं नाहीं ! यावेळीं माझ्या मनाची स्थिति काय झाली, ती माझ्यानें सांगवत नाहीं! कसचें जेवण अन् कसचें काय? एखादा लहान पोरहि करणार नाहीं एवढा मीं आकांत केला. एकदम बस्कण घेतली. यावेळीं माझी कम्मर खचली होती. रडूं आवरतां आवरेना. रात्रीचे बारावर एक वाजेपर्यंत मी एकसारखा ऊर बडवून घेत होतों. शेवटीं थोडासा शुद्धीवर आल्यावर मला वाटूं लागलें कीं, असा शोक करून कांहीं वळावयाचें नाहीं. चोरी उमगण्याची कांहीं तरी तजवीज केली पाहिजे. चोरी कोणीं केली असावी हें शोधून काढण्याकडे मीं माझी सारी धूर्तता आणि अक्कलहुषारी खर्च केली, पण व्यर्थ! दोनचार केळ्याच्या साली आणि एकदोन चुरकटशा कागदांवर कांहीं खरडलेले आंकडे, एवढाच काय तो मागमूस लागला. पण यावरून चोरी कोणीं आणि केव्हां केली याचा शोध कसा लागावा? कागदावर कोणाचें नांवबिंव असेल ह्मणून मीं तो तीनतीनदा दिव्यापुढें धरला, पण थोड्याशा आंकड्यांच्या बेरजेशिवाय त्यावर दुसरें कांहींएक नव्हतें. अखेरीस मी अगदीं निराश झालों. आपला सर्वस्वी घात झाला अशी माझी पक्की खात्री झाली. इतक्यांत मला विचार सुचला कीं, आतांशा आपल्या या मुंबईत हुषार डिटेक्टिव बरेच आहेत. त्यांपैकीं एखाद्याच्या सहाय्यानें उमगली तर एखादे वेळीं चोरी उमगेल. झालें. मनांत विचार येण्याचा उशीर, नळावर जाऊन चूळ भरून टाकला व डगला वगैरे चढवून तसाच एक व्हिक्टोरिया करून कोटांत गेलों. तेथें जाऊन तीन्ही इंग्लिश डेली पत्रांत, गुजराती डेली पत्रांत, आणि त्याचप्रमाणें मराठींतील प्रभाकर डेली पत्रांत खालील आशयाची जाहिरात दिली.

**" १००० रुपये इनाम !**

**आह्मांला एका कुशल डिटेक्टिवाची मदत पाहिजे आहे. आमच्या घरीं या चारदोन दिवसांमध्यें एक आश्चर्यकारक चोरी झाली आहे. या चोरीचा जो कोणी थांग लावून देईल त्याला वरील रकमेचें इनाम संतोषानें देण्यांत येईल."**

जाहिरातींकडे दहा बारा रुपये खर्चून एकदा घरीं येऊन पडलों. प्रवासांत फार श्रम झाले असल्यामुळें पहांटे पहांटे मला किंचित झोंप लागली. सुमारें सात वाजले असतील नसतील, मी अद्याप अंथरुणांतच होतों, इतक्यांत "माधवराव सेट कांय रहेच ?" ( माधवराव सेट कुठें रहातात ? ) असें पुकारित कोणी आल्याचा मला भास झाला. डोळे उघडून पाहतों, तों एक ऐटबाज पारशी, फ्याशनेबल ड्रेस केलेला आहे व डोळ्यांस चांगला २५-३० रुपयांचा चष्मा लाविला आहे, असा माझ्या पुढ्यांत उभा ! मीं म्हटलें "काय काम आहे ?"

तो पारसी गृहस्थ ह्मणाला "त्यांच्याशीं मला कांहीं प्रायव्हेट ( खासगी ) काम आहे."

"मला सांगण्याजोगें नाहीं काय?" मीं प्रश्न केला.

"शेट, उगीच हुजत कां करतां? माझा व्हॅल्युएबल टाईम ( महत्वाचा वेळ ) फुकट घालवूं नका !"

"मला वाटतें, आपण डिटेक्टिव तर नसाल ?" मीं विचारलें.

"ओ येस ! आर यु माधवराव सर ?" (तुमचेंच नांव माधवराव?)

"होय, मीच माधवराव. आजच्या पत्रांत जाहिरात मींच दिली होती. हें पहा डिटेक्टिवसाहेब ! या तिजोरीमध्यें माझा १०,००० वर किंमतीचा विषय होता; पण तो कोणीं चोरिला, याचा कांहींच थांग लागत नाहीं !"

"वेरी वेल !" खिशांतून लवेंडर वाटरनें भिजविलेला रुमाल बाहेर काढून तोंडावरून पुशित पुशित डिटेक्टिव म्हणाला. "बरें, मी आपल्याला असें विचारतों, चोरी झाल्यापासून हें सर्व सामान जसेंच्या तसेंच येथें आहे कीं याला कोणाचा हातबीत लागला आहे ?"

"नाहीं साहेब ! या सगळ्या सामानाला कोणीं बोट देखील लाविलें नाहीं." मी ह्मणालों.

"मग ठीक आहे, तुमची चोरी पकडलीच ह्मणून समजा! कारण, आसपासच्या देखाव्यावरच चोरी उमगण्याचा सर्वस्वी आधार आहे."

डिटेक्टिव तोंडानें असें बोलत आहे तोंच त्यानें, फोडलेल्या तिजोरीच्या झांकणावरील सरासरी एक इंचाइतक्या भागावरची धूळ गोळा केली आणि खिशांतून एक धाकटा तराजू काढून तिचें वजन केलें.

" दर कलाकास एका इंचाचा ३६,३४७ इतका भाग धूळ पडते असा नियम आहे. तेव्हां या धुळीवरून असें निश्चित होतें कीं, ही चोरी शुक्रवारीं रात्रीं सवादोन वाजून सात मिनिटांच्या सुमारास झाली असली पाहिजे !" डिटेक्टिव गंभीर मुद्रेनें ह्मणाला.

मी चकितच झालों ! खरोखर, या डिटेक्टिवाच्या हातून आपला ऐवज परत मिळेलच मिळेल, अशी माझी बालंबाल खात्री झाली. मनाशीं मीं ह्मटलें "अहाहा ! धन्य ही मुंबापुरी ! या ठिकाणीं अशीं एकेक नररत्नें आहेत कीं, तोंडांत बोटच घालावें !"

वरप्रमाणें मी स्वतःशींच पुटपुटत आहें, इतक्यांत डिटेक्टिवानें जवळच पडलेल्या केळीच्या साली बारीक नजरेनें न्याहाळून व खिशांतून एक कसलेंसें भिंग काढून (मला वाटलें तें सूक्ष्मदर्शक यंत्र असावें) त्याच्या सहाय्यानें त्या साली पुनःपुन्हा बारकाईनें पाहून तो मला म्हणाला " ही चोरी तीन इसमांनीं केली आहे व त्यांत एक बाई आहे !"

मी अधिकच थक्क होऊन गेलों !

"या तिघांपैकीं एक सरासरी ५५ वर्षें उमरीचा असावा !"

आतां मात्र माझ्यानें स्तब्ध राहवेना. मनाला अतिशय उत्कंठा उत्पन्न होऊन मीं विचारलें " डिटेक्टिव साहेब ! हें आपण कशावरून जाणलें ?"

तो मोठ्या दिमाखानें बोलूं लागला " त्यांत काय आहे ? हें पहा, या सालींवर दोघांचे निरनिराळे दांत उठले असून तिसरीवर फक्त ओंठांनीं चघळल्याच्या खुणाच उठल्या आहेत. यावरून, हा तिसरा म्हातारा—अर्थात् तोंडाचें बोळकें झालेला असा असला पाहिजे, हें उघड आहे. शिवाय, स्त्री तर अतिशयच सुंदर असली पाहिजे. मला वाटतें, बहुशा ती एखादी वेश्या असावी! कारण, आपलें सुंदर तोंड आरशांतून बारंवार पाहत असतां आपल्या हातांतील रुमालानें आरसा पुसल्याचें

दिसून येत आहे. त्याप्रमाणेंच या लोकांनीं सारा विषय येथेंच विभागून घेतला असावा.”

“हें खरें कशावरून?” मीं प्रश्न केला.

“विषय विभागून घेते वेळीं त्यांच्यामध्यें मारामारी झाली असावी, त्यामुळेंच या खुर्च्या उलथ्यापालथ्या झाल्या आहेत. शिवाय, स्त्रीनें म्हाताऱ्याच्या नाकावर हें पुस्तक फेंकल्यामुळें याला रक्त लागलें आहे. इत्यादि प्रकारावरून त्यांची वांटणी येथेंच झाली आहे, हें उघड ठरतें.”

“होय, मी कबूल करितों, त्यांची मारामारीहि झाली असेल; पण पुस्तक स्त्रीनेंच मारलें असेल आणि तें म्हाताऱ्याच्याच नाकावर, हें तुह्मी निश्चित कसें सांगूं शकतां?” मीं पुन्हा उत्कंठेनें प्रश्न केला.

“हे पहा रक्ताचे जंतु सूक्ष्मदर्शकयंत्रांत म्हाताऱ्याचेच दिसत आहेत कीं नाहींत ते? तरुणाचे असते तर असे कधींहि दिसते ना!” डिटेक्टिव ह्मणाला.

“बरें, ते येथें किती वेळ राहिले असावे?” मीं विचारलें.

“ते येथून साडे चार वाजतां निघून पांचांच्या गाडीनें रायचुरास गेले आहेत!”

“अरे बापरे! डिटेक्टिवसाहेब, मला वाटतें तुह्मी कोणी जादुगार आहां!” मी अत्यंत चकित आणि आभारी होऊन ह्मणालों.

“अरे नहीं रे जी! यांत आश्चर्य मानावयाजोगें कांहींच नाहीं! एखादा बच्चा डिटेक्टिवहि हें सहज सांगूं शकेल. मग मी तर या धंद्यांत आज कित्येक वर्षें उमेदवारी करतों आहे!”

“पण तुह्मांला शपथ आहे, ते लोक रायचूरलाच गेले हें तुह्मीं कशावरून ताडलेंत?” मीं अधीर होऊन प्रश्न केला.

“काय सेट! हें आपल्याला एवढें गूढ वाटतें? हॉ-हॉ-हॉ!” डिटेक्टिव मोठ्या ऐटीनें ह्मणाला. “अहो रावसाहेब! ह्या चुरडलेल्या कागदावर नाहीं का तुह्मांला पेन्सिलीनें खरडलेले कांहीं आंकडे दिसत? हा त्या लुच्चांनीं रेल्वे भाड्याचा हिशेब केला आहे; आणि हें पहा

जी. आय. पी. रेल्वे गाइड? या कागदावरील रकमा बरोबर रायचूरच्या भाड्याएवढीच होत आहे! यावेळीं तुह्मीं जर मला ५०० रुपये देत असाल तर (खिशांतून घड्याळ काढून) किती साडे आठ झाले? नवाला गाडी निघते नव्हे? या क्षणीं लुच्चांचा पाठलाग करून त्यांना एकंदर मालमत्तेसहीत पकडून आणतों. पण या कामगिरीबद्दल कमींतकमी आणखी ५०० रुपये घेईन हो!"

मीं मोठ्या खुबीनें खिशांतून ५०० रुपयांच्या नोटा काढून त्याच्या हातावर ठेविल्या व माझा सर्व माल मला मिळतांच ५०० सोडून दुसरे १,००० रुपये देण्याचें त्याला वचन, नव्हे, लेख लिहून दिला.

डिटक्टिव मोठ्या संतोषित मुद्रेनें मला मुजरा करून जो गेला तो सहा महिने झाले, अझून परत येत नाहीं! तो डिटेक्टिव नसून मुंबईतील सुप्रसिद्ध दादाभाईच्या गोल्डन ग्यांगपैकींच एक अट्टल सोदा होता व पहिली चोरीहि त्यानेंच केली होती, असें मला सर्वजण सांगत आहेत; पण माझी मुळींच खात्री पटत नाहीं. तो आज येईल उद्यां येईल अशी त्याची मी अझूनहि वाट पाहतच आहें!

प्रिय वाचक! आपणा कोणास माझा डिटेक्टिव भेटल्यास त्याला माझ्याकडे धाडा हो!

# मनाचा मोठेपणा.

प्रख्यात सेनस्टोन कवि एक दिवस आपल्या प्रिय पत्नीसह नदी किनाऱ्यावर सहल करित असतां जवळच्या झाडींतून हातांत भरलेलें पिस्तुल घेऊन एक भयंकर मनुष्य एकदम बाहेर पडला आणि "तुझ्याजवळ काय असेल तें यावेळीं निमूटपणें बाहेर काढ, नाहींतर येथल्या येथेंच ठार होशील!" अशी कविवर्यास त्यानें धमकी दिली. सेनस्टोनची बिचारी बायको, हा भयंकर अकल्पित प्रकार पाहतांक्षणींच मूर्च्छित होऊन पडली! सेनस्टोनहि फार चपापले. हूं कीं चूं कांहीं न करितां त्यांनीं खिशांतून पैशांची पिशवी काढली व "अभाग्या, हें घे आणि तृप्त हो," असें ह्मणून त्या काळपुरुषापासून त्यांनीं आपली सुटका करून घेतली.

कवींचें हें आचरण पहातांच तो मनुष्य अत्यंत लज्जित झाला. त्यानें तोंडावर पदर घेऊन हातांतील पिस्तुल नदींत फेंकून दिलें आणि खालीं मान घालून खिन्न मुद्रेनें तो निघून गेला. त्या मनुष्याच्या चर्येंत असा विलक्षण फेरफार झालेला सेनस्टोनच्या दृष्टोत्पत्तीस येतांच त्यांच्या मनास भारी चुटपट लागली. प्रत्यक्ष स्वतःचा प्राण घेण्यास उद्युक्त होणाराविषयींहि त्यांनां कळवळा उत्पन्न झाला, व त्याची अशी मुद्रा होण्याचें कारण काय असावें, याचा तपास लावण्याकरितां ते ताबडतोब त्याच्या मागोमाग गुप्तपणें गेले. यावेळीं सेनस्टोन कवींच्या नजरेस आलें कीं, सदर्हू मनुष्य जातीचा अघोरकर्मी नसून केवळ दारिद्र्यामुळेंच हें नीच कर्म त्याला स्वीकारावें लागलें होतें. तो एक गरीब शेतकरी होता, व एका मोठ्या कुटुंबाच्या पोषणाचा भार त्याच्यावर पडला होता. कुटुंबपोषणास आवश्यक असलेल्या प्राप्तीचे सर्व मार्ग खुंटले असल्यामुळेंच हें पापकर्म करण्याचें त्याच्या नशिबीं आलें होतें. तो आपल्या दोघां तान्हुल्यांस पोटाशीं धरून त्यांनां कुरवाळित एकसारखे वारंवार त्यांचे मुके घेत व बरोबरच डोळ्यांतून आंसवें गाळित "माझ्या चिमुक-

त्यांनों! तुमच्याकरितां असें नीच कर्म करण्याचें माझ्या दैवीं आलें आहे. भुकनें तुमचा जीव कासावीस झालेला पाहून माझें काळीज कळवळतें!" वगैरे प्रकारें दुःखोद्गार काढित कपाळावर हात मारून घेत आहे व फार कष्टी झाला आहे, असा त्याला सेनस्टोन कवींनीं स्वनेत्रांनीं प्रत्यक्ष अवलोकन केला.

त्या शेतकऱ्याची ही शोचनीय स्थिति पहातांच कवींचें अंतःकरण अगदीं सद्गदीत झालें. ते मागल्यापायीं घरीं गेले व चाकराकरवीं त्याला बोलावून आणून त्यांनीं दुसऱ्याच दिवसापासून त्याला आपल्या पदरीं एका चांगल्या पगाराच्या नोकरीवर ठेविलें.

याला ह्मणावें मोठें मन! शत्रूवरहि उपकार करणारे पुरुष खरोखर मोठ्या मनाचेच समजले पाहिजेत. प्रत्यक्ष स्वतःचा जीव घेण्यास उठलेल्यावर कोणी एवढी दया करील काय? अशा मनुष्यास तुह्मी आह्मी एकदम पोलिसाच्या हवालीं केलें असतें; परंतु सेनस्टोनचें अंतःकरण केवढें थोर होतें! त्यांचे पैसे लुटून घेतले, ठार मारण्याची त्यांना भीति घातली, तथापिहि तें सारें विसरून जाऊन त्यांनीं त्याच्यावर—आपल्या शत्रूवर उपकारच केले!

# माझ्या मामांची एक वाईट खोड.

तिकडून कांहीं निकडीच्या कामानिमित्त एकाएकीं पुण्यास जाणें झाल्यामुळें मला एकटीला घरीं अगदींच करमेनासें झालें. आमची नेहमीं बसण्याउठण्याची खोली कशी खावयास येई. ह्मणून आतांशा चार दिवस मी गिरगांवांत मामांकडे रहावयास आलें होतें. माझे मामा घरचे खाऊनपिऊन सुखी होते. स्वभावानेंहि फार सज्जन असत. माझी मामी देखील तशीच भली बायको होती. देवदयेनें त्यांनां दुःख कसें तें ठाऊक नव्हतें. मामांनां विनू नांवाचा चार वर्षांचा एकुलता एक मुलगा होता. हा लबाड असा गुणी होता ह्मणून सांगूं! त्याचे ते बोबडे आणि मधुर बोल ऐकून मन तल्लीन होई. गुलामाचें तोंडहि मोठें मोहक असे.

एक दिवस दहा वाजतां मामा आफिसांत जावयास निघाले आहेत, इतक्यांत विनू धावत आला व त्यांच्या धोतराचा पदर धरून "बाबा? थंध्यातालीं घलीं येतांना माला एत छान्दालतें बुत आनालना? मी वातायला शित्नाल बाबा!" असें लडिवाळपणानें ह्मणाला.

"पाहीन पाहीन, हं बाळ!" मामा जिन्यावरून उतरतां उतरतां ह्मणाले व ट्रॅममध्यें बसून निघून गेले.

"ह अ-अ! बाबा माला बुत आन्नाल. मी वातून गम्मत कल्नाल ह-अ-अ-अ!" जणूं पुस्तक मिळालेंच असें मानून विनू आनंदाच्या भरांत नाचूंउडूं लागला.

"विनुबाळ! तूं बुक घेऊन काय रे करणार?" त्याचा मोठ्या प्रेमानें मुका घेऊन मीं प्रश्न केला.

"ताय तल्नाल! हां! तुमाला वो ताय आमी ताय गम्मत तल्नाल. ती थाऊक ताई! त्या माद्वलावांत्या दगूपातीं एत शुंदल बुत आहे, तो तें थाला दीत वातीत अथ्तो, नि आमी नाय वात्नाल? आमी दोगे मिळून एक थाला काल्नाल, नी थकीला अन् शुंदलीला थिकवनाल

नि गम्मत कल्नाल. ह-अ-अ!” विनू आनंदाच्या भरांत येऊन ह्मणाला. “पन बाबा तेवां येतील ?”

“असा उतावीळ होऊं नकोस विनू?” मी ह्मणालें.

“अलेले ! मी विथल्लों ले विथल्लों !” विनू ह्मणाला. “बाबांनां थांदिल्लें पायदे होतें कीं लामा दुद घेऊन येईल, त्यादबलोबलत बुत पाथऊन द्या ह्मनून ! अले, पन थंद्यातालीं बाबात आन्तील.”

यःकश्चित् पुस्तक तें काय, नि विनूला एवढा आनंद होतो काय ! बाळपणचा आनंद खरोखर अपूर्व असतो. सारा दिवस विनूच्या याच गोष्टी. तो वाडींतल्या मुलांबरोबर खेळावयाकरितां खालीं उतरे, घटका अर्ध घटिका झाली नाहीं तोंच पुन्हा वर येई, व बुकाविषयीं नाना प्रकारच्या गोष्टी बोलून माझी बरीच करमणूक करी.

“अद्दून थंद्यातालहोत नायीं ?” तो थोडक्या वेळानें आपल्याशींच ह्मणे, आणि खिडकीपाशीं जाऊन “बाबा तेवां येतील ?” असें ह्मणत रस्त्याकडे एकसारखी टक लावी.

शेवटीं एकदाचे पांच वाजले. पांचांचे ठोके ऐकतांच विनू माझ्या खोलींत धावत धावत आला, आणि “ ताई, अवो ताई ! आतांत पांत वादले! ” तो अतिशयित हर्षित होऊन ह्मणाला. “आतां बाबा येतील नायीं ?” असें तो बोलतो आहे, तोंच पुन्हा तो खिडकीपाशीं धावत गेला व पाय उंच करून मोठ्या उत्कंठेनें बाहेर डोकावूं लागला. दोनचार मिनिटें गेल्यावर विनू एकदम ओरडला “अले, बाबा आले ले आले ! बुत थित्यांत अथेल ! हातांत थल्लीत आहे!” असें ह्मणून तो एकदम जिन्याच्या दाराकडे धावला.

विनूच्या या निःशेष व निर्दोष आनंदाचें मला मोठें कौतुक वाटलें, व आतां बूक मिळतांच त्याला केवढा आनंद होतो, हें प्रत्यक्ष पाहण्याकरितां मीहि त्वरा करून दिवाणखान्यांत आलें.

“द्या द्या, बाबा लौतल बुत द्या ! मी तें ताईला दाथवनाल. काला पाऊं लौतल ?” मामा जिन्यांत असतांच विनू त्यांनां बिलगला.

" बुक ? बुक कसलें ? " मामा चकित मुद्रेनें ह्मणाले. " मीं बुक आणीनच ह्मणून कुठें सांगितलें होतें?" "

" होय, तुर्मी थांदितलें होतें, 'बलें पाहीन' ह्मनून ?"

"खरें, पण मी विसरलों बाळ !" आपल्या हलगर्जीपणामुळें विनूच्या मनाला या निराशेनें केवढी भयंकर दुखापत झाली असले याचा कांहींएक विचार न करितां मामांनीं बेपर्वाईनें उत्तर दिलें.

आपल्या बापाच्या वचनावर पूर्ण भरंवसा ठेवून मनांत मांडे भाजित असलेल्या विनूनें बापाच्या तोंडून अशीं अक्षरें ऐकतांच त्या बापड्याला कसेंसेंच झालें! त्याची छाती भरून आली. डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले व रडकुंडें तोंड करून तो आई सैपाक घरांत चहाच्या तयारींत होती तेथें गेला, आणि तिच्या कुशींत डोकें खुपसून एक सारखा स्फुंदूं लागला.

"काय झालं बाळ? माझं सोनुलं तें !" मामी विनूस कुरवाळित विचारूं लागल्या. "तुला रागं भरले का ते ?"

विनू कांहींएक उत्तर न करितां अधिकच स्फुंदूं लागला. "काय झालें तें तर मला सांग?" मामींनीं पुन्हा विचारलें.

पण बापड्या विनूचें अंतःकरण आशाभंगाच्या दुःखामुळें इतकें भरून आलें होतें कीं, त्याच्या तोंडून शब्द फुटेना ! तो आपला हुंदक्यांवर हुंदके देत एकसारखा रडूंच लागला.

"काय ? सांगशील कीं नाहीं काय झालं तें ? तुला कुणी रागं भरलं, का मारलं, का झालं तरी काय ?"

आतां मामींचा शब्द किंचित् पालटला. प्रेमाचें रूप बदलून आतां त्यानें दरडावणीचें रूप धारण केलें. डोळेहि बदलले. तरीहि विनू कांहींएक न बोलतां मोठमोठ्यानें रडतच होता.

"चल जा इथून !" बिलगून असलेल्या विनूस दूर लोटून मामी ह्मणाल्या. "मेला काय झालं तें सांगायचं सोडून रडतच राहिला आहे. हट्टी मेला ! "

बिचाऱ्या विनूवर हा दुसरा गहजब कोसळला. आतां तर तो मोठमोठ्यानें रडूं लागला.

" जळोरे मेल्याचं दुःख !" मामींची तब्यत अधिकच गरम झाली. " तोंड आटपतोस कीं नाहीं ? का आणूं काठी ?"

पण विनू भिंतीस चिकटून जो आकांत करित होता, तो कांहीं केल्या उगा म्हणून राहीना ! मामी आतां अधिकच चवताळल्या व विनूला काठीनें बडवित सुटल्या. बापड्या विनूवर एकामागून एक अशा एकसारख्या अनेक अन्यायांचा वर्षावच सुरू झाल्यामुळें त्याच्या मनाची चमत्कारिक स्थिति झाली, व तो केंविलवाण्या मुद्रेनें अधिकाधिकच रडूं लागला.

कांहींकेल्या विनू आपलें रडणें सोडीना, असें पाहून मामींनीं त्रासून अखेरीस त्याला एका खोलींत कोंडलें व दारास बाहेरून कडी लाविली.

हा सगळा तमाशा गुपचुपपणें मी पाहत होतें. याबद्दल मला अतिशयित वाईट वाटलें. बापड्या विनूचा यांत कांहींएक अपराध नव्हता. दोष सारा माझे मामा आणि मामी यांचाच होता. अशा निष्काळजी, अविचारी, मूर्ख आणि हेकट आईबापांचीं मुलें, चिडखोर, रडवीं आणि दुर्गुणी निपजल्यास नवल नाहीं ! गरीब बिचाऱ्या विनूस, बुक आणून देण्याची आशा लावून निष्काळजीपणानें आशाभंग करणारा बाप, खरोखर घातकीच समजला पाहिजे ! त्याचप्रमाणें मामींनीं आपल्या मुलाला कोणतें दुःख झालें आहे तें युक्तीनें समजून न घेतां, त्या बापड्या अर्भकावर आपला मातृत्वाचा हक्क आणि तोहि कठोरतेनें गाजविणें, हें सर्वतोपरी अयुक्त होतें. माझीं मामामामींच तीं ! मला वडील आहेत, पूज्यहि आहेत, तरी त्यांचें या वेळेचें वर्तन मला अगदीं आवडलें नाहीं. असत्य वचनें दिल्यानें आणि अपराधाशिवाय शासन केल्यानें पुढें मुलेंहि तशींच निपजल्यास मागाहून त्यांनां दूषण लावणारीं आईबापें मूर्ख समजलीं पाहिजेत. मघांपासून घडलेला एकंदर प्रकार पाहून मला अतिशयित वाईट वाटलें. अंतःकरण

सद्गदित झालें. पण मध्यें पडून माझ्यानें कसें बोलवतें ? किती झालें तरी वडील माणसें तीं ! 'तुमचें हें करणें अयोग्य आहे' असें सांगणें हें मर्यादेस आणि शिष्टाचारास सोडून असल्यामुळें मी बाजूस राहून गुपचुपपणें सारा खेळ पाहत होतें.

घटका दीड घटका झाल्यावर मीं खोलीचें दार उघडलें, तों विनू रडून रडून दमल्यामुळें एका कोचावर घोरत पडला आहे असें माझ्या दृष्टीस पडलें. मला त्याची फार कींव आली.

" विनू कुठें आज दिसत नाहीं तो?" चहाचे वेळीं विनू नाहीं असें पाहून मामांनीं प्रश्न केला.

" मेल्यानं आज कपाळ उठविलं! उगीच रडरड रडत होता, त्याला चांगली शिक्षा केली आहे आज !" असें ह्मणून मामी माझ्याकडे पाहत हंसल्या.

" कां, त्याला काय झालें होतें ?" मामांनीं चहा पीत पीत निष्काळजीपणानें विचारलें.

" कोण जाणे काय झालं तें. वरूनच रडत खालीं आला, व काय झालं ह्मणून विचारतां कांहींकेल्या बोलेना. बाबापुता करून पुष्कळ विचारलं, धमकीहि दिली, पण छे !"

मामा नंतर यासंबंधानें कांहीं बोलले नाहींत. ती गोष्ट तितक्यावरच राहिली.

चहापान उरकल्यावर मी सहज आगाशींत गेलें. विनू या ठिकाणीं आपल्या दोन्ही चिमुकल्या हातांचा मस्तकाला टेंका देऊन आगाशीच्या कठड्याशीं एका खुर्चीवर उभा होता. समोरच्या घरीं रामू आणि काशी पुस्तकाचीं पानें परतित होतीं तिकडे यानें सारें लक्ष्य लाविलें होतें. तो तिकडे उत्कंठेनें पाहत होता खरा, पण त्याची मुद्रा फार खिन्न दिसत होती. मी जातांच त्यानें मान फिरवून माझ्याकडे पाहिलें, परंतु कांहींएक बोलला नाहीं; पुन्हा निमूटपणें तिकडेच

पाहूं लागला. मघांपासून बापडयावर बरेच नाहक गहबज कोसळले असल्यामुळें मला त्याची फार दया येत होती. त्याला पोटाशीं धरून शांत करावें, त्याची समजून घालावी, असें माझ्या मनांत फार होतें, व तशी संधि मी केव्हांपासून तरी पाहत होतें. परंतु त्याच्याशीं काय बोलावें हें मला सुचेना. त्याला एखादें पुस्तक देऊन खुष करावें, असें माझ्या मनांत आलें. माझ्यापाशीं एका इंग्लिश कंपनीचा रंगी-बेरंगी चित्रांचा सुंदर कॅटलॉग होता. तो विनूस दिल्यास त्याला आनंद होईल असें वाटल्यावरून मी तशीच मागल्यापायीं खोलींत गेलें, व तो कॅटलॉग पदराखालीं झांकून घेऊन पुन्हा आगाशींत आलें. इतक्यांत मामीहि तेथें आल्या. कठडयाशीं एकलाच उभा असलेल्या विनूस पाहून त्या ह्मणाल्या "जा बाळ! रामूबरोबर खेळ जा! ती बघ काशीदिखील तुला बोलावते आहे."

"नायीं दा, आमी नाय खेल्नाल!" विनू खिन्न पण जरा क्रुद्ध मुद्रेनें ह्मणाला.

"बरं आहे! नाहीं खेळायचं तर बस एकलकोंडा?" मामी माझ्याकडे पाहून हंसत हंसत ह्मणाल्या. "कालच याला मीं ह्मटलं 'सारा दीस खेळतच राहूं नये!' त्या वेळीं ह्मणत होत्या "जला दिकील खेलूं नये?" नि आज मीच होऊन 'खेळजा, ह्मणून सांगत असतां 'नायीं जानाल!' ह्मणतो! कसलं हेकट पोर आहे!"

"मला नाहीं तसं वाटत." मी ह्मणालें. "मुलांचा स्वभाव नीट समजून घेणं व समजून तो सांभाळणं अंमळ कठीण आहे खरं; पण ही गोष्ट शिकणं हें आईबापांचं कर्तव्यच आहे. आणि या गोष्टीचा जर तीं पुरतेपणं अभ्यास करतील, तर त्यांनां आपलीं मुलं बिघडलीं आहेत अथवा तीं हेकट, दांडगीं आहेत, आपल्यास जुमानीत नाहींत, अशी कुरकुर करण्याचं कारणच राहणार नाहीं!"

यापेक्षां जास्त बोलणें मर्यादेबाहेर होईलसें वाटल्यावरून मी इतक्यावरच जीभ आटोपती घेतली, व ही गोष्ट एवढ्यावरच

राहिली. कां कुणाला ठाऊक, माझ्या या भाषणावर कांहींएक न बोलतां मामी लवकरच आंत गेल्या. नंतर आगाशींत दुसरें कोणी नाहीं असें पाहून मी विनूपाशीं गेल्यें व "विनूबाळ, इकडे ये, तुला कांहीं सांगायचं आहे," असें हंसत हंसत त्याला ह्मणालें.

विनू तत्क्षणीं उठला. त्याच्या मुद्रेवरून मला स्पष्ट दिसून आलें कीं, मी त्याला बुक देण्याकरितांच हांक मारित आहें हें तो कळून चुकला होता.

"तुला कांहीं द्यायचं आहे विनू!" पदराखालीं झांकून आणलेला सुंदर कॅटलॉग बाहेर काढून मीं ह्मटलें.

"ताय पुत्तक! अहा—" आणि विनूची मुद्रा पुन्हा एकदा पूर्ववत् प्रफुल्लित झाली.

विनूनें तो कॅटलॉग इकडून तिकडून उलटला, उलटा सुलटा करून त्यांतील चित्रें पाहिलीं, व 'पुत्तक अहा पुत्तक' म्हणत आपल्या आईला दाखविण्याकरितां मोठ्या आनंदानें उड्या मारित तो धावत गेला. त्याचा हा निर्दोष आनंद पाहून मला मोठें कौतुक वाटलें. आपल्या आईबापांचा अन्याय आणि जुलमी वर्तन विनू अगदीं थोड्या वेळांत विसरला, हें पाहतांच तर माझें अंतःकरण किती तरी गहिंवरलें.

विनू नंतर कोणाच्याच नजरेस पडला नाहीं. शेजारच्या रामूस, काशीस व ठकीस तीं गुळगुळीत कागदावरील सुंदर चित्रें दाखविण्यांत व जणूंकाय त्या चित्रांचा भावार्थ आपल्यास पूर्ण माहित आहे अशा मुद्रेनें त्यांची त्यांविषयीं समजूत करण्यांत तो अगदीं गढून गेला होता. आपल्या बापालाहि त्यानें जेवतेवेळीं आनंदाच्या भरांत येऊन त्या पुस्तकाविषयीं कितीतरी गोष्टी सांगितल्या!

दुसरे दिवशीं सकाळीं मामा दिवाणखान्यामध्यें बसून कांहींसें लिहित आहेत, इतक्यांत बापुडवाणी दिसणारी अशी सातआठ वर्षांची एक गरीब मुलगी तेथें आली, व दीन मुद्रा करून आणि हात

जोडून मामांच्या कानांत तिनें हलकेच कांहीं सांगितलें. मामांनीं तिला एकदोन प्रश्न विचारले, व तिनें मोठ्या नम्रतेनें त्यांचीं उत्तरें दिलीं. शेवटीं " ठीक आहे, पाहीन ! " असें म्हणून मामा पूर्ववत् आपल्या लिहिण्याच्या कामांत गढून गेले व लवकरच ती मुलगीहि तेथून निघून गेली.

" ती कुणाची मुलगी मामा ? " मीं विचारलें.

" आपल्या त्या राघू शिंद्याचीग ! " कपाळाला आंठया चढवून मामा ह्मणाले. " सारे मलाच येऊन त्रास देतात ! हा राघू एरवीं भला माणूस आहे हो ! तो एका प्रसंगीं माझ्या चांगलाच उपयोगीं पडला आहे. पूर्वीं याला कोटांत कुठेंशी नोकरी होती; परंतु हल्लीं दोनचार महिने तो आजारी आहे. त्याच्या जुन्या धन्यानें राघूच्या जागेवर दुसरा माणूस ठेविल्यामुळें सध्या हा रिकामाच आहे. हल्लीं त्या नानासाहेब वकिलांला एका माणसाची गरज असल्याचें त्याला समजलें आहे, आणि त्यांचा माझा चांगला स्नेह असल्यामुळें आपलें एवढें काम करा, असा त्यानें मुलीबरोबर मला निरोप पाठविला होता."

" करा करा बापड्याचं एवढं काम ! त्याला बापड्याला भाकरी मिळो, " मीं ह्मटलें.

" तर, केल्याशिवाय कसें चालेल ? तो नाहीं आपल्या उपयोगीं पडला आहे ? " असें म्हणून मामा पुन्हा लिहूं लागले.

या गोष्टीला चारसहा दिवस लोटल्यावर ती मुलगी पुन्हा आली. तिला पाहतांच " अर्रर्र! शिंची मला आठवणदेखील राहिली नाहीं!" मामा ओशाळल्यासारखे होऊन स्वतःशींच पुटपुटले.

" पण जरा सबुर कर मुली, मी आतांच जाऊन येतों ! " असें म्हणून त्यांनीं घाईघाईनें डोक्यावर पगडी ठेवून ते तत्क्षणीं बाहेर पडले.

सुमारें अर्ध्या तासानें मामा परत येऊन म्हणाले "मुली, तुझ्या बापाला सांग कीं, त्यांनीं कालच माणूस ठेवला. नाहींतर ते तुला जरूर ठेवते!"

बापडी मुलगी रडकुंडें तोंड करून डोळे पुशित चालती झाली.

"खचित, फार वाईट झालें !" मामा म्हणाले. "काल जरी गेलों असतों, तरी बिचाऱ्याचें काम झालें असतें."

"तुम्हीं मोठी चूक केली मामा !" मीं म्हटलें.

"खोटें नव्हे ! पण मी तरी काय करूं? मला थोडें का काम आहे ? शिंची फुरसत म्हणून कशी ती जरा देखील मिळत नाहीं. तोच परभारें गेला असता तरीहि त्यांनीं कांहीं नाकारलें नसतें."

"पण तुम्हीं त्याला साफ नकार कळविला असता तर ना तो आपण होऊन त्यांचेकडे गेला असता? 'ठीक आहे, पाहीन!' अशी तुम्हीं त्याला आशा लाविलीत म्हणूनच तो बापडा आज असा तोंडघशीं पडला."

मामा फार खट्टू झाले. कांहींएक बोलले नाहींत.

"मामा ! तुमच्या या 'पाहीन' शब्दानें केवढा बरं अनर्थ केला ? गरीब बापड्या राघूची भाकरी गेली ! चार दिवसांपूर्वीं बिचाऱ्या विनूबाळाचा आशाभंग तुमच्या 'पाहीन' शब्दानंच केला ! मामीं-कडून त्याला विनाकारण मार खावा लागला. तुमच्या जिवालाहि हुरहुर लागली." बोलतां बोलतां खरोखरच माझा कंठ गहिंवरून आला. इतक्यांत राघूहि मुलीला बरोबर घेऊन काठी टेंकित कांपत कांपत माडीवर आला.

"काय राघू? कां आलास?" मामा किंचित शरमून म्हणाले.

"तर काय कराव सेट? आमा गरीबाच कपालच फुटक तवा आमच्या बऱ्याची क्वणास बुद तरी कसी व्हैल?" बिचारा राघू कपाळावर हात मारून घेऊं लागला. "पन तुमी मला सपस्ट सांगत्येस कीं 'बुआ आमच्या इस्वासावर ऱ्हाऊं नको' तर मीच परबारें ग्येलों असतों तिकड ! घरांत एक दाना ऱ्हाई. तीन दीस पान्या संगातीं काडले—" असें म्हणून तो ढळढळां रडूं लागला. त्याची त्या वेळची ती स्थिति पाहून माझ्या तर काळजाचें पाणीच झालें !

"जा जा राघू ! तूं बेफिकीर राहा !" मामा दुःखी मुद्रेनें ह्मणाले. "जा, आजच्या आज तुझी कुठेंतरी मी अवश्य तजवीज करतों."

आणि मामांनीं अखेरीस बोलल्याप्रमाणें केलें. संध्याकाळींच आपला वशीला चालवून त्यांनीं राघूस नोकरी मिळवून दिली, आणि त्याच दिवसापासून 'पाहीन' असें पोकळ आश्वासन देण्याची जी त्यांनां वाईट संवय जडली होती, ती सोडून दिली. आतां ते आपल्या हातून होण्यासारख्या गोष्टींविषयींच 'पाहीन' ह्मणून सांगत असतात. बाकी न होण्याजोग्या गोष्टींबद्दल साफ नकार सांगतात; आणि यापासून त्यांनां कधींहि दुःखी होण्याचा प्रसंग येत नाहीं.

# नवरे कसे तयार करावे !

आमची बचुबाई स्वयंपाकाच्या कामांत किती वस्ताद! कां नसेल? आजपर्यंत ती कितीजणांच्या तरी येथें स्वयंपाकाला राहिली असेल; मग तिचा त्या कामांतला अनुभव कुठें जावा! बचुबाई स्वभावतःच बुद्धिमती असल्यामुळें आपला धंदा संभाळून सभोंवार काय चाललें आहे, याचेंहि निरीक्षण करित असे. त्यामुळें कोणकोणत्या घरांत नवऱ्याबायकांचीं भांडणें कसकशीं लागतात, हें तिला चांगलें ठाऊक झालें होतें. परवां सहज बोलतां बोलतां ती या गोष्टींचा पाढा वाचूं लागली, तेव्हां आह्मीं तिला सहज विनोदानें ह्मटलें "कां हो बचुबाई, तुह्मी इतके चांगले चांगले जिन्नस तयार करतां, तर नवरे कसे तयार करावे तें सांगा बघूं!"

बचुबाई बुद्धिमानच कीं नाहीं! तिनें लगेच आमची उत्प्रेक्षा आपणहि घेतली, आणि आपल्या धंद्याच्या भाषेनें ती ह्मणाली "एवढंच का? तर थोडं काम आहे! नवरे तयार करण्याला जास्त साहित्य लागत नाहीं. आणि जें कांहीं थोडंसं लागतं तेंहि कांहीं बाहेरून पण आणावं लागत नाहीं! तें बरीक आपल्याचकडे असतं. मात्र ते तयार करतांना आपली देखरेख पुष्कळ असली पाहिजे. कांहीं बायका त्यांनां उगाच तापवित असतात. कांहीं त्यांनां नेहमीं गरम करितात. कांहीं आपल्या हलगरजीपणानें त्यांनां गोठवून टाकतात. पण या रीतीनं नवरे कधींहि चांगले होत नाहींत. पण योग्य खबरदारी ठेवली तर ते कसे होतात ह्मणून सांगूं! नुसते पाहून घ्यावे!!

"प्रथम नवऱ्यांची निवड करावी लागते. त्यासाठीं कांहीं आपणास बाजारांत जाण्याची गरज नसते! चांगले चांगले, ते घरींच येत असतात. ते आले, ह्मणजे त्यांची आपण स्वतः निवड करावी. आई-बापांचं अनुमोदन घ्यावं; परंतु नुसत्या दिखाऊपणावर जाऊं नये, गुण पाहून मग घ्यावे.

"नवरे घरांत आले ह्मणजे त्यांनां नेहमीं चांगल्या ठिकाणीं ठेवावं. त्यांनां ज्या कपड्यांत ठेवायचं, ते चांगले नीट आहेत कीं नाहीं, हें वेळोवेळीं पहात असावं. ते कुठं तरी पडतील, ह्मणून त्यांनां समाधानरूपी रेशमाच्या बळकट दोरीनं घट्ट आवळून बांधावं. कर्तव्य ह्मणून जी एक दोरी आहे, ती इतकी बळकट असत नाहीं.

"प्रेम, व्यवस्थितपणा, आणि आनंदीवृत्ति यांचा चांगला जाळ करावा, व त्यांनां योग्य इतक्या अंतरावर त्याजवळ त्यांना ठेवावं. ते तडफडूं लागले तर काळजी करण्याचं कांहीं कारण नाहीं. कारण, नवरे पुरे तयार होतपर्यंत असंच करित असतात! नंतर चुंबनाची कांहीं साखर घालावी. त्या वेळीं मिऱ्याची पूड मात्र टाकूं नये. थोडासा मसाला घातल्यास चांगला खरा, पण तो मोठ्या धोरणानंच घातला पाहिजे!

"त्यांनां उगाच कशानं टोंचूं नये, हळुहळू ते नरम होणारच; व तें टोंचल्याशिवायसुद्धां कळून येतं.

"याप्रमाणें केलं ह्मणजे उत्कृष्ट प्रतीचे नवरे तयार होऊन ते बायकांच्या व मुलांच्या फार उपयोगीं पडतात, व आपण गैरसावध नसल्यास कधींहि बिघडत नाहींत!!"

सूपशास्त्रविशारदेचें हें विनोदप्रचूर पण बोधपूर्ण मार्मिक स्पष्टीकरण ऐकून पोट धरधरून हंसत हंसत, व तिच्या बुद्धीची तारीफ करित करित आह्मी आपल्या लेखशाळेंत निघून आलों.

# यमीची गोष्ट.

होय, यमी दिसण्यांत मोठी देखणी होती, यांत संशय नाहीं तिचें तें गौर व ईषद्रक्त मुख अगोदरच मोहक असे. तशांत आणखी तिची ती आनंदवृत्ति व निर्व्याजता, यांनींहि आपल्या प्रभेनें तिच्या स्वाभाविक मोहकपणांत विशेषच भर घातली होती. त्यामुळें तिला कोणींहि कितीहि वेळां पाहिलें असलें, तरी ती समोरून जातांना दृष्टीस पडली ह्मणजे तिच्याकडे एकसारखें पाहिल्यावांचून त्याच्या-नेंहि राहवत नसे. पण हें तिला समजल्यामुळें ती फार बिघडून गेली होती. यमी जरी वयानें सहा वर्षांचीच होती, तरी ती आपलें सुंदर तोंड नेहमीं आरशांत पहात असे. एक वेळ असें झालें कीं, तिच्या आईनें तिला कसल्याशा कामासाठीं आंतून हांक मारली. ती उत्तर देत नाहींसें पाहून तिनें तेथूनच ओरडून विचारलें " यमे ! तूं अशी आहेस तरी कसल्या कामांत ? "

" मी किनई माझं सुरेख तोंड आरशांत पाहत आहें आई ! " यमीनें उत्तर दिलें.

" यमे ! तूं सुरेख आहेस ह्मणून तुला कुणीं ग सांगितलं ?"

" कुणी ह्मणजे ! मला पुष्कळजणं असंच ह्मणतात. माझ्या शाळेंतील सोबतिणीसुद्धां असंच ह्मणतात; आणि माझं मलासुद्धां असंच वाटतं, " यमीनें उत्तर दिलें.

"बरं, तूं अगोदर इकडे ये बघूं, तुला मी एक सुरेखशी गोष्ट सांगत्ये. पहा कशी मौजेची आहे ती!" असें आईनें ह्मणतांच यमी आंत जाऊन तिच्याजवळ बसली, आणि तिच्या आईनें आपली गोष्ट सुरू केली.

" एके ठिकाणीं एक मुलगी होती, ती फार देखणी होती, "

" ती मीच असेन ! " यमीनें मनांत ह्मटलें.

" ती इतकी देखणी होती कीं, ती रस्त्यानं जाऊं लागली ह्मणजे लोक तिच्याकडे पाहत उभे राहत. त्यामुळं तिला गर्व वाटूं लागला.

तिच्या गर्वामुळं तिच्या सोबतिणी तिच्या वाटेस मुळीं जाईनातशाच झाल्या. पण तिला वाटलं, सोबतिणीस आपल्या सौंदर्याचा मत्सर वाटतो, ह्मणूनच त्या आपल्याशीं नीट बोलतसुद्धां नाहींत! एके दिवशीं ती बागेंत गेली असतां जवळच कोणीतरी गोड गाणं गात असावं, असं तिला वाटलं. तेव्हां ज्या बाजूनं तो आवाज येत होता तिथें ती जाऊं लागली. थोडंसं दूर गेल्यावर एकदम एक चमत्कारिक देखावा तिचे दृष्टीस पडला. जिकडेतिकडे हिरवी गार जमीन असून तिथें तरुण मुली नाच करित व गाणं गात होत्या व त्यांच्या मध्यें एका सोन्याच्या मंचकावर एक सुंदर स्त्री बसलेली होती. हें पाहून बनी (हें त्या मुलीचं नांव) थक्क झाली. इतक्यांत त्या तरुण मुली तिच्याजवळ एकदम धावत आल्या व तिला ह्मणाल्या 'आमच्या राणीसाहेबांसमोर तुला आलं पाहिजे. त्यांनां असली आगंतुकी कधीं खपत नाहीं'! एवढं ऐकतांच बनीला त्यांच्याबरोबर जावंच लागलं. ती राणीजवळ जातांच तिनं बनीला विचारलं 'कायग ए कुरूप अवदसे! तूं माझ्या जागेंत काय ह्मणून आलीस?' 'कुरूप!' बनीनं भीतीनें कांपत कांपत एकदम ह्मटलं. 'कुरूप—कुरूप!' राणी पुनः ह्मणाली. 'मला घरीं तर सर्वजणं सुंदर ह्मणत असतात.' बनीनं धापा टाकित उत्तर दिलं. हें ऐकल्याबरोबर सर्व मुली मोठ्यानं खदखदा हंसत ह्मणाल्या 'काय सुंदर पण सुंदर! अग अवदसे पोरी! आमच्यांतील कुरूपांतील कुरूपहि तुझ्यापेक्षां कितीतरी पटीनं सुंदर आहे!' राणीनं सौम्यपणानं बनीला विचारलं 'तूं हल्लीं आपलं तोंड आरशांत पाहिलं तरी होतं का?' तिला त्या मुलीविषयीं जरा वाईट वाटलं ह्मणून तिनं एक आरसा मागविला, आणि बनीला त्यांत पाहण्यास सांगितलं. त्यांत पाहिल्याबरोबर बनी एकदम आरसा एकीकडे लोटून ह्मणाली 'नको तो आरसा दाखवूं मला! मी आतां देखणी मुळींच दिसत नाहीं!' बनीला आतां इतकं वाईट वाटलं कीं, तिला आपलं रडं आवरतां येइना. ती रडतच तिथून जाऊं लागली. इतक्यांत तिचा पाय एका वेलींत अडकला

आणि ती खालीं पडली. बनी डोळे उघडून पहाते तों ती एका झाडाखालीं निजली होती असें तिला आढळून आलें. आतां ती चांगलीच सावध होऊन उठून बसली. तिनं आपले डोळे चोळले व सभोंवार पाहिलं. ती भांबावल्यासारखी झाली. ती राणी आणि तो आरसा कुठं होता ? खरोखरच तें सारं स्वप्न होतं. इतक्यांत तिची आई येऊन ह्मणाली ‘बने जागी झालीस का तूं ? मी केव्हांची इथें आल्यें आहें, पण तुला गाढ झोंप लागली होती ह्मणून तुला जागं केलं नाहीं.’ मग ती तेथून आईबरोबर घरांत गेली. तें स्वप्न मात्र तिच्या मनांतून मुळींच गेलं नाहीं. तें राहून राहून तिला आठवत असे व त्यामुळं तिचा गर्वहि पुष्कळ कमी झाला. हें पाहून शाळेंतील मुलीहि तिच्यावर पूर्वीप्रमाणं प्रीति करूं लागल्या. नंतर आणखी थोडक्याच दिवसांनीं ती सर्वांच्या गळ्यांतील ताईत बनली.”

“वा, गोष्ट मोठी नामी आहे आई !” यमी ह्मणाली. “पण तिला असं स्वप्न कां बरं पडलं ?”

“मला वाटतं, तें स्वप्न तिला पडलं तें ईश्वराच्या इच्छेनंच पडलं,” आईनें उत्तर दिलें. “तिचा गर्व कमी व्हावा ह्मणून तिला ही शिक्षा मिळाली. बाळे यमे ! तूंहि ध्यानांत धर बरं, कीं, आपण हुषार असणं किंवा सुंदर असणं, ही देवाची देणगी आहे. त्याबद्दल कुणींहि गर्व करूं नये. कारण, ती हुषारी किंवा तो देखणेपणा त्यांनीं आपल्या कर्तबगारीनं मिळविलेला नसतो !”

हें बोलणें नीट लक्ष्य देऊन ऐकल्यावर यमी ह्मणाली ! “आई, मीहि आतां मुळींच गर्व करणार नाहीं, आणि बनीप्रमाणं चांगल्या रीतीनं वागेन.”

# मी चतुर्भुज कसा झालों ?

तो प्रसंग मी कधीं तरी विसरेन ! त्या गोष्टीला आज उणींपुरीं दहा वर्षें होत आलीं, तरीहि ती कालच—छे नुकतीच घडली असावी, असें मला वाटत आहे ! खरोखर, परमेश्वरीसूत्रें मोठीं विलक्षण असतात, यांत संशय नाहीं ! तारेला मीं त्या दिवसापूर्वी कधीं तरी पाहिलें होतें काय? तिची माझी यत्किंचित तरी जानपछान ? पण पहिल्याच दृष्टिभेटी-बरोबर आह्मा उभयतांच्या अंतःकरणांत जें दृढ आणि कायम प्रेम उत्पन्न झालें, व पुढें त्यानेंच जें गंभीर स्वरूप धारण केलें, त्याबद्दल मला अझूनहि मोठें आश्चर्य वाटत आहे.

बुधवारचा दिवस होता तो. जून महिना चालू होता. जस्टिस काशिनाथ त्रिंबक तेलंग यांच्यापुढें चाललेल्या एका खुनी अपिलाचे खटल्यांमधील आरोपीस मोठ्या शिताफीनें बचावून मी नुकताच ऑफि-सांत येऊन एका आराम खुर्चीवर पडलों होतों. पण आमच्या दैवीं फुरसत कुठली? मीं खुर्चीवर पाठ टेंकायला नी तारेचा शिपाई यायला एकच गांठ ! लखोटा फोडून पहातों, तर "आतांच्याच गाडीनें त्वरित या, काम फारच नाजुक आहे," असा मजकूर. त्यावेळीं मला असा संताप आला होता ह्मणून सांगूं ? मनाला वाटलें, जळो तो पैसा आणि आग लागो या ब्यारिस्टरीच्या धंद्याला ! पळभर विश्रांति घेईन ह्मटल्यावर मिळायची नाहीं? बस, कांहींहि होवो, आज नाहीं जायचें आपल्याला! आपण लोकांचेताबेदार थोडेच आहों ?

असा विचार माझ्या मनांत आला खरा, पण काय झालें कुणाला ठाऊक, मला आपलें कोणी ओढूंच लागलें ! मन नाखूष असतांहि मीं एकदोन बुकें घेतलीं, प्रवासांत उपयोगीं पडणारे कांहीं कपडे घेतले, ट्रंकमध्यें सर्व भरलें व तडक स्टेशनाकडे चालता झालों. मला परमेश्वरी सूत्रानेंच ओढून नेलें असावें ! गाडी सुटावयास आतां अवकाश अगदींच थोडा राहिला होता. लवकर लवकर जाऊन एकदा तिकीट

काढलें व घाईघाईनें फर्स्ट क्लासच्या डब्यांत जाऊन पडलों. एवढें बरीक चांगलें झालें होतें कीं, या डब्यांत दुसरें कोणीहि नव्हतें. घंटा वाजली, शीळ झाली व गाडी आतां सुटणार इतक्यांत गार्डानें माझ्या डब्याचें दार उघडलें, व एक पंधरासोळा वर्षांची तरुण स्त्री आंत आली.

माझ्या समोर बसलेल्या तरुणीहून सुरूप, मनोहर स्त्री, मीं खचित यापूर्वी कधींहि पाहिली नव्हती. माझी कल्पित पुतळी साधी व बाहेरून डामडौल न करणारी अशी होती. पण या सुंदरीहून विशेष रमणीय आणि मोहक चित्र मीं स्वप्नांतहि पण कधीं रेखिलें नसेन ! तिला पाहतांच मी एखाद्या चित्रासारखा तटस्थ झालों. नानाविध हृदय-व्याकुलतांनीं मला घायाळ केलें, व जणों मी आज माझ्या आयुःक्रमाच्या पुस्तकाचें पहिलेंच कोरें पान उलथित आहें, असा मला भास झाला. मी स्वतःलाच विचारूं लागलों "हें प्रेमच असेल काय? आणि खरोखर तें प्रेमच असलें तर पहिल्या दृष्टिभेटीबरोबर जडणारें प्रेम तें हेंच काय?"

माझ्या अंतःकरणांत अशा प्रकारें गडबड चालू असतां आमची गाडीहि पण चालू झाली. डब्यांत आतां फक्त आह्मी दोघेंच होतों. पण छे! किती झालें तरी अपरिचित, परकी, तरुण आणि समवयस्क स्त्री! तिच्याशीं एकदम बोलावें कसें, आणि तें तरी काय ? बाहेर मोठी गम्मत दिसत आहे ह्मणावें, तर पावसाची संतत धार चालू होती; हवा छान ह्मणावी, तर गार वारा अंगास झोंबत होता; पण इकडे माझी उत्कंठा अधिकाधिक वाढतच होती. शिवाय, आह्मी सुधारकवर्गांत मोडणारे व ती तरुणीहि आंग्लविद्याविभूषित असलेली. कारण, गार्डाशीं धीटपणें इंग्रजीमध्यें बोलतांना मीं तिला ऐकिलें होतें. तेव्हां एखाद्या गांवढळा-प्रमाणें मौन्य स्वीकारून दुसरीकडे तोंड फिरवावें, हें कांहीं मला प्रशस्त वाटेना. पण बोलावें काय व सुरुवात करावी कशी, हें कांहीं बराच वेळ सुचेना !

दुपारपर्यंत पावसाचें कांहींएक चिन्ह नसल्यामुळें ती फक्त साध्या कपड्यांनींच आली होती. तिच्या अंगांत काय तें फ्लॅनेलचें एक

जाकिट होतें. इतर उबदार कपडे नव्हते. परंतु स्टेशनावरच पावसाला सुरुवात झाली होती. लवकरच सोसाट्याचा वारा सुटला व एकदम थंडी वाजूं लागली. तेव्हां ही संधि बरी आहे असा विचार करून मीं माझ्या ट्रंकमध्य असलेली नवी शाल बाहेर काढली आणि " हवी असल्यास इचा उपयोग करा," अशी तिला माझी इच्छा दर्शविली.

ती तरुण स्त्री स्मितमुख करून म्हणाली " कांहीं फिकीर नाहीं, एवढी म्हणण्यासारखी थंडी नाहीं आहे. "

" छे ! आपण ही घेतलीच पाहिजे !" मी ह्मणालों. " माझ्या अंगांत बनातीचा गरम कोट आहे, मला शालीची गरज नाहीं." अशा रीतीनें आमच्या मौन्याचा अंत होऊन भाषणास सुरुवात झाली.

" शेजारच्या बायकांच्या डब्यांत त्या मडमांनीं सारी जागा अडवून टाकल्यामुळं मला इकडे यावं लागलं; पण मी मला मोठी भाग्यवान समजत्यें कीं, आपल्यासारख्या भल्या गृहस्थांच्या सोबतीचा मला लाभ घडला. देव करो नि एखादा धटिंगण टोपडा न येवो !"

मींहि तशीच इच्छा प्रदर्शित केली. नंतर तिनें मला विचारिलें " किती लांब आपल्याला जावयाचं आहे?"

" पुण्यास, " मीं उत्तर दिलें.

" मीहि पण पुण्यासच जात आहें. तिकडे आपले कोणी आप्त वगैरे असतील वाटतं ?"

" नाहीं. पुण्यास कोणी बाबासाहेब नांवाचे श्रीमान् गृहस्थ आहेत; त्यांचें कांहीं निकडीचें काम असल्यामुळें मी जात आहें. मी बॅरिस्टर आहें."

" आं ! आमच्या बाप्पांकडेच आपण जात आहां? मोठ्या विलक्षण तऱ्हेनं आपली गांठ पडली तर इथं ही?" एकाएकीं व्याकुळ मुद्रा करून ती तरुणी म्हणाली " अगबाई ! काय सोसाट्याचा वारा सुटला हा !"

" भिण्याचें कांहीं कारण नाहीं. आह्मांला येथें कसलाच उपद्रव होणार नाहीं." असें म्हणून झट्दिशीं मीं कांचेचीं सर्व दारें लावून घेतलीं.

" आपण माझ्या सोबतीस मिळालां, हें किती चांगलं झालं ! पण जर मी या ठिकाणी एकटीच असत्यें, तर–"

" तर आपली स्थिति काय झाली असती तें माझ्यानें सांगवत नाहीं. पण मी मात्र जरी एकटाच असतों, तरी मला त्याचें कांहींएक वाटलें नसतें." मीं ह्मटलें.

अशा प्रकारें आमचें बरेंच संभाषण चाललें. आम्ही बोलत होतों, हंसत होतों, यःकश्चित् बाबींवर वादविवाद करित होतों, पण माझी स्थिति कशी झाली होती, माझें मीच जाणें. त्या तरुणीचा मंजुळ स्वर, मधुर आणि नम्र भाषण, हास्यमुद्रा, आनंदीवृत्ति, प्रेमळ स्वभाव आणि तिची सुविद्यता इत्यादिकांनीं तिची मूर्ति मला इतकी कांहीं मनोहर भासत होती कीं, त्याचें वर्णन करतां येत नाहीं.

" पण-पण मी म्हणत्यें, आ-आपलं नांव क-काय ?" त्या तरुणीनें कांपत कांपत मला विचारलें.

" माझें नांव ? माझें नांव यशवंतराव ! " मी म्हणालों.

" अन् माझं तारा ! पण मला माझ्या मायेचीं माणसं तानी या आवडीच्या नांवानंच हांक मारतात. आपणहि हवंतर त्याच नांवानं हांक मारित जा."

" खरोखर, हें नांव कितीतरी गोड आहे, " मीं हंसत हंसत म्हटलें.

मी हें मोठा धीर करून म्हणालों, पण आंतून माझी अवस्था कशी झाली होती ? सर्वांगांत ज्वर भरला होता. कपाळावर दरदरून घाम सुटला होता व छाती अति वेगानें उडत होती. माझीच एकट्याची अशी स्थिति झाली होती असें नाहीं. त्या सुंदरीनेंहि लाजेनें खालीं मान घालून तीहि जोरानें श्वासोच्छ्वास करित होती. यावेळीं माझ्या प्रेमाची कांहींतरी स्पष्ट खूण प्रदर्शित करण्याविषयीं मी अगदीं अधीर झालों होतों; तरीहि एकदम कोणतीहि गोष्ट करणें अविचारमूलक होय, असा

पोक्त विचार करून मी तसें करण्यास धजलों नाहीं. कारण, न जाणो, त्या योगें त्या सुंदर तरुणीस राग येईल व माझ्या सगळ्या आशा लयास जाऊन जीवितहि विफल होईल अशी मला धास्ती पडली.

गाडी आतां हळुहळू चालूं लागली व हां हां म्हणतां केव्हांच पुणें आलें. माझा विचार बुधवारांतील सरदारगृहांत उतरण्याचा होता; परंतु माझ्या सोबतिणीनें आपल्याच घरीं येण्याबद्दल मला फारच आग्रह केल्यामुळें नाइलाज होऊन—पण अति आनंदानें—मी तिच्या विनंतीस मान्य झालों. टांगेवाला वाट पाहत होताच. त्यानें आमचें सामान गाडींत टाकलें व आम्ही शहरांत चाललों.

"आम्हीं आलों बाबा !" आणि माझ्याकडे बोट दाखवून "हे यशवंतराव बारिस्टर. यांनां मीं गाडींतच गांठलं. यांचं गाडींत मला फारच सहाय्य झालं. खरोखर, हे चांगल्या स्वभावाचे आहेत" घरीं पाय टाकतांच तानी बाबासाहेबांस म्हणाली.

बाबासाहेबांचे व आमचे नमस्कारचमत्कार झाल्यावर त्यांनीं माझें अति आदरानें स्वागत केलें व मी दुसरीकडे न जातां त्यांच्याच येथें उतरावयास आलों याबद्दल आपला आनंदहि प्रदर्शित केला. इकडच्या तिकडच्या गोष्टींसंबंधीं थोडेंबहुत संभाषण झाल्यावर नंतर लवकरच भोजनविधि उरकला व मी निजावयास गेलों. गाडींतल्या प्रवासानें अंग बरेंच दुखत असल्यामुळें अंथरुणास लागतांच मी निद्रावश झालों. पण ती संपूर्ण रात्र मीं केवढ्या आनंदांत घालविली? रात्रीच्या वेळींहि मी गाडींतच होतों. ती सुंदरी माझ्यापुढेंच बसली होती, व मी आनंदसागरांत पोहत होतों. एकाएकीं टाईमपीसच्या अलामानें कठोर शब्द करतांच दचकून जागा होऊन नुकताच पाहत असलेला प्रकार एक स्वप्न होतें असें कळून येतांच मी अत्यंत दुःखी झालों.

बाबासाहेबांच्या इच्छेप्रमाणें मृत्युपत्र वगैरे तयार केलें. रजिस्ट्रारच्या ऑफिसांत जाऊन तें रजिस्टर करून आलों. इतर कांहीं व्यवस्था करावयाची होती तीहि करून टाकली, व दुपारच्या दोन अडीचांच्या

सुमारास घरीं आलों. मन कांहीं कोठेंच लागेना ! खोलींतल्या खोलींत इकडून तिकडे व तिकडून इकडे येरझारा करित होतों. बाहेर व्हरंड्यांत बरीच मंडळी होती, पण त्यांत जाऊन बसण्यास मन घेईना. कारण, तें कालपासून दुसरीकडेसच भटकत होतें. खोलीचें दार उघडून पाहिलें, तों आंतील दिवाणखान्यांत एका वाटोळया टेबलाजळ माझी कालची प्रवासांतील सोबतीण,एका आराम खुर्चीवर पडून मोठ्या आवडीनें नुक्ताच आलेला 'विविधज्ञान विस्तारा 'चा अंक वाचण्यांत तल्लीन झालेली मला दिसली. दार उघडल्याचा आवाज ऐकतांच ती हास्य मुद्रा करून ह्मणाली "आपल्याला करमत नसेल तर इकडे येऊन बसावं बारिस्टर ! पण बाबा ह्मणत होते तितके उदास तुह्मी दिसत नाहीं ? तुह्मांला इथं चुकल्याचुकल्यासारखं वाटत असेल नाहीं ? बरोबर आहे, या एवढ्या मोठ्या घरांत घटकाभर तुमच्याशीं बोलून करमणूक करण्यास फक्त कायती एक बिचारी मीच आहें ! माझ्याशिवाय बोलाचालायला कोणीहि नसल्यामुळं तुह्मांला कसंसंच होत असेल !"

"काय ह्मटलें ? तुमच्याशिवाय दुसरें कोणीहि नाहीं ? आपले प्रिय बाबासाहेब हिशोबांतच नाहीं वाटतें ?"

"खरोखर, तुह्मी किती योग्य बोललां ? माझ्या प्रियकर बाबांस मी कधींतरी विसरेन ? ते केवढे दयाळू, केवढे उदार ! आणि त्यांचं मजवर केवढें प्रेम— "

"अलबत् ! तुमचा स्वभावच तसा गोड आहे, कीं, कोणींहि तुमच्यावर मनापासून प्रेम केल्यावांचून राहूंच नये !"

"तुह्मी आपलं कांहीं तरी बोलतां झालं ! यांतील अर्धदिखिल मी खरं मानित नाहीं !"

"तुह्मी माना अगर नका मानूं, पण तुमच्या अगीं तो गुण आहे खास ! मी तोंडावर बोलतों ह्मणून रागावूं नका, पण मी खचित सांगतों, निदान माझ्यातरी पाहण्यांत आपल्यासारखी सद्गुणी, सालस व प्रेमळ स्वभावाची तरुणी—"

" तुझी एवढं सलगीचं भाषण कां करित आहां ? तुम्हाला माहित आहे, बाबांनीं मला स्पष्ट सांगितलं आहे कीं, तुम्ही जर मर्यादेनं वागाल तरच तुम्हांला आमच्या इथें राहूं द्यायचं, नाहींतर तुमचं बिऱ्हाड संध्याकाळींच इथून उचललं जाईल. ऐकलं? अन् बाबाहि त्या शेजारच्या खोलींतच निजले आहेत."

एवढं बोलूनच ती थांबली नाहीं, तर तत्क्षणीं एकदम चवताळल्या-सारखी मुद्रा करून " बाबा, अहो बाबा ! हे पहा हो–? असें म्हणून खोलीकडे जाऊं लागली !

हा प्रकार पाहतांच माझी गाळण उडाली. तिला चांगलें वाटावें या उद्देशानें मी बोललों होतों, असें असतां उलट त्याचा तिला राग आला, निदान तिनें तरी क्षणभर मला तसें भासविलें–हें पहातांच मला फार वाईट वाटलें. आतां पुढें काय प्रकार घडतो हें कांहीं मला कळेना. माझी फजिती होते कीं काय, अशी मला भीति वाटूं लागली व भयानें तोंड काळेंठिक्कर पडलें. पाय लटलट कांपूं लागले. इतक्यांत काय आश्चर्य ! ती तरुणी खो खो हंसत माघारी आली व " वाहवारे बारीस्टर ! शाबास तुमची!" असें म्हणाली. अर्थात् तिनें ती एक थट्टाच केली होती ,असें मला कळून आलें.

" चला, आपण थट्टेचा भाग क्षणभर बाजूस ठेवूं. तुम्ही जें मघां म्हणालां कीं, सर्वजणं मजवर प्रेम करतात तें कसं काय?" तानीनें मला प्रश्न केला.

"त्याचा अर्थ एवढाच कीं, जें कोणी तुम्हांला ओळखत असेल, निदान एक वेळ कां होईना पण तुम्हांला पाहील, त्याचें प्रेम तुम्हांवर जडलेंच पाहिजे. अशीच अलौकिक शक्ति तुमच्या अंगीं आहे !"

" तुम्ही कीं नाहीं बारीस्टर, एखाद्या खुळया मुलाला, त्याची आई पाण्यानं भरलेल्या परातींतील चंद्रमा दाखवून जशी त्याची समजूत करते, तसं मला समजावित आहां. तुम्ही मला अशी कुठल्या जन्मीं पाहिली होती व मला अशी केव्हांपासून ओळखित आहां, कीं, मी खरोखरच चांगली आहें अशी तुमची खात्री व्हावी ?"

"खरें म्हणाऊ, तर तुमची आणि माझी ओळख होऊन अझून पुरते चोवीस कलाकहि झाले नाहींत, तरीहि जणूं काय तुमची माझी अनेक जन्मांपासून दृढ ओळख आहे, असेंच मला वाटत आहे ! जास्त काय सांगूं? ताराबाई! आतां उद्यां दुपारीं किंवा अधिकतर परवां दुपारीं आपणां उभयतांचा वियोग तर होणारच ! मी माझ्या धंद्याच्यानिमित्तानें मुंबईस निघून जाईन व तुम्हीहि आपल्या अभ्यासांत आणि इतर घरखटल्यांत निमग्न व्हाल. पण त्या घटकेची आठवण होतांच माझ्या छातींत कसें धस्स होत आहे ! पण खरोखर, एखाद्या वेड्याप्रमाणें मी हें कांहीं तरी बरळत आहें. खरोखर न घडण्याजोगी गोष्ट ! ताराबाई, माफ करा, पण तुह्मी एवढें पक्कें लक्ष्यांत ठेवा कीं, या पृथ्वीवर एक इसम आहे, जो तुमच्यावर अंतःकरणापासून प्रेम करित आहे, व तुमची प्रत्येक आज्ञा शिरसा वंद्य करण्यास एका पायावर तयार आहे–"

"वा: ! असा तो एक कोण बरं ?" ती तरुणी हंसत हंसत ह्मणाली. "आणि तुम्ही एवढे कावरेबावरे कां होत आहां ?"

"ताने ! यावेळीं थट्टा बाजूस ठेव, माझ्यावर दया कर ! तो दुसरा कोणीहि नसून तुझ्या पुढ्यांत उभा असलेला हा तुझा नम्र सेवकच आहे !"

"खरोखर ?"

"ईश्वरास स्मरून खरोखर !!!"

"नी, मीहि तुमचीच आहें, अन् तुमचीच होणार!" हे गोड शब्द त्या तरुणीच्या तोंडून निघतांच मला जो आनंद झाला व मी मनोराज्यांत ज्या गटंकळ्या खाऊं लागलों, तसा आनंद व तसें सुख मला कोणी तिन्ही लोकींचा राजा करता तरीहि झालें नसतें ! मी अत्यंत हार्षित झालों, वेडा झालों व घटकाभर माझी शुद्धि नष्ट झाली !

"ताने , हा विचार कायम ना ?"

"वा: ! अझूनहि संशय ? तसं नसतं, तर मीं तुम्हाला इतक्यापर्यंत मज्जल आणूं दिली असती ?"

" खचित नाहीं ! नी मीहि पण तसा वागलों नसतों. पण ताने ! बाबासाहेबांबद्दल कसें—"

" सध्या त्यांनां याबद्दल कांहींएक न कळवावं हेंच बरं, असं मला वाटतं. सवड मिळतांच युक्तिप्रयुक्तीनं मी त्यांचं मन वळवीन. पण गडे! मला वारंवार भेट द्याल ना ? मी खचित सांगत्यें, आतां आपल्याविना मला या पुण्यांत मुळींच चैन पडायचं नाहीं ! "

" त्याची काळजी तुला नको, ती मलाच जास्त आहे!"

* * * *

मीं हल्लीं बारिस्टरचा धंदा सोडून दिला असून चीफ जस्टीस होण्याचीहि सगळी उमेद आणि आशा सोडिली आहे. असें घडल्यास बरेच दिवस झाले. तें कसें घडलें तें सांगतों.

त्या दिवसानंतर कांहींना कांहीं कामानिमित्त कांहीं तरी बहाणा करून मी वारंवार पुण्यास जात होतों. पुण्यांतला यःकश्चित् का खटला असेना, पण मला कोणाकडून तरी बोलावणें आलें, कीं उडी मारलीच! मग फी अगदीं थोडी, किंबहुना मुळींच नाहीं मिळाली, तरी चिंता नाहीं; तिकडे मुळीं माझें लक्ष्यच नसे ! पुण्यास वसंतमाला होवो, कॉलेज ग्यादरिंग होवो, किंवा दुसरें कांहीं सटरफटर होवो, आमची स्वारी आपली ठेवलेलीच ! मी नेहमीं बाबासाहेबांचाच पाहुणा बनत असें, व त्यांचीहि मला पुण्यास आल्यावर दुसरीकडे कोठेंहि न उतरण्याबद्दल सक्त ताकीद असे. परंतु माझ्यासारख्या तरुण, होतकरू व धंदेवाल्या मनुष्यास अशी वारंवार रखड कांहीं श्रेयस्कर नव्हती. मला हें सारें समजत होतें, नाहीं असें नाहीं; पण उमजत मात्र नव्हतें! मन मुळीं कसल्याच कामाकडे लागत नव्हतें. सारा दिवस आणि सारी रात्र तानीचा ध्यास ! कोर्टांत गेलों तानी, जेवावयास बसलों तानी, फिरावयास गेलों तानी ! कंसास जसा अशनीं, शयनीं, पानीं, यानीं, जनीं, वनीं, मनीं आणि नयनीं कृष्णच कृष्ण दिसत होता, तशीच हुबेहुब माझी स्थिति झाली होती ! शिवाय, मी न गेलों ह्मणजे तिकडे

तिचीहि तीच अवस्था होई. तीहि कसलीना कसली तरी सबब दाखवून बाबासाहेबांकडून मला वारंवार बोलावून नेई. एक दिवस असेंच कांहीं दिवाळीच्या कीं कसल्याशा सणानिमित्त मला बोलावण्याविषयीं तानीनें बाबासाहेबांस पत्र लिहिण्यास सांगितलें. तेव्हां ते एकदम चिडून ह्मणाले " असें घडी घडी ये ये, जा जा, हें कांहीं मला बरें दिसत नाहीं ! तुह्मी याचा काय तो एकदाचा निकाल कां करित नाहीं ? "

तानी लाजेनें खालीं मान घालून ह्मणते " तुह्मी आपले मला उगाच लाजवतां बा—"

"वा! मला आपला भोळाच समजतेस वाटतें! अग, त्यानें आमच्या घरांत पहिल्या प्रथम पाय ठेवला त्या घटकेपासूनच मी तुह्मी उभयतांचे रंगढंग जाणून चुकलों होतों ! ह्मटलें, जाऊं द्या, एकमेकांनां पसंत पडलें आहे, हरकत नाहीं. जोडा कांहीं वावगा नाहीं ! आपली पंचाईत चुकली!" बाबासाहेब हंसतहंसत ह्मणाले

" अं—अं ! तुह्मी एवढे लबाड आहां तर! "

गरीब बिचारी तानी ! तिनें लाजेमुळें आपल्या मतें चोरून ह्मणून ठेविलेली गोष्ट बाबासाहेब केव्हांपासूनच जाणत होते हें जेव्हां तिला समजलें, तेव्हां ती केवढी लाजली, केवढी ओशाळी झाली व आंतून तिला आनंदाच्या केवढ्या गुदगुल्या झाल्या !

नंतर लवकरच मोठ्या समारंभानें आह्मी चतुर्भुज झालों. आणि माझी प्रियकर तानी, मीं बाळगलेल्या थोर उमेदीपेक्षांहि कितीतरी जास्त सद्गुणी, भली आणि चांगल्या स्वभावाची निपजली आहे ! मी हल्लीं पुण्यांतच येऊन राहिलों आहें. गुलाम जगू, बोबड्या गोड बोलांनीं आपल्या ह्मातार्‍या आज्याला—बाबासाहेबांला आनंदवित असतांना, व बाबासाहेबहि आपल्या एकुलत्या एक गोजिरवाण्या नातवाचे मोठ्या कौतुकानें लाड करतांना पाहून मला आणि तानीला केवढा आनंद होत असतो ! आह्मीं उभयतां आनंदसागरांत डुंबत असतों !

# एका सद्गुणी मुलीची गोष्ट.

"आई ! तुझं मस्तक मला जरा वर उचलूं दे ग! तें माझ्या मांडीवर टेंकल्यानं तुला अमळ बरं वाटेल."

वरील भाषण करणारी लिझेट नांवाची पंधरासोळा वर्षांची एक मुलगी होती. तिची आई डेम मार्ग्रेट, मरणोन्मुख होऊन बिछान्यावर कण्हत पडली होती. तिचें हें अखेरचेंच दुखणें होतें. लिझेटची आपल्या आईवर निस्सीम प्रीति असल्यामुळें आईच्या या दुखण्यामध्यें ती तिची सेवा मनापासून करित असे. ती नेहमीं तिच्या बिछान्यापाशीं बसे, तिचें मन रमावें म्हणून तिला पुस्तकांतील चांगल्या चांगल्या गोष्टी वाचून दाखवी व तिची योग्यप्रकारें सेवाशुश्रूषा करी. आई पुरे पुरे ह्मणत असतांहि वारंवार लिझेटनें तिचे पाय दाबावे, तिच्या पोटाशीं जाऊन निजावें व जेणेंकरून आईला बरं वाटेल तें तें करावें, असा तिचा क्रम असे. आज तर लिझेटच्या आईची तब्यत अतिशयित बिघडली होती. तिच्या मुद्रेंत बराच फरक पडला होता व आपण आज खास मरणार, हें तिला समजून चुकल्यामुळें ती फारच दिलगीर दिसत होती.

लिझेटचें भाषण संपतें न संपतें तोंच बिछान्यावर विव्हळत पडलेली डेम मार्ग्रेट ह्मणाली "लिझेट, तूं माझ्यावर एवढं प्रेम कां करित आहेस? तुझं हें माझ्यावरचं प्रेम पाहून माझी छाती भरून येते ग !"

"आई ! तूं असं कांहींतरी बडबडून माझ्या अंतःकरणास कां बरं घरे पाडित आहेस ? माझ्या प्रियकर आईची मनोभावानं सेवा करणं हा माझा धर्मच आहे. मी तुझी जेवढी चाकरी करीन तेवढी थोडीच होणार आहे. तुझं मस्तक मला जरा वर करूं दे, त्यापासून तुला सुख वाटेल."

डेम मार्ग्रेट ह्मणाली " लिझेट, मी आतां जास्त वेळ जगत नाहीं. मी केव्हांच जायची, पण माझा जीव घुटमळतो आहे. बाळे, तूं जर

माझ्यावर एवढं प्रेम न करतीस, तर मला मरायला एवढा अवकाश लागला नसता; मी केव्हांच गेल्यें असत्यें. पण तुझं हें मनस्वी प्रेम, माझ्यानें सहन करवत नाहीं. अरेरे! मीं ज्याचं महान नुकसान केलं आहे, तेंच उलट माझ्यवर प्रेम करित असतांना मी कोणत्या तोंडानं सहन करूं? हाय–हा आ–"

आईची ही व्याकुळ स्थिति पाहून बापडी कोंवळ्या मनाची लिझेट घाबरून गेली. तिची छाती भरून आली व डोळ्यांतून आसवें गळूं लागलीं. रडत रडत ती आईस म्हणाली "आईग! अशा मर्मभेदी भाषणांनीं तूं माझं हृदय वेधूं नकोस गडे! तूं माझं कांहींएक नुकसान केलं नाहींस आणि मला कसलंच दुःख दिलं नाहींस. आईच्या रीतीप्रमाणं तूं माझ्यासाठीं आजपर्यंत पुष्कळ झीज सोसली आहेस; पुष्कळ दुःखं भोगिलीं आहेस. तुझे माझ्यावर अगणित उपकार झालेले आहेत. तुझ्यासारखी माता क्वचितच असेल!"

डेम मार्ग्रेट आवेशानें ह्मणाली "लिझेट! लिझेट! तूं मला 'आई' अशी हांक मारूं नकोस! तो शब्द माझ्या काळजास झोंबतो ग! बाळे, ही चांडाळीण तुझी आई नव्हे!"

आपल्या आईच्या तोंडून हें विपरीत भाषण ऐकतांच बिचारी लिझेट गर्भगळीतच झाली. आई ह्मणते तरी काय, हें तिला कळेना. ती रडकुंडें तोंड करून म्हणाली "आई! आज तूं असं काय करित आहेस? गडे, मला भीति वाटते!"

डेम मार्ग्रेट म्हणाली "लिझेट! मी आतां लवकरच मरणार आहें. मीं एक मोठं पातक केलं आहे. मरणापूर्वी मला तें धर्मोपदेशकाच्या कानांवर घालूंदे. तूं धर्मोपदेशकास लवकर घेऊन ये. जा जा, लवकर जा!"

आईच्या आज्ञेप्रमाणें लिझेट धर्मोपदेशकास घेऊन आली. धर्मोपदेशक डेम मार्ग्रेटच्या शेजारीं बसल्यावर ती त्याला ह्मणाली "महाराज, परमेश्वराचा मीं एक महान अपराध केला आहे. या निरपराध सद्गुणी

मुलीचा मीं मोठा घात केला आहे. लिझेट ! लिझेट ! मी तुझ्याकडे कोणत्या तोंडानं क्षमा मागूं ?"

लिझेट सद्गदीत होऊन डोळे पुशित ह्मणाली " आई! तूं आज—"

" नको ! न-अ-को ! तुझ्या मी पायां पडत्यें, मला ' आई ' अशी हांक मारून माझ्या पापी अंतःकरणावर आणखी डागण्या देऊं नकोस! तुझ्या बापुडवाण्या मुखांतून निघालेला हा शब्द ऐकतांच माझ्या काळजाचं पाणी होत आहे ! ( धर्मोपदेशकाकडे वळून, ) महाराज ! मी अघोर पातकी आहें. मी या मुलीची खरी आई नव्हें ! लिझेट, मी तुझी आई नव्हें ! "

डेम मार्ग्रेट याप्रमाणें बोलत असतां थरथर कांपूं लागली. धर्मोपदेशकहि मोठ्या विस्मयांत पडले. थोडासा विसांवा घेऊन हुषार झाल्यावर तिनें आपला वृत्तांत सांगण्यास सुरुवात केली. डेम मार्ग्रेट ह्मणाली "माझा भ्रतार मरण पावल्यास सुमारं पंधरासोळा वर्षं झालीं असतील. त्यावेळीं माझ्या पोटीं एक मुलगी जन्मली होती. ती पांचसहा महिन्यांची असतां पारीसमधील डीपान्स नांवाच्या एका धनाढ्य उमरावाची बायको, आपल्या तीनचार महिन्यांच्या लेंकीसह, हवा पालटण्याकरितां ह्मणून आमच्या गांवीं आली होती. त्या बाईनं आपल्या मुलीची जोपासना करण्यासाठीं मला दाईदाखल ठेविलं होतं. बाईच्या हुकुमावरून तिच्या लेंकरास मीं माझ्या घरींच आणिलं. यजमानिणीच्या लेंकराला उत्तम प्रकारच्या जोपासनेनं गुटगुटित पुष्ट करून तिच्या हवालीं करावं व या कामागिरीबद्दल मोठं इनाम पटकवावं, या उमेदीवर मीं कितीतरी काळजी घेऊन त्या बालकाचं संगोपन करित होत्यें. परंतु दुर्दैवानं तें आजारी पडून मरणोन्मुख झालं. इतक्यांत धनीण आपल्या लेंकरास न्यावयास आली. परंतु तें तर आतां मरतं कीं घटकेनं मरतं अशा स्थितींत पडलेलं ! माझं इनाम बुडतं, याची मला मोठी काळजी पडली. इतक्यांत द्रव्याच्या लोभानं माझ्या मनांत अशी दुष्ट कल्पना आली कीं, माझी स्वतःची मुलगी

जी वयानं, रंगरूपानं आणि दिसण्यामधेंहि अगदीं थेट धनिणीच्या मुलीप्रमाणंच होती, तिलाच धनिणीची मुलगी ह्मणून तिच्या हवालीं करावं! कारण, या वेळीं ती गुटगुटित होती. महाराज! धनिणीपासून मिळणाऱ्या मोठ्या इनामाच्या दुष्ट आशेमुळं शेवटीं तें अघोर कर्म मी करून चुकल्येंच ! त्या बाईनंहि माझ्या मुलीला स्वतःचीच मुलगी समजून व त्याची अंगकांति पुष्ट पाहून आनंद पावून मला मीं बाळगलेल्या आशेपेक्षांहि मोठं इनाम दिलं व ती आपल्या गांवीं निघून गेली. मीं दुष्टेनें अशा प्रकारं कपट करून त्या बाईचं बाळ ठकविलं व तेंच ही माझी लिझेट होय ! ”

डेम मार्ग्रेटचा हा वृत्तांत ऐकून धर्मोपदेशक स्तब्ध झाले. लिझेट डोळ्यांत आसवें आणून म्हणाली “तरमग तूं माझी आई नव्हस काय?”

डेम मार्ग्रेट दीन मुद्रेनें म्हणाली “बेटा ! जरी मी तुझी जन्मदाती आई नसल्यें, तरीहि मीं तुझ्यावर आईप्रमाणंच प्रेम केलं आहे. तुझी जतन जर मीं केली नसती, तर तूं केव्हांच मरून गेली असतीस. पण लिझेट, तूं मजवर रागावूं नको. माझ्या अपराधाची क्षमा कर. ”

लिझेट ढळढळां रडत म्हणाली “ मी क्षमा करत्यें. तूंच मला लहानाची मोठी केलीस, तूंच माझे लाड पुरविलेस, यासाठीं तुझ्या अंतकाळीं, मी तुझं अंतःकरण दुखवित नाहीं. मी तुला मनापासून क्षमा करत्ये.”

“ अरेरे ! ” डेम मार्ग्रेट स्फुंदत स्फुंदत ह्मणाली “ मज अघोर पापिणीला, माझ्या अंतकाळीं माझं प्रिय बालक अंतरावं ना? हाय हाय! मी केवढी हतभागी ! ”

डेम मार्ग्रेटचे हे शब्द ऐकतांच डोळे भरून येऊन लिझेट जरा रागानें पण दीन मुद्रेनें म्हणाली “ आई ! मग मला तूं आपली मुलगी समजत नाहींसच ना ?”

“ शाबास, बाळे शाबास ! देव तुझं भलं करो ! तुझे हे गोड शब्द ऐकून मी संतुष्ट झाल्यें. आतां मी सुखानं मरेन. ”

आणि खरोखरच तिचें हें भाषण संपतें न संपतें तोंच तिचे डोळे मिटले आणि श्वासहि बंद झाला.

डेम मार्ग्रेटच्या मृत्यूला कांहीं दिवस लोटल्यावर, लिझेट पारीसमध्यें राहत असलेली आपली खरी आई मडम डीपान्स इच्याकडे जावयास निघाली. धर्मोपदेशकापासून तिनें एक पत्र घेतलें होतें व त्या पत्रांत त्यानें डेम मार्ग्रेटनें मरते वेळीं सांगितलेली सगळी हकीगत लिहिली होती. लिझेटनें आपलें एकंदर सरसामान एका पेटींत भरलें व साध्या पोषाखानेंच ती पारीस येथें जाण्याकरितां आगगाडींत बसली. पारीसच्या स्टेशनावर उतरतांच तेथील भव्य देखावा पाहून ती भांबावल्यासारखी झाली. त्या शहरची दाट आणि प्रचंड वस्ती, तेथील गगनभेदक उंच उंच हवेल्या, शोभायमान बागबगीचे, श्रीमान लोकांच्या फिरण्यासवरण्याच्या दोन दोन घोड्यांच्या सुशोभित गाड्या, वगैरे थाट पाहतांच ती अगदीं चकित होऊन गेली. कारण, तिनें आजपर्यंत यांतील कांहींएक अवलोकन केलेलें नव्हतें. ती स्वतःशींच ह्मणूं लागली "अहाहा ! असा हा सुंदर देखावा आतां मला वारंवार पहाण्यास मिळावयाचा असल्यामुळं मला केवढा आनंद होईल ? अशा या आनंदप्रद सुखापासून मला एका स्त्रीनं दूर ठेविलं ? हाय हाय ! माझ्या दाईची मुलगी, जी माझी दौलत, माझं नांव आणि माझ्या आईचं प्रेम उपभोगित आहे, तिला मी आतां लौकरच पाहीन. ती मुलगी केवढ्या तोऱ्यांत असेल ? पण ज्या वेळीं हा कागद मी माझ्या आईच्या हातांत देईन, त्यावेळीं तिला केवढं दुःख होईल, आणि मी केवढी सुखी होईन ! " असा विचार करित करित तिनें एका मजुरास बोलावून आणलें व त्याच्या डोकीवर पेटी देऊन त्याला " मडम डीपान्सच्या घरीं चल, " ह्मणून सांगितलें. रस्त्यांतून जात असतां तेथील चित्रविचित्र रमणीय प्रकार पाहून लिझेटचें मन अतिशय प्रसन्न झालें, व आपल्याला लवकरच हें सुख उपभोगावयास सांपडणार असें मनांत येऊन तिला अतिशय आनंदहि वाटूं लागला. इतक्यांत तिच्या दृष्टीस एक देऊळ पडलें. त्याबरोबर

ती एकदम थबकून स्वतःशींच ह्मणाली " अरेरे! मी केवढी दुष्ट! केवढा नीच विचार माझ्या मनांत घोळत आहे ? त्या गरीब बापडीस मी दुःखी करणार ना? मी केवढी निर्दय !" असा विचार करून ती मजुरास ह्मणाली " बाबा ! तूं जरा इथें उभा रहा, मी देवळांत जाऊन देवाची प्रार्थना करून येत्यें. "

देवळांत जाऊन लिझेटनें गुडघे टेकलें व हात जोडून पुढील-प्रमाणें देवाची प्रार्थना केली:—" हे परम कृपाळु देवा ! मी आज माझ्या आईस भेटावयास जात आहें. माझी आई मला आपल्या कन्येदाखल कबूल करून माझेवर प्रेम करील, असं तिच्याशीं भाषण करण्याची तूं मला शक्ति दे ! एका गांवढ्या गांवांत लहानाची मोठी झालेली मी गरीब मुलगी आहें. त्यामुळं मोठ्या लोकांबरोबर कसं बोललं पाहिजे हें मला मुळींच माहित नाहीं. आणि हे परमेश्वरा ! तूं माझं अंतःकरण उदार कर. जी मुलगी आज माझ्या ठिकाणीं असून माझ्या आईच्या प्रेमास पात्र झाली आहे, तिच्याशीं नम्रपणानं वागण्याची शक्ति तूं माझ्यांत उत्पन्न कर. तिच्यावर म्यां प्रेम करावं असं तूं कर. कारण, मी जाण्याबरोबर ती बापडी मातृविहीन आणि दुःखी होईल. मी माझ्या खऱ्या आईस आणि खऱ्या सुखास अंतरण्या-मधें बापड्या त्या मुलीचा कांहींएक अपराध नाहीं. यास्तव, तिच्याशीं बहिणीप्रमाणं वागण्याचं सामर्थ्य तूं मला दे. एवढीच तुझ्याकडे पदर पसरून मागणी मागत्यें. "

याप्रमाणें देवाची प्रार्थना केल्यावर ती मजुराबरोबर चालती झाली. लवकरच मडम डीपान्सच्या घरीं ती येऊन पोहोंचली. आपल्या आईच्या घरीं ( अनोळखी आईच्या घरीं ) प्रथमच चढतांना लिझेटचे पाय लटलट कांपूं लागले. पण हिंमत धरून ती वर चढली. दरवाजा बंद होता. लिझेटनें घंटेची दोरी मोठ्या जोरानें खेंचली. घंटेचा आवाज मोठ्यानें झालेला ऐकून मडम डीपान्सची एक दाई घाबरून धावत धावत आली व तिनें दरवाजा उघडला. परंतु पाहते तों एक गरीब

कुळंबट मुलगी उभी असल्याचें तिला दिसून आलें. त्याबरोबर त्या दाईला फार राग येऊन ती ह्मणाली " एवढ्या जोरानं घंटा वाजविण्यासारखं तांतडीचं तुझं काय काम अडलं होतं ? "

लिझेटनें धीटपणें उत्तर दिलें " मडम डीपान्सनां मला आतांच्या आतांच भेटायचं आहे. "

दाई ह्मणाली " खरोखर, तूं फार वाईट काम केलंस ! एवढ्या जोरानं घंटा वाजविल्यामुळं आमची धनीण जागी झाली असेल ! " लिझेटकडे बारकाईनें न्याहाळून ती ह्मणाली " तूं मार्सेल्सहून आलीस काय ? डेम मार्ग्रेटची का तूं मुलगी ? "

लिझेटनें जबाब दिला " होय ! "

"तर सबूर कर. आमच्या छोट्या धनिणीस बोलावत्यें. ती आपल्या सोबतिणीला पाहून फार खूष होईल. ती तुझी नित्य आठवण करित असते. "

असें ह्मणून दाई आंत गेली. लवकरच उंची रेशमी पोषाख केलेली एक खुपसुरत तरुण मुलगी बाहेर आली व तिनें दोन्हीं हातांनीं लिझेटच्या गळ्यास घट्ट मिठी मारून ती ह्मणाली " लिझेट ! लिझेट ! तूं आल्यानं मला केवढा आनंद झाला आहे? देवानंच आज तुला मला भेटण्याची बुद्धि दिली, हे त्याचे माझ्यावर केवढे उपकार झाले आहेत ! माझी दाई खुशाल आहेना ? तूं बोलत कां नाहींस गडे ? मला पाहून तूं भीत तर नाहींस ना ? "

लिझेट बापडी चकितच झाली. आपली ही बहीण, आपला एवढ्या प्रेमानें आदरसत्कार करील, हें तिच्या स्वप्नींहि नव्हतें. परंतु प्रथमच तिचें हें मायाळू वर्तन लिझेटच्या दृष्टीस पडतांच तिच्या अंतःकरणांत या बहिणीबद्दल हेव्याच्याऐवजीं प्रेमानें ठाणें दिलें. लिझेटनें डेम मार्ग्रेट मरण पावल्याचें वर्तमान तिला सांगितलें. आपली दाई मेली हें ऐकतांच क्लोटिल्डा (हें त्या मुलीचें नांव होतें.) ह्मणाली " अरेरे ! ती मेली काय? माझी गरीब दाई ! बिचारी मेली ? आपणा उभयतांस

तिच्याबद्दल फार वाईट वाटतं. पण लिझेट ! तूं भिऊं नकोस. तुला इथंहि बहीण आणि आई आहे. तूं अशा प्रसंगीं आमच्या इथं आलीस, हें ठीक केलंस. तुला इथं कुणीच परकी समजणार नाहीं ! तूं माझी बहीण हो. आमच्या घरांतील सर्वजणं तुझ्यावर मजसारखंच प्रेम करतील, तुला मान देतील आणि तुझा हुकूम बजावतील. (चाकरांकडे वळून क्लोटिल्डा म्हणाली ) तुम्ही ऐकतां आहांना ? ही तुमची दुसरी क्लोटिल्डा आहे. आम्ही दोघीहि एकच दुध प्यालों आहों. तुम्ही सर्वजण ही सांगेल तें ऐकत जा !"

लिझेट म्हणाली " क्लोटिल्डे ! मला आईस भेटायाचं आहे. ती कुठं आहे ? तिला मला लवकर भेटवशील का ? "

क्लोटिल्डा म्हणाली " आईची आणि तुझी भेट इतक्यांत होणार नाहीं. कारण आई नुकतीच निजली आहे. तूं माझ्याबरोबर चल. तुला पाहून मला अतिशय हर्ष वाटत आहे. " असें म्हणून क्लोटिल्डेनें लिझेटला आपल्या घरांतील शृंगारलेला मोठा दिवाणखाना व सुंदर सुंदर खोल्या दाखविल्या. ती म्हणाली " ही माझी बसण्याउठण्याची खोली. डाव्या हाताची खोली माझ्या अभ्यासाची खोली होय. ही उजव्या बाजूची खोली रिकामीच आहे, ती मी तुला देईन, व निजण्यासाठीं ती समोरची खोली मोकळी करायला सांगत्यें. म्हणजे आम्हां उभयतांनां सारा दिवस आणि सारी रात्र जवळ जवळ राहण्यास मिळेल. परंतु रात्रीच्या वेळीं वारंवार माझी प्रकृति बिघडत असते, त्यामुळं तुझ्या झोंपेचा मोड होईल तर मात्र नकळे. माझी प्रकृति एवढी नाजुक झालेली आहे कीं, यत्किंचित् श्रम होतांच मला एकदम ताप येतो. यावेळीं माझा हात पहा, गरम लागतो आहेना ? तुला पाहिल्याबरोबर मला झालेल्या आनंदामुळंच तो असा गरम झाला आहे. कसल्या तरी दुःखाची किंवा भयाची जर कसली गोष्ट मी ऐकेन तर मी तावडतोब मरेन, एवढी माझी प्रकृति नाजुक झालेली आहे. यामुळंच मला राग येईल असं न करण्याविषयीं सगळीं

माणसं फार जपतात. सर्वजणं मला खूष ठेवण्याविषयीं झटत असतात. माझ्या शब्दावर कोणीहि प्रत्युत्तर करित नाहीं. अशी माझी अगदींच नाजुक स्थिति झालेली आहे. ही स्थिति मला माझ्या आई-पासून आलेली आहे. माझ्या बाबांची शरीरप्रकृति मजबूत होती, असं लोक सांगतात. पण लिझेट, तूं कशी सुंदर आणि निरोगी दिसत आहेस ! ( तिच्या गालावरून हात फिरवून ) तुझे हे गाल पहा गुलाबाच्या फुलासारखे आहेत ! तूं किती भाग्यशाली आहेस ? नेहमीं रोगी असणं केवढया दुर्दैवाचं लक्षण ? पण लिझेट, तूं बोलत कां नाहींस ? तूं एवढी गंभीर कां दिसतेस ? माझ्यावर तुझं प्रेम बसत नाहीं काय ? ”

लिझेट ह्मणाली “ मी नुकतीच इथं आल्यें असून तुम्हांला बरोबर ओळखित नसल्यामुळंच मला एकदम बोलवत नाहीं. ”

क्लोटिल्डा ह्मणाली “मग, मी तुला जास्त ओळखित होत्यें कीं काय ? जीं दोन बालकं, एकच दूध पिऊन वाढलीं आहेत व एकाच पाळण्यांत, एकाच बिछान्यावर बरेच दिवस निजलीं आहेत, त्यांची पुन्हा भेटाभेट झाल्यावर एकमेकांच्या मनांत प्रेमाचा पाझर फुटण्यास वर्षांचीं वर्षं लागलीं पाहिजेत काय ? लिझेट, हें बोलणं तुला शोभत नाहीं. दे दे, मला झडकर आलिंगन दे ! नाहींतर माझी प्रकृति आतांच विकोपास जाईल. ”

क्लोटिल्डेचें हें मधुर आणि प्रेमपूर्ण भाषण ऐकून लिझेटचें कोंवळें अंतःकरण विरघळून गेलें. तिनें मोठ्या प्रेमानें क्लोटिल्डेच्या मुखाचें चुंबन घेऊन तिला कडकडून आलिंगन दिलें. तिची मनामध्यें खात्री झाली कीं,क्लोटिल्डेसारखी गुणी आणि नीतिमान मुलगी क्वचितच असेल.

क्लोटिल्डा उठली आणि तिनें एका मोठ्या आरशासमोर लिझेटच्या खांद्यावर हात ठेवून ती ह्मणाली “ पहा लिझेट ! आपण उभयतां कशा अगदीं एकसारख्या दिसत आहों ? माझा पोषाख तुला अगदीं सारखा होईल, नाहीं ? तुझ्या अंगावरील पोषाख तुला माझ्यासाठीं बदलला पाहिजे. तूं माझ्याप्रमाणंच पोषाख करावास, अशी माझी इच्छा आहे.”

आपल्या आईला कधीं एकदा पाहीन, असें लिझेटला झालें असल्यामुळें तिचें क्लोटिल्डेच्या या भाषणाकडे मुळींच लक्ष्य नव्हतें. क्लोटिल्डेच्या प्रेमाबद्दल तिचे आभार मानून तिच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचें तिला भानच राहिलें नाहीं. ती क्लोटिल्डेला विचारूं लागली "आई केव्हांशी उठेल ?"

क्लोटिल्डा म्हणाली " लिझेट ! आईला उठायला अजून बराच अवकाश आहे. आणखी चांगला एक तासपर्यंत आपल्याला तिच्या खोलींत जातां येणार नाहीं." इतक्यांत ती दिलगीर मुद्रेनें म्हणाली "अरेरे ! माझं मस्तक केवढं हलकं आहे ! माझ्यानं अतिशय दुःख सहन करवत नाहीं. माझी छाती एकसारखी धडधडत आहे ! या माझ्या स्थितीवरून मला वाटतं, एखादे दिवशीं मी अशीच कसल्यातरी कारणामुळं एकाएकीं मरेन ! पण अरे ! मीं आपलं माझ्याविषयींच एकसारखं चऱ्हाट लाविलं आहे ! मीं तुला नुसतं विचारलंदेखील नाहीं कीं, तुला काय हवं—नको आहे ह्मणून ? ताई ! तुला भूकबिक लागली असेल नाहीं ? चहा मागवूं का ? तूं कपडे तरी उतर !"

लिझेट म्हणाली " गडे, मला कांहींएक नको. फक्त आईला कधीं भेटेन असं झालं आहे."

क्लोटिल्डा म्हणाली "तुझी एवढी आतुरताच आहे, तर आई उठली कीं नाहीं तें मी पाहून येत्यें. माझ्या गरीब दाईनं मरण्याच्या अगोदर लिहिलेला कागद तूं आणला असावास वाटतं ? तुझ्या हातांतील कागद तोच वाटतं ? बघूं बरं त्यांत काय लिहिलं आहे तें ?"

पण लिझेटनें एकाएकीं हात मागें खेंचला. हें पाहून क्लोटिल्डा म्हणाली " आईपाशीं तूंच स्वतः हातोहात देणार असलीस, तरीहि हरकत नाहीं. मला कांहीं त्याबद्दल वाईट वाटत नाहीं. पण आईला भेटण्यास अजून चांगला एक तासाचा अवकाश आहे. यासाठीं तेवढ्या अवकाशामध्यें तूं तुझा पोषाख वगैरे बदल, केंस विंचर आणि अंग धुऊन घे, तुझ्या घरीं ज्याप्रमाणं तूं वागत असस, त्याप्रमाणंच इथंहि वाग,

मनांत कोणत्याहि प्रकारचा संकोच बाळगूं नकोस. आई उठली कीं नाहीं तें मी पाहून येत्यें. तेथपावेतों तुझ्यानं एकटं बसवत नसेल, तर हीं इथं गोष्टींचीं सुरेख सुरेख पुस्तकं पडलीं आहेत, त्यांतील एखादं वाच हवं तर."

लिझेट फार ओशाळी झाली. कारण, तिला लिहितांवाचतां मुळींच येत नव्हतें. ती म्हणाली "मला वाचतां येत नाहीं."

हें ऐकतांच क्लोटिल्डा चकित झाली व तिला फार वाईटहि वाटलें. वाईट एवढ्याचकरितां वाटलें कीं, नजाणो, लिझेटला दुःख झालें असेल. म्हणून तिनें तिला हृदयाशीं धरून म्हटलें " लिझेट, मला क्षमा कर. तुला लाजविण्याकरितां मी खरोखर बोलल्यें नव्हत्यें; पण तूं एवढी कां शरमतेस ? तुला पुस्तकं वाचतां न येण्याचं कारण एवढंच कीं, तूं तें शिकलीसच नाहींस; त्याची कांहीं लाज बाळगायला नको आहे. पण तूं एवढं मात्र कर कीं, ही हकीगत इथील कुणाएका-साहि कळवूं नकोस. कारण, इथले लोक असे मूर्ख आहेत कीं, ही गोष्ट ऐकतांच खदखदा हंसतील व त्यायोगें मला फार दुःख होईल. तुझी शिकण्याची इच्छा असेल—तूं शिकावंसच अशी मी तुला विनंति करत्यें—तर मी तुला अगदीं थोड्या वेळांत लिहिण्यावाचण्यास शिकवीन. त्याचप्रमाणं मला कशीदा, शिवणकाम, चित्रं काढणं, इत्यादि कला येतात, त्याहि तुझी मर्जी असल्यास तुला मी शिकवीन."

क्लोटिल्डेचें आपल्याविषयींचें एवढें प्रेम आणि एवढी कळकळ पाहून लिझेटचें अंतःकरण विरघळून गेलें. ती मोठ्या विचारांत पडली. आपल्या आईच्या मोठ्या मिळकतीवर, आणि अनेक नोकरांचाकरांवर आपला खरा हक्क शाबीत करण्याविषयीं ती उत्कंठित होती; व दुसरीकडे, जी आपली व तिची पूर्वीची यत्किंचितहि ओळख नसतां आपल्याशीं एवढ्या उदार मनानें वागते आहे, आपल्यावर एवढें प्रेम करित आहे, तिला एकाएकीं महान दुःखी करावें, हें तिला मोठें दुःसह वाटत होतें. लिझेटच्या जागीं दुसरी एखादी मुलगी असती, तर तिनें

स्पष्ट ह्मटलें असतें कीं " दुष्टे! जा जा, माझें नांव, माझें वैभव आणि माझ्या आईचें प्रेम, माझ्यापासून हिरावून बसली आहेस, तर नीघ येथून !" पण ती लिझेट होती! आपल्यावर मनापासून प्रेम करणाऱ्या क्लोटिल्डेला दु:खी करण्यापेक्षां तिला स्वत:च्या सुखाची किंमत जास्त वाटली नाहीं. तिनें मनाचा निर्धार करून क्लोटिल्डेस कडकडून मिठी मारली व तिच्या खांद्यावर मस्तक ठेवून ती गाहिंवरून म्हणाली " क्लोटिल्डे ? तूंच—तूंच भोग! या सर्वांस माझ्यापेक्षां तूंच विशेष पात्र आहेस!"

आपण इला सांगतों आहों काय व ही अशी सद्गदीत स्वरानें "तूंच—तूंच भोग!" असें ह्मणते आहे काय, हें कांहीं क्लोटिल्डेच्या ध्यानीं येईना. ती चकित होऊन ह्मणाली "ताई! मीं काय भोगूं? माझ्यासाठीं तूं मार्शेल्सहून कांहीं चीज आणली आहेस काय? काढ काढ पाहूं काय ती ? "

हें ऐकतांच लिझेट फारच ओशाळी झाली. आपल्या अंत:करणामध्यें चाललेले विचार आपल्याला नकळत बाहेर पडले, ह्याबद्दल तिला फार वाईट वाटलें व ती हातानें तोंड झांकून घेऊन म्हणाली "क्लोटिल्डे! प्रवासाच्या श्रमामुळं माझं मस्तक फार तापलं आहे व त्यामुळं मला वाटतं, मी भ्रमांतच कांहींतरी बोलून गेल्यें. मला क्षमा कर."

इतक्यांत एका चाकरानें क्लोटिल्डेस सांगितलें कीं " बाईसाहेब ! तुह्मांला थोरल्या बाईसाहेब बोलावताहेत. त्या नुकत्याच उठल्या असून लिझेट आल्याचें वर्तमान ऐकतांच फार खुष झाल्या आहेत व तिला भेटण्याची त्यांची इच्छा आहे."

लिझेट कांपत कांपत मनाशींच ह्मणाली " देवा! तूं मला आतां सहाय्य हो."

लिझेट आणि क्लोटिल्डा आईच्या खोलीपाशीं येतांच क्लोटिल्डा लिझेटला ह्मणाली "लिझेट, तूं जरा इथं उभी रहा. मी अगोदर आंत जात्यें, व नंतर तुला बोलावत्यें."

क्लोटिल्डा आंत गेली. आईनें तिचें चुंबन घेतलें व लिझेटला हांक मारली. आईनें हांक मारतांच लिझेटचें ऊर धडधडूं लागलें. ती लटलट कांपत खोलींत गेली. तिला पहातांच एकदम चमकल्यासारखें होऊन मडम डीपान्स मोठ्यानें ओरडली "अरे! हे डोळे! हे डोळे! अरे हे कसे अगदीं त्यांच्यासारखेच दिसत आहेत!"

क्लोटिल्डा ह्मणाली "त्यांच्यासारखे—कुणासारखे आई?"

मडम डीपान्स व्याकूळ होऊन ह्मणाली "खरोखर, त्यांच्याचसारखे हे डोळे दिसत आहेत! परक्याच्या लेंकरास त्यांच्यासारखे डोळे असून माझ्या लेंकरास नसावे? लिझेट, इकडे ये. तूं खालीं नजर करूं नकोस, माझ्याकडे पहा. पोरी! तुझे हे डोळे पाहतांच मला त्यांची आठवण होते ग! पण क्लोटिल्डे, तुला काय झालं? तूं कां ग रडत्येस?"

क्लोटिल्डा खुर्चीवर अंग टाकून मोठमोठ्यानें स्फुंदूं लागली. त्या सरशी मडम डीपान्स एकदम उठून तिला पोटाशीं धरून ह्मणाली "बाळे! तुला काय झालं? तूं कां रडत्येस? सांग सांग मला, काय झालं तें!"

क्लोटिल्डा रडत रडत ह्मणाली "माझे डोळे बाबांच्यासारखे नसून देवानं ते लिझेटला दिले आहेत. आतां तूं माझ्यापेक्षां लिझेटवरच जास्त प्रीति करशिल आणि आई, तूं मला विसरशिल, ह्मणून मला रडूं येतं."

मडम डिपान्स ह्मणाली "अग खुळे पोरी! तूं केवढी वेडी आहेस? माझा प्राण तो! नको ग बाळ तूं रडूं! तुला रडतांना पाहून मला कसंसंच होतं, बेटा! तूं आजारी पडशील! वैद्यानं तुला कितीवर बजावून सांगितलं आहे कीं, तूं अतिशय दुःख किंवा अतिशय आनंद करूं नकोस ह्मणून? बाळ, तूं सुखी तरच मला सुख! तुझा जीव तोच माझा जीव। तूं बापड्या या गरीब मुलीचा मत्सर करूं नको; ती बापडी मातृविहीन मुलगी आहे. तिला तूं तुझ्या बहिणीप्रमाणें समज!"

हा सगळा प्रकार पाहून लिझेट मनांतल्या मनांत थिजून गेली. तिनें आईला देण्याकरितां म्हणून हातांत ठेविलेलें पत्र, ती छपविण्याची तजवीज करूं लागली. तथापि मडम डीपान्सच्या तें दृष्टीस पडलेंच. तिला वाटलें, लिझेटनें आपल्याला पत्र आणलें आहे, पण तें देण्याचें तिला धैर्य होत नसावें. म्हणून तिनें प्रश्न केला " लिझेट, तुझ्या हातांत तें काय आहे ? तें मला पत्र आणलं आहेस काय ? तुझी आई डेम मार्ग्रेट इनंच का तें पाठविलं आहे ? "

लिझेट अडखळत अडखळत आणि कांपत म्हणाली " हो-ओ-य-न-न नाहीं आईसाहेब ! " असें म्हणून ती रडूं लागली व स्फुंदत स्फुंदत म्हणाली " मा—माझी आई म—मरण पावली. " लिझेटनें याप्रमाणें पत्राची गोष्ट बदलूनच टाकली. या प्रसंगी तिनें आत्मसंयमन कशा प्रकारें केलें याची कल्पना वाचकांनींच करावीं.

लिझेट आपल्या आईच्या घरीं राहिली. तिनें दयाळू स्वभावाच्या क्लोटिल्डेसाठीं, आपण खरी मुलगी असून क्लोटिल्डा ही दाईची मुलगी आहे, हें बाहेर पडूं दिलें नाहीं, इतकेंच केवळ नाहीं, तर आपण जणों क्लोटिल्डेच्या दाईचीच लेंक आहों, अशा रीतीनें ती वागूं लागली. खरा प्रकार सर्वांना जाहिर करण्याविषयीं आणि त्याचप्रमाणें खरी मुलगी आपण आहों याबद्दल आपल्या आईची खात्री करण्याविषयीं, तिचें अंतःकरण तिला वारंवार असह्य यातना देत होतें; तथापिहि भोळ्या दिलाच्या क्लोटिल्डेसाठीं तिनें तो आपला विचार वारंवार आवरित असावें. ती क्लोटिल्डेशीं कधींहि उद्दामपणानें वागली नाहीं; तर अगदीं नम्रपणानें, चाकराप्रमाणेंच ती तिच्याशीं वागत असे. हा स्वभाव लहानसहान उदार काय ?

परंतु क्लोटिल्डाहि लिझेटशीं सख्ख्या बहिणीप्रमाणेंच वागत असे. तिनें लिझेटला कोणत्याच प्रकारें कमी पडूं दिलें नव्हतें. तिला दररोज ती मोठ्या आवडीनें शिकवित असे. क्लोटिल्डेच्या सहाय्यानें लिझेट दीड दोन

वर्षांच्या आंतच लिहिण्यावाचण्यांत, आणि गायन, कशिदा वगैरे कलेंत बरीच तरबेज झाली.

मडम डीपान्स क्लोटिल्डेवर लिझेटपेक्षां फार प्रीति करी. कारण, ती तिला स्वतःची मुलगी समजत होती. क्लोटिल्डा मोकळ्या मनानें आईशीं बोलत असे. लिझेटला तसें करतां येत नव्हतें. आईवर खरा हक्क बजाविण्यास लिझेट असमर्थ होती. आपण हक्कदार आणि खरी मुलगी असतां, आपल्यास खऱ्या मुलीप्रमाणें वागतां येत नाहीं, हें पाहून तिला फार दुःख वाटे व त्यामुळें ती एकसारखी झुरणीस लागली होती. फक्त क्लोटिल्डेसाठींच ती अशी आंतल्या आंत दुःख आवरून होती. एकांतामध्यें ती फार शोक करित असे. ती मार्सेल्सहून आली होती तेव्हां जेवढी अंगानें भरलेली आणि निरोगी होती, त्याच्या शतांशानेंहि सांप्रत तिची अंगलट नव्हती. तिचे गुलाबी गाल फिक्कट झाले होते, डोळे खालीं गेले होते व तोंडावर पांडुरता आली होती.

लिझेटला लागलेला हा हृद्रोग त्या सर्वांतर्यामी परमेश्वराशिवाय दुसऱ्या कोणालाहि ठाऊक नव्हता. पण कृपाळु ईश्वरास शेवटीं तिची दया आली. १८३० च्या जुलई महिन्यांत पारीसमध्यें एक भयंकर दंगा झाला. या प्रसंगीं मडम डीपान्स बाहेर कोठेंशी फिरावयास गेली असतां तिला बरीच इजा झाली. दंग्यामध्यें आई सांपडली असून तिला मोठी दुखापत झाली आहे, हें वर्तमान क्लोटिल्डेला समजतांच ती एकदम मूर्च्छितच झाली. क्लोटिल्डेची प्रकृति अतिशय नाजूक होती. अति दुःख किंवा अति आनंद तिला सहन होत नसे. त्यायोगें ती एकदम आजारी पडत असे, हें मागें सांगितलेंच आहे. तोच प्रकार या वेळीं घडला. ती बिचारी अतिशयच आजारी पडली. मडम डीपान्स थोडक्या दिवसांच्या आंत बरी झाली, पण क्लोटिल्डेचें दुखणें वाढत गेलें व ती जगण्याची आशाहि राहिली नाहीं. या तिच्या दुखण्यामध्यें लिझेट तिची मोठ्या प्रेमानें चाकरी करित होती. आपण या दुखण्यांतून आतां पार पडत नाहीं, अशी क्लोटिल्डेची खात्री

झाल्यावरून एक दिवस ती डोळ्यांत आसवें आणून लिझेटला ह्मणाली "लिझेट, मी आतां लवकरच मरणार आहें. माझ्या प्रियकर आईस आणि तुला सोडून जातांना, मला अति अवघड वाटत आहे. माझं मन अतिशय घुटमळत आहे. पण गडे लिझेट, आई जेव्हां बेशुद्ध होऊन आली होती, त्या वेळीं तूं 'आईग ! आईग !' असं बोलत विव्हळ झाली होतीस. तूं खरोखर तसं बोलली होतीस, कीं मला आपलं तसं स्वप्नच पडलं, त्याची मला आतां पक्की आठवण नाहीं. पण त्यावरून माझ्या मनांत हजारों कल्पना उभ्या रहात आहेत. 'हे डोळे ! हे डोळे! हे डोळे अगदीं त्यांच्याचसारखे आहेत! हे डोळे अगदीं त्यांच्याचसारखे आहेत !' अरे ! मी वेडी झाल्यें ! मी कांहींतरी बहकत आहें ! अरे ईश्वरा !! पण गडे लिझेट, तूं मला जबाब देत नाहींस ! तूं एवढी घाबरीघुबरी कां ग होतेस ? तूं कष्टी कां होतेस ? तुझें मन एवढं कांग घुटमळतं ?"

लिझेट ह्मणाली "क्लोटिल्डे, तूं बरी झालीस कीनई ह्मणजे मी तुला सगळं सांगेन, ह्मणजे झालं ना ? तुझी प्रकृति सध्या फारच नाजुक झाली आहे. तूं असल्या गोष्टी मनांतदेखील आणूं नकोस ! माझी एवढी विनंति तूं ऐकशीलना?" असें ह्मणून लिझेटनें कोटिल्डेच्या मुखाचें चुंबन घेतलें व तिच्या अंगावरून ती हात फिरवूं लागली.

त्यासरसी क्लोटिल्डा एकदम आवेशानें म्हणाली "लिझेट ! लिझेट ! अग तें सगळं मला समजलं आहे! त्या कागदांतील सगळं गुह्य मला समजलं आहे! अरेरे! मी चांडाळीण तुझ्या सुखाच्या आड आल्यें. हें सारं तुझंच वैभव असतां, त्यांतील थोडथोडं मी तुला आज दोन वर्षे देत आल्यें. त्या थोड्यांतच तूं संतोष मानलास आणि तूं मला कधींहि नाहीं सांगितलंस कीं 'तूं जें हें मला देत आहेस तें सगळं आपलंच आहे!' तूं माझ्यासाठीं सर्व सुखाचा त्याग केलास. मीं तुला आईच्या प्रेमापासून दूर ठेविलं, त्यामुळं तुला अतिशय दुःख झालं आहे. तुला कैक प्रसंगीं एकांतामध्यें रडतांना मीं पाहिलं आहे. अरेरे ! देवाचा मीं केवढा हा गुन्हा केला ?

लिझेट! आतां तुझं सारं वैभव मी तुझ्या हवालीं करीनच! पण, आज दोन वर्षं मीं तुला दुःखी करून जें पाप जोडलं आहे, त्याचं निवारण कसं होईल? लिझेट! मला क्षमा कर. मी आतां लवकर मरणार आहें."

क्लोटिल्डेची ही स्थिति पाहून लिझेटला तिची फारच दया आली. तिनें तिला कडकडून मिठी मारिली व ती ह्मणाली "माझे आवडते क्लोटिल्डे, तूं अशी कष्टी होऊं नकोग! तूं माझ्याशीं भलेपणानं आणि प्रेमानं वागली आहेस. मी तुला दुःखी करण्याकरितां ह्मणून मार्सेलसहून आल्यें होत्यें, पण तुझ्या भलेपणामुळं तो दुष्ट विचार माझ्या मनांतून समूळ नाहींसा झाला. तुझ्या प्रेमपाशांत न गुंतण्याविषयीं मी केव्हां केव्हां प्रयत्न करित होत्यें. पण, तो माझा दुष्ट प्रयत्न तुझ्या उदार वर्तनामुळं निष्फळ झाला. तूं माझ्यावर अतोनातच प्रेम करूं लागलीस. मी अगदीं अडाणी आणि बुद्धिहीन होत्यें. पण आज मी जी थोडंबहुत शिकल्येंसवरल्यें आहें, आणि त्या शिक्षणापासून जें सुख आणि जो आनंद आज अनुभवित आहें, तो सारा तुझाच उपकार आहे. क्लोटिल्डे, मीं तुला जें दिलं आहे, त्यापेक्षां कितीतरी जास्त तूं मला दिलं आहेस. तुझे मजवर खरोखर अगणीत उपकार आहेत!"

क्लोटिल्डा ह्मणाली "अहाग माझे प्रिय बहिणी! तुझं तोंड जेवढं मोहक आहे, तेवढंच तुझं अंतःकरणहि पण सुंदर आहेग! तूं खरोखरच देवकन्या आहेस!" असें ह्मणून त्या दोघींनींहि एकमेकींस घट्ट मिठी मारिली. उभयतांचीं अंतःकरणें गहिंवरून आलीं, अश्रु वाहूं लागले. बराच वेळ कोणाच्याच तोंडांतून शब्द फुटेना. दोघीहि एकसारख्या स्फुंदूं लागल्या. इतक्यांत त्यांनां कोणाचीशी चाहूल ऐकूं आली. त्यासरशी क्लोटिल्डा ह्मणाली "आई येत आहे वाटतं. आई! अरेरे, मा-मा-झी खरी आई तर म-रू-न गे—"

लिझेटनें क्लोटिल्डेच्या कानांत सांगितलें "चूप चूप क्लोटिल्डे, ही सगळी हकीगत आईला कळविण्याचं काय अगत्य आहे?"

त्यांचें असें भाषण चाललें आहे, इतक्यांत दरवाजा उघडून मडम डीपान्स आंत आली. ती ह्मणाली "बाळ तूं भिऊं नकोस ! डाक्तर आत्तां येतील. ईश्वर चांगलंच करील. ऐकलं बाळ, भिऊं नको !"

मडम डीपान्सनें क्लोटिल्डेस पोटाशीं धरलें आहे, तिच्या अंगावरून ती हात फिरवित बसली आहे, इतक्यांत एकाएकीं क्लोटिल्डेला भयंकर आंचकी आली व ती मोठ्यानें ओरडत ह्मणाली "आई ! मी तुझ्या मां-डी-वरच म-रत्यें आहें—मी सुखा-मधेंच म-र-त्यें आहें. लिझेट, देव तुझं भलं करो. मला तूं क्ष-मा क-र आणि तूं स-दैव सु-खी र-हा!" असें ह्मणून तत्क्षणीं तिनें प्राण सोडला.

लिझेट आणि मडम डीपान्स यांनीं एकच आकांत मांडला. घरांतील सर्व मंडळी भयभीत होऊन धावून आली. मडम डीपान्स तर फारच शोक करूं लागली. क्लोटिल्डेचे एक एक गुण आठवून आठवून ती हृदयभेदक आक्रोश करूं लागली. एकंदर मंडळी दुखांत बुडून गेली. "माझी एकुलती एक मुलगी मरण पावली ! आतां मला जगून काय करायचं आहे ? माझी क्लोटिल्डा गेली-गे-ली ! " इत्यादि प्रकारें दुःखोद्गार काढित मडम डीपान्स ऊर बडवून घेऊं लागली. तें पाहून आईच्या खांद्यावर मस्तक ठेवून लिझेटहि रडूं लागली व तिनें तें पूर्वीचें पत्र तिला दाखविलें. पत्र वाचून पहातांच तत्क्षणीं मडम डीपान्स मूर्च्छित झाली.

क्लोटिल्डेच्या ऐवजीं मडम डीपान्सला आपली खरी आणि वारस मुलगी मिळाली याबद्दल संतोष वाटावा यांत विशेष नवल नाहीं. पण आज इतके दिवस भयंकर आत्मसंयमन करून लिझेट राहिली होती, हें पाहून तिला अत्यंत आश्चर्य वाटलें व त्याबरोबरच तिच्या उदार स्वभावाबद्दल तिला अतिशय आनंदहि झाला.

लिझेटसारख्या उदार अंतःकरणाच्या मुली धन्य होत !

# मोगरीची ही माळा देऊं?

सुमारें पांचेक वर्षे होतील. येथील ग्रांट मेडिकल कॉलेजांत मी वैद्यकीचा अभ्यास करित होतों. मी कॉलेजच्या बोर्डिंगामध्येंच राहत असल्यामुळें फक्त रविवारींच कायतो तास दोन तास बाहेर पडलों तर पडें. बाकीचा सगळा वेळ मी तेथेंच असें. शिवाय, फिरण्यासवरण्याची मला ह्मणण्यासारखी हौसहि पण नव्हती. एका रविवारीं नित्याचीं पुस्तकें वाचून वाचून अतिशय कंटाळा आल्यामुळें, पांच साडे पांचांच्या सुमारास महालक्ष्मीच्या बाजूस मी एकटाच फिरावयास गेलों होतों. यावेळीं माझ्याबरोबर दुसरें कोणीहि नव्हतें. समुद्राच्या सुशांत भागीं, एका लांकडी बांकावर मी सायंकाळच्या वेळची आसमंतातभागची सुरम्य शोभा अवलोकन करित बसलों असतां रस्त्यांतून जाणारी पंधरासोळा वर्षांची एक माळ्याची तरुण मुलगी, मोगरीच्या सुवासिक कळ्यांच्या चारपांच माळा असलेली एक फुलांची परडी हातांत घेऊन माझेपाशीं आली व तींतील एक माळा बाहेर काढून मला ह्मणाली "मोगरीची हीं माळा देऊं? वास लई गोड आहे बघा तात्या!"

"काय घेशील तिचें?"

"दोन आणे द्या तात्या!"

"किंमत फार सांगतेस!" असें ह्मणून, तिची गरीब स्थिति पाहून मीं पाकिटांतून चवली काढली व तिच्या हातावर ठेविली.

तिनें या दयालुत्वाबद्दल माझे फार आभार मानले व ती हंसत हंसत चालती झाली. कांहीं पावलें चालून गेल्यावर ती एकदम थबकली व मागें परतून माझेपाशीं पुन्हा येऊन मला दीन मुद्रेनें विचारूं लागली "तात्या, थोडे पैसे घेऊन आमच्या गरीबाच्या घरीं आमच्या एका दुखणेकऱ्यास बघून जाईल, असा तुमच्या ओळखीचा एखादा डाक्तर असल्यास मला सांगा हो? गरीबावर मोठे उपकार होतील बघा!"

"तुझ्या घरीं कोण आजारी आहे?"

" माझी आईच दुखणेकरी झाली आहे तात्या ! " ती डोळ्यांत आसवें आणून ह्मणाली. "माझ्या आईचं दुखणं कांहीं मोठंसं नाहीं आहे, पण तिला नुसती बघण्यासच डाक्तर दोन रुपये मागतात. आह्मां गरीबांपाशीं इतके पैसे कुठें आहेत ?"

तिचें हें भाषण ऐकतांच माझ्या अंतःकरणास द्रव आला. मीं तिला आश्वासन देऊन ह्मटलें "कांहीं फिकीर नाहीं, तूं काळजी करूं नकोस ! तुझ्या आईला तपासून तिला मी फुकट औषध देईन. मीहि एक डाक्टरच आहें. तुझी आई कुठें राहते ?"

"मग गरीबावर थोर उपकार होतील तात्या ! तुमचे हे उपकार बघा, कधींहि विसरणार नाहीं आह्मी !"

रस्त्यांतून जात असलेली एक व्हिक्टोरिया बोलावली व आम्हीं दोघें तिच्या घरीं निघालों. सुमारें आठदहा मिनिटांनीं गोवालिया तलावावरून गाडी ग्रांटरोडच्या कोंपऱ्यापाशीं आली व तेथें एका आडव्या गल्लीच्या नाक्यावर आह्मी उतरलों. गाडीवाल्याच्या हातावर अधेली ठेवतांच तो निघून गेला व आम्ही एका बोळांत शिरलों. या बोळामधून त्या बोळांत, त्यांतून पुन्हा तिसऱ्यांत, असे आह्मीं कितीतरी बोळ आणि लहानलहान वळणें ओलांडलीं. ती मुलगी मला जिकडे घेऊन जात होती तिकडे मी चाललों होतों. बरेच बोळ ओलांडल्यावर ती मुलगी एका पडक्या घराच्या दाराजवळ येऊन थांबली व तिनें दार बाहेरून मोठ्या जोरानें आंत लोटलें. परंतु आंत पाहतों तर सर्वत्र काळोख ! उजेडाचें नांव नव्हतें.

" माझा हात धरा तात्या, " ती मुलगी मला ह्मणाली व एखादा आंधळा, वाट दाखविणाराच्या हातांतील काठीस धरून जसा चांचपडत चांचपडत जात असतो तसा मी तिच्यामागून जाऊं लागलों. कांहींसें चालून गेल्यावर आह्मीं एक कर्ररर्र कर्ररर्र वाजणारा जिना चढलों व तसाच दुसराहि एक उतरून एका मोठ्या दालनांत आलों. चौकाच्या मध्यभागीं बाहेरून बंद असलेला एक दरवाजा उघडून ती मुलगी मला

एका खोलींत घेऊन गेली व "आई! मी दाक्तरास घेऊन आल्यें. हे बघ ते आले आहेत. जरा उठतेसका?" असें ह्मणून तिनें खोलीचें दार ओढून घेतलें व बाहेरूनहि तें बंद केल्यासारखा आवाज मला ऐकूं आला. नंतर ती मुलगी तेथें जवळच असलेली एक खुर्ची पुढें करून ह्मणाली "दाक्तरसाहेब, जरा बसतां? आईला गाढ झोंप लागली आहे."

खोलींत एक समई मिणमिण जळत होती. एका खाटेवर एक दुखणाईत मनुष्य तोंडावरून पासोडी गुरफटून घेऊन निजलें होतें. ती मुलगी, दिव्यांत घालण्यासाठीं तेल आणण्यास ह्मणून जाण्याचा बहाणा करून आंतल्या एका खोलींत गेली. मी दुखणेकऱ्याच्या अगदीं जवळ जाऊन त्याला तपासूं लागलों. ती दुखणाईत स्त्री गाढ निद्रिस्त होती. इतकी कीं, मला तिचा श्वासोच्छ्वास देखील स्पष्टपणें ऐकूं येत नव्हता. तिची नाडी वगैरे तपासण्याकरितां मीं तिच्या तोंडावरील पासोडी वर उचलली, तों अरे बापरे! कोणी आईहि नाहीं आणि बापहि नाहीं. रोगीहि नाहीं आणि भोगीहि नाहीं! मी गर्भगळितच होऊन गेलों! डोळे नसलेलें, डोळ्यांच्या जागीं मोठमोठाल्या खांचा असलेलें, असें एक विद्रुप आणि भयंकर प्रेत मला दिसलें. "हें काय बरें प्रकरण असावें?" अशा भीतीच्या विचारांत मी गर्क झालों आहें, इतक्यांत एका दरवाजामधून एका मागून एक असे चार दैत्यासुर, काळकुट्ट पोषाख करून व तोंडावरून बुर्खा घेऊन माझ्याजवळ आले. त्यांनां पाहतांच मीं पक्कें समजलों कीं, त्या पोरीनें दगा देऊन मला जाळ्यांत अडकविलें. आह्मांला आज येथें मुक्ति मिळते खास. येथून आतां बचावून जाणें दुरापास्त होय! ही हकीगत आज या वेळीं मी लिहितों आहें खरा, पण त्या प्रसंगाची आठवण होतांच व तें चित्र माझ्या डोळ्यांसमोर उभें रहातांच अझूनहि मला कांपरें भरतें! मग त्या वेळीं—आतां मरतों कीं सेकंदानें मरतो, अशी भयंकर भीति मूर्तिमंत पुढ्यांत उभी असलेल्या वेळीं माझ्या मनाची स्थिति कशी झाली असावी, याची कल्पना वाचकांनींच करावी!

माझ्या हातांत हिऱ्याची एक आंगठी, सोन्याचें घड्याळ व कांहीं रोख नोटी, मिळून सुमारें सातआठशेंचा विषय होता. तो त्यांच्या हवालीं करून एकदा जीव बचावून घ्यावा, असा मीं विचार केला व समयसूचकता बाळगून यत्किंचितहि न गडबडतां मी धीटपणानें ह्मणालों—नव्हे त्यांनां तसें दाखविलें. आंतून आमची लटपट काय उडाली होती तें माझें मला ठाऊक! "तुमची इच्छा मी समजलों. तुह्मी मला मारूं नका. माझ्यापाशीं असलेलें सर्व कांहीं मी तुह्मांला मोठ्या आनंदानें देतों. मला जीवदान द्या."

माझें हें भाषण ऐकतांच ते चकितच झाले, व तोंडांतून एक अक्षरहि न उच्चारतां मला वेढून उभे राहिले.

"तुझ्यापाशीं सध्या काय काय आहे ? बोल लवकर!" त्यांतील एकजण, हातांतील सुरा दाखवून मला म्हणाला.

माझ्यापाशीं होतें नव्हतें तें सर्व मीं त्यांनां दाखविलें व म्हटलें "आणि शिवाय मी तुह्मांला शपथपूर्वक वचन देतों कीं, उद्यांचे उद्यां ब्यांकेमधून एक हजार रुपये काढून जो इसम खुणेकरितां ही माळा घेऊन माझ्यापाशीं येईल त्याचेकडे देईन !"

"वा: ! मग आम्हांला आयतेच पोलीसच्या हवालीं करणार होय? अहारे वेड्या !"

"आईबापांची शपथ नाहीं. माझ्या प्राणाची शपथ नाहीं. परमेश्वराची शपथ नाहीं. तो इसम निर्भयपणें परत येईल."

"सगळ्या गोष्टी मग ! सध्या काय आहे तें तर पाहूं या."

भराभर मीं सारा ऐवज काढून त्यांच्या पुढ्यांत ठेविला. ते तो घेऊन एकीकडे गेले व नीट पारखून पाहूं लागले.

कांहीं वेळानें त्यांतील एकजण माझ्याजवळ येऊन ह्मणाला "तूं आमच्याशीं इमानानें वागलास या तुझ्या वर्तनाबद्दल आम्हीं तुला पांच मिनिटांचा अवकाश देतों. आजपर्यंत कोणासहि एवढी मुदत दिलेली नाहीं. तरी मरणापूर्वीं तुला देवाचें स्मरण करावयाचें असेल

तर कर. ” असें म्हणून माझ्या पुढ्यांत घड्याळ उघडून ठेवून तो जाऊं लागला.

“ मग तुम्ही माझा प्राण घेणार ?” मीं रडत रडत म्हटलें. “ मला मारूं नका हो ! मला जिवदान द्या हो ! मी तुमच्याकडे भीक मागतों, तुमच्या पायां पडतों. —”

“ चूप! जास्त गडबड करशील तर आतांच डोकें उडवीन !” असें म्हणून त्यानें हातांतलि सुरा उगारला.

माझी बोबडी वळली. मला पांच मिनिटांची मुदत देऊन तो काळ पुन्हा आंत गेला. मला कसेंसेंच वाटूं लागलें. मी आतां लवकरच पास होणार होतों. डिग्री मिळविल्यावर सुरेखसा दवाखाना थाटून स्वतंत्रपणें उदरनिर्वाह करणार होतों. लोकांत नांव मिळविणार होतों. त्या माझ्या मनांतल्या थोर थोर सर्व आशा पार नष्ट होऊन, मी असा अवचित अपघातानें मरत आहें ! अरेरे ! माझा यत्किंचितहि अपराध नसतां मरत आहें! हें लक्ष्यांत येऊन मला केवढें दुःख झालें , मी केवढा हळहळलों व त्या चांडाळांचा मला केवढा संताप आला ह्मणून सांगूं ! पण काय करूं, कांहींच इलाज चालण्यासारखा नव्हता. पुष्कळ विचार केला, अनेक कल्पना लढवल्या, पण व्यर्थ ! अखेरीस ताडकन् उठलों व “ दगा, दगा, धावाहो धावा !” अशी किंकाळी फोडित दरवाजाकडे धावलों. पण दरवाजा बाहेरून बंद ! माझें हें वर्तन पाहतांच ते राक्षस अतिशयच चवताळले व एकदम धावत येऊन माझी मानगुटी पकडून म्हणाले “ बदमाष ! असा पळून जाणार होय ? ”

मीं दुसऱ्यादा अतिशय मोठ्यानें किंकाळी फोडली व त्याच पळास बंद असलेला दरवाजा खाडकन् उघडला आणि शिपायांची एक टोळी आंत घुसल्याचें मीं पाहिलें. पुढें काय घडलें, त्याची मला आठवण नाहीं.

नंतर एका तासानें डोळे उघडून पाहतों, तों मी हास्पिटलामध्यें एका लोखंडी खाटेवर पडलों आहें, जवळ दोनतीन डाक्टर, कंपाउंडर वगैरे मंडळी उभे असून मला सावध करित आहेत, व एकच गडबड

उडाली आहे, असें मला दिसून आलें. मी चांगला शुद्धींत आल्यावर मला प्रोफेसरसाहेबांकडून समजलें कीं, सदर्हू जागेविषयीं गुप्त पोलिसाला पुष्कळ दिवसांपासून वहीम होता व त्यामुळें एक डिटेक्टिव, माझी आणि त्या लुच्च्या मुलीची गांठ पडल्या ठिकाणापासून माझ्या मागोमाग येऊन खात्री करून घेऊन पोलीसच्या टोळीस घेऊन आला होता.

त्या दिसापासून मीं कानास अगदीं खडा लावून घेतला आहे कीं, अनोळख्या ठिकाणीं जातांना, त्या ठिकाणाची व तेथल्या लोकांची पक्की खात्री करून घेतल्याशिवाय घरांतून पाऊलच उचलावयाचें नाहीं !

बाहेरगांवच्या प्रिय वाचकांनों ! माझी ही गोष्ट ध्यानांत धरा व यदाकदाचित् तुह्मी जर कधींकाळीं या बकाली मुंबई शहरांत आलांच, तर येथील सोनेरी टोळीच्या लोकांकडून माझ्याप्रमाणें फसले जाऊं नका!

# माझ्या भाच्यांचा एक खेळ.

" कायग शांते ! कसलीग एवढी गडबड उडाली आहे ? "

" आह्मी खेळत आहों मावशी. आंत या, आमची गम्मत तर पहा!" शांती ह्मणाली.

" खरोखर मावशी," राजा ह्मणाला " तुह्मांला मोठी गम्मत वाटेल. याच तुह्मी! " असें म्हणून तो गुलाम माझा हात धरून मला दिवाणखान्यांत ओढूनच नेऊं लागला.

आंत जाऊन पहातें, तर माझ्या बहिणीचीं चारहि मुलें एकत्र जमलीं आहेत, हंसतखेळत आहेत, व मार एकच गडबड उडाली आहे.

" ह्या बघा मावशी, या पेटीमध्यें आह्मीं प्रत्येकानें आपापली इच्छा लिहून चिठ्या टाकल्या आहेत, आणि आतां त्यांतील एकेक चिठ्ठी उचलून आह्मी वाचणार आहों. " नानानें खेळाचा खुलासा केला.

" मी तुमची एकेक चिठ्ठी उचलून वाचूं ? " मीं त्यांनां गमतीनें विचारलें.

" वाः वाः, वाः वा, मग तर फारच छान होईल ! तुह्मीच—तुह्मीच वाचा मावशी, " राजा दिवाणखाना गाजवित म्हणाला.

माझ्या भाच्यांच्या या खेळाचें मला मोठें कौतुक वाटलें. मी हंसत हंसत जवळच्या एका खुर्चीवर बसल्यें व त्यांच्या चिठ्या वाचण्यास आरंभ केला.

सगळ्यांत मोठा मुलगा नाना बारा वर्षे उमरीचा, देखणा, हुशार आणि महत्वाकांक्षी होता. तो इंग्रजी पांचवें बूक घडघड वाचित असे. वर्गामध्यें पहिला नंबर त्यानें कधींहि सोडला नव्हता, व दर वर्षीं तो परीक्षेंतील सर्वांत मोठें इनाम पटकाविल्यावांचून राहत नसे. दुसरा दिनू शांत स्वभावाचा आणि पोक्त बुद्धीचा मुलगा होता. त्याच्या नऊ वर्षांच्या वयाकडे नजर दिली असतां खरोखर त्याच्या बुद्धीबद्दल आणि समाधानवृत्तिबद्दल पाहणारास आश्चर्य वाटे. सर्वांत धाकटा राजा मोठा मस्त होता. गुलामाला बोलायाला पुष्कळ पाहिजे होतें. राहतां

राहिली शांती. आणि तिच्यावर तर माझा सारा जीव असे. पोर मोठी देखणी आणि गुणी होती. असो. मीं त्या पेटींतील एक चिठ्ठी उचलली व मोठ्यानें वाचलें " अतीशय श्रीमान् होऊन चार घोड्यांच्या गाडींतून फिरावें, अशी माझी इच्छा आहे."

" हां, ही तुझी रे चिठ्ठी नाना," शांती शांत स्वरानें ह्मणाली.

" होय माझीच!" नाना ह्मणाला. " काय मावशी, तुह्माला हें पसंत आहेना?"

" तूं इंग्लंडचा इतिहास वाचला असशीलच नाना! कार्डीनल वुलसे याची गोष्ट तुला आठवते काय? त्याची इच्छा अगदीं तुझ्याप्रमाणं होती." मीं म्हटलें. " सुमारं चारशं वर्षांपूर्वीची ही हकीगत आहे. कार्डीनल वुलसे हा अगदीं सामान्य मनुष्य होता. त्याला श्रीमान आणि मोठं व्हावं अशी फार इच्छा होती, आणि अंतीं ती त्याची इच्छा ईश्वरकृपेनं सफलाहि झाली. तो इंग्लंडचा मुख्य प्रधान झाला. भव्य महालांत राहूं लागला व चारचार घोड्यांच्या गाडींतून फिरूं लागला. त्याच्या सारखी अमीरी कोणींहि भोगिली नसेल! असं सांगतात कीं, त्याच्या तैनातीस थोडथोडके नव्हेत तर पांचशांवर नोकर होते!"

" अब-ब-ब-ब! पांचशें नोकर?" चाराहि मुलें आश्चर्य चकित होऊन ह्मणालीं. " एवढे आपल्या कोल्हापुरच्या महाराजांपाशींहि नसतील!"

" त्याच्या घोड्यांच्या अंगावर मूल्यवान जवाहीर होतं, आणि चाकर लोकांचे पोषाख मोठमोठ्या सरदारांच्या पोषाखांहूनाहि जास्त किंमतीचे होते."

" वाः! तर मग मावशी खचित, तो खरोखर अत्यंत सुखी होता." नाना उत्सुकतेनें ह्मणाला.

"त्याचा पुढं शेवट कसा झाला तो ऐका." " लोकांच्या डोळ्यांमधें त्याचं तें अवाढव्य ऐश्वर्य खुपूं लागलं. सारे लोक त्याचा हेवा करूं लागले. राजाचंहि त्याच्यावरून मन उडालं व त्यानं त्याला पदभ्रष्ट केलं. अर्थात्, ज्या राजाची इमानंइतबारं सेवा बजावून त्यानं एवढा मान

संपादिला होता, त्याच राजापासून पुढं महान अपमान पावून तो सर्वांच्या धिक्कारास पात्र झाला. इतकंच नव्हे, तर अन्नान्न दशेमधें उपास काढित मरण पावला. त्या प्रख्यात पुरुषाचे मरते वेळचे पुढील उद्गार तुह्मी चांगले ध्यानांत धरा. तो ह्मणाला "ज्याप्रमाणं निमकहलालीनं मीं माझ्या बादशहांची सेवा बजाविली, तीच जर मीं मला निर्माणकर्त्या मोठ्या बादशहाची—परमेश्वराची—बजाविली असती, तर खचित या माझ्या वृद्धपणामधें ती मला फळास येती! माझ्या कीर्तीस आजच्यासारखा कलंक लागता ना! हे मनुष्या! हें नश्वर जग, कीं ज्यामधें धूळ, केरकचरा, कीटक वगैरे पदार्थ सगळ्या उत्तम उत्तम वस्तूंचा बिघाड करित आहेत, आणि धाडपाडू चोर भयंकर दरोडे घालित आहेत, तेथें तूं तुझं जवाहिर सांठवूं नकोस. तर तें स्वर्गलोकींच सांठीव. कारण, तेथें धूळ नाहीं, केरकचरा नाहीं, कीटक नाहींत आणि धाडपाडूहि पण नाहींत!"

नंतर मीं दुसरी चिठ्ठी उचलली व मोठ्यानें वाचलें "मोठा विद्वान आणि नामांकित व्हावं, अशी माझी इच्छा आहे."

"अति श्रीमान होण्याची इच्छा करणं अविचारीपणाचं आहे, पण अति विद्वान होण्याची आवड बाळगणं कांही वावगं नाहीं, नाहीं मावशी?" दिनूनें आपल्या चिठ्ठीबद्दल विचारलें.

"होय! पण त्या विद्येचा उपयोग चांगल्या प्रकारं केला तरच! विद्या ही तीक्ष्ण धारेच्या एखाद्या शस्त्राप्रमाणं आहे. शस्त्राच्यायोगें शत्रूचा संहार करतां येतो, त्याचप्रमाणं कधीं कधीं स्वतःची मानहि तोडून घेण्यास तें उपयोगीं पडतं. पूर्वीं फ्रान्स देशामधें वाल्टर नांवाचा एक प्रख्यात विद्वान होऊन गेला. अझून पावेतों त्याचं नांव सर्वतोमुखीं गाजत आहे. युरोपांतील प्रत्येक शहरामधें त्याच्या लेखांची वाहवा झाली होती. बादशहानंहि पण त्याचं अलौकिक बुद्धिसामर्थ्य पाहून त्याची तारीफ केली व एकंदर थोर लोकांमधें तो पूज्य झाला!"

"अहाहा ! तो केवढा पुण्यशील प्राणी होता? त्याला याबद्दल केवढा संतोष झाला असेल!" दिनू मिटक्या मारित म्हणाला.

"सारं ऐकून तरी घे दिनूबाळ! त्याच वाल्टरला पुढं असं वाटूं लागलं कीं, आपण हातांत कलम धरूं लागण्याच्या अगोदरच जर आपण एखाद्या अडाणी कुंळबटाप्रमाणंच राहिलों असतों, एखाद्या धनगरासारखा अज्ञानी, मूर्ख किंवा वेडाच राहिलों असतों, तर किती उत्तम होतं!—माझ्या या भाषणानं तुह्मी अचंब्यांत पडूं नका बाळांनों! माझं पुढचं भाषण ऐका.—त्या दुष्ट वाल्टरनं आपली नांवाजलेली लेखणी, त्या जगत्कर्त्या परमेश्वरावरच उचलली. आपली सारी हुषारी, सारी कुशलता, परमेश्वराच्या विरुद्धच खर्च केली, व मिळविलेल्या साऱ्या कीर्तीची राखरांगोळी करून घेऊन तो सर्वांच्या धिक्कारास पात्र झाला. वाल्टरनं आपल्या दुष्ट लेखणीनं जें पापी कर्म केलं, त्या कर्मापासून त्यानं लोकांमधें पूर्वी जेवढा मान आणि कीर्ति मिळविली होती, तेवढाच अपमान आणि अपकीर्ति मिळविली. माझ्या बाळांनों! ईश्वरास भिऊन वागावं हेंच प्रत्येक माणसाचं कर्तव्य आहे."

तिसऱ्या चिठ्ठीवर पुढील अक्षरें होतीं. "अत्यंत सुंदर असावं आणि सर्वांची प्रीति जोडून घ्यावी अशी माझी इच्छा आहे."

हें ऐकतांच सर्व मुलें खदखदा हंसून शांतिच्या तोंडाकडे बघूं लागलीं. शांती बापडी अगदीं शरमून गेली होती.

"पुष्कळ मुली जें इच्छितात, तेंच तूंहि इच्छिलंस माझे छकुले!" शांतीचा मुका घेऊन मीं ह्मटलें. "तुझ्या या इच्छेवरून इंग्लंडच्या इतिहासांतील आनी बोलीन या अत्यंत खुपसुरत स्त्रीची मला आठवण होते शांते! ही सुंदर स्त्री इतकी कांहीं लावण्यवति होती कीं, आठवा हेनरीहि तिच्या रूपावर मोहित झाला, आणि ती अगदीं गरीबाची मुलगी असतांहि लवकरच इंग्लंडची राणी बनली. हेनरीनें तिच्याशीं विवाह केला."

" तिला फार सुख झालं असेल नाहीं ? " राजानें शांतेच्या तर्फे प्रश्न केला.

" नाहीं राजा ! ती जीवास एवढी वैतागली होती कीं, इंग्लंडची राणी होण्यापेक्षां आपण एखाद्या भिकाऱ्याची बायको झाल्यें असत्यें तर फार उत्तम, असं तिनं इच्छिलं असेल. लवकरच हेनरीचं मन तिच्याविषयीं विटलं, आणि तिच्यावर जारकर्माचा आरोप येऊन, आपल्या भर तारुण्यांतच तिला फांसावर चढावं लागलं ! "

" अरेरे , गरीब बापडी ! " शांती कोमेजलेलें तोंड करून ह्मणाली. " पण तरी काय झालं ? आपण सुंदर होण्याची इच्छा धरूं नयेच कीं काय ? "

" कोण नको ह्मणेल माझे सोनुलें ! " पुन्हा तिचें चुंबन घेऊन मी ह्मटलें. " जगांत एक सौंदर्य आहे, तें मिळविण्याविषयीं प्रत्येकानं झटलं पाहिजे. तें सौंदर्य दुसरं कांहींएक नसून सद्गुण हेंच होय. माझ्या बाळांनों ! त्या परमेश्वरापाशीं तुह्मीं दुसरं कांहीं एक न मागतां हेंच सौंदर्य तुह्मांस देण्याबद्दल मागा व तें तो तुह्मांस देवो . "

"आतां एकच चिठ्ठी राहिली ! एकच चिठ्ठी राहिली ! " नाना, दिनू आणि शांती गलबला करूं लागलीं. मी ती उचलली व वाचलें " जगांत कीर्तिमान व्हावं अशी माझी इच्छा आहे. "

"तुह्मी आम्हांला असं उदाहरण दाखवूं शकाल मावशी, कीं जो कीर्तिमान झाला असतांहि असुखी होता ?" राजा ह्मणाला.

"एक कां ! असे पुष्कळ दाखले दाखवीन !" मी ह्मणालें. "नेपोलियन बोनापार्टाचं नांव तुह्मीं शाळेमधें ऐकलंच असाल. लष्करांत एका सहासात रुपड्यांच्या शिपायादाखल प्रवेश करून तो पराक्रमी नर गांवामागून गांव, आणि प्रांतांमागून प्रांत जिंकित चालला. शेवटीं तो सार्वभौम बादशहा बनला. सारं युरोप, नेपोलियनाचं नांव ऐकतांच थरथर कांपत असे ! पण त्याचा अखेर परिणाम काय झाला ? ज्या लोभी

महत्वाकांक्षेनं त्याला एवढ्या उच्चपदास चढविलं होतं, त्याच अनिवार लोभानं त्याला एकदम खड्ड्यांत लोटून दिलं! एका ओसाड प्रदेशांत जंगली किल्ल्यामधें त्यानं आपलं शेष आयुष्य बंदिवान स्थितींत घालविलं."

"तरीहि कीर्तिमान होण्याची माझी इच्छा मी कधींहि सोडणार नाहीं!" राजा मोठ्या आवेशानें म्हणाला.

"नको नको! ती भली इच्छा तूं कधींहि सोडूं नकोस. पण तू नाशवंत कीर्ति न मिळवितां अमर कीर्ति मिळविण्याविषयींचीच इच्छा धर. निरपेक्ष बुद्धीनं, लोकांच्या कल्याणास्तव तनमनधनेंकरून झटणारेच अमर कीर्ति संपादण्यास भाग्यशाली होतात!"

# खानसाबका टट्टू और आरबकी घोडी.

मियां शेरअल्ली मूळचे आपल्या मुंबईचेच रहिवाशी. पण स्वारींचे पराक्रम येथील पोलिसाला पूर्णपणें कळून चुकल्यामुळें, गांवांत कांहीं गडबड झालीरे झाली, कीं, मियांजींची मोठ्या बारकाईनें झडती होऊन, कसूर कीं बेकसूर त्यांनां आठचार महिन्यांनीं डोंगरीवरची हवा चाखणें भाग पडू लागल्यामुळें शेवटीं स्वारीनें येथल्या गैरइन्साफी पोलिसास कंटाळून जाऊन मुंबईशहरास अखेरचा रामराम ठोकिला व हैद्राबादचा रस्ता पकडला.

हैद्राबाद आणि सिकंदराबाद हीं दोन प्रसिद्ध शहरें अगदीं जवळ जवळ आहेत, हें आमच्या वाचकांपैकीं बहुतेकांस निदान ऐकून तरी माहित असेलच. आमच्या मुंबईकर मियांजींनीं या दोन्ही शहरांत प्रथमतः लहान स्केला-प्रमाणा-वर आपल्या धंद्यास सुरुवात केली. स्वारी अशा झोंकांत फिरे कीं, हे कोणी दिल्लीचे नबाबच असावेत, असेंच कोणालाहि वाटावें. मुंबईसारख्या ठिकाणच्या वस्ताद पोलिसाच्या डोकीवरचे केस मोजून चुकलेले, तेव्हां मियांजी आपल्या हस्तलाघवाच्या कामीं असामान्य प्रवीण होते, हें निराळें सांगावयास नकोच ! बोलतां बोलतां मियांजी शेजारच्या इसमास अशी टोपी घालीत, कीं, कोणाची मगदूर नाहीं मियांचा संशय घेईल म्हणून !

हैद्राबादेंत मियांसाहेब ज्या बंगल्यांत उतरले होते, त्याच्या शेजारीं खानसाहेब अब्दुल कादर नांवाचे एक श्रीमान् सरदार राहत असत. उभयताची गट्टी जमावयास फारसा अवकाश लागला नाहीं. शेरअल्ली या नव्या स्नेह्यांच्या घरीं वारंवार जाऊं येऊं लागले. उभयतांची खूप दोस्ती जमली व खानसाहेबांच्या बंगल्यांतून हळुहळू लहानसहान वस्तु अदृश्य होऊं लागल्या ! बापडा अकलेचा खंदक खान, यानें दररोज ही कागाळी मियांजींस सांगून या बिलंदर चोराचा पत्ता लावण्याविषयींचो सल्ला त्यांनां विचारावी. मियांजींनीं आपल्या स्नेह्याला चोरी

पकडण्याचे बाबतींत अशी एकेक अजब युक्ति शिकवावी, कीं, सत्तर हजार वर्षांनींहि चोरीचा पत्ता ह्मणून लागूं नये !

अबदुल कादर यांच्या पागेंत सफेद तट्टांची एक फारच नामी जोडी होती. तिच्यावर आमच्या मियांसाहेबांचा डोळा गेला. सदरहू जोडी पसार करणें कांहीं अशातशांतलें काम नव्हतें. त्याचप्रमाणें ती विकण्या-सवरण्याचें नांव काढणेंहि महान् दुर्घट होतें ! तरीहि मियांजींच्या मनांत अमुक एखादी गोष्ट करावी असें आलें ह्मणजे ते तिचा पिच्छा पुरविल्यावांचून ह्मणून कधींहि राहत नसत. शिवाय, ते जी कामगिरी शिरावर घेत, ती बेमालूमरणें पार पाडण्याच्या कामीं त्यांचा हातखंडा असे.

कर्मधर्मसंयोगानें या सुमारास एक आरब व्यापारी, विकण्याकरितां कांहीं घोडे घेऊन हैद्राबादेस आला व चद्दरघाटामध्यें मोठा मंडप ठोकून तेथें त्यानें आपलें ठाणें दिलें. "आतां छान जुळेल," शेरअल्लीनें मनांत विचार केला, व चारआठ दिवस लोटल्यावर एक दिवस संध्या-काळच्या सुमारास संधि साधून, खानांच्या तबेल्यामधील जोडी मोठ्या धाडसानें पसार केली, व नवीन आलेल्या आरबाच्या मांडवांत जाऊन त्याला ती विकण्याची आपली इच्छा दर्शविली. जोडी तर अति फक्कड! दोन्ही तट्टू जवान, उमदे, अंगानें गुटगुटीत असे होते. आरबाच्या तोंडास पाणी सुटलें. शेवटीं हो नाहीं करतां हजारास साटें ठोकलें आणि बापड्या भोळ्या आरबानें मनांतल्या मनांत खूप मिटक्या मारित पांच हजारांचा माल फक्त हजार रुपयांतच मिळविला, याबद्दल स्वतःस धन्यवाद देत थैली सोडली व हजारांच्या नोटा काढून मियांजींच्या हातावर ठेविल्या.

शेरअल्लीचें आणि त्या आरब व्यापाऱ्याचें या साऱ्याबाबतींत संभा-षण चाललें होतें त्या वेळीं आरब आपल्या एका आवडत्या घोडीस हातांनीं गोंजारित स्वहस्तें दाणा चारित होता. हें पाहून मियांजींनीं त्याला विचारलें " हें अस्सल अरबी जनावर दिसतें. याची किंमतहि तशीच जब्बर असेल नाहीं ? "

" अरे साहेब ! " त्या घोडीच्या तोंडाचें प्रेमानें चुंबन घेत आरब म्हणाला " ही माझी घोडी किती गरीब आहे ह्मणून सांगूं ? माझा प्राण गेला तरी ही घोडी मी कोणासहि देणार नाहीं ! मुंबईचे वडे साहेब—गव्हर्नर—हें जनावर दहा हजारांस मागत होते. पण कोणीं दहा लाख रुपये जरी माझ्यापुढें मोजले तरीहि ही माझी घोडी मी देणार नाहीं. "

" पण तुह्मांला ठाऊक आहे अरबसाब ! " मियांजी गंभीर मुद्रेनें बोलूं लागले. " या बकाली शहरांत उचले आणि भामटे असे कांहीं बिलंदर आहेत कीं, मोठ्या शहाण्या मनुष्यासहि केव्हां वेडा करतील याचा नेम नाहीं. अहो ! आह्मी येथले बारमासचे रहिवाशी, तरी आह्मांलासुद्धां या सोद्यांची भीति वाटते. तेव्हां स्नेहभावानें मी सांगतों आपला तुह्मांला, कीं, तुह्मी फार सावधगिरीनें असा. "

"अरे सेट! कांहीं खाण्याची कीं वाटेवरली गोष्ट आहे कीं काय ? माझे-बरोबर या, मी तुह्मांला दाखवितों सारें. तुमच्यासारख्या भल्या माणसांस गुप्त गोष्ट कळविण्यास कांहीं हरकत नाहीं. " असें म्हणून त्या भल्या गृहस्थाचा ( ! ) हात धरून आरब त्याला मंडपाच्या मध्यभागीं घेऊन गेला आणि बोटानें दाखवित ह्मणाला "या—या ठिकाणीं मी निजत असतों, आणि कंतानी पडद्याच्या बरोबर मागच्या बाजूस घोडीला बांधित असतों, ही येथची जमीन सारी खडकाळ आहे. तेव्हां यदा-कदाचित् जर कोणी चोर आलाच तर घोडीच्या पायांच्या नालांचा आवाज तत्क्षणीं ऐकूं येऊन मी जागा होईन. शिवाय, माझी घोडी अशी शाहणी आहे कीं, तिच्या लगामीला हात घालतांच ती खिंकाळल्या-वांचून कधींहि रहावयाची नाहीं. आतां सांगा सेटजी तुह्मीच, इला कोण कसा चोरूं शकेल तो ? "

मियांजी मनांत ह्मणूं लागले " बरें आहे बच्चाजी ! घोडीच्या तोंडास चण्यांचा तोबरा चढवून वाटेवर तुझाच बुरणूस पसरतों, ह्मणजे मग घोडीचें खिंकाळणें आणि पायांचा आवाज कसा ऐकतोस

तो पाहीन ! ” असा मनांतल्या मनांत बेत करून ते आरबास ह्मणाले “ असें आहे तर मग कांहीं हरकत नाहीं. बरें येतों आतां, सलाम आलेकुम ! ”

“ आलेकम् सलाम ! ”

\+ + + + +

मध्यरात्रीच्या सुमारास फार थंडी वाजूं लागल्यामुळें आरब बिछान्यावर पायांखालीं असलेला आपला बुरणूस पांघरायाकरितां ह्मणून पाहूं लागला, परंतु बुरणूस जागेवर सांपडेना ! हातांनीं आजूबाजूंस चापसून पाहिलें, परंतु छे ! “ अं ! असें कसें झालें ? ” आरब मोठ्या विचारांत पडला व झट्दिशीं उठून त्यानें दिवा लाविला. बाहेर पाहतो, तों जागेवर घोडीहि नाहीं ! मात्र रस्ताभर बुरणूस पसरलेला त्याच्या दृष्टीस पडला.

इकडे मियांजी भरधांव घोडी फेंकित सिकंदराबादेकडे येत आहेत, इतक्यांत एका हातांत फाणस, एका हातांत सोटा व मुखांत सरस्वती, अशा थाटानें खानसाहेबांची स्वारी त्यांना वाटेंत भेटली.

“ ओ हो ! सलाम आलेकुम् ! एवढ्या रात्रीचे कुठें ?” मियांजींनीं घोडी थांबवून खानास प्रश्न केला.

“ + + चें तोंड जाळायाला !” खानानें आणखीहि अपशब्दांचा वर्षाव केला.

“ पण भले गृहस्थ हो ! तुह्मीं पहिल्यानें मला कां नाहीं विचारलें ? तुह्मीं जी किंमत सांगितली असती ती मीं खुशीनें दिली असती. सोन्यासारखी तट्टूची जोडी, बाहेर कां ह्मणून विकली ? ”

“ अ—आं ! क—काय ? विकली ? क-को-कोणीं ? क-को-ठें ? सांगा सांगा लवकर, कोणीं विकली ? ”

“ अरे हो हो ! पण काय झालें ! एवढे घाबरतां काय ह्मणून ? ”

“ क—कोण घाबरतो आहे ? पण सांगा लवकर ! तुह्मीं माझी जोडी कोठें पाहिली ? मोठी मेहरबानी होईल दोस्त ! ”

"बस बस! जास्त शहाणे होऊं नका! ह्मणे जोडी कुठें आहे! छन् छन् हजार रुपये वाजवून खिशांत टाकलेत, चारचौघांच्या देखत सौदा केलात, अन् ह्मणे आपण त्या गांवचेच नव्हों! काय गोष्टी शिकवनाहेत! अहो, चवाठ्यावरली गोष्ट का कधीं गुप्त राहील?"

"अरे यार! मी कसम–शपथ खाऊन सांगतों," खान काकळुतीस येऊन बोलूं लागला "आज संध्याकाळीं कोणी बदमाष, माझी ती आवडती जोडी तबेल्यांतून चोरून पसार झाला आहे. त्या हरामखोराचा तपास लावण्याकरितां सारी सिकंदराबाद धुंडूनधुंडून थकलों; आतां हैद्राबादेस त्याच्याच तलासाकरितां जात आहें. मियांसाब! कृपा करून त्या चोराचा मला पत्ता सांगा. तुमचे माझ्यावर फार उपकार होतील!"

"मोठ्याच आश्चर्याची गोष्ट ह्मणायची तर!" मियां गंभीर मुद्रेनें म्हणाले. "ही जोडी आजच संध्याकाळीं, तो आठ दिवसांपूर्वीं आरब आला आहे नव्हे, त्याच्या तबेल्यांत मीं पाहिली. तो आरब उद्यां मोठ्या पहांटेस हैद्राबादेहून कूच करण्याच्या तयारींत आहे. यास्तव जलदी जा, जलदी न कराल तर मागाहून हात चोळित बसाल!"

"अर्रर्रर्र! आतां काय करूं? भाई, मेहरबानी करायची तर पुरीच करा. ही तुमची घोडी जरा मला द्या, कीं मी त्या हरामखोराला आतांच जाऊन पकडतों."

मियांसाहेब म्हणाले "खानसाहेब, माफ करा, मी तोंडावर स्पष्ट बोलणारा माणूस आहें, हें तुमच्या माझ्या अल्प परिचयावरून तुम्हांला कळून आलेंच असेल. समजा, ही घोडी मीं तुम्हांला दिली व तुह्मीं उद्यां मला साफ नाहीं परत देत ह्मटलें, तर तुमच्यासारख्या मोठ्या माणसांपुढें आह्मा गरिबांचें हो काय चालणार? शिवाय, आतांसे माझे दिवस आले आहेत मोठे विचित्र. कोणाचें बरें ह्मणून करावयास जावें तों तें राहतें बाजूलाच व उलटें अंगावरच येतें. यास्तव दिलगीर आहें खानसाब, माफ करा!"

"अरे दोस्त! एवढा माझा विश्वास नाहीं? माझ्याकडून असें होईलसें का तुम्हाला वाटतें? ही घ्या ठेवा माझी हिऱ्याची आंगठी तुमच्यापाशीं. उद्यां तुमची घोडी परत देऊन ही सोडवून घेईन, ह्मणजे तरी कांहीं हरकत नाहीं ना?"

"आतां कबूल! व्यवहाराच्या कामीं लाज काय कामाची?" असें म्हणून शेरअल्लीनें आंगठी चढवली व विशेष पराक्रम करण्यास दिल्लीकडे आपला मोर्चा फिरविला.

पुढें काय प्रकार घडला तें आमच्या चाणाक्ष वाचकांस सांगण्याची विशेषशी जरुरी नाहीं. खानसाहेब आणि आरब एकमेकांची दाढी तोडूं लागले. सरस्वतीचा तर उभयतांनीं हवातसा उपयोग चालविला. बराच वेळ मल्लयुद्ध झाल्यावर, तिऱ्हाइतानें येऊन जेव्हां त्यांची समजूत केली तेव्हां ते शुद्धीवर आले व आपापली मत्ता बदलून घेऊन त्यांनीं पोलिसास वर्दी दिली. पण मियांजी का हातीं लागतात!

# आणि अखेरीस घडलेंहि पण तसेंच !

मुसलमान लोकांत वहाबी ह्मणून एक संप्रदाय आहे. या लोकांविषयीं अलीकडे विशेषसें कांहीं ऐकूं येत नाहीं खरें; परंतु एका काळीं यांनीं इंग्रजांस 'दे माय धरणी ठाय' करून सोडलें होतें.

एके वेळीं अमीरखॉं नांवाचा एक पठाण, उत्तरेच्या बाजूस फार जुलूम करित पुष्कळ मुलूख लुटित चालला होता. हजारों पठाण त्याला येऊन मिळाले होते. त्यांत सय्यद अहंमद नांवाचाहि एक पठाण होता. त्यानें नंतर लूट करण्याचें सोडून दिलें व आपण धर्मप्रचारक आहों, असें तो सर्वांस सांगूं लागला. त्यानें असें जाहिर केलें कीं, आपल्या—मुसलमानी—धर्मांत जे जे दोष आहेत ते ते सर्व नाहींसे करण्याचा आपला मनोदय आहे. त्याच्या सतत परिश्रमामुळें थोडक्या मुदतीच्या आंतच, हजारों लोक त्याच्या धर्ममतांकडे वळूं लागले. कांहीं दिवस लोटल्यावर तर तो एवढा प्रबल झाला कीं, त्याचें नांव ऐकतांच पंजाबांतील लोक थरथर कांपत असत ! तो प्रथम मक्केस जाऊन आला व त्यानंतर त्यानें विधर्मीयांबरोबर युद्ध करण्याचा विचार केला. दिल्ली, लखनौ, आग्रा इत्यादि नाना ठिकाणचे हजारों लोक त्याला येऊन मिळाले. होतां होतां, त्याच्या हुकुमांत राहणारी चाळीस हजार लोकांची फौज तयार झाली.

या वेळीं भरतखंडांत प्रायः प्रत्येक ठिकाणीं वहाबी लोक दृष्टीस पडत. हे दूरदूरच्या ठिकाणीं असले, तरीहि त्यांच्यामधील ऐक्य मोठें विलक्षण असे. त्यांचा हरएक बेत अगदीं अल्प काळांत सर्वांनां कळे. सर्व काम एवढ्या गुप्त रीतीनें होत असे कीं, दुसऱ्या लोकांस कधींहि त्याचा गंधसुद्धां लागत नसे, व यदाकदाचित् जर कोणीं त्यांचा कसलाहि बेत समजून घेण्याविषयीं प्रयत्न केलाच, किंवा कोणास सांगितला, तर त्याचा केव्हां नाश होईल याचा नेम नसे. कोण, कुठून येऊन हल्ला करील, याची मुळींच अटकळ करतां येईनासें झालें होतें.

हळुहळू यांचें प्रस्थ फारच माजलें व ते विलक्षण साहसी झाले. इंग्रजांबरोबरहि युद्ध करण्याचा त्यांनीं बेत केला. सांप्रतचे कलोनियल सेक्रेटरी लॉर्ड एल्जिन यांच्या वडिलांचे कारकिर्दीत पाटणा येथील वहाबी लोकांनीं इतर ठिकाणच्या वहाबी लोकांच्या सहाय्यानें, इंग्रजांस पळवून लावण्याचा व्यूह रचिला. परंतु त्या वेळचे तेथील म्याजिस्ट्रेट टलरसाहेब यांनीं मोठ्या धूर्तपणानें त्या लोकांचा कट मोडला नसता तर या वहाबी लोकांनीं इंग्रजांस पुनः १८५७ सालच्या प्रसंगाची आठवण करून दिली असती !

इ० स० १८६९ त लॉर्ड मेयो हिंदुस्थाचा गव्हरनर होऊन आला. त्याच्या कारकिर्दीत कांहीं कारणांमुळें या वहाबींचा एक कट उघडकीस आला व त्यांचे धुरीण इंग्रजांच्या हातीं लागले. त्यांच्यावर कलकत्ता येथील हाय कोर्टांत भयंकर खटला सुरू झाली. लोकांत त्या वेळीं या खटल्याशिवाय चर्चेस दुसरा विषयच राहिला नव्हता. तात्पर्य, सर्व बंगाल प्रांतभर हा खटला गाजून गेला होता. सर हेनरी नरहॅम हे त्या वेळीं हाय कोर्टाचे चीफ जस्टीस होते. त्यांनीं सर्व पुरावा पाहिल्यावर आरोपींस जन्मठेपेची शिक्षा ठोठाविली.

ह्या गोष्टीस कांहीं दिवस लोटल्यावर एके दिवशीं दोनप्रहरीं सर हेनरी नरहॅम हे हाय कोर्टांतून गाडीमध्यें बसून आपल्या बंगल्याकडे जात असतां, कोणत्या दिशेनें कोणास ठाऊक, एकदम कोणीं एकानें येऊन त्यांच्या छातींत सुरा खुपसला, आणि जज्जसाहेब थंडगार पडले !

हें वर्तमान शहरांत पसरतांच सर्वत्र हाहाःकार उडाला ! 'हें कृत्य वहाबींकडूनच झालें असावें, त्यांनींच असा हा सूड उगविला,' असें सर्वजण बोलूं लागले व हे सैतानी लोक केव्हां काय करतील कोण जाणे, अशी सर्वांस भीति पडली. त्यांना करतां येणार नाहीं अशी कोणतीच गोष्ट नाहीं, असें सगळ्याजणांस वाटूं लागलें. इंग्रज लोकांची तर अगदीं पांचांवर धारण बसली !

इकडे सिमल्यास अशी बातमी पोंचली कीं, या लोकांचा गव्हरनर जनरल साहेबावरहि डोळा आहे! सर्व ठिकाणीं या गोष्टीचीच चर्चा व भवतिनभवति सुरू झाली. ज्या अर्थीं या लोकांनीं खुद्द गव्हरनर जनरलासारख्या बड्या अधिकाऱ्याचा खून करण्याचा विडा उचलला आहे, त्या अर्थीं बाकीच्या लोकांचा भरंवसा काय राहिला ? सारांश, या वेळीं सर्व लोकांचीं मनें भीतीमुळें वहाबीमयच होऊन गेलीं होतीं.

सरकारी अधिकाऱ्यांमध्यें लॉर्ड मेयो, हा फार चांगल्या स्वभावाचा व प्रजेच्या हितासाठीं झटणारा अम्मलदार होता व ह्मणूनच त्याच्यावर रयतेची विशेष भक्ति होती. त्याच्या रक्षणासाठीं त्याच्याबरोबर नेहमीं असणारे लोक फार सावधगिरीनें वागूं लागले. लॉर्ड मेयो जसा दयाळू होता, तसाच तो साहसी व शक्तिमान होता. त्याला या गोष्टीची मुळींच भीति वाटली नाहीं. तो आपल्या मित्रांला ह्मणाला "तुह्मीं कितीहि बंदोबस्त ठेवला, तत्रापि वेळ आला असतां त्याचा कांहीएक उपयोग होणार नाहीं!"

आणि असेरीस घडलेंहि पण तसेंच ! एवढ्या सावधगिरीनेंहि लॉर्ड मेयोचें रक्षण झालें नाहीं ! इ०स०१८७२ च्या जानेवारी महिन्यांत लॉर्ड मेयो ब्रह्मदेश व अंदमान बेटें पहाण्यासाठीं ह्मणून बाहेर पडला. ज्यांनां जन्मठेपेची शिक्षा होते त्यांनां या बेटांत नेऊन सोडतात, ही गोष्ट सर्वांनां माहित असेलच. मेयो साहेबाचा या बेटांत जाण्याचा उद्देश इतकाच होता कीं, या ठिकाणीं कैदी लोकांचे फार हाल होतात असा जो बोभाटा असे त्यांत सत्यांश कितपत आहे तें स्वनेत्रांनीं अवलोकन करावें व त्यांनां सुखानें राहतां येईल अशी व्यवस्था करावी. ब्रह्मदेश पाहून झाल्यावर लॉर्ड मेयो फेब्रुआरी महिन्यामध्यें अंदमानांत जाऊन पोंचला. या ठिकाणींहि त्याच्या बरोबरचे लोक त्याच्या रक्षणार्थ खडा पाहरा करित होते.

अंदमानास पोंचण्याच्या पूर्वीं दोन दिवस, बोटीमध्यें नरहॅमच्या खुनासंबंधीं गोष्ट निघाल्यावेळीं मेयो म्हणाला "अशी जर गोष्ट असेल

तर आपल्या रक्षणार्थ पाहिजे तो प्रयत्न केला व कितीहि कडक पहारा ठेविला, तरी त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं!" त्याचें हें भाषण, फक्त तीन दिवसांनंतर त्याच्यावरच प्रसंग गुदरून अक्षरशः खरें ठरलें!

अंदमानांत रस आणि भायपार अशीं दोन बेटें आहेत. या दोन ठिकाणीं अतिशयित उद्धट व अतिशयित खुनशी कैद्यांस ठेवित असतात. हीं दोन्ही बेटें पाहून मेयो सुरक्षितपणें संध्याकाळच्या वेळीं परत आला. त्यानें 'माउंट हॅरियट' नांवाचा डोंगर पाहण्याची इच्छा प्रदर्शित केल्यावरून त्याच्या आग्रहामुळें सर्व मंडळी डोंगरावर गेली. तेथील हवापाणी चांगलें आहे असें त्याला दिसून आल्यामुळें, आजारी कैद्यांकरितां त्या ठिकाणीं एक हास्पिटल बांधावें असा त्याचा विचार होता.

ते वर चढून गेले त्या वेळीं सूर्यास्त झाला होता. सायंकाळच्या सूर्याचे निमिषार्धांत लुप्त होणारे किरण समुद्राच्या पाण्यांत पडून अत्यंत मनोहर दिसत होते. हा देखावा आणि सभोंवतालची विलक्षण सृष्टिशोभा पाहून मेयो म्हणाला "किती रमणीय देखावा दिसत आहे हा! अशी शोभा आपण जन्मांत पाहिली नव्हती!"

हळुहळू अंधकार पसरूं लागला, तसे मशाली पेटवून सर्वजण खालीं उतरले. समुद्रांत दूर असलेल्या बोटीवर जाण्याकरितां सर्वजण किनाऱ्यावरच्या होडींत बसले. मेयोच्या रक्षणार्थ सर्व मंडळी त्याला घेरून ऊभी राहिली व जय्यत पहारा करूं लागली. आतां होडी सुटणार, इतक्यांत एक भयंकर ध्वनि झाला व सर्वजण पाहत आहेत तोंच एक तीक्ष्ण धारेची सुरी मोठ्या जोरानें येऊन मेयोच्या छातींत घुसली!!

झालें! मेयोचा अंत झाला व आमच्या गोष्टीचाहि अंत झाला! हें राक्षसी कृत्य करणारा तेव्हांच सांपडला; परंतु मेयो जे शब्द बोलला होता, ते अक्षरशः खरे झाले!

# वाः ग्रंथकार !

आह्मी मूळचे नाशिकाकडील एका खेड्यांतले रहिवासी. तिकडे आमची कीर्ति सर्वतोमुखीं झालेली. गोविंदराव पंडित ही व्यक्ति लहानसहान पोरासमुद्धां ठाऊक ! आणि पंडित ही पदवीसुद्धां तेथील लोकांनींच आपण होऊन आह्मांला दिली होती. हल्लींच्यासारखी ती मिळविण्याकरितां अस्मादिकांला सरकारची मनधरणी करावी लागली नव्हती. ही पदवी देण्याला आमच्या अंगचा कांहीं विशेष गुण लोकांच्या दृष्टोत्पत्तीस आला होता, आणि या गुणाचा गौरव करण्याकरितांच त्यांनीं आह्मांला हा मोठा मान दिला होता. असा हा गुण कोणता हें जाणण्याची आपल्याला अगदीं उत्कंठा लागली असेल; परंतु ती पूर्ण करण्याचें तूर्त आह्मांला नाकारिलें पाहिजे. थोडा धीर धराल, तर आमच्या सहाय्यावांचूनहि ती आपली जिज्ञासा पूर्ण होईल. असो. अशा या आमच्या विशाल कीर्तीला आमचें खेडेगांव अगदींच आकुंचित झाल्यामुळें, तिच्या वारंवार आमच्याकडे तक्रारी येऊं लागल्या. त्या तक्रारी योग्य आहेत अशी आमची खात्री होतांच आह्मीं त्यासंबंधीं योग्य ती तजवीज केली, आणि आमच्या नेहमींच्या व्यापारांत मुंबईस येण्याच्या रेल्वेभाड्यापुर्ते पैसे मिळतांच आह्मीं या अवाढव्य शहरावर खुद्दांचा कीर्तीची ध्वजा फडकाविण्याकरितां अग्निरथाचा आश्रय केला. मुंबईस येऊन पोंचलों व एका संभावित खाणावळींत बिऱ्हाडहि ठोकलें.

ह्या भव्य शहरांतील लोकांवर कोणत्या तऱ्हेचे उपकार करण्याकरितां अस्मादिकांची स्वारी येथें आली आहे हें त्यांनां लवकर कसें विदित करावें, या विचारांत आमची सारी रात्र गेली. मुंबईंतील लोकांच्या सुदैवानें आह्मांला दुसरीतिसरी कांहीं युक्ति सुचली नाहीं. ज्या गुणांत आमची एवढी वाहवा होऊन आह्मांला पंडित ही पदवी प्राप्त झाली होती, त्याच गुणाच्या प्रभावानें मुंबईंतील लोकांनां दिपवून टाकावें, व यांच्यापासूनहि असल्या अमोलिक गुणांचें बीज करून घ्यावें, हाच विचार कायम करावा लागला.

रात्र संपली, दुसरा दिवस उगवला, व आह्मीं आपलें भपकेदार पैठणी पागोटें किंचित् डाव्या कानाकडे कलतें नेऊन 'शुभस्य शीघ्रं' ह्मणून बाहेर पडलों. आमचा उद्योग सुरू करण्याला आह्मांला थोड्याशा भांडवलाची जरूर होती, व तें प्राप्त करून घ्यावें ह्मणूनच आह्मी बाहेर पडलों होतों. आमचें दैव बलत्तर! आमची व एका फेरीवाल्या व्यापाऱ्याची गांठ पडली. हे ह्मातारेबुवा नवीनच चीनदेशाहून आले होते. त्यांनीं चिनई रेशमी कापड विकण्यास आणलें होतें. बगलेंत सातआठ ताके मारून हे फिरत होते. यांनां आमची भाषा मुळींच कळत नसे. तेव्हां अशी अनायासें प्राप्त झालेली शिकार आह्मी हातची थोडीच जाऊं देणार होतों! त्यांनीं कापडाचा ताका आमच्यापुढें करितांच आह्मीं तो हातांत घेतला, उलटासुलटा करून पाहिला, व हातांनींच त्याला किंमत विचारिली. त्यानें त्याच भाषेनें आह्मांला आपल्या हाताचीं पांचहि बोटें तीन वेळ दाखविलीं व तोंडानें कांहीं बडबडला. आह्मीं ताका त्याच्या हातांत परत देऊन जाण्याचा आव घातला, व समोरच्या एका मोठ्या चार मजली घराच्या दोनतीन पायऱ्या चढलोंहि. म्हाताऱ्यानें पुन्हा हांक मारिली व बारा बोटें दाखविलीं. आम्हांला कापडाची जरूर नाहीं म्हणून परत देतांना आम्हीं दहा बोटें दाखविलीं. सुदैवाचा योग, थोडी कुरकुर करून तो कबूल झाला. आम्हीं कापड हातांत घेऊन मोठ्या ऐटीनें खिशांतून पाकीट बाहेर काढिलें, व त्याच्या समक्ष उघडलें. परंतु त्यांत अवघा एक रुपया व दोनतीन चवल्या यांशिवाय काय होतें? नि असणार तरी कुठून? साऱ्या जगांतील आमची संपत्ति काय ती इतकीच! रुपया काढून त्याच्या हातावर ठेविला, आणि त्याला तेथेंच उभें राहण्यास सांगून कापड हातांत घेऊन वरून पैसे घेऊन येतों म्हणून दर्शविलें व त्याच्या संमतीची अपेक्षा न करितां धाडधाड जिना चढण्यास सुरुवात केली. आमचा भपकेबाज पोषाख पाहून व आमची घरांत प्रवेश करण्याची तऱ्हा पाहून हें आमचेंच घर आहे व आम्ही मोठे श्रीमंत आहों असें

त्या चिनी फेरीवाल्याला वाटलें असावें. त्याच्या वाटण्याची आह्मांला थोडीच पर्वा होती! आमचें अर्धेअधिक काम तर झालें होतें. आतां अडचण कायती त्या घरांतून दुसऱ्या बाजूनें बाहेर पडण्याची. आमच्या सुदैवानें आम्हांला येथेंहि हात दिला. तिसऱ्या मजल्यावर चढून आशी पुढें गेलों मात्र, आम्हांला मागच्या बाजूनें उतरण्याचा जिना दिसला. आम्हीं तो लागलाच मोठ्या संथपणानें गांठलाहि. लागलीच खालीं उतरलों व दुसऱ्या बाजूच्या रस्त्याला लागून कावसजी पाटलाच्या तळ्याकडील रस्त्याची वाट सुधरली. तेथें तयार केलेले कपडे विकण्याचें एक दुकान दिसलें, त्यांत शिरलों व "या कापडाचे पारसी फयाशनचे चार डगले शिवावयाचे आहेत," असें दुकानदारास सांगितलें.

दुकानदार म्हणाला "दहा रुपये पडतील. या कापडाला अस्तर घातलें पाहिजे ह्मणून इतका जास्त खर्च पडेल."

त्याला आम्ही येथील राहणारे नाहींत, कापड स्वस्त मिळालें ह्मणून घेतलें, दहा रुपये देण्यास आपणांजवळ नाहींत, असें मिनतवारीनें सांगितलें.

"तर कापड विकून टाका," दुकानदारानें बेपर्वाईनें उत्तर दिलें.

"तुह्मी घेतां काय?" आह्मीं तावडतोब त्यालाच विचारिलें.

"पांच रुपये देतों, द्या मर्जी असेल तर," दुकानदार ह्मणाला.

होय, नाहीं करतां करतां आठ रुपयांस त्याच्या गळ्यांत कापडाचा ताका घालून कृतकृत्य होऊन आम्हीं खाणावळीचा मार्ग धरिला. त्या चिनी कापडवाल्याची पुढें काय व्यवस्था झाली हें पाहण्यास आह्मांला अजूनपावेतों वेळच मिळाला नाहीं!

तिसऱ्या प्रहरीं एक लहानशी खोली भाड्यानें घेऊन त्यांत आह्मीं आमचें बिऱ्हाड लाविलें. संध्याकाळच्या वेळीं पागोट्यास रजा देऊन डोक्यावर एक नवीन फयाशनची टोपी चढवली. आपल्या धंद्याला अवश्य तें भांडवल मिळालें या आनंदांत प्रफुल्लित मुद्रेनें काळका–

देवीच्या रस्त्याकडे मोर्चा फिरविला. जुनीं पुस्तकें विकण्याचीं येथें मोठीं दुकानें होतीं. त्यांपैकीं एका दुकानांत शिरून एका मोठ्या इतिहासाच्या तीन प्रती दिसल्या त्या अगदीं अल्प किंमतींत खरेदी केल्या. हें इतिहासाचें पुस्तक फारच जुनें असल्यामुळें त्याची कोणास गरज नव्हती, ह्मणून आह्मांला किंमत फारच कमी पडली. बिऱ्हाडीं आणून त्या तिन्ही पुस्तकांचीं मळपृष्टें फाडून टाकिलीं. दुसरे दिवशीं एका अप्रसिद्ध छापखान्यांतून या पुस्तकाचीं कांहीं पहिलीं व कांहीं शेवटचीं पृष्ठें त्याच आकाराच्या कागदावर छापून घेऊन तीं नवीन पृष्ठें पुन्हा पूर्ववत त्या पुस्तकांवर चिकटविलीं व तीं तिन्ही पुस्तकें नव्यानें कापून घेतलीं. हीं पृष्ठें पुन्हा छापतांना त्या पुस्तकाच्या कर्त्याचें नांव काढून त्या ठिकाणीं आम्हीं आपलें नवीन नांव घुसडून दिलें. मुंबईंत येतांना आम्ही आपलें जुनें नांव आमच्या गांवींच विसरून आलों होतों, यामुळें येथें आम्हांला नवीन नांव धारण करावें लागलें. पुस्तक छापल्याची तारीख, सन, हीं बदलून नवीन घातलीं, व त्यास ‘ हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास ’ असें नवीन नांव दिलें. पुस्तकाची किंमत दहा रुपये असें ठोकून दिलें होतें. ज्या छापखान्यांत हीं पृष्ठें छापलीं त्या छापखान्याचें नांवहि त्यावर होतेंच. येणेंप्रमाणें कोणालाहि हीं पुस्तकें पहातांच तीं अगदीं नवीनच छापून प्रसिद्ध केलीं आहेत असें वाटावें असें त्यांनां स्वरूप दिलें होतें.

त्या वेळीं, नवीन प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांसंबंधीं सरकारचा कायदा हल्लींच्यापेक्षां निराळा होता. पूर्वीं एतद्देशीय गृहस्थानें केलेल्या कोणत्याहि पुस्तकाच्या तीन प्रती घेऊन सरकार ग्रंथकारास त्या पुस्तकावर लिहिलेली किंमत ताबडतोब देत असे. हा सरकारी ठराव आह्मांला पूर्णपणें अवगत होता. आमची सर्व तयारीहि या ठरावालाच अनुलक्षून होती. आमचीं हीं पुस्तकें तयार होतांच तीं घेऊन आह्मी कोटांत सरकारी ऑफिसांत हजर झालों. रीतीप्रमाणें सर्व व्यवस्था होऊन आह्मांला आमच्या पुस्तकाच्या तीन प्रतींबद्दल तीस रुपये ताबडतोब देण्यांत आले.

झालें, आमचें कार्य झालें. आमचें भांडवल आतां हां हां ह्मणतां वाढत चाललें. आह्मीं एकामागून एक अशीं भराभर तीनचार नवीं नवीं पुस्तकें याच रीतीनें तयार केलीं व त्याबद्दल आह्मीं लिहिलेली किंमत आह्मांला सरकारांतून मिळत गेली. आमचें भांडवल जवळजवळ शंभरांवर जमलें व पुढें हा धंदा फारच त्रासदायक आहे असें वाटूं लागलें; यामुळें यापेक्षां जास्त प्राप्तीचा व कमी त्रासाचा धंदा शोधून काढण्यांत आह्मीं आपलें डोकें खर्च केलें. शेवटीं असा अपूर्व धंदा आह्मांला आढळलाहि. त्यांत आह्मांला कशी कशी किफायत झाली हें आपल्याला कळविण्याचा आमचा विचार आहे.

वर सांगितल्याप्रमाणें तीनचार पुस्तकें आमच्या नांवावर आमच्या स्वकपोलकल्पित कल्पनेनें प्रसिद्ध केल्यावर आमचें भांडवल जवळजवळ शंभरावर आलें व आह्मांला धंदा चालविण्यास उमेद आली. थोड्याच दिवसांत 'आनंद धन' नांवाचें एक अत्युत्तम पुस्तक आम्हीं स्वतः लिहून प्रसिद्ध केलें. त्यांतला मजकूर आमचा स्वतःचाच होता, किंवा तो लोकांच्या पुस्तकांतून चोरून घेतला होता, हा प्रश्न अगदीं निराळा आहे; आणि त्याचें उत्तर आम्ही बिलकूल देणाराहि नाहीं ! उत्तराची आपल्याला अपेक्षाच असेल तर ज्या कोणीं सुदैवी मनुष्यानें तें वाचलें असेल त्याला विचारा, म्हणजे आपलें समाधान होईल. त्या पुस्तकांत कोणकोणत्या विषयांचा समावेश केला होता त्याचें मात्र थोडेंसें दिग्दर्शन येथें करितों:—

त्यांत अनेक नद, नद्या, सरोवरें, रमणीय उद्यानें इत्यादिकांचें चटकदार वर्णन—जें वाचून वाचकगण भ्रांतींत पडून जावे ! त्यांनां हे देखावे आपण प्रत्यक्षच पहात आहों कीं काय असेंच वाटावें ! घांट, देवालयें इत्यादि पवित्र व मनमोहक स्थलें; आपल्या सुमधुर रवानें ऐकणारांचीं श्रवणेंद्रियें परितृप्त करून सोडणारे कोकिल, मयुर, शुक, सारिकादि पक्षी; तरुण स्त्रीपुरुषांचा प्रणयसंवाद, प्रेमकलह, वीरश्रीनें अंग थरारून सोडणारे घनघोर युद्धसंग्राम इत्यादिकांचें अगदीं हृदयंगम

वर्णन केलें होतें. पुस्तकाच्या नांवाप्रमाणें खरोखरच तें एक आनंदाचें अजब साधन आम्हीं निर्माण केलें होतें!

अशा सर्व गोष्टींनीं जरी तें अगदीं ओतप्रोत भरलें होतें, तरी त्याला एक मोठी अडचण आली व ती फक्त जनसमुदायाच्या उदार आश्रयाचीच होय! अस्मादिकांच्या या सुंदर पुस्तकांतील स्वारस्य समजण्याइतकें समाजाच्या मठ्ठ डोक्यांत ज्ञान होतें कोठें? या ज्ञानाच्या कमतरतमुळें ते आमच्या या असल्या अत्युत्तम पुस्तकाकडे पाहून 'नाचतां येईना तर अंगण वांकडें,' या न्यायानें नाक मुरडूं लागले, यांत आमचा काय अपराध बरें? लोकांच्या अरसिकतेमुळें 'आनंद-साधना'च्या सर्व प्रती जशाच्या तशाच पडून राहिल्या, याला आम्ही काय बरें करणार? तरी स्वस्थ बसण्याइतका आमचा स्वभाव अनुदार नव्हता. आमचें कर्तव्य आम्हांला पूर्णपणें अवगत होतें. तशांतून, आमचें सर्व भांडवल या पुस्तकाच्या खटाटोपींत बहुतेक पार झालें होतें. आमची सर्व मदार कायती या पुस्तकाच्या विक्रीवरच होती. तेव्हां लोक जर स्वसंतोषानें असलें सुंदर पुस्तक घेत नाहींत, तर त्यांच्याकडून तें बळजबरीनेंच घेवविलें पाहिजे, असा आम्हीं स्वतःशीं विचार केला. विचार ठरण्याचाच कायतो अवकाश, लागलाच उद्योगाला प्रारंभ झाला. दुसऱ्याच दिवशीं एका प्रसिद्ध वर्तमानपत्रांत खालील जाहिरात फडकूं लागली:—

## "आनंदसाधन !

अनेक विद्वान गृहस्थांकडून लिहविलेलें! प्रसिद्ध वर्तमानपत्रकर्त्यांनीं नांवाजलेलें! आबालवृद्ध स्त्रीपुरुषांनां वाचण्याला योग्य! प्रत्येक स्त्रीपुरुषानें एकवार तरी अवश्य वाचावेंच! अशा प्रकारचें पुस्तक मराठी भाषेत हेंच पाहिलें आहे! किंमत अगदीं अल्प! अवघा १ रुपया! टपालखर्च एक आणा निराळा पडेल!

छापून प्रसिद्ध करणार—**पंडित गोविंदराव,**

गिरगांव, **मुंबई.**"

ही जाहिरात एक वेळ नव्हे, दोन वेळ नव्हे, तीन वेळाहि नव्हे, एकसारखी बारा वेळ प्रसिद्ध झाली; परंतु उपयोग ? कांहीं नाहीं ! आमचे लोक अगदींच मट्ठ, हें आह्मांला आतां पुरतें कळून आलें. जाहिरात देण्यापासून आमचा एक कवडीचाहि फायदा झाला नाहीं; उलट खर्च मात्र अंगावर आला. आस्ते आस्ते आमचा खिसाहि अगदीं रिकामा होण्याच्या बेतांत आला. आतां पुढें काय करावें ? पैशाची तर आह्मांला फार जरूर होती आणि तीसुद्धां आमच्या या सुंदर पुस्तकावरच मिळाला पाहिजे, अशी आमची फार इच्छा ! अर्थात्, लोकांची ज्ञानार्जनाची इच्छा जागृत करण्याची कांहीं तरी बेमालूम युक्ति शोधून काढण्याचा आमचा निश्चय ठरला. झालें. आमच्या दुसऱ्या प्रयत्नास सुरुवात झाली.

आमच्याजवळ आतां अवघे दहा रुपये शिल्लक राहिले होते. तेवढे खिशांत घातले; ऐटबाज पोषाख चढविला आणि तडक काळकादेवीच्या रस्त्यावर जाऊन एका पुस्तकें विकणाराच्या दुकानांत प्रवेश केला. दुकानदारानें मोठ्या अदबीनें 'कोणकोणतीं पुस्तकें पाहिजेत ?' ह्मणून विचारतांच आह्मीं खालील बात ठोकून दिली. आह्मी म्हणालों "नागपुरास आमचें पुस्तकें विकण्याचें मोठें दुकान आहे. आह्मांला कांहीं पुस्तकें खरेदी करावयाचीं आहेत. आपल्या दुकानाची आमच्या नागपुरास फार कीर्ति असून शिवाय आपलें आमचें खातेंहि आहे. कमिशनच्या बाबतींत जुळलें, तर आम्ही आपल्याकडून रोख किंमतीनें ह्या यादीप्रमाणें पुस्तकें विकत घेऊं."

असें ह्मणून खिशांतून एक यादी काढून दुकानदाराच्या हातांत दिली. तींत खालीं लिहिल्याप्रमाणें पुस्तकांचीं नांवें लिहिलीं होतीं:—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| आजकालच्या गोष्टी | ... ... | ... | प्रती | १०० |
| सौ. डा. आनंदीबाईचें चरित्र | ( काशीबाईकृत ) | ... | ,, | २५ |
| अरेबियन नाइटस | ... ... | ... | ,, | १० |
| संसारसुख | ...( गाडगीळकृत ) | ... | ,, | ५० |

| | | | |
|---|---|---|---|
| पण लक्षांत कोण घेतो ? | ... ... ... | ,, | २०० |
| आनंदसाधन | ... ( पंडित गोविंदरावकृत ) | ,, | २०० |
| सद्गुणी सून | ... ( गांगनाईककृत ) | ,, | १०० |
| सुशील यमुना | ... ... ... | ,, | १५० |
| नारायण आणि गोदावरी | .... ... ... | ,, | ५० |
| विकारविसलित | ... ( आगरकरकृत ) | ,, | २५ |
| दुर्गा | .... ( देवलकृत ) | ,, | २५ |
| ताराबाई आणि हिराबाई | ... ( गांगनाईककृत ) | ,, | ५० |
| निहालकुवर | ... ... ... | ,, | १०० |
| हिंद आणि ब्रिटानिया | ... ... ... | ,, | २५ |
| झांशीची राणी लक्ष्मीबाई (पारसनीसकृत) | | ,, | १०० |

यादी वाचून दुकानदार ह्मणाले " यांतील सर्व पुस्तकें आमच्या दुकानीं आहेत. फक्त ' आनंदसाधन ' मात्र नाहीं. या पुस्तकाचें नांव आह्मी आजच पहिल्यानें ऐकतों आहों. शिवाय, ग्रंथकाराबद्दल आम्हांला माहितीहि पण नाहीं !"

" काय म्हणतां ? गोविंदराव पंडितांनीं केलेल्या ' आनंदसाधन ' पुस्तकाचें नांव आपण आजवर ऐकिलें नाहीं ? मोठेंच आश्चर्य ह्मणा-यचें ! आमच्या गांवीं तर या पुस्तकाला फार मागण्या येतात. बरें तें असो. या यादीप्रमाणें सर्व पुस्तकें जर आपल्याकडे नसतील तर यादी परत द्या, आम्ही स्वतःच पंडितांच्या पत्त्यावर जाऊन तीं पुस्तकें घेऊन येतों. मेहरबानीनें गिरगांवाकडे जाणारा रस्ता कोणता तो मात्र आम्हांला दाखवा. "

असें ह्मणून ज्या वर्तमानपत्रांत आमची जाहिरात प्रसिद्ध झाली होती त्याची एक प्रत खिशांतून काढून आम्हीं त्या दुकानदारास दाखविली. त्यानें ती लक्षपूर्वक वाचून पाहिली व ह्मटलें " या एकाच पुस्तका-करितां आपण इतक्या लांब जाण्याची तसदी कशाला घेतां ? आह्मी आपला एक मनुष्य पाठवून तुह्मांला लागतील तेवढ्या या पुस्तकाच्या प्रती आणवून देऊं. असे चार साडेचार वाजण्याच्या सुमारास जर

आपण येथें परत याल, तर आपल्या यादीबरहुकूम सर्व पुस्तकें आह्मी आगाऊ तयार करून ठेवूं. परंतु कांहीं बयाण्यादाखल देऊन जाल तर बरें."

"ठीक आहे !" आह्मीं उत्तर दिलें. "बयाण्याबद्दल दहा रुपये दिले ह्मणजे पुरे होतील कीं नाहीं? परंतु आह्मांला आज रात्रीच्या मेल गाडीनें नागपुरास परत गेलेंच पाहिजे आहे हो! कसेंहि करून संध्याकाळपर्यंत सर्व पुस्तकें तयार करून ठेवण्याला मात्र विसरूं नका ह्मणजे झालें." असें ह्मणून बरोबर आणलेली दहा रुपयांची नोट दुकानदाराच्या हातावर ठेविली व परत बिऱ्हाडाचा मार्ग धरिला.

दुकानदाराचा मनुष्य आमच्या 'आनंदसाधनाच्या' प्रती नेण्याकरितां येणार, हें तर ठरलेंच! आमच्या मागोमाग एकदोन तासांतच आमचा पत्ता शोधितशोधित तो येतांना आमच्या दृष्टीस पडला. आमचें नांव घेऊन आह्मी कोठें रहातों हें विचारतांना आह्मीं त्याला माडीवरच्या खिडकींतून पाहिलें. त्याला स्वतःच भेटणें आह्मांला बरें न वाटल्यामुळें आह्मीं एक मनुष्य त्याला भेटण्याकरितां तयार करून ठेविला होता. त्याची व त्या दुकानदाराच्या मनुष्याची गांठ पडून थोडा वेळ विचारपूस झाल्यानंतर तो ह्मणाला "काळकादेवीच्या रस्त्यावर आमचें पुस्तकें विकण्याचें दुकान आहे. आह्माला गोविंदराव पंडितांनीं केलेल्या 'आनंदसाधन' नामक पुस्तकाच्या २०० प्रती पाहिजे आहेत. तरी आपण शेंकडा कमिशन काय द्याल व पैसे किती दिवसांनीं दिले पाहिजेत?"

आमच्या मनुष्यानें उत्तर दिलें "आनंदसाधनाच्या प्रती फार शिल्लक आहेत कोठें? फार फार तर दोन अडीचशें असतील. गोविंदराव पंडित गेले आहेत बाहेरगांवीं. दुसरी आवृत्ति काढण्याविषयीं त्यांना दोनचार पत्रें पाठविलीं, परंतु आजवर कांहींएक उत्तर आलें नाहीं; आणि पुस्तकाला तर रोज मागण्यांवर मागण्या येत आहेत. आमच्या कोणत्याहि पुस्तकाला आह्मी बिलकूल कमिशन देत नसतों. तथापि

आपण व्यापारी असल्यामुळें आम्ही आपल्याला १५ टक्के कमिशन देऊं. पैसे मात्र रोख मिळाले पाहिजेत. उधारीचा व्यवहार आम्ही कोणाशींच ठेविला नाहीं व ठेवित नाहीं. याउपर आपली मर्जी. ”

शेवटीं हो ना करितां करितां २५ टक्के कमिशन देण्यास आमचा मनुष्य कबूल झाला. दुकानदाराच्या मनुष्यानें पैसे मोजून दिले व पुस्तकें घेऊन आपल्या दुकानाची वाट धरली. आमची अजब युक्ति शेवटास गेली ! आतां संध्याकाळीं त्याच्या दुकानाकडे जाण्याची आम्हांला काय जरूर होती ? दुकानदारानें आमच्या यादीबरहुकूम सर्व पुस्तकें अगदीं चक्क बांधून वगैरे तयार करून तो आमची वाट पाहत बसला. गाडीच्या वेळेपर्यंत त्यानें दुकान उघडें ठेविलें होतें. शेवटीं “ कांहीं अडचणीमुळें आले नसतील, सकाळीं येतील,” अशी मनाची समजूत करून बिचारा दुकान बंद करून घरीं गेला. दुसरे दिवशीं अगदीं सकाळीं पुन्हा दुकान उघडून आमची वाट पाहत बसला; परंतु व्यर्थ ! आमचा पत्ता नाहीं ! एवढी मोठी विक्री एकदम होणार म्हणून त्याला जो आनंद झाला होता तो आतां मात्र अगदीं मावळला. बिचाऱ्याच्या तोंडावर निराशेनें आपला पगडा बसविला. शेवटीं, आणखी पांचचार दिवस आमची वाट पाहून त्यानें तीं पुस्तकें विकण्यास सुरुवात केली. कांहीं दिवसांनीं सर्व पुस्तकें विकलीं गेलीं, परंतु आमच्या ‘ आनंदसाधना ’च्या एका प्रतीनेंहि बिचाऱ्याचें दुकान सोडिलें नाहीं ! तेव्हां तीं पुस्तकें परत करण्याकरितां आपला मनुष्य त्यानें पुन्हा आमच्याकडे पाठविला. या वेळीं आम्हीं स्वतःच त्याला भेटलों. वरील सविस्तर हकीगत त्यानेंच आम्हांला सांगितली, व फारच मिनतवारीनें पुस्तकें परत घेण्याविषयीं आमची प्रार्थना केली. परंतु त्याची सर्व खटपट व्यर्थ गेली, हें निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं. आम्हीं साफ सांगितलें कीं “एकवार बिकलेला माल आम्हीं मुळींच परत घेत नसतों !” बिचारा दुकानदार मनांतल्या मनांत चुरमुरे खात चालता झाला. झालेल्या फजितीची हकीगत कोणालाहि सांगण्याचें

त्याला धैर्य झालें नाहीं. बिचाऱ्याला दीडशें रुपये विनाकारण नुकसान सोसावें लागलें. त्यांपैकीं एक कवडीहि वसूल होईल तर शपथ ! नाहीं ह्मणावयाला आह्मीं बयाण्यादाखल दिलेले दहा रुपये कायते त्याला मिळाले होते !

वाचकहो ! याप्रमाणें सातआठ दुकानदारांनां आमच्या भेटीचा लाभ झाल्यावर आमच्या 'आनंदसाधना'च्या दोन हजार प्रती खपण्याला वेळ तो कितीसा लागणार ? हां हां ह्मणतां सर्व प्रती खलास झाल्या. छपाईचा, जाहिरातींचा वगैरे खर्च वजा जातां आह्मांला सरासरी दीड हजार रुपये निव्वळ फायदा झाला!! दुसऱ्यास कळलें तर आपली फुकट फजिती मात्र होईल, या धास्तीनें कोणींहि ही गोष्ट दुसऱ्यास कळूं ह्मणून दिली नाहीं आणि यामुळेंच आमची अचाट कल्पना सिद्धीस जाण्याला मुळींच अडचण आली नाहीं. अनेक दुकानदार आमचें अगाध कल्पनाचातुर्य पाहून थक्क झाले; परंतु 'आनंदसाधन' आणि 'गोविंदराव पंडित' हीं दोन नांवें त्यांच्या स्मृतिपटलांतून जाण्याला बरेच दिवस लागले. असो. यानंतर आह्मीं असेंच आणखीहि एक 'चतुर्दशरत्नें' या नांवाचें उत्तम पुस्तक छापून प्रसिद्ध केलें, व एक सुंदर मासिक पुस्तक काढून त्यांत वर्गणीदारांनां हजारों रुपयांचीं बक्षिसें मिळण्याचीहि सोय केली.

खरोखर या जगांत पैसा हें एक आनंदाचें श्रेष्ठ साधन आहे. एका पैशाची भरपूर मदत असली ह्मणजे मग मनुष्य दुसऱ्या कशाचीहि पर्वा करित नाहीं. कितीहि कठीण गोष्ट असो, ती या पैशानें अत्यंत सुलभ करितां येते. दुष्प्राप्य वस्तूहि या पैशाच्या सहाय्यानेंच सहजगत्या प्राप्त करून घेतां येते. एवंच, पैसा असला ह्मणजे मनुष्य काय पाहिजे तें करूं शकतो. तेव्हां, अशा या अलौकिक वस्तूला आनंदाच्या सर्व साधनांमध्यें श्रेष्ठ असें कोण ह्मणणार नाहीं ? असो. आमचें 'आनंदसाधन' खलास होऊन त्याच्या मोबदला आह्मांला हें खरेंखरें आनंदाचें साधन प्राप्त झालें होतें. आमचा तळीराम गार झाला होता. तथापि वाचकहो ! आतां आह्मीं अगदींच स्वस्थ बसलों होतों अशी मात्र आपण मनांत

कल्पनादेखील आणूं नका! कारण, आमच्या ह्या वेळपर्यंतच्या परिचया-वरून आपल्याला सहजच समजलें असेल कीं, आह्मांला उद्योगाची फारच आवड असे. उगीच पडून आळसानें वेळ घालविणारांपैकीं अस्मादिकांची व्यक्ति नव्हती. जगतावर उपकार करण्याची आह्मांला पराकाष्ठेची हौस असल्यामुळें अशी उद्योगप्रिय व केवळ जगाच्या कल्याणाकरितां अवतरलेली विभूति पैसा कितीहि मिळाला ह्मणून स्वस्थ बसणार थोडीच ! आमचें 'आनंदसाधन' संपतांच आह्मीं 'चतुर्दशरत्नें' या नांवाचें दुसरें एक अत्युत्तम पुस्तक लिहिलें. हें लिहिण्याला ह्मणजे आह्मांला फारसा वेळ लागला, असें मुळींच नाहीं ! पांचसहा दिवसांतच तयार होऊन पुस्तक छापखान्यांत जाऊन पडलेंहि! कारण, यांतील मजकूर ह्मणजे चौदा प्रसिद्ध व्यक्तींचीं जीवनचरित्रें, भिन्नभिन्न ग्रंथांतून घेतलीं होतीं. तेव्हां तीं लिहिण्याला वेळ तो कितीसा लागणार ?

पुस्तक छापून तयार होण्याला कायतो सातआठ दिवसांचा अवकाश होता. आह्मीं एका अगदीं अपरिचित पुस्तक विकणाराची भेट घेतली व त्याला आह्मीं अशा प्रकारचें एक सुंदर पुस्तक छापवित असल्याचें कळवून ह्मणालों " जर आपली हरकत नसेल, तर हें पुस्तक आपल्याच दुकानांत विक्रीस ठेवण्याची आमची इच्छा आहे. त्याबद्दल आह्मी आपल्याला २५ टक्के कमिशन देऊं. आपल्या नांवानें या पुस्तकाबद्दल विनंतिपत्र प्रसिद्ध करण्याची आह्मांला परवानगी द्याल तर मोठीच मेहरबानी होईल. कारण, आपल्याला सर्व ओळखतात; बाहेरगांवच्या लोकांचा आपल्यावर जितका विश्वास बसेल, तितका आमच्यासारख्या-वर बसणार नाहीं. यासाठीं आपण जर कबूल व्हाल तर आपल्या नांवावर पुस्तकाची विक्री अधिक होऊन त्यांत उभयतांचें हित होईल.

दुकानदार महाराज या गोष्टीला सहज कबूल झाले. त्यांनां वाटलें, या विनंतीपत्राच्या योगानें एक तर अनायासें आपलें नांव सर्वत्र प्रसिद्ध होऊन शिवाय आपल्याला विक्रीवर कमिशन भरपूर मिळेल. मग यांत आपलें नुकसान काय आहे? याप्रमाणें कमिशन घेऊन पुस्तकें विकण्याचें

दुकानदार कधींहि नाकारित नाहींत; कारण, यांत ते कधींहि फसण्याचा संभव नसतो. विक्री झाली तर अगोदर आपलें कमिशन, मग ग्रंथकर्त्याची आठवण ! कित्येक दुकानदार तर "आज देऊं, उद्यां देऊं," अशावर चालढकल करून ग्रंथकर्त्यांनां झुलवित असतात. बिचाऱ्या ग्रंथकर्त्याला पैसे द्यावयाचे ह्मणजे त्यांच्या मोठें जिवावर येतें! दिलेच तर एखादे वेळीं दोनचार रुपये देऊन वाटेस लावितात. ज्यांनां ते ओळखत नसतात, व ज्यांच्याशीं केवळ पत्रव्यवहारानेंच काम चालतें, त्यांनां तर हे "पुस्तकाची एकहि प्रत खपली नाहीं. जाहिरातीचाच खर्च अंगावर चढत आहे," वगैरे वगैरे लिहून संतुष्ट करितात. एकंदरींत, या व्यवहारांत आपलें नुकसान होण्याचा संभव मुळींच नसल्यामुळें आमचे दुकानदार आपल्या नांवानें विनंतिपत्र काढूं देण्याला कबूल झाले, यांत आश्चर्य कसलें ?

याप्रमाणें परवानगी मिळतांच दोनतीन दिवसांनीं खालील जाहिरात एका लोकमान्य वर्तमानपत्रांत फडकूं लागली:—

"लक्ष्य द्या ! लक्ष्य द्या !

विकत घ्या किंवा नका घेऊं परंतु एक वेळ

अवश्य वाचून तर पहा !

**चतुर्दशरत्नें.**

लौकरच छापून प्रसिद्ध होईल. या पुस्तकामध्यें सर्वजनप्रसिद्ध, सर्व लोकांच्या आदरास पात्र, सर्वविद्यापारंगत, अशा चौदा एतद्देशीय थोर पुरुषांचीं, माहितीनें परिपूर्ण भरलेलीं जीवनचरित्रें वर्णिलेलीं आहेत ! या पुस्तकाच्या वाचनानें कितीहि नीच वृत्तीचा मनुष्य असला तरीहि त्याच्या अंतःकरणांत सद्वृत्तीचा प्रकाश पडेल ! असत्संगाला प्रवृत्त झालेला मनुष्य सत्संग धारण करील. लहान मुलांनां आपण जगांत कसें वागावें हें या पुस्तकांतील चांगल्या चांगल्या दृष्टांतांवरून कळून येईल. हें पुस्तक अबालवृद्ध स्त्रीपुरुषांनां वाचण्याला सर्वथा योग्य असें

आहे. किंमत अगदींच अल्प. फक्त एक रुपया. टपाल हंशील व व्ही. पी. खर्च मिळून तीन आणे जास्त पडतील.

पुस्तकें मिळण्याचा पत्ता—

**मेसर्स खर आणि कंपनी,**

बुकसेलर्स आणि पब्लिशर्स,

**काळकादेवी रोड, मुंबई.**"

ही जाहिरात प्रसिद्ध होऊन चारपांच दिवस झाले मात्र, दुकानदाराकडे चोंहोंकडून पुस्तकाच्या मागणींचीं एकसारखीं पत्रें येण्यास सुरुवात झाली! कोणीं एक प्रत मागविली होती, कोणीं दोन मागविल्या होत्या व कोणीं कोणीं तर चारचार, पांचपांच प्रतीहि एकदम मागविल्या होत्या! एका आठवड्याच्या आंतच सुमारें शंभरांवर पत्रें आलीं, व तीं सर्व मिळून तीनशेंहून जास्त प्रती गिऱ्हाइकांनीं व्ही.पी.नें मागविल्या होत्या. याप्रमाणें पत्रांवर पत्रें आलेलीं पाहून दुकानदार महाराजांनां अर्थातच वाटलें कीं, या पुस्तकाचा खप सपाटून होणार!

याच सुमारास एके दिवशीं आह्मी त्या दुकानांत गेलों व दुकानदारास विचारिलें "आपल्या नांवानें आमच्या पुस्तकाची जाहिरात प्रसिद्ध होऊन बरेच दिवस झाले, मागणींचीं कांहीं पत्रेंबित्रें आलीं का ?"

दुकानदारानें उत्तर दिलें "आजपर्यंत आलेल्या पत्रांवरून मला तर खास वाटतें कीं, आपल्या पुस्तकाची विक्री अगदीं झपाट्यानें होणार." असें ह्मणून त्यानें आजपर्यंत आलेलीं सर्व पत्रें आणून आमच्यापुढें ठेविलीं आणि तो ह्मणाला "हीं पहा, सरासरी तीनशेंवर प्रती पाठविण्याविषयीं पत्रें आलीं आहेत."

हीं पत्रें पाहून आह्मांला मोठा आल्हाद झालासें दर्शवून आह्मी ह्मणालों "आह्मांला खास वाटतें कीं, आमच्या या पुस्तकाचा बराच प्रसार होण्याचा संभव आहे; परंतु काय उपयोग ? आमच्या श्रमाचा आह्मांला कांहीं उपयोग होईलसें दिसत नाहीं. आमचा दैवयोग असा कांहीं विलक्षण आहे कीं, लाभ ह्मणून कोणत्याहि गोष्टींत आह्मांला

होणेंच नाहीं! आम्हीं ज्या आशेनें हें पुस्तक लिहिलें, ती आमची आशा ईश्वराच्या मनांत निष्फळ करण्याचें दिसतें! ”

आमचे हे निराशेचे उद्गार ऐकून दुकानदार म्हणतात “ असें कसें बरें आपण म्हणतां ? आपल्या या पुस्तकाची विक्री सपाटून होण्याचा रंग दिसत आहे.”

“ आपण ह्मणतां तें सारें खरें, परंतु कांहीं अत्यंत महत्वाच्या कामाकरितां सध्या आम्हांला पैशांची फारच जरूर आहे, एकदोन दिवसांत कसेंहि करून पांचसहाशें रुपये पाहिलेच पाहिजेत ! या गोष्टीचा विचार करण्याकरितां काल संध्याकाळीं आम्ही आमच्या एका आप्ताच्या घरीं बसलों होतों, इतक्यांत तेथें एक गृहस्थ आले. आह्मांला वाटतें कीं, ते कोणीतरी पुस्तकांचेच व्यापारी असावेत. त्यांनीं ही आमची पैशासंबंधीं गोष्ट ऐकली. तेव्हां ते आह्मांला ह्मणाले “काहो, ‘आह्मी असें ऐकतों कीं आपण ‘ चतुर्दशरत्नें ’ या नांवाचें पुस्तक केलें आहे, व त्याच्या दोन हजार प्रती छापावित अहां ? हें जर खरें असेल तर एखाद्या पुस्तकें विकणाराला तें पुस्तक जरा स्वल्प किमतींत विकून टाका, आणि त्या पैशानें हा आतांचा महत्वाचा कार्यभाग उरकून घ्या ह्मणजे झालें. ’ हें ऐकून आह्मीं त्याला सांगितलें ‘ तुह्मी ह्मणतां तें सर्व खरें, परंतु आमचीं सर्व पुस्तकें आज एकदम विकत घ्यायला कोण तयार आहे?’ यावर तो म्हणाला ‘तें मझ्याकडे लागलें. आपण त्या गोष्टीस कबूल असाल तर गिऱ्हाईक पाहून देण्याचें काम माझें. ’ आह्मी त्याच्या ह्मणण्यास कबूल झालों व ‘ आणा, गिऱ्हाईक पाहून आणा, ह्मणजे कायतें पाहूं.’ असा त्याला जबाब दिला. तो गृहस्थ आज सकाळीं एका इसमास घेऊन आमच्या घरीं आला व ह्मणाला ‘ आपणास कबूल केल्याप्रमाणें हें आपल्या पुस्तकास गिऱ्हाईक आणलें आहे. यांचा पुस्तकें विकण्याचा धंदा आहे. हे आपल्या पुस्तकाच्या दोन हजार प्रतींबद्दल पांचशें रुपये रोख देण्यास तयार आहेत. जर आपण कबूल असाल तर

हे छापखान्यांतूनच पुस्तकें घेऊन जातील.' आह्मांला पैशांची अत्यंत जरूर, तेव्हां आह्मांला त्याच्या ह्मणण्याला सम्मति दर्शवावी लागली. तरी देखील 'आपण मेहरबानीनें उद्यां भेटा, म्हणजे कायतें नक्की ठरवूं,' असें त्याला सांगितलें आहे. कारण, हें असलें यःकश्चित् सामान्य पुस्तक विकत घेण्याची त्याला एवढी उत्कंठा कां ? आम्हांला याचें मोठें गूढ पडलें. पुष्कळ विचार केला, परंतु कांहीं केल्या त्याचें कारण लक्ष्यांत येईना; परंतु आतां जेव्हां हीं आपल्याला आलेलीं एवढीं पत्रें पाहिलीं, त्याबरोबर हीं सगळीं पुस्तकें एकदम स्वल्प किमतींत खरीद करण्याचा एवढा उद्योग करण्याचें त्याचें कारण लक्ष्यांत आलें.

हीं आमची सर्व हकीगत ऐकून घेतल्यावर दुकनदाराला साहजीकच वाटलें कीं, पांचशें रुपये देऊन जर त्यानें हीं पुस्तकें विकत घेतलीं, तर त्याला कांहीं थोडाथोडका फायदा होणार नाहीं. या पुस्तकाबद्दल हीं एवढीं पत्रें आलीं आहेत हें कसें तरी त्या गृहस्थाला समजलें असावें, आणि ह्मणूनच हें पुस्तक एकदम विकत घेण्याविषयीं त्यानें एवढा प्रयत्न चालविला आहे. असें होऊं देण्यापेक्षां आपणच स्वतः हें पुस्तक विकत घेतलें, तर आपल्यालाच नाहीं का हा सगळा फायदा मिळणार? पुस्तक छापून बाहेर पडलें नाहीं तोंच जर त्याला इतकीं गिऱ्हाइकें जमलीं आहेत, तर तें तयार झाल्यावर अलबत्त यापेक्षांहि जास्त जमतील, यांत तिळमात्र संदेह नाहीं ! ज्यांच्याकडून हीं पत्रें आलीं आहेत त्यांनां पुस्तकें पाठविण्याचाच कायतो अवकाश, ताबडतोब तीनशें रुपये येतील. तेव्हां, एकंदरीनें पाहतां हा असला सुयोग हातचा जाऊं देणें कधींहि उचित होणार नाहीं. असा मनाशीं विचार

करून दुकानदार आम्हांला म्हणाले "हें पुस्तक विकण्याचाच आपला विचार झाला असेल तर तें दुसऱ्याला देण्याचें काय बरें कारण आहे ? माझ्या नांवानें याच्या जाहिराती प्रसिद्ध झाल्या आहेत, त्याअर्थी हें आपण दुसऱ्या कोणासहि न देतां मलाच दिलें पाहिजे. इतकेंच नाहीं,

तर दुसरा कोणी जी कांहीं किंमत देईल त्यापेक्षां माझेजवळून कांहीं कमी घेतली पाहिजे, हें आपणास उचित आहे; परंतु आपण दुसऱ्याजवळ एकवार किंमतीचा ठराव करून आलां आहां, व तो आपल्याला पांचशें रुपये देण्यास तयार झाला आहे, तेव्हां मलाहि आपल्याला तेवढी किंमत देणें भाग आहे."

दुकानदाराच्या या बोलण्यावर पहिल्यानें आम्हीं बरेच आढेवेढे घेतले. "एकाजवळ विक्रीचा ठराव केला असतां तें त्याला न देतां तुम्हांला कसें द्यावें?" वगैरे वगैरे बऱ्याच अडवणी दाखवून त्याला पांचशेंवरून सातशेंवर तर आणिला व शेवटीं मोठ्या नाखुशीनें त्याला तें पुस्तक विकत दिलें. रुपये मोजून पदरांत घेतले, आणि तेथून चालते झालों.

वाचकहो! येथें आम्हांला एवढेंच सांगितलें पाहिजे कीं, ज्या गोष्टी सांगून आम्हीं आमचें पुस्तक त्या दुकानदाराच्या गळ्यांत बांधिलें होतें, त्या सर्व अगदीं खोट्या होत्या. पुस्तक विकावयाचें एवढेंच कायती सत्य गोष्ट होती. कोणाहि दुकानदाराचें व आमचें या पुस्तकाच्या बाबतींत भाषणहि झालें नव्हतें. किंवा कोणींहि या पुस्तकाबद्दल पांचशें रुपये देण्याचें आमच्यापाशीं कबूल केलें नव्हतें.

पुस्तक विकून ज्या दिवशीं आमच्या हातांत रुपये पडले त्याच दिवसापासून पुस्तकासंबंधीं दुकानदाराला पत्रें येण्याचें अजिबात बंद झालें. हें असें कां झालें हें आमचें आम्हालाच ठाऊक! त्या दुकानदाराला किंवा दुसऱ्या कोणाला यांतलें एक अक्षरहि माहित नव्हतें!

दुकानदारानें पुस्तकें दुकानांत आणल्याबरोबर आलेल्या पत्रांबरहुकूम तीं नीटनेटकीं बांधून एकएकाला व्ही. पी. नें पाठविण्याची सुरुवात केली. एका मागून एक पुस्तकें रवाना झालीं, परंतु पैसे येण्याची मात्र सुरुवात होईना! दुकानदार पहिल्यापहिल्यानें कित्येक दिवस, पोष्टाच्या शिपायाची मोठ्या उत्कंठेनें वाट पहात बसत. शिपाई पत्रें वगैरे देऊन जाई, परंतु पैशाचें नांव नाहीं! सातआठ दिवस झाले तरी

एकाहि पुस्तकाचे पैसे आले नाहींत ! हळुहळू पैशांच्या ऐवजीं दुसरें मात्र कांहीं पोष्टांतून परत येण्याची सुरुवात झाली. पुस्तकावरील पत्त्यांप्रमाणें पोस्टखात्याला मालकाचा पत्ता लागेना. तेव्हां अर्थात् तीं सर्व एकामागून एक दुकानदाराकडे परत येऊं लागलीं. पाठविलेलीं सर्व पुस्तकें क्रमाक्रमानें परत आलीं, यांत बिचाऱ्या पोष्टाचा काय बरें अपराध ? दुकानदार महाराज कपाळावर हात मारून बसले ! सातशें रुपये देऊन त्या बिचाऱ्यानें जीं एवढीं पुस्तकें विकत घेतलीं, त्यांपैकीं एकहि विकलें गेलें नाहीं. उलट, फायद्यांत टपालहांशिलाला मात्र पदरचे बरेच पैसे गेले !

ही सर्व हकीगत त्यानें एक दिवस आपल्या एका व्यवसायबंधूस निवेदन केली. त्यानें ती लक्ष्यपूर्वक ऐकून घेऊन आलेलीं सर्व पत्रें नीट बारकाईनें तपासून पाहिलीं. पहातां पहातां त्याच्या लक्ष्यांत आलें कीं, त्या सर्व पत्रांचें अक्षर अगदीं एका वळणाचें आहे; लिहिण्याची तऱ्हा मात्र निरनिराळी. शाई व लेखणी अगदीं एकच !! पत्रावरील पोष्टाचे छाप पाहून तर फारच आश्चर्य वाटलें. पत्रांत पाठविणारानें जो गांव किंवा जें पोष्ट लिहिलें होतें, त्यांपैकीं एकाहि पोष्टांतून एकहि पत्र आलेलें नव्हतें. सगळीं मुंबईतल्या मुंबईतच कोणत्याना कोणत्यातरी पोष्टांतून आलेलीं होतीं. जें जें पत्र पहावें त्या त्या पत्रावर मुंबईतल्याच कोणत्याना कोणत्यातरी पोष्टाचा छाप ! पत्रांत मात्र दूरदूरच्या गांवांचीं नांवें लिहिलीं होतीं. तेव्हां त्याच्या लक्ष्यांत आलें कीं, हें सर्व कारस्थान गोविंदराव पंडितांचेंच असावें. त्यांनींच ही लोकांना फसविण्याची आणखी एक नवीन युक्ति लढविली असावी. आपण स्वतःच सगळीं पत्रें आस्ते आस्ते लिहून मुंबईतील निरनिराळ्या पोष्टांत टाकलीं असावीं, आणि त्याच स्वारीनें या सर्व पत्रांच्या व आपल्या वाक्चातुर्याच्या सहाय्यानें बिचाऱ्या भोळ्या दुकानदाराला मोहजालांत अडकवून त्याला गर्त्यांत आणिलें आहे.

गरीब बिचारा दुकानदार! अगदींच फसला गेला! काय करावें हें त्याला सुचेना. त्यानें हवी तितकी खटपट केली, परंतु अस्मादिक आतां त्याला थोडीच दाद देणार! शेवटीं त्यानें वकिलामार्फत आह्मांला नोटीसहि दिली! परंतु आमच्याजवळून त्याला एक छदामहि प्राप्त झाला नाहीं. शेवटीं बिचारा कंटाळून आपल्या स्वतःच्याच अकलेची तारीफ करित स्वस्थ बसला. दुसऱ्या कोणाजवळ या आपल्या कमअकलेचें प्रदर्शन करून आपली आणखी फजिती करून घेण्याचें धैर्य त्याला झालें नाहीं. मोठ्या दुःखित अंतःकरणानें सातशें रुपये बुडीत खात्यांत लिहून चुरमुरे खात राहिला.

याप्रमाणें बरेच पैसे मिळविल्यावर कांहीं दिवस विसांवा घेण्याचा आम्हीं निश्चय केला. परंतु व्यर्थ! आमची उद्योगप्रियता आह्मांला कसची स्वस्थ बसूं देते! पुन्हा कांहीं तरी उद्योग करावा असें वाटूं लागलें. एक एक पुस्तक प्रसिद्ध करून तें खपविण्याचा तर आपल्याला आतां अगदींच कंटाळा आला होता. तेव्हां या खेपेस तीनचार चांगलीं पुस्तकें एकदम प्रसिद्ध करण्याचा आह्मीं विचार केला.

आमच्या देशांतील वाचकवर्गांत आढळून येणाऱ्या एका विशेष गोष्टीचा येथें निर्देश केला असतां अप्रासंगिक होणार नाहीं. या वर्गांत अनेकजण असे आहेत कीं, त्यांच्यासमोर एखाद्या अश्लील पुस्तकाचें कोणीं नुसतें नांव उच्चारिलें पुरे, तत्काळ कानांत बोटेंच घालतील! परंतु हेच सभ्यगृहस्थ (!) रात्रीच्या वेळीं खोलीचा दरवाजा घट्ट लावून घेऊन, कोणी आपणाकडे पहात नाहीं अशी खात्री होतांच तेंच अश्लील पुस्तक मोठ्या आतुरतेनें उघडून त्याचें पारायण करण्याला कधींहि मागें-पुढें पहात नाहींत! त्याचप्रमाणें हे सभ्यगृहस्थ (!) अशा प्रकारचें पुस्तक, इतर पुस्तकांपेक्षां जरी चौपट किंमत जास्त पडली तरीहि विकत घेण्याला कमी करित नाहींत! ह्या त्यांच्या विशेष गुणाची अस्मादिकांला पूर्ण माहिती होती. तेव्हां आतां याच दिशेनें उद्योग करण्याचा आह्मीं निश्चय केला. बसल्या बसल्या खालील विनंतिपत्र तयार केलें.—

हीं असलीं अश्लील पुस्तकें छापण्याचें धाडस करणाराला कायद्या-प्रमाणें यथायोग्य शिक्षा झाल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं, ही गोष्ट जरी अगदीं खरी होती, तरी देखील या विषयाचे भाक्ते, अशा विचारांत पडून ही आलेली अपूर्व संधि कधींहि फुकट जाऊं देणार नाहींत, ह्याबद्दल आह्मांला पक्की खात्री होती.

विनंतिपत्र नुसतें लिहून तयार केलें, परंतु तें प्रसिद्ध कसें करावें, ह्याचीच शंका होती. मुंबईंत जेवढीं जेवढीं ह्मणून वर्तमानपत्रें निघतात, त्या प्रत्येकाच्या आफिसांत जाऊन तपास केला, त्यांच्या नेहमींच्या दराच्या दुप्पट पैसे देण्यासहि तयार झालों, तथापि कोणीहि आमची जाहिरात आपल्या पत्रांत प्रसिद्ध करण्याचें कबूल करीना!

ही जबरदस्त अडचण येतांच, जाहिरात देण्याचा बेत आम्हीं बाजूला ठेविला. जाहिरातीऐवजीं एका छापखान्यांतून स्वतंत्र हँडबिलेंच छापून घेतलीं. तरीहि पुन्हा एक अडचण उभी राहिलीच. हीं हँडबिलें वांटावीं कोणीं व कशीं? परंतु यालाहि आम्हीं तावडतोब युक्ति काढिली. आमच्या डोक्याला आणि युक्ति सुचणार नाहीं असें घडणें अशक्य! दोनचार चांगल्या चांगल्या पुस्तकांचीं नांवें घालून आम्हीं दुसरें एक निराळेंच हँडबिल छापविलें, व तें सर्वांत जास्त खप होणाऱ्या एका वर्तमानपत्राच्या मॅनेजर साहेबांनां दाखवून, त्यांच्या त्या लोकप्रिय पत्राबरोबर वांटण्याचा ठराव केला. ठरावाप्रमाणें पैसे मिळतांच मॅनेजर साहेबांनीं, पत्राच्या घड्या वगैरे घालण्याचें काम करणाऱ्या कामगाराला बोलावून आणिलें, आणि आमच्याकडे बोट दाखवून त्याला सांगितलें "हे गृहस्थ हँडबिलें आणून देतील तीं आपल्या पत्राबरोबर पाठवावीं."

कामगारानें होय ह्मणून जबाब दिला व जातां जातां आम्हांला हँडबिलें लौकर घेऊन येण्याविषयीं सूचना दिली. कारण, तें वर्तमानपत्र त्याच रात्रीं घड्या वगैरे घालून तयार व्हावयाचें होतें. आह्मीं त्याच्या या बोलण्याला मान हालवून संमति दर्शविली व तेथून निघून घरीं आलों.

संध्याकाळीं मुद्दामच थोडासा उशीर करून आह्मी हँडबिलें घेऊन तेथें गेलों. आह्मांला उशीर झाल्यामुळें अर्थातच त्या वर्तमानपत्राच्या घड्या वगैरे घालण्याच्या कामाची खोटी झाली व त्याबद्दल ते सकाळचे कामगार आमच्यावर अगदीं रुष्ट झाले. आह्मांला हेंच पाहिजे होतें! त्यांनां खुष करण्याचा मार्ग आह्मांला चांगला अवगत होता, व त्याचें साधनहि आमच्याजवळ होतें; त्याचा आम्हीं तावडतोब प्रयोग केला. त्यांनां जरा एका बाजूस बोलावून त्यांच्या हातावर दोन रुपये ठेवतांच त्यांचा तो राग अगदीं समूळ गेला. इतकेंच नाहीं, तर ते अस्मादिकांवर इतके कांहीं खुष खुष झाले कीं, आह्मीं आणलेलीं सर्व हँडबिलें त्यांनीं तावडतोब वर्तमानपत्राच्या प्रत्येक प्रतीमध्यें एक एक अशीं भरभर घालवून पत्राच्या घड्या करण्याचा तडाका लाविला. तीं हँडबिलें कसलीं होतीं, सकाळीं मॅनेजरसाहेबांस दाखविलीं तीं हींच कीं काय, वगैरे कांहींएक पहाण्याचें त्यांनां कारणच पडलें नाहीं. पडेल कशाला? बिचारा रौप्यमुद्रिकांच्या मोहजालांत अगदीं जखडून बांधला गेला होता. असो. आमचा कार्यभाग सिद्धीस गेला. आम्हीं आणलेलीं सर्व हँडबिलें वर्तमान-पत्रांत गेलीं, त्यांतलें एकहि शिल्लक राहिलें नाहीं, अशी आमची खात्री होतांच आह्मी अगदीं कृतकृत्य होऊन घरीं आलों.

त्या वर्तमानपत्राबरोबर आमच्या हँडबिलांचा योग्य वेळीं चोहोंकडे फैलाव होतांच त्यांत लिहिलेल्या पुस्तकांकरितां पोष्टांतून दररोज एक-सारख्या मनिआर्डरी येऊं लागल्या. आम्हींहि या पैशांचा उपयोग मन मानेल तसा करूं लागलों. पुस्तक मात्र एकालाहि पाठविलें नाहीं. पाठविणार कोठून? असलीं अश्लील पुस्तकें प्रसिद्ध करून अनायासें पोलीसच्या तडाक्यांत सांपडण्याइतके का आह्मी मूर्ख होतों? वाचकहो! हा वेळपर्यंत झालेल्या आमच्या परिचयावरून तरी तुह्मांला तसें वाटणार नाहीं, अशी आमची पक्की खात्री आहे. तीं पुस्तकें आमच्याजवळ नव्हतींहि, आणि अर्थात् तीं आह्मांला कोणालाहि पाठवितांहि आलीं नाहींत. तेव्हां आमचे सर्व आश्रयदाते आम्हांवर अत्यंत रुष्ट झाले, हें कांहीं निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

आमच्या या अश्लील पुस्तकांसाठीं झालेल्या आश्रयदात्यांमध्यें बरेच इसम मोठे संभावित गृहस्थ होते. त्या बिचाऱ्यांनां पुस्तकें मिळालीं नाहींत, तरीसुद्धां जास्तकमी तक्रार करितां येईना. कारण, जर करतां आपलें नांव कोणास समजलें तर पैशापरी पैसा जाऊन उलट अब्रूची मात्र खराबी होणार! अशा भीतीनें, आपण फसल्याबद्दल पस्तावा होऊन बिचाऱ्यानां स्वस्थ बसावें लागलें.

परंतु सगळेच कांहीं सभ्य नव्हते. कित्येक असेहि होते कीं, त्यांनां लोकलज्जेची चाड मुळींच नव्हती. अशा लोकांनीं मात्र पुस्तकें पाठविण्याविषयीं पत्रें पाठवून आमचें डोकें उठविलें. जेव्हां त्यांच्या एकाहि पत्राचें उत्तर आमच्याकडून गेलें नाहीं, तेव्हां तर त्यांच्यापैकीं कित्येकांनीं आमची लबाडी उघडकीस आणण्याची धास्ती घातली. अस्मादिक अशा पोकळ धमकीला थोडेच जुमानणारे होते! होतां होईल तोंपर्यंत 'मौन्यं सर्वार्थसाधनं' या तत्त्वाचें उल्लंघन करावयाचें नाहीं, असा आह्मीं निश्चयच केला होता! असो. नुसत्या धमकीनेंहि आह्मी वळत नाहीं असें पहातांच ते लोक आमची उघड उघड नालस्ती करूं लागले. शेवटीं तर 'आमचे पैसे अमक्या दिवसांच्या आंत परत पाठवा, नाहींतर लोकांनां फसविल्याबद्दल तुमच्यावर कायदेशीर व्यवस्था करावी लागेल!' अशी आह्मांला नोटीस लागली. आतां मात्र आमचें धाबें अगदीं दणाणून गेलें. पुढें काय करावें हें कांहीं वेळ आमचें आह्मांलाच सुचेना! आमचे आतां बारा वाजण्याची वेळ अगदीं नजीक आली, असें मनांत येऊन आमची हबेलंडी उडाली! परंतु असें किती वेळ चालणार? आह्मी आमच्या विलक्षण डोक्याला फारसा त्रास दिला नाहीं तोंपर्यंतच! थोडासा वेळ डोकें खाजवितांच यावरहि एक बेमालुम युक्ति सांपडली. आमच्या अगाध कल्पनाचातुर्यानें आमची याहि वेळीं बाजू राखिली!

दहाबारा दिवस परिश्रम करून आह्मीं पंधरा पंधरा, वीस वीस पानांचीं, अगदीं क्षुद्र अशीं तीन चोपडीं तयार केलीं. त्यांपैकीं एकाला 'रतिशास्त्र,' दुसऱ्याला 'संभोगरत्नाकर,' आणि तिसऱ्याला 'कामरत्न,' अशीं

नांवें ठोकून दिलीं. पुस्तकांचीं नांवेंच काय तीं अश्लील, परंतु तिहींपैकीं एकांतहि अश्लील गोष्टीसंबंधीं अवाक्षरहि नव्हतें ! फिर्याद रुजू होण्यापूर्वींच आमचीं हीं पुस्तकें छापून तयार झालीं व तावडतोब प्रत्येक मिन्हाइकाला पोष्टांतून आह्मीं तीं पाठवूनहि दिलीं! झालें. आमचें काम झालें. आमच्या शत्रूचीं तोंडें बंद झालीं. फिर्याद करण्याचा बेत जागच्या जागींच ढांसळला.

असो. कसे तरी एकदाचे आह्मी या धास्तींतून पार पडलों. इतक्यांत इकडे दुसरेंच लचांड उपस्थित झालें! या फिर्यादीच्या गडबडीमुळें आमचीं हँडबिलें अनायासें पोलीसच्या दृष्टोत्पत्तीस आलीं. आह्मी हीं पुस्तकें खरोखरच छापून त्यांची विक्री करित असतों, हेंहि त्यांनां समजलें. मग आणखी काय पाहिजे? ‘भुताच्या हातांत कोलीत’ ह्मणतात, त्याप्रमाणें व्यवस्था झाली ! एक दिवस मोठ्या जय्यत तयारीनें पोलीसमंडळ अचानक आह्मांला शोधित आलें, व कोणालाहि न विचारतां त्यांतले कांहीं लोक आमच्या घरांत शिरले, आणि कांहीं बाहेर पहारा करित राहिले. हे कशासाठीं आले होते तें आह्मी तेव्हांच समजून चुकलों. यांनां चांगलेंच तोंडघशीं पाडावयाचें असा निश्चय करून आह्मी अगदीं स्वस्थ बसलों. आमचीं पुस्तकें समोरच होतीं, तीं सर्व जप्त करून पोलिसचे लोक आह्मांला चौकीवर घेऊन गेले. अश्लील पुस्तकें छापून प्रसिद्ध केलीं आणि तीं विकलीं असा आमच्यावर आरोप ठेवून फिर्याद रुजू केली, तरी आह्मी कांहींएक न बोलतां चूप राहिलों. त्या वेळीं जामीन देऊन आह्मी घरीं आलों. नेमलेल्या तारखेस कोर्टांत हजर झालों. हा चमत्कारिक खटला पाहण्यासाठीं व विशेषत: अस्मादिकांची मूर्ति कशी काय आहे ती प्रत्यक्ष पाहण्यासाठीं कोर्टांत लोकांची इतकी कांहीं गर्दी झाली होती कीं, बोलण्याची सोय नाहीं ! असो. योग्य वेळीं कामाला सुरुवात झाली.

सरकारी वकील आपले एतद्देशीयच गृहस्थ होते. त्यांनीं आह्मांला विचारिलें “ हीं सगळीं पुस्तकें तुम्हींच प्रसिद्ध केलीं काय ? यांची

विक्रीहि तुम्हीच करतां ? हीं पुस्तकें विकावयास तुम्हीं आपल्या घरींच ठेविलीं होतींना ?”

“ होय महाराज ! ” आम्ही म्हणालों. “ हीं सगळीं पुस्तकें आम्हींच प्रसिद्ध केलीं आहेत, व तीं आमच्याच घरीं विक्रीस ठेविलीं होतीं. जसजशीं गिऱ्हाइकें येत तसतशीं ती आम्ही विकितहि होतों; परंतु हीं पुस्तकें मुळींच अश्लील नाहींत. या सगळ्या पुस्तकांत एकसुद्धां अश्लील शब्द नाहीं. नांवावरून प्रथमदर्शनीं तीं तशीं असावीं असें वाटतें, परंतु त्यांत अश्लील मजकूर मुळींच नाहीं. ”

असें ह्मणून त्यांतील एक पुस्तक घेऊन आह्मीं तें अथपासून इति-पर्यंत मोठ्यानें वाचून दाखविलें. सर्वांनां आमच्या ह्मणण्याची खात्री पटली. मॅजिस्ट्रेट साहेबांची आमच्या निरपराधीपणाबद्दल पक्की खातरी झाली. अर्थात्, आह्मांला दोषमुक्त करून सोडून देणें त्यांनां भाग पडलें. निकाल सांगतांना पोलीसवर मात्र साहेबांनीं ताशेरा झाडला. ते ह्मणाले “योग्य चौकशी केल्याशिवाय उगाच भलताच आरोप ठेवून एखाद्याला कोर्टापुढें ओढणें ह्मणजे निव्वळ जुलूम आहे ! ”

कसा फार्स उडाला ! बिचारे पोलीस हिरमुसले होऊन आमच्याकडे डोळे फाडित फाडित कोर्टांतून निघून गेले. आह्मीहि विजयध्वजाची पताका फडकावित मोठ्या ऐटीनें घरीं आलों.

याप्रमाणें नाना प्रकारच्या उपायांचें अवलंबन करून आह्मी जसजसे जास्त पैसे मिळवूं लागलों, तसतशी आमची हांवहि वाढत चालली. थोडथोडे पैसे मिळविण्याचा आतां आह्मांला अगदींच कंटाळा आला. हजारों रुपये अनायासें मिळवितां येतील अशी कांहीं तरी युक्ति शोधून काढण्यांत हल्लीं आमचें डोकें जगदीं गढून गेलें होतें. थोडेच दिवसांत अशीहि एक विलक्षण युक्ति आह्मांला सांपडली व ती सिद्धीस नेण्याच्या प्रयत्नांकडे आह्मी लागलों.

आमच्या अपूर्व लेखणीचें पुन्हा एकवार स्मरण करून तिच्या सहाय्यानें आह्मीं एक विनंतिपत्र तयार केलें. तें असें :—

"अगदीं नवीन ! प्रथम प्रयत्न !! अपूर्व संधि !!!

**पांच रुपयांस पन्नास हजार !**

मार्च महिन्याचे पहिले तारखेपासून आह्मी एक साप्ताहिक वर्तमानपत्र प्रसिद्ध करणार आहों. त्यामध्यें राजनीति, समाजसुधारणा, इतिहास, साहित्य, इत्यादि अत्यंत महत्वाच्या विषयांची चर्चा केली जाईल. आजपर्यंत अशा प्रकारच्या पत्राची आपल्याकडे मोठी उणीव होती. ती अंशत: तरी भरून काढावी ह्मणूनच केवळ निरपेक्षबुद्धीनें आह्मीं हें काम आरंभिलें आहे. तरी प्रत्येक सुशिक्षित मनुष्यानें या कामीं आह्मांला मदत करावी व देशकल्याणाच्या या महत्कृत्यास हातभार लाविल्याचें श्रेय जोडावें, अशी समस्तांपाशीं प्रार्थना आहे. यांतील लेख मोठमोठ्या जगप्रसिद्ध विद्वानांकडूनच लिहविले जातील. तेव्हां त्याविषयीं आम्हांला जास्त लिहिण्याची जरूर दिसत नाहीं. परंतु अशा या कामीं आह्मांला लोकाश्रयाची अत्यंत जरूर आहे. हें लोककल्याणाचें अत्यंत महत्त्वाचें काम अत्यंत खर्चाचेंहि आहे. तेव्हां तें सुरळीत चालणें हें केवळ लोकाश्रयावरच अवलंबून राहील. हें पत्र मिळून शिवाय वर्गणीदारांनां बक्षिसांच्या रूपानें फायदाहि व्हावा, अशी एक नवीनच युक्ति आह्मीं योजिली आहे.

आमच्या पत्राची वर्षाची वर्गणी टपालहांशिलासुद्धां फक्त पांच रुपये पडेल. आमची पक्की खात्री आहे कीं, या एप्रील महिन्याचे आंत आह्मांला निदान १५,००० तरी वर्गणीदार मिळतील व या १५,००० वर्गणीदारांची या वर्षाची आगाऊ वर्गणी एप्रीलच्या तिसाव्या तारखेच्या आंत रोख रुपये ७५,००० आमच्याजवळ जमतील. त्यांपैकीं ५०,००० रुपये तीस एप्रीलच्या आंत रोख पैसे भरून होणाऱ्या वर्गणीदारांमध्यें बक्षिसांच्या रूपानें वांटले जातील.

**बक्षिसांचा तपशील :—**

| रुपये. | | | बक्षिसांची संख्या. | एकूण रुपये. |
|---|---|---|---|---|
| १०,००० | रुपयांचें | बक्षीस | ... १ | ... १०,००० |
| ५,००० | ,, | ,, | ... १ | ... ५,००० |
| ३,००० | ,, | ,, | ... १ | ... ३,००० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २,००० | रुपयांचीं बक्षिसें | ... | २ | ... | ४,००० |
| १,५०० | ,, ,, | ... | २ | ... | ३,००० |
| १,००० | ,, ,, | ... | १० | ... | १०,००० |
| ५०० | ,, ,, | .... | १० | ... | ५,००० |
| २५० | ,, ,, | ... | ४० | ... | १०,०००० |
| | एकूण बक्षिसें | | ६७ | | रु. ५०,००० |

यात्रमाणें ६७ जगांमध्यें हे ५०,००० रुपये वांटले जातील. ज्यांच्या नशिबाचा सुयोग येईल त्याला दहा हजारांपासून कमींत कमी अडीचशें रुपये तरी खात्रीनें मिळून शिवाय एक वर्षभर अत्यंत महत्त्वाच्या विषयांनीं भरलेलें मोठ्या किंमतीचें वर्तमानपत्र अनायासें वाचावयास मिळेल. तरी ही असली अपूर्व संधि कोणींहि फुकट घालवूं नये.

या बक्षिसांच्या रकमेवर तीस एप्रीलनंतर होणाऱ्या कोणाहि वर्गणीदाराचा बिलकूल हक्क चालणार नाहीं. ज्या मानानें वर्गणीदारांची संख्या कमजास्त होईल त्या मानानें बक्षिसांची संख्याहि कमजास्त होईल. अर्थात् जास्त वर्गणीदार जमले तर त्यांत वर्गणीदारांचाच फायदा आहे, हें आमच्या वर्गणीदारांनीं अवश्य लक्ष्यांत ठेवावें.

मे महिन्याच्या पांचव्या तारखेस दोन प्रहरीं साडेचार वाजतां, नंबरांच्या चिठ्या टाकून बक्षिसांचा निकाल लावण्यांत येईल. पंचांसमक्ष हा निकाल केला जाईल, व बाहेरगांवच्या वर्गणीदारांच्या माहितीसाठीं सविस्तर निकाल वर्तमानपत्रांत प्रसिद्ध केला जाईल."

याप्रमाणें विनंतिपत्र तयार करून त्याच्या दहापांच हजार नव्हे, तर एकदम एक लाख प्रती छापून घेतल्या. रेल्वेच्या गाईडमध्यें, पोष्टाच्या गाईडमध्यें, टाइम्सच्या क्यालेंडरांत, थ्याकरचे डायरेक्टरींत जें जें गांव म्हणून दिसलें त्या त्या गांवीं आह्मीं या जाहिराती पोष्टांतून पाठवून दिल्या. लहातमोठ्या सर्व गांवीं हां हां ह्मणतां आमच्या या नवीन कल्पनेचा फैलाव केला. फक्त मुंबईतच काय ती आह्मीं याची चाहूलसुद्धां लागूं दिली नव्हती !

थोड्याच दिवसांत आह्मांला आढळून आलें कीं, भोळे बिचारे बाहेरगांवीं रहाणारे लोक, आमच्या गोड गोड थापांनां भुलून गेले जाहिरातींत लिहिलेल्या अगदीं लबाडीच्या गोष्टी त्यांनां सत्य आहेत असें वाटलें. कबूल केलेलीं बक्षिसें आह्मी खरोखरच वांटणार आहों, असें त्यांनां वाटलें. बिचाऱ्यांनां काय माहीत, कीं, त्यांच्या डोळ्यांत धूळ टाकण्याकरितांच केवळ आह्मीं हें अवडंबर माजविलें आहे ह्मणून ? अरेरे बिचारे अगदींच भोळे ! !

हळुहळू वर्गणी यावयास सुरुवात झाली. पुष्कळ लोक मनिआर्डरीनें पैसे पाठवूं लागले व वर्गणीदारांच्या यादींत नांवें नोंदविण्याविषयीं पत्रांवर पत्रें येऊं लागलीं. आह्मांला वाटलें होतें तितके जरी नाहींत, तरी एप्रील अखेरीस जाहिरातीचा वगैरे सर्व खर्च वजा जाऊन आमच्या हातांत निव्वळ दहा हजार रुपये शिल्लक राहिले.

मागें आह्मीं सांगितलेंच आहे कीं, मुंबईंत आह्मीं या गोष्टीचा अगदीं मागमूसहि लागूं दिला नव्हता. कारण, आमची येथील लोकांची साधारण बरीच ओळख झाली होती, हें वाचकांनां ठाऊक आहेच. या खेपेला आमचा हा खेळ केवळ बाहेरगांवच्या मंडळींशींच चालला होता; परंतु असें किती दिवस चालणार ? आमच्या बाहेरगांवच्या वर्गणीदारांचे आप्तमित्र मुंबईंत होतेच. त्यांनां ही बातमी सहजच लागली, व ते याचा बारकाईनें तपास करूं लागले. आतां मात्र आह्मांला पंचाईत पडली. कारण, ही उपद्व्यापी मंडळी बक्षिसांचा निकाल पहाण्याला अवश्य जमणार, आणि मग आह्मांला खरोखरच चिठ्या टाकून बक्षिसें द्यावीं लागणार. आह्मीं तर एकाहि वर्गणीदाराचें नांव कीं गांव लिहून ठेविलें नव्हतें, किंवा त्यांची नंबरवारीनें यादीहि तयार केली नव्हती. जेवढे पैसे आले तेवढे गट्ट करून गुपचुप बसलों होतों. आतां काय करावें ! बक्षिसांचा निकाल पहाण्याला लोक जमले ह्मणजे आह्मांला वर्गणीदारांची यादी बाहेर काढावी लागणार व आमचें एकंदर कारस्थान बाहेर पडणार, ही मोठी आह्मांला धास्ती पडली. परंतु प्रत्येक

अडचणीवर युक्तिहि आहेच ! मग आमच्या अगाध कल्पनाचातुर्याच्या सहाय्यानें याहि कचाटांतून आह्मी अगदीं सुरक्षित बाहेर पडलों, यांत नवल तें कसलें ?

एकदोन दिवस मेहनत घेऊन जितक्या लोकांनीं आमच्याकडे पैसे भरले होते, तितक्याच, आमच्या कल्पनासृष्टींतून बाहेर काढलेल्या नवीन नांवांची आह्मीं एक नंबरवार यादी तयार केली, व वर्गणीची रक्कम तारिखवार जमा केली. एकंदरींत या बनावट यादीला आह्मीं असें कांहीं स्वरूप दिलें होतें कीं, कोणालाहि ती अगदीं खरी आहे, असेंच वाटावें. याप्रमाणें बक्षिसांची तर व्यवस्था चोख करून ठेविली. आतां कितीहि लोक पहाण्यास आले, तरी त्याची आह्मांला पर्वा नव्हती! आमच्या खिशांतली एक दमडीहि कोणाला मिळूं नये असा अगदीं पक्का बंदोबस्त आह्मीं करून टाकिला. असो. आतां काय ती दर आठवड्यास वर्तमानपत्र काढण्याची घोरपड आमच्या गळ्यांत राहिली. परंतु एक बेमालूम युक्ति योजून तिलाहि धुडकावून लाविलें. थोडेसे पैसे खर्च करून खालील जाहिरात आम्हीं एकदोन वर्तमान पत्रांत प्रसिद्ध केली:—

"आमच्या आश्रयदात्यांस विनंति !

आम्हाला मोठी उमेद होती कीं, आम्हीं योजिलेल्या उपयुक्त पत्राला निदान १५,००० तरी वर्गणीदार मिळतील. परंतु लिहिण्यास अतिशय खेद होतो कीं, या कामांत आमची अगदींच निराशा झाली. आजपर्यंत पुरे एक हजारसुद्धां वर्गणीदार जमले नाहींत. ज्या देशांत केवळ सार्वजानिक हिताकरितां सुरू केलेल्या कृत्याची अशी दशा उडते, त्या देशाच्या उर्जितावस्थेविषयीं आशा करणें व्यर्थ आहे. अशा स्थितींत अशा मोठ्या अवाढव्य खर्चाचें पत्र सुरू करणें म्हणजे केवळ मूर्खपण होईल. तरी याबद्दल आमच्या आश्रयदात्यांची आह्मी क्षमा मागतों.

जमलेल्या पैशांतून आजपर्यंत झालेला खर्च वजा करून, आह्मी जाहीर केल्याप्रमाणें नेमलेल्या दिवशीं, बाकीची रक्कम जमलेल्या

वर्गणीदारांतच बक्षिसांच्या रूपानें वांटली जाईल. आणखी वर्गणीदार जमतील या आशेवर मुदत मुळींच वाढवितां येत नाहीं. कारण, बक्षिसांची सोडत काढण्याची मुदत सरकार यापुढें वाढवूं इच्छित नाहीं. यामुळें आमचा अगदींच नाइलाज आहे.

पंडित गोविंदराव, गिरगांव, मुंबई."

दोन्ही अडचणींचा याप्रमाणें निकाल लावला. नेमलेल्या तारखेस जमलेल्या सर्व लोकांसमक्ष सोडत काढण्याचा फार्स करण्यांत आला, व बक्षिसें कोणकोणास मिळालीं त्यांचीं नांवें वाचून दाखविण्यांत आलीं. बाहेरगांवच्या वर्गणीदारांनां कळावा म्हणून हा निकाल जाहिरातीच्या रूपानें एकदोन वर्तमानपत्रांत प्रसिद्धहि केला. मात्र एवढेंच कीं, त्यांत बक्षीस मिळालेल्या इसमाचा फक्त नंबर, नांव आणि गांव यापेक्षां जास्त माहिती दिली नव्हती. उदाहरणार्थ त्यांपैकीं एक दोन नांवें येथें देतों:—

| नंबर | नांव | पत्ता | बक्षीस. |
|---|---|---|---|
| ३७२ | गोविंद हरि, | मुंबई. | १,००० |
| ५१९ | नारायण रघुनाथ, | बडोदें. | ५०० |
| इत्यादि. | इत्यादि. | इत्यादि. | इत्यादि. |

वाचकांनां सांगण्याची जरूर नाहींच कीं, हीं सर्व नांवें आमच्या स्वकपोलकल्पित नांवांच्या यादींतून घेतलेलीं होतीं. त्यांपैकीं एकहि मनुष्य अस्तित्वांत नव्हता. अर्थात्, आमच्याजवळील दहा हजारांपैकीं एक छदामहि कोणास मिळाला नाहीं. याप्रमाणें सर्व लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकून त्यांच्या पैशानें आम्हीं आपला तळीराम गार केला. ज्या ज्या बिचाऱ्या भोळ्या लोकांनीं आमचेकडे बक्षिसांच्या आशेनें पैसे पाठविले होते त्या सर्वांनां आम्हीं याप्रमाणें आमच्या अगाध कल्पनाचातुर्यानें फसविलें. भोळे बिचारे ! त्यांनां काय माहीत, कीं, या जगांत आमच्यासारखे कैक पराक्रमी कपटपटु नराधम, दुसऱ्याला ठकवून, आपलें पोट जाळण्यास सदोदित बकध्यान लावून बसलेले असतात तें!

# फुलजानि बेगम.

अहमदाबादेजवळ अझूनहि एक उद्यानभूमि दृष्टीस पडते. अवरंगझेब बादशहा शिवाजीचें दमन करण्याच्या हेतूनें दिल्लीस जास्त वेळ न राहतां अहमदाबादेस रहात असे, हें वाचकांस माहीत असेलच. ज्या उद्यानाविषयीं वर उल्लेख केला आहे, तेथें बादशहाची एक बेगम वास करित असे. या उद्यानामध्यें एक मोडकें कारंजें अझूनहि दिसतें. या कारंजाखालीं लक्ष्य लावून पाहिल्यास, पर्शियन भाषेंत एक श्लोक आहे असें आढळून येईल. श्लोकाचा भावार्थ पुढील आशयाचा आहे:—

**हृत्प्रेम ठावें जरि होय मातें**
**ना आणितों पुष्प कधीं इथें तें !**

हा श्लोकार्ध पाहून मन स्वभावतःच कुतुहलाक्रांत होतें.

जें उद्यान आज व्याघ्रादिकांचें निवासस्थल झालें आहे, तें दोनशें वर्षांपूर्वीं, इंद्राच्या नंदनवनाप्रमाणें मनोहर होतें; जो कारंजा आज मोडून पडून रोदन करित आहे, तो एका वेळीं गुलाबपाण्याचा वर्षाव करित होता; जो वाडा आज मोडका पडलेला दिसतो, तो एका काळीं विलासभूमीचें माहेरघर बनून राहिला होता; ज्या ठिकाणीं आतां दिवसाढवळ्या शृगालांचा रव ऐकूं येत आहे, त्या ठिकाणीं एका वेळीं अप्सरांसाहि लज्जान्वित करणारा रमणीगण संगीतानें मनें उल्हासित व उन्मत्त करित होता!

दोनशें वर्षां पूर्वींची गोष्ट. एके दिवशीं संध्याकाळच्या सुमारास उद्यानाच्या उजव्या बाजूस एक तरुण पुरुष एका मनोहर निकुंजामध्यें एकाग्रतेनें विचार करित बसला होता. त्याचें वय चोवीस वर्षांपेक्षां किंचित् जास्त होतें. शरीर सुदृढ, पोषाख मऱ्हाठेशाही व कमरेस एक सुरी खोंचलेली होती. अवरंगझेबाच्या बेगमेच्या महालांत प्रवेश करण्याचें साहस त्यानें काय ह्मणून केलें असावें ?

तो तरुण विचार करित बसला आहे तों अलंकारांचा मधुर निनाद तेथें ऐकूं आला, व एक सोळा वर्षांची बालिका येऊन उभी राहिली. तरुण एकदम उठून तिच्या समोर गेला; पण ती युवती मागें सरून त्याला ह्मणाली "मी आतां अस्पृश्य आहें, मला स्पर्श करूं नका!"

येसाजीनें तें कांहीं न ऐकतां त्या बालिकेच्या मोहक गुलाबी गालाचें शतशः चुंबन घेतलें. दोघांच्या नेत्रांमधून अविरत अश्रुधारा वाहूं लागल्या. येसाजी ह्मणाला "कमळे! शरीर अपवित्र झालें तरी हृदय अपवित्र झालें नाहीं. तुझें हृदय माझें आहे. आज तुझ्याच सांगण्यावरून, त्या शरीरापासून तें पवित्र हृदय विच्छिन्न करण्यासाठीं मी आलों आहें!"

येसाजीच्या छातीवर मस्तक ठेवून कमळा रडत होती व येसाजीहि रडत होता. याप्रमाणें किती वेळ त्यांचें रोदन चाललें होतें हें दोघांसहि कळलें नाहीं. स्त्रीचें हृदय कोमल ह्मणतात, परंतु त्या कोमल हृदयासारखें कष्टसहिष्णु हृदय आणखी दुसरें कोणतेंहि नसेल! तरुणी येसाजीस ह्मणाली "हा अपवित्र देह ठेवणार नाहीं, असा मीं निश्चय केला आहे! जर हें हृदय माझं असतं तर याला यापूर्वीच मीं या शरीरापासून वेगळं केलं असतं. परंतु आपण लहान होतां, तेव्हांपासूनच हें हृदय आपलं झालं आहे. परंतु त्या महापातक्यानं हें शरीर कलंकित केलं आहे. हें शरीर आतां ठेवणार नाहीं. तुह्मांला इथें बोलावून मीं संकटांत आणलं आहे. तर आतां विलंब नको!"

येसाजी कमरेंतून सुरी काढून ह्मणाला "दया, माया सर्व सोडून मी येथें आलों आहें. परंतु–"

कमळा विलक्षण–हृदयविदारक हास्य करून ह्मणाली "छे छे! तुह्मी तर मला नरकांतून स्वर्गाला चढविण्यासाठीं आलां आहां!"

येसाजी तिचें पुनः चुंबन घेऊन विकटस्वरानें ह्मणाला "चल तर, मग वेळ कशाला?"

त्या युवतीनें आपलें वक्षःस्थळ पुढें केलें व येसाजीनें हात वर केला. क्षणांत त्या फुलापेक्षांहि कोमल फुलाच्या–कमळेच्या हृदयांत ती सुरी खुपसली असती, पण तसें झालें नाहीं!

ज्या ताटव्यामध्यें हा प्रकार चालला होता, त्याच्या आड राहून एक महा बलवान् कृष्णकाय खोजा, हा सर्व प्रकार पाहत होता. तरुण सुरी वर करित आहे असें पाहतांच मागून धावत येऊन त्यानें त्याचा हात धरला. दोघांसाहि भीति व आश्चर्य वाटलें. पण एकदम कमळेच्या मुद्रेंत फरक पडला. सिंहिनीप्रमाणें ती खोजाकडे वळून ह्मणाली ! " मसरूर! मी कोण तें जाणतोस काय ? "

खोजा बिंदुमात्र विचलीत न होतां गंभीर स्वरानें म्हणाला " होय , आपण फुलजानि बेगम ! "

"मी आज्ञा करत्यें, या तरुणाचा एकदम हात सोड. हा माझा आप्त आहे. "

खोजा म्हणाला "बेगमसाहेबांची आज्ञा मान्य करून मीं याला सोडलें असतें; परंतु जो बेगमसाहेबांचा प्राणनाश करण्यास तयार झाला, त्याला बादशहाच्या हुकुमाशिवाय मला सोडतां येत नाहीं ! "

" तर कर पाहूं कसा त्याला कैदी !" असें म्हणून तिनें जमिनीवर जोरानें पाय आपटला. त्याबरोबर ज्या जमिनीवर येसाजी उभा होता ती दुभंग झाली! येसाजी खालीं गेला व पुन: ती जमीन पूर्ववत् झाली ! एवढें झाल्यावर फुलजानि बेगम गजगतीनें एक एक पाऊल टाकित तेथून आपल्या महालांत निघून गेली.

हा प्रकार पाहून मसरूर आश्चर्यानें तेथल्या तेथेंच थबकून राहिला ! कांहीं वेळानें भानावर आल्यावर तो आपल्याशींच म्हणाला "यांत कांहीं मोठेंसें नवल नाहीं ! पैगंबरासहि या स्त्रियांनीं फसविलें आहे, तेथें माझी काय कथा ! पण कसेंहि करून या काफरास पकडलेंच पाहिजे ! "

नंतर त्यानें दुसऱ्या दोन खोजांस हांक मारली. ते आल्यावर त्यांनां तो म्हणाला " या ठिकाणीं जमिनीखालून कोठें रस्ता आहे, आणि तो कोठें जातो, हें तुम्हांला माहित आहे काय ? "

एक वृद्ध खोजा म्हणाला " होय. बादशहाच्या शयनगृहापासून एक रस्ता आहे. "

मसरूर म्हणाला " तर त्वरा करा. येथून एक मराठा गेला आहे."

त्यानें असें सांगितल्याबरोबर ते धावतच निघून गेले, व मसरूरहि विचार करित करित चालता झाला.

या ठिकाणीं फुलजानि बेगम व येसाजी यांविषयीं थोडीशी माहिती देणें आवश्यक आहे. अहमदाबादेपासून तीस कोस अंतरावर देवीगांव म्हणून एक खेडें होतें. सध्या तें खेडें कोठें दिसत नाहीं. या खेड्यांत नारायणराव शिरके म्हणून एक मध्यम स्थितींतील मराठा राहत असे. येसाजी हा त्याचा एकुलता एक पुत्र. त्याच खेड्यांत एक विधवा राहत असे, तिला एक मुलगी होती, तिचें नांव कमळा. लहानपणापासून येसाजी व कमळा एकमेकांबरोबर खेळत असत. येसाजीच्या घरामागील घरांतच कमळेची आई राहत असे. जेव्हां कमळेस सोळावें वर्ष लागलें, तेव्हां नारायणरावानें येसाजी बरोबर तिचा विवाह केला. विवाहानंतर दोनतीन दिवसांनीं कमळेची आई आजारी पडून मरण पावली.

एवढ्यानेंच झालें नाहीं. तर खरें दुःख पुढें यावयाचें होतें. विवाहानंतर एक महिना झाल्यावर एके दिवशीं अवरंगझेब शिकारी-साठीं गेला होता. त्यानें देवीगांवांत कमळेस पाहिलें. तिला पाहिल्या-बरोबर बादशहा मोहित होऊन तिला आपल्या महालांत नेऊन ठेवण्याचा त्यानें हुकूम केला. त्याच दिवशीं कमळेला महालांत जावें लागलें. तिचें फुलजानि बेगम असें नांव ठेवलें. या वज्रपतनानें येसाजी व कमळा यांच्या मनाची झालेली स्थिति, येसाजीच्या मातापितरांचा शोक, देवीगांवच्या सर्व लोकांचें दुःख, यांचें आमच्यानें वर्णन करवत नाहीं!

फुलजानि बेगम एक महिनाभर सतीबाग नांवाच्या उद्यानांत राहिली. त्या ठिकाणीं तिचा एका दासीशीं चांगला स्नेह झाला. तिला सर्व 'जुमेल' नांवानें हांक मारित असत. जुमेलच्या मदतीनें बेगमेनें येसाजीला एक पत्र पाठविलें. तिनें लिहिलें " जर माझ्यावर आपलें बिंदुमात्र प्रेम असेल, तर आपण येथें या. आम्हीं एकदमच हें जग सोडून जाऊं. येतेवेळीं तीव्र शस्त्र आणावें."

येसाजी तेजस्वी मराठा. आपल्या पत्नीला पापपंकांत मग्न होऊं देण्यापेक्षां तिचे प्राण नष्ट करणेंच अधिक योग्य असा विचार करून त्यानें त्याप्रमाणें वागण्याचा निश्चय केला. पुढें जुमेळच्या बुद्धिकौशल्यानें तो महालांत आल्यावर पुढें काय काय प्रकार घडला तो वाचकांस ठाऊकच आहे.

एकदम भूमीखालीं अंधकारमय गव्हरांत आपण पडलों, हें पाहून तो किंकर्तव्यतामूढ होऊन राहिला; परंतु त्याला अधिक वेळ विचारांत पडावें लागलें नाहीं. एका कोमलहस्तानें त्याच्या पाठीस स्पर्श केला. त्याबरोबर दचकून तो मागें फिरला, पण गाढ अंधकारामुळें त्याला कोणीच दिसेना. त्यानें विचारलें " कोण ? "

एका स्त्रीनें उत्तर दिलें " तरुण पुरुषा ! येथून लवकर पलायन कर. शत्रु जवळ आला आहे. दुसरी गोष्ट विचारूं नको. जर वांचलास तर फुलजानीस पाहशील. चल, पळ! भुयाराच्या मुखाजवळ घोडा तयार आहे."

नंतर त्या स्त्रीनें त्याला वाटेस लाविलें. भुयाराच्या मुखाजवळ येण्यास येसाजीस बराच वेळ लागला; परंतु बाहेर आल्याबरोबर पाहतो, तों तेथें खरोखरच एक घोडा बांधलेला होता. त्यावर बसून येसाजी भरधांव निघाला.

कांहीं वेळानें त्यानें मागें वळून पाहिलें, तों दोन स्वार आपला पाठलाग करित आहेत असें त्याला आढळून आलें. त्यानें घोडा आणखीहि भरधांव सोडला, पण इतक्यांत दोन तीर मोठ्या जोरानें येऊन त्याच्या उजव्या हातामध्यें घुसले. ती दुःसह वेदना तशीच सहन करून येसाजी पुनः पुनः घोड्याला टांच मारूं लागला. परंतु शत्रु पाठीवर येत चालला असें पाहिल्याबरोबर तो घोड्यावरून खालीं उतरला व घोडा तसाच सोडून देऊन आपण एका झाडाआड झाला. इतक्यांत स्वार तेथें येऊन पोंचले. परंतु घोड्यावरच तो तरुण पुरुष असेल, असें समजून ते तसेच पुढें गेले.

जेव्हां चोहोंकडे शांत झालें, तेव्हां येसाजी बाहेर आला. आपण कोठें आलों आहों, रात्र किती झाली आहे, हें पाहण्यास त्याला एवढा वेळ फुरसतच नव्हती. अहमदाबादजवळच आपण आलों असून, नऊ वाजण्याचा सुमार झाला असावा, असें त्याला आतां आढळून आलें. त्यानें

नंतर आपल्या बाहूंतून ते दोन तीर काढले. तीरांबरोबर तीराच्या वेगानें रक्त बाहेर आलें. डोकीचा मंदील फाडून त्यानें आपला बाहु बांधला व तो पुढें जाऊं लागला. रक्तपातामुळें तो यावेळीं अगदीं थकून गेला होता, व पुढें तर एकदम घेरी येऊं लागल्यामुळें एका घराच्या पायऱ्यांवर पडून मूर्च्छित झाला.

येसाजी जेव्हां जागा झाला तेव्हां आपण स्वप्नांत आहों असें त्याला वाटूं लागलें. कारण, आपण, एका मोठ्या मंदिरांत पडलों असून आपले हातपाय बांधलेले आहेत; शेंकडो सुवर्णदीप सुगंधी तेलानें प्रकाशत आहेत; समोर सिंहासनावर पुष्पहार लंबायमान झाले आहेत, सिंहासनावर दिल्लीपति अवरंगझेब व त्याच्यामागें फुलजानि दिसत आहे. येसाजीनें बंधनमुक्त होण्याचा प्रयत्न केला, पण तो निष्फल झाला. इतक्यांत त्याला घेरी येऊन तो पुनः मूर्च्छित झाला.

पुनः जेव्हां तो सावध झाला, तेव्हां त्याला असें वाटलें कीं, आपणास बादशहाजवळ आणलें आहे, व जवळ चार खोजे नागव्या तरवारी घेऊन उभे आहेत. या वेळीं आपली चौकशी चालली असावी असें त्याला वाटलें. त्या तरुण पुरुषाची रूपसंपन्न मूर्ति पाहून अवरंगझेबाचेंहि हृदय द्रवलें होतें; नाहींतर यापूर्वींच तो मरण पावला असता. अवरंगझेब म्हणाला " तरुणा ! तुझें साहस विलक्षण आहे, यांत संशय नाहीं. ज्या महालांत पक्ष्याचाहि प्रवेश होणें कठीण, त्या ठिकाणीं तूं आलास तरी कसा ? तूं कोणाजवळ आला होतास तें सांगशील, तर तुला क्षमा केली जाईल! "

येसाजीनें उत्तर दिलें " आपण खुशाल माझें मस्तक उडवा, मी ती गोष्ट सांगणार नाहीं. "

अवरंगझेबाची मुद्रा अकस्मात् रक्तवर्ण झाली. तो खोजांस म्हणाला " या काफरास एकदम मारून टाका !"

नंतर त्यानें आसपास नजर फिरवून म्हटलें "या महालांत राहणारीं मनुष्यें या ठिकाणीं आहेत. कोणत्या दासीजवळ हा आला होता ? "

कोणींच उत्तर दिलें नाहीं.

अवरंगझेब अत्यंत क्रोधायमान होऊन म्हणाला " मारा काफराला लौकर, म्हणजे यावर प्रेम करणारी कोण असेल तिची तृप्ति होईल ! "

चार तरवारी एकदम वर झाल्या ! तत्क्षणीं आकाशपाताळ दणाणून सोडणारी अशी एक किंकाळी ऐकूं आली. बादशहा सिंहासनावरून खालीं उतरला. त्याच्या दृष्टीस विलक्षण हृदयविदारक देखावा पडला. फुलजानि बेगम येसाजीच्या अंगावर आपली छाती वर करून पडली. दोन तरवारी तिच्या छातींत गेल्या, व दोन येसाजीस लागल्या. बादशहाची फुलजानीवर अत्यंत प्रीति होती. तो एकदम ओरडला "अफसोस! अफसोस ! फुलजानि ! हें काय केलेंस ? "

फुलजानि म्हणाली " क्षमा करा, मीं स्त्रीचं खरं कर्तव्य केलं ! "

हे शब्द येसाजीच्या कानांत पडले व तो किंचित् हंसला. नंतर उभयतांनीं डोळे मिटले !

बादशहाचें पाषाणहृदयाहि या वेळीं द्रवून गेलें. त्यानें तेथेंच आज्ञा केली कीं "आजपासून सात दिवस अहमदाबादच्या लोकांनीं शोकचिन्हें धारण करावीं ! या वाड्याच्या समोर या दोघांस एकाच ठिकाणीं कबर द्यावी. या कबरेवर एक सुंदर कारंजा करून त्यांतून गुलाबपाण्याचा नेहमीं वर्षाव होत राहूं दे. आणि या कबरेखालीं सुवर्णाक्षरांनीं या विलक्षण घटनेच्या स्मरणार्थ एक श्लोक लिहा. "

दिल्लीश्वराच्या आज्ञेनें एक दिवसांत एक शहर वसलें आहे, तेथें एवढी गोष्ट होण्यास कितीसा वेळ लागणार ! आज्ञेप्रमाणें सर्व व्यवस्था झाल्यावर बादशहानें आपल्या हातानें कबरेवर एक गुलाब वृक्ष लावला. शेंकडो बेगमांनीं तिच्यावर पुष्पहार घातले. नंतर बादशानें विचारलें "कबरेवरील श्लोक रचणार कोण ? "

सर्वांनीं उत्तर दिलें " फुलजानीची दासी जुमेली ! "

बादशहानें जुमेलीस श्लोक वाचण्याची आज्ञा केली. जुमेलीनें तो पुढीलप्रमाणें वाचला:—

**हृत्प्रेम ठावें जरि होय मातें,**
**ना आणिता पुष्प कधीं इथं तें !**

# आवडती ताईत.

तारा! अहाहा! तुझें नांव किती मधुर! माझ्या तरुणपणीं तुझें हें नांव ऐकून मी किती आनंदमुग्ध होत असें! पण ते दिवस आतां पुन्हा केव्हां तरी येण्याची आशा आहे ? हाय ! मुळींच नाहीं ! !

तारेस जेव्हां मीं पहिल्यानें पाहिलें, त्या वेळीं तिचें वय नुसतें आठ वर्षांचें होतें. माझे वडील मिरजेस नोकरीवर होते; तेथें तारेचे वडील बदली होऊन आले. येतेवेळीं त्यांनीं आपलीं सर्व मनुष्यें बरोबर आणलीं होतीं.

परक्या ठिकाणीं मैत्री होण्यास वेळ लागत नाहीं. परिचित जनांचीं मुखें मुळींच दृष्टीस पडत नसल्यामुळें मनांत एक प्रकारची व्यग्रता उत्पन्न होते, व परिचयोत्सुक मनें सहजच स्नेहसूत्रांनीं बांधून जातात. प्रथम भाषणापासून आरंभ होऊन या उत्सुकतेचें पर्यवसान शेवटीं आप्तपणांत होतें. तारेच्या मनुष्यांचें व आमचें असेंच झालें!

तारेचें घर जरी बरेंच लांब होतें, तरी आह्मी रोज एकत्र खेळत होतों. मी प्रत्यहीं तारेच्या घरीं खेळण्यासाठीं जात असें; तारा माझी वाट पहात बसत असे व तिनें मला लांबून पाहिलें कीं तिचा तो कोमल मुखचंद्रमा उज्वलतर होत असे.

याप्रमाणें आह्मीं चार वर्षें मौज मारली. तारेशिवाय मला दुसरा सुखविषय राहिला नाहीं. त्यावेळीं मी सतरा वर्षांचा होतों. अशा वेळीं अकस्मात् एके दिवशीं मला माझ्या अंतःकरणांतील गोष्ट कळून आली!

बाबांची साताऱ्यास बदली झाली. आह्मीं मिरज सोडली. हेंच माझें पहिलें दुःख, अथवा दुःखाचा प्रारंभ. त्या वेळची माझी स्थिति मला सांगतां येत नाहीं. तारेचे ते अश्रुपूर्ण, आकर्णविश्रांत आणि विरहकातर नेत्र, मला अझूनहि दिसत आहेत!

साताऱ्यास गेलों, आणि सर्वच शून्य दिसूं लागलें! खेळ यासवर-ण्यास माझ्याबरोबरचे मुलगे तेथें नव्हते, असें नाहीं—पुष्कळ होते;

परंतु मी कोणाबरोबर खेळत नसें. मला कशांतच गोडी वाटत नसे. साताऱ्यास एक गोष्ट मात्र मला समाधानाची, आणि ती तारेचें पत्र! मिरजेस असतांना मी एक हुशार विद्यार्थी होतों. साताऱ्यास आल्यापासून मला काय झालें कोणास ठाऊक, तेथें मी शाळेच्या परीक्षेत पसार झालों नाहीं. बाबांनां फार वाईट वाटलें, व त्यांनीं मला लगेच मुंबईस अभ्यासाकरितां ठेविलें.

घरीं रहावें, शाळेंत जावें, आणि विस्मयान्वित होऊन त्या नादपूर्ण मुंबईच्या रस्त्यांवरून लोकांकडे पाहत असावें. याप्रमाणें एक वर्ष गेलें. उन्हाळ्याच्या सुटींत मी साताऱ्यास जाण्यास निघालों. दुपारीं चार वाजतां घरीं येऊन पोंचलों. बाहेर कोणी नव्हतें. बाहेरून मी "आई," ह्मणून हांक मारली.

इतक्यांत आंतून कोणीं अत्यंत मंजुळ स्वरानें व आनंदभरानें ह्मटलें "कोण? विनु दादा!"

मी चकित होऊन पाहतां, तों माझ्यापुढें तारा येऊन उभी! मंत्र मारल्याप्रमाणें तटस्थ होऊन मी तिच्याकडे पाहतच राहिलों.

तारेचें असें सुंदर रूप, यापूर्वीं मीं कधींहि पाहिलें नव्हतें! किती तें अप्रतिम, अलौकिक सौंदर्य! वर्षाकालारंभींचा नदीचा भर, वसंतारंभींच्या हरित वल्लींची शोभा, तारेच्या कमनीय देहावर पूर्णपणें तरंगित होत होती. मी स्वप्नमग्न होऊन तिच्याकडे पाहूंच लागलों!

इतक्यांत मला आईनें हांक मारल्याबरोबर थोडासा खटावल्यासारखा होऊन आंत जाऊन मीं तिला नमस्कार केला. पुढें तारेचा बाप गांवीं गेला व जातेवेळीं त्यानें तारेस व तिच्या आईस आमच्या येथें ठेविलें होतें हें मला समजलें; पण येतेवेळीं तो त्यांनां घेऊन जाणार, हें ऐकल्यावर मात्र मला वाईट वाटल्याशिवाय राहिलें नाहीं.

तारेच्या विवाहाची गोष्ट चालली होती. तिचा बाप तिला कुलीन वर सांपडत नाहीं ह्मणून विवंचनेंत होता. पण तारेच्या आईला एक वेळ असें बोलतांना मीं ऐकलें "नुसत्या कुलीनास घेऊन काय चाटायचें आहे?

माझ्या तारेला सोन्यानें मढवून काढणारा भेटल्याशिवाय मी कांहीं तिचें लग्न करणार नाहीं !"

मला मोठी चिंता उत्पन्न झाली. तारा माझी होणार नाहीं काय ? लज्जेमुळें मला बोलतां आलें नाहीं खरें, पण मला आशासुद्धां मुळींच सोडतां आली नाहीं.

तारेचा बाप साताऱ्यास आला व आपल्या मनुष्यांस घेऊन मिरजेस गेला. माझें मन त्यावेळीं अंधकारमय होऊन गेलें. जातेवेळीं शिवरामपंतांनीं मला ह्मटलें होतें " विनू, तूं मुंबईस गेलास ह्मणजे आमच्यासाठीं एक चांगलीशी जागा पाहून ठेव. मी वर्षाची रजा घेऊन तेथें येऊन राहणार आहें. " तथास्तु !

मुंबईस आल्याबरोबर मोठ्या उत्साहानें घर शोधूं लागलों. एक घर पसंत केलें. पुढें लवकरच शिवरामपंत सहपरिवार बोरीबंदरावर आले. मी त्यांनां स्टेशनावरून घेऊन आलों.

शिवरामपंतांनीं माझ्या वडिलांस लिहिलें— " आह्मी मुंबईस राहूं तेवढे दिवस विनूस आमच्या येथें राहण्याविषयीं लिहावें. " त्याप्रमाणें बाबांनीं मला लिहिलें. प्रथम मीं थोडेंसें कांकूं करून पाहिलें, पण शिवरामपंतांचा आग्रहच पडल्यामुळें माझा निश्चय बराच बदलला. पण तारेनें जेव्हां हंसत व थोडासा राग दाखवित " विनू दादा ! आतां आह्मी बरींच परकीं झालों नाहीं का ?" असें मला ह्मटलें, तेव्हां मी लगेच शिवरामपंतांस येतों ह्मणून बोललों, व दुसऱ्याच दिवशीं त्यांच्यायेथें येऊन राहिलों.

त्या वर्षीं मी परीक्षेंत पास झालों आणि माझा नंबरहि पहिला आला. शिवरामपंतांसहि अत्यंत आनंद झाला व ते मला क्षणोक्षणीं उत्तेजन देऊं लागले.

कांहीं दिवसांनीं बाबा रजा घेऊन मुंबईस आले. बरोबर आईहि आली होती. तारेच्या लग्नाविषयीं ज्यांनीं खटपट चालविली होती, त्यांनीं आईस माझें लग्न करण्यास सांगितलें. पण बाबांचा एक जबाब—

"त्याचें शिकणें पुरें झाल्याशिवाय त्याचें लग्न करावयाचें नाहीं!" आई मात्र त्या गोष्टीस फार उत्सुक होती. मीहि आशेमुळें थोडासा चंचल झालों. तारे! ती आशा आतां आहे का?

बाबांचा साताऱ्यास जाण्याचा दिवस ठरला. जाण्याच्या आधल्या दिवशीं आई मला ह्मणाली "विनू! तुझा कसा काय विचार आहे? तुला आपलं लग्न करून घ्यायचं आहे का?"

मी एकदम ह्मणून चुकलों "तारेबरोबर माझें लग्न झालें तर करीन."

हें ऐकून आईचा चेहरा किंचित् गंभीर झाला. कां?

रात्र. निजायाला जात होतों, इतक्यांत बाबा मला हांक मारून ह्मणाले "विनू! माझ्याबरोबर साताऱ्यास चल. सर्व व्यवस्था करून मग निजायला जा. आपल्याला पहांटेस निघायचें."

मी कांहीं बोललों नाहीं. मुंबईस राहण्याचेंहि कारण नव्हतें. एका ट्रंकमध्यें माझीं पुस्तकें व कपडे घालून मी निजायाला गेलों.

पहांटेस आमची जाण्याची तयारी झाली. सर्वांच्या भेटी झाल्या. तारेच्या आईस मीं नमस्कार केल्यावर तिनें मला चांगला आशीर्वाद दिला. मीं मनांत ह्मटलें, माझें सर्व सुख तुमच्या हातांत आहे!

मी बाहेर येतांना मध्येंच तारा आली व मला ह्मणाली "विनू दादा! एक गोष्ट ऐकून घे."

"काय तारे?"

आह्मी अंकोचानें गोष्टी बोलत होतों. तारेनें हंसत हंसत विचारलें "विनू! लग्न करायला जातोस का?"

मीं विचारलें "काण ह्मणतो?"

"तुला नाहीं का ठाऊक? काल रात्रीं आई आणि—बोलत होतीं."

माझी वृत्ति चमत्कारिक झाली. कसें साहस झालें कोणाला ठाऊक, आंवरतां येईनाच अशी इच्छा उत्पन्न होऊन मीं एकदम ह्मटलें "तारे! लग्न केलें तर तुझ्याबरोबर! नाहीं तर या जन्मांत कांहीं नाहीं!"

तारा कांहीं बोलली नाहीं. ती कांहींशी विचार करित माझ्याकडे पाहत राहिली. कांहीं वेळानें ह्मणाली "विनू! ती तुझ्या हातांतील ताईत मला देशील का ? "

ताईत ती काय किंमतीची, अन् तारेला मी देणार नाहीं अशी जगांत वस्तु तरी आहे? मीं लगेच दोरा तोडून ताईत तारेजवळ दिली. नंतर विचारलें " तिचें काय करणार आतां ? "

तारा हंसत हंसत ह्मणाली "मी जितके दिवस जगेन, तितके दिवस ही माझ्याजवळ ठेवीन. "

मी " कां ? " ह्मणून ह्मणणार होतों, इतक्यांत मला बाबांनीं हांक मारली. त्या बरोबर तसाच तेथून गेलों. कांहीं वेळानें आह्मीं गाडींत बसून निघालों.

वाटेमध्यें मीं अस्थिर मनानें वेळ घालविला. तारेनें तें स्मरणचिन्ह कां बरें घेऊन ठेवलें आहे ?—तारा मला लाभणार नाहीं ?—माझ्या लग्ना-विषयीं कोण बोलत होतें ? लग्नाची गोष्ट मनांत आल्याबरोबर मीं प्रतिज्ञा केली कीं, तारेशिवाय कोणाबरोबर विवाह करणार नाहीं ! पण बाबांनीं आग्रह केला तर ?—तरीहि नाहीं ! कधींहि नाहीं ! !

साताऱ्यास जाऊन पोहोंचलों! पण तेथें माझ्या मनाची स्थिति काय झाली होती, एका देवासच ठाऊक !

चोहोंकडे श्यामल भूभाग, निर्मल आकाश , वृक्षराजी फलांनीं आनत, चोहोंकडे सौंदर्य, पण शांति कोठें आहे !

साताऱ्यास एक आठवडा काढला. एके दिवशीं मी विचार करित बसलों असतां बाबांनीं हांक मारली. मी तसाच उठून गेलों तों त्यांनीं कांहीं एक न बोलतां त्यांनां टपाळांतून नुकतेंच आलेलें एक पत्र माझ्या हातीं दिलें. पाहतों तों शिवरामपंतांचें अक्षर! त्यांनीं तें बाबांस लिहिलें असतां मला तें वाचण्याचा काय बरें अधिकार ? असा विचार करून मीं त्यांच्या तोंडाकडे पाहिलें. तों बाबा ह्मणाले "वाचून पहा."

मी पत्र वाचूं लागलों. तें असें:—

" कृ० सा० न० वि० वि०

तुह्मीं तारेबरोबर विनूचा विवाह व्हावा अशी पुनः इच्छा प्रदर्शित केली आहे. मुंबईस असतांना जेव्हां तुह्मीं हा प्रश्न काढला होता, तेव्हां माझ्याकडून कोणतीच हरकत नव्हती. विनूसारखा जांवई मिळणें सुदैवाचीच गोष्ट आहे. पण आमचें कुटुंब या गोष्टीला मुळींच कबूल नाहीं, त्याला काय करावें ?

सध्या एका अडचणींत सांपडलों आहों. कै० श्रीमंत आपसाहेब पटवर्धन यांचे कनिष्ठ चिरंजीव बाळासाहेब हे अभ्यासाकरितां मुंबईस राहत असतात. आमच्या घरांतील मनुष्यें व बुरावांच्या इथें गेलीं असतां, तेथें बाळासाहेबांनीं चिरंजीवीस पाहिलें. त्याच दिवशीं त्यांचे दिवाणजी आमच्या येथें आले व त्यांनीं लग्नाची गोष्ट काढली. घरांतील मनुष्यांचा चिरंजीवास श्रीमंतांच्या येथें देण्याचा निश्चय झाला आहे. तरी आपणहि आपली सल्लामसलत द्याल अशी आशा आहे. इकडील सर्व मंडळी खुशाल आहे.

कळावें, लोभ असावा, ही विनंति. आपला,

शिवरामपंत साधले. "

पत्र वाचून झाल्यावर मीं तें बाबांकडे पुनः दिलें. त्यांनीं ह्मटलें " आतां तुझें काय ह्मणणें आहे ? "

मी काय बोलणार ? बाबा पुनः बोलूं लागले " प्रयत्नांत कांहीं कसूर केली नाहीं. तथापि तारेबरोबर तुझा विवाह होणें अशक्य आहे, हें तुला आतां समजलें असेलच. शिवरामपंतांनीं कांहीं जरी लिहिलें, तरी ते आपली कन्या श्रीमंतांचें घर सोडून आमच्या येथें देतील अशी कल्पनाच करावयास नको! तुझी आई तर ह्मणत आहे कीं, तारेशिवाय तूं कोणाबरोबर लग्न करणार नाहींस! तारेशिवाय दुसरी कोणी चांगली मुलगी जगांत नाहींच काय ? "

मी अधोवदन होऊन स्तब्ध राहिलों. माझा अपमान झाला असें मला वाटूं लागलें. जगांत पैसाच अधिक आहे काय? असा मी मलाच प्रश्न करूं लागलों. बाबा माझ्याकडे पाहून ह्मणाले " काय ह्मणतोस, बोल ? "

निराशेंतहि एक प्रकारचा आनंद असतो. तो आनंद अभिमान हा होय! मी ह्मणालों "ज्या अर्थीं जगांत पैसाच श्रेष्ठ आहे, त्या अर्थीं पैसा मिळविल्याशिवाय मी लग्न करणार नाहीं !"

"ठीक आहे." बाबा ह्मणाले.

बाळासाहेबांबरोबर तारेचा विवाह झाला असें मला थोड्याच दिवसांनीं कळलें. तेव्हां मी विचार करूं लागलों कीं, तारा आतां सुखी असेल काय? अलबत असली पाहिजे! तसें नसतें, तर तिनें एक अक्षर बोलण्याचीच कायती फुरसत होती, कीं लगेच शिवरामपंतांनीं साफ ना ह्मटलें असतें.

दुपारीं जेवायास बसलों होतों. आई समोर बसली होती. ती ह्मणाली "तूं आतां आपलं लग्न करून घे. मी आतां तरी सुनमुख पाहीन."

बाबाच्या समोर डोळ्यांतून पाणी आलें नव्हतें; पण तें आईपासून चोरून ठेवतां आलें नाहीं. ज्या प्रेमांत तन्मयता असते, तेथें छपवाछपवी कधीं चालत नाहीं. मी हुंदका आंवरून ह्मणालों "पैसा मिळविल्याशिवाय लग्न करणार नाहीं, अशी मीं प्रतिज्ञा केली आहे."

मी पुढें इंजिनीअरिंग कॉलेजांत शिकावयास गेलों.

× × × × ×

बरेच दिवस, सुमारें दहा वर्षें, कॉलेज सोडून सरकारी नोकरी करित आहें. पैसा रग्गड मिळविला, पण मनास समाधान नाहीं.

दुःखावर दुःख! ज्या अमृतनिर्झराच्या प्रवाहावर मी इतके दिवस वांचलों होतों, तो सुकून कोरडा पडला. स्नेहाची प्रतिमा माझी माता, हाय! सोडून गेली. बाबा मधून मधून लग्न करण्याविषयीं मला लिहून पाठवीत—प—ण आतां काय? मी लिहित असें "अझून पैसा मिळविला नाहीं. !"

घनघोर पर्जन्य. आकाश मेघमालांनीं खचून गेलेलें. वारा सुगंधशाली. तरुलता उज्वल आणि हिरव्या गार! मी ऑफिसांत विचार करित बसलेला होतों. इतक्यांत नेहमींप्रमाणें पुण्याचा 'केसरी' माझ्या

मेजावर येऊन पडला. तो घेऊन त्यावर दृष्टि फिरवूं लागलों. आर्टिकल, स्फुटलेख, बातमीपत्रें, वर्तमानसार कांहीं सुचना. जाहिरातीच्या बाजूस दृष्टि गेली. तों पुढील जाहिरात दृष्टीस पडली :—

"१००० रुपये बक्षीस !!!

बडोद्याचे प्रसिद्ध सरदार श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन, यांच्या सहधर्मिणी पुण्याहून बडोद्यास जात असतां, वाटेंत त्यांच्याकडून एक चांदीची लहानशी ताईत हरवली आहे. जो कोणी ही ताईत आमच्याकडे आणून देईल, त्याला एक हजार रुपये देण्यांत येतील. ताईतीची किंमत चारपांच रुपयांहून जास्त नाहीं. ज्या कोणाला ती मिळाली असेल त्यानें ती आणून दिल्यास वर लिहिलेली रकम बक्षीस मिळेल. ताईतीवर वि. स. दे. अशीं अक्षरें आहेत.

हरिपंत मराठे,

श्रीमंत पटवर्धन यांचे कारभारी, वडोदें."

माझें नांव विनायक सखाराम देशमूख. माझ्या ताईतीवर माझ्या नांवाचीं पहिलीं अक्षरें होतीं याची मला पक्की खात्री ! कां कोणास ठाऊक, एकदम डोळ्यांत पाणी आलें व तें त्या पत्रावर टपकन् पडलें !

त्या वेळीं सब्-ओव्हर्सीयर तेथें आला त्यानें तर हा प्रकार पाहिला नसेल ना !!

# कोणी एवढी मेहरबानी करील?

असे पाजी आहेत हे दुष्ट! चांडाळांना दुसऱ्यांची निंदा केल्यावांचून एक दिवस ह्मणून चैन पडायाचें नाहीं! या दुष्ट नराधमांकडून सेवकाला थोडाथोडका नाहीं हो त्रास पोंचला! देवदयेनें आपल्या सेवकाला मध्यान्हींची भ्रांत मुळींच नसून तो दोन पैशांनीं सुखी आहे. तरीहि त्याला नाहीं कसलें पानतंबाखूचें व्यसन, कीं विड्या सिगारेटस्चा शोक! नाहीं श्रीमंतीची घमेंड कीं रिकामी शेखी! आपण भला कीं आपलीं पुस्तकें भलीं!

कां कुणास ठाऊक, स्त्रियांसंबंधींच्या कसल्याहि गोष्टी निघाल्या, कीं, अस्मादिकांच्या पडल्या कपाळाला आंठ्या! मुळापासूनच मला त्या गोष्टीची मोठी चीड असे. पुढें मी जेव्हां वयांत आलों व माझा अभ्यासक्रम पुरा झाला, त्यावेळीं कोणीं लग्नाची वगैरे गोष्ट काढली, कीं, त्याला सबंधचे सबंध तोंडांत टाकावा, असें माझें वर्तन असे.

पण, अविवाहितपणाचें दुःख ज्याला त्याचा अनुभव असेल त्यालाच समजेल! अरेरे! काय ती फजिती आणि काय ते हाल! कोणी अमुकच संशय घेईल तर कोणी तमुकच घेईल! "असाच बघतो, तसाच चालतो!" काय ह्मणतील अन् काय नाहीं, सांगवत नाहीं! कोणा एखाद्या स्नेह्याच्या घरीं वारंवार जात येत असावें, ह्मणजे झाली या हरामखोरांची टकळी सुरू! एक ह्मणेल "ऐकलें सदुभाऊ! हल्लीं हल्लीं त्या आपल्या विनायकरावाचें अन् यशवंतरावाचें एवढें काय सख्य जडलें आहे कुणास ठाऊक! जबरे दोस्त बुवा!" तर दुसरा ह्मणेल "पण तुला त्यांतली मख्खी कळली आहे कुठें! यशवंतरावाची बहीण आहे लग्नाची चौदापंधरा वर्षांची! समजलें? तेवढ्याकरितां तर स्वारी एकसारखी घिरटया घालित असते." यावर त्या अकलेच्या खंदकानें ह्मणावें "असें असें? आपल्याला काय बोवा हें ठाऊक! आह्मीं गेलों आपले भावार्थानें. असा का प्रकार आहे? रव —"

रस्त्यांतून जात येत असतांना खिडकीशीं उभी असलेल्या कोणा उपवर तरुणीकडे सहज नजर गेली पुरे, हे कावळे लागले एकदम काव काव करायला! " हं विनायकरावाचा डोळा येथें आहे रे आहे!" बरें खालीं मान घालून चालावें, म्हणजे तरी का सुटका आहे? म्हणतील " बापड्याला फार हळहळ वाटते! गरीब रे बापडा गरीब!"

नाटकाला जावें तर तेथेंहि हीच रड. जरासुद्धां इकडे कीं तिकडे मान फिरवितां नये. बंदिवानासारखें हालचाल केल्यावांचून पाहिजे तर बसावें. कोणा आप्तइष्टाच्या घरीं लग्नास वगैरे गेलों तर त्या ठिकाणीं देखील ही स्त्रियांची पिडा पदोपदीं नडत असे. ह्मणून आपण आपला निश्चयच करून चुकलों होतों कीं, घरून कुठें बाहेर ह्मणून पडावयाचेंच नाहीं. कारण, ही नसती उपाधि घरीं बोलावून आणा कशाला?

एखादे दिवशीं लायब्ररींतून कसलीं तरी एकदोन पुस्तकें घेऊन येतांना कोणी ओळखीचा भेटला पुरे, एकदम थांबायाचा व विचारायाचा " काय विनायकराव! हीं जाडीं जाडीं बुकें कोणाला बुवा दाखवायाला नेत आहेस?"

असें एक कीं दोन म्हणून सांगावें? या लोकांच्या ह्या बडबडीनें अगदीं भंडावून सोडलें होतें. तथापि मी हें सगळें निमूटपणें सोसून घेत असें. कारण, आपल्याला राग येतो असें या लोकांस कळलें पुरें, मग तर आपण होऊनच आपल्या पायावर कुऱ्हाड मारून घेण्यासारखा प्रकार व्हावयाचा! मग हे चांडाळ प्रत्येक वेळीं आणि प्रत्येक प्रसंगीं चिडवित रहावयाचे. तेव्हां करतां काय? सगळें आपलें हंसण्यावारीच न्यावें लागे.

तात्पर्य, अविवाहित स्थिति अतिशय वाईट, याचा मला पुरता अनुभव येऊन चुकला होता. जरा देखील इकडे कीं तिकडे फिरायला म्हणून मिळत नसे. अशी कुचंबणी आणि असा तोंड दाबून बुक्क्यांचा मार सहन करावा लागत होता कीं, पुसूं नका! ह्मणून मी बहुतकरून घरांतून बाहेरच पडत नसें, हें मघां सांगितलेंच आहे. पण यामुळें तरी

का आमच्या कपाळाचा त्रास चुकला होता? आमची आइची आई—जी माझ्यावर अतिशय प्रेम करित असे—जायाची रुसून व ह्मणावयाची "काय बाबा, तुम्ही झालां आतां मोठे लोक ! आतां तुम्हांला तुमच्या माणसांनांहि भेटायला वेळ सांपडायचा नाहीं !" बरें आजीला राग येतो ह्मणून तिच्याकडे कधीं मधीं जावें, तर इकडे घरीं माझी वडील बहीण अंबुताई, आहेच हजार तऱ्हेनें थट्टा करायला तयार ! "भाईला, मामाच्या हिरेला पाहिल्यावांचून चैनच पडत नाहीं ! असं करीनास भाई ! मीच तिला कांहीं दिवस आमच्या इकडे रहायला घेऊन येत्यें. म्हणजे तुझा आजीला भेटायच्या निमित्तानं मामांच्या घरीं जाण्याचा त्रास तरी वांचेल ! बोलत कां नाहींस ? आहे ना तुला हा विचार पसंत ?"

बरें, कधीं खिडकी उघडी टाकून वाऱ्यावर कांहीं तरी वाचित बसेन ह्मणेन, तर तेथें कांहीं वाचित बसायला, कीं नुसतें उभेंहि रहायला मोकळीक नसे. कर्मधर्मसंयोगानें खिडकी उघडीच राहिली असून आपण वाचनांत गढून गेलेलें असावें आणि इतक्यांत कोणी मित्र भेटायला यावा, ह्मणजे भरली आमची साडेसाती ! समोरची कमळाबाई त्याच्या दृष्टीस पडतांच त्यानें गांवांतील 'गपाटागॅझेट' मध्यें द्यावी बेधडक बातमी ठोकून कीं "विनाकरावाच्या समोरच्या घरीं ते भगवंतराव राहतात कीं नाहीं, त्यांच्या कमळाबाईकडे एकसारखें पाहत पाहत साहेब अंगामध्यें सडकून ज्वर घेत, मिशांला पीळ देत अभ्यास करित असतात ! तोंडासमोर मात्र पुस्तकबाई आणि डोळ्यां-समोर एकसारखी कमळाबाई !"

अरे राम राम ! कपाळ उठलें या शिंच्या त्रासानें ! शिवाय "भाई ! लग्न कधीं करतोस ?" "दोस्त मेजवानी कधीं देतोस ?" "मग ह्मातारा झाल्यावर का लग्न करणार आहेस ?" वगैरे वगैरे कंटाळा कांहीं विचारूं नका ! आजीनें ह्मणावे "विनू, आमच्या हिरेसारखी मुलगी लाखांतहि मिळायची नाहीं बरं ! अन् तुझ्यावर ती केवढा लोभ करते ? शिवाय,

बिचाऱ्या हिरेच्या आईचा तुलाच आपला जांवई करण्याचा फार हेतु होता. माझा एवढा शब्द ऐक, जास्त शहाणा होऊं नकोस!"

या मूर्ख बायकांनां कोणी ताळ्यावर आणणारा नाहींच का? मुलें पाळण्यांत असतांनाच त्यांचे हातपाय जखडून टाकण्याच्या कामीं या कमअक्कल ह्माताऱ्याकोताऱ्या बायका एकसारख्या हपापलेल्या असावयाच्या! आणि त्यांत जर का कुठें थोडेसें नातेंगोतें असलें कीं ठरला यांचा ठाम निश्चय! मग पुढें त्या नवरानवरीचें कांहीं का होईना! यांच्या हौशी तर पुऱ्या होतात! "तुझ्या मावशीचा अमुक अमुक हेतु होता; तुझ्या चुलतीच्या बहिणीच्या जावेच्या मैत्रिणीची अमुक अमुक इच्छा होती!" असें सांगून व डोळ्यांत आसवें आणून एखाद्याच्या अगदीं गळीं पडतील. पण अक्कलशून्य हो! तुमच्या हिरेबरोबर किंवा कमळेबरोबर त्या सांगणारास का आपला जन्म घालवायाचा असतो? मूर्ख कुठल्या!

" नाहीं, आपल्याला हिरेबरोबर कधींहि पटायचें नाहीं; हा कांहीं बाहुलाबाहुलीच्या लग्नाचा खेळ नव्हे बरें आजी, जन्माच्या गांठी आहेत!" असें सांगून आजीचें ह्मणणें आपण साफ झाडून टाकावें. पण ती कुठली गप्प बसायला! "हं मला सारं समजतं! आतांच्या तुह्मा सुधारलेल्या पोरांनां साहेबांच्या मडमेसारखीच फटाकडी बायको असावीशी वाटतं. पण हें बरं नव्हे हो! दोन इंग्रजी अक्षरं समजून यस फयस करतां येऊं लागलं, ह्मणजे झालं या सटवींनां अस्मान ठेंगणं! सासूसासऱ्यांची मर्यादा नाहीं, परक्यांची भीडमुरवत नाहीं, बसायला खुर्च्याच पाहिजेत, पायांत बूटच पाहिजेत, पोरांनां संभाळायला दाईच हव्यात! बाईसाहेब सारा दिवस नवऱ्याच्या देखत खुर्चीवर उताण्या पडून बुकं वाचतील बुकं! या सटव्याच तुह्मा लोकांनां वठणीस आणतील! याच तुह्मांला 'नाकापेक्षां मोतीं जड' शा होतील. खरं गृहसुख यांच्यापासून कधींहि मिळायचं नाहीं हें पक्कं ध्यानांत ठेवा!"

अरे बापरे ! आजीचें चऱ्हाट सुरू होतांच आपण आपला एकदम ' सूं बाल्या ' ठोकावा ! या हजार कारणांमुळें जीव अगदीं त्रासून गेला होता. शिवाय, आपल्या बरोबरीच्या कित्येक मित्रांच्या स्थितीचा मनास हेवाहि उत्पन्न व्हावा. यांच्या घरीं यांना भेटायला जावें तर हे आपले मिसीसबरोबर आनंदानें गोष्टी करित बसलेले दृष्टीस पडावयाचे. आणि आपण मात्र ' उर्ध्वाय दिशे ब्रह्मणेनमः ' करित हवेंत जांभया देत रहावयाचें, हें कांहीं ठीक दिसेना.

या सगळ्याचा अंत कशानें होईल? लग्नानें—लग्नानें—बस लग्नानेंच ! ! एवढें तर निश्चित होतें कीं, आपण चतुर्भुज झालों, कीं या सगळ्या अडचणी आणि सगळ्या भानगडी नाहींतशा व्हावयाच्या. शेवटीं अस्मादिकांचा ठाम निश्चय ठरला कीं, काय होईल तें होवो, आतां कपाळावर दोन अक्षता पाडून घेण्यांतच खरी शोभा आहे !

सौंदर्य कांहीं गोऱ्या चामडींतच येऊन भरलेलें नाहीं, हें तर मी पूर्णपणें जाणत होतों. माझी पक्की खात्री होती कीं, नवऱ्याला सुख देणारी स्त्री चांगली सुशिक्षित आणि चलाख अशीच असली पाहिजे. शेवटीं अशी एक वधु माझ्या लक्ष्यांत आली. माझ्याबरोबरच कॉलेजांत माणक नांवाची एक मुलगी शिकत होती, तिची माझी कॉलेजांत असते वेळीं बरीच ओळख पडली होती. तीहि हल्लीं लग्नाच्या विचारांत असल्याची गुणगुण माझ्या कानीं येतांच या बाबतींत आह्मां उभयतांचा पत्रव्यवहार चालू झाला.

आतां दुसरें काय पाहिजे ? माणकचें नाक जरा मोठें असल्यास काय झालें ? मला तर तें असावें त्याहूनहि किंचित् लहानच दिसत होतें ! शिवाय ती अंगानें जरा स्थूल आणि ठेंगणी होती म्हणून काय झालें? मला तर सुकून गेलेल्या आणि मडमांसारख्या सिंहकटी स्त्रियांची मोठी चीड असे ! तेव्हां, माणकच्या स्थूलदेहाबद्दल खेद न होतां उलट मी फार खुष खुष होऊन गेलों होतों ! आणखी फक्त एकच बाब राहिली. माणकच्या चामडीला रंग देतेवेळीं ब्रह्मदेव कोणत्य

विचारांत गुंग होता कोण जाणे ! खरोखर, त्यावेळीं त्याचें चित्त स्थिर नव्हतें. कारण, हिला हिंदुस्थानांत जन्मास न घालतां आफ्रिकेंत जन्म द्यावयाचा आहे, अशीच त्याची समजूत झाली; आणि या त्याच्या चुकीमुळें माणकच्या अंगवर्णांत जरा काळा रंग विशेष पडला होता. पण चिंता नाहीं ! आपल्याला ह्या बाह्य गोष्टींशीं काय कर्तव्य होतें ! आपल्याला तर माणकचे सद्गुण, तिची चतुराई, तिची चलाखी, तिची सुविद्यता, तिचा विनय आणि तिचा गोड स्वभाव हींच पाहिजे होतीं !

बस ! सेवकाचा निश्चय झाला कीं, माणकशिवाय दुसऱ्या कोणाहि बरोबर लग्न करावयाचें नाहीं. लग्नाचें साटें कसें आणि कोणत्या शर्तींवर ठरविण्यांत आलें, त्याशीं वाचकांचा संबंध नाहीं. माणकच्या हजारों नखऱ्यांनंतर एक दिवस गिरगांवांत गुपचुपपणें आह्मां उभयतांच्या कपाळावर अक्षता पडून 'अति सुमुहूर्त सावधान' झालें ! मित्र-मंडळीस आपण लग्नाचें बुध्द्याच आमंत्रण दिलें नव्हतें; पण हे वस्ताद चारचौघांत झालेली गोष्ट काय समजल्यावांचून राहतात ? जो भेटे तो आपला "हुः-हुः-हुः-हुः! आह्मी नाहीं कधींहि करणार लग्नी-ई-ई-ई-न!" ह्मणून चिडवी. पण आपण आपले "बरें येतों. जरा जरूरीचें काम आहे" ह्मणून धम ठोकावी.

आतां जीव जरा निश्चिंत झाला. आतां तर कोणाच्यानें मला मोकळेपणें फिरण्यासवरण्यास अटकाव करवणार नाहीं ? आतां तरी कोणी मजवर भलतेसलते संशय घेऊं शकणार नाहीं ? आतां कोणा मित्राच्या घरीं गेल्याआल्यास लोकापवादाचें भय नाहीं ? इत्यादि इत्यादि विचार मनांत येऊन जिवास किंचित् स्वस्थता वाटूं लागली व आपण एका मोठ्या बंधनांतून मोकळे झालों, असें वाटलें. शिवाय, माणकहि सेवकावर एवढी कांहीं मोहित होऊन गेलेली होती कीं, माझ्याविना तिला एक क्षणभरहि करमत नसे ! पण मी पडलों मुळापासून एकांतप्रिय, आणि मित्रांस तर कांहीं आमची पाठ क्षणभरहि

सोडीनात! होतां होतां हा प्रकार इतका शिखरास पोहोंचला कीं, आतां याला उपाय काय करावा, याची मला मोठी पंचाईत पडली! मीं मनांतून नेहमीं देवास गाऱ्हाणें घालावें कीं, देवा इच्या माहेरचें कोणी आजारी तरी पडूं दे, म्हणजे ही ब्याद थोडे दिवस माहेरीं तरी जाईल व आपल्याला तेवढा वेळ फुरसत मिळेल! परंतु इतक्यांत, तिनें आपल्या दोन्हीं नाजुक हातांची माळ माझ्या गळ्याभोंवतीं घालून मोठ्या प्रेमानें चुंबन दिलें म्हणजे मी मागलें तें सारे विसरून जाई व आनंदसागांत मग्न होई !

हें सगळें अगदीं थोड्या दिवसांचेंच होतें! आम्हीं उभयतांनीं लग्नानंतर अधिक तर पांचसहा महिनेच सुखसंपांत घालविले असतील नसतील तोंच माणकबाईंची हुषारी मला भारी वाटूं लागली. साधारण बाबतींतहि आमच्या राणीसाहेब बस आपण म्हणतों तेंच खरें व आपणच हुषार, असा प्रकार करूं लागल्या! आज तुम्हीं असेंच केलें उद्यां तसेंच केलें, कोटच असा घालतां, बटणच असे लावतां, वगैरे वगैरे कांहीं बोलूंच नका ! मी आपला चकित होऊन गेलों.

एक दिवस सकाळीं चहापान झाल्यावर मी खोलीमध्यें एका आराम-खुर्चीवर सहज आडवा पडलों होतों. इतक्यांत पुण्याचा ‘ सुधारक ’ वांटणाऱ्या मनुष्यानें माणकच्या हातीं आणून दिला. ‘ सुधारक ’ पाहतांच माणकला मीं म्हटलें “ वाच पाहूं त्यांत काय आहे तें. मी येथून पडल्या पडल्या ऐकतों. ”

माणक माझ्या समोरच्या खुर्चीवर खांकरत खांकरत गळा साफ करित मोठ्या ऐटीनें वाचायास बसल्या. मराठी आर्टिकलें वगैरे दिलीं सोडून, एकदम इंग्रजी मजकुराकडेच मोर्चा फिरविला. अशी कांहीं भरधाव गाडी सोडली कीं, मला त्यांतलें एक अक्षरहि समजलें नाहीं! शेवटीं स्टीम—वाफ—जरा मंद करण्याची संधि मला सांपडली. इंग्रजींत ‘ नंतर ’ याला after असा शब्द आहे. याचा उच्चार सर्व लोक ‘ आफ्टर ’ असा करितात. पण आमच्या महा विद्वान् माणकबाई मोठ्या ऐटी-

मध्यें ' एप्टर ' असें वाचूं लागल्या. दोनतीन वेळां मी उगी राहिलों. परंतु पुनः पुनः ' एप्टर ' ' एप्टर ' असेंच जेव्हां ऐकूं येऊं लागलें, तेव्हां मीं ह्मटलें " माणक ! सारें जग ' आफ्टर ' असा उच्चार करतें, अन् तूंच ' एप्टर ' हा भलताच उच्चार कुठून आणलास ? "

" घ्या ! आपल्याला त्यांत नाहीं कांहीं कळत तर मेलं उगी तरी बसावं ! याचा खरा उच्चार ' एप्टर ' हाच आहे, समजलं ? "

" तर मग आपल्या इंग्रजी पहिल्या इयत्तेच्या मास्तरापासून तों कॉलेजचे प्रोफेसर, प्रिन्सिपालापर्यंत सारेजण बेटे मूर्खच वाटतें ? "

" अलबत ! नऊशें नव्याण्णवद् वेळां मूर्ख ! ते अडाणी लोक चूक करतात, ह्मणून मींहि करूं कीं काय ? तीं मेलीं मेंढरं असतात कीं नाहीं, त्यांतला ह्मोरक्या खड्ड्यांत पडतांच बाकीचींहि जशीं डोळे मिटून डबाडब उड्या टाकतात त्यासारखं तुमचं हें बोलणें दिसतं ! माणसानं प्रत्येक गोष्टींत आपली विचारशक्ति थोडी खर्चली पा—"

" बस बस! जास्त शेखी मिरवूं नकोस! आजपर्यंतचे सर्व लोक मूर्ख अन् तूंच काय ती एक विद्वान् आणि शोधक वाटतें ? "

" कशाला पण या लोकांचा तुह्मी एवढा कैवार घेत आहां हा ? बापजन्मीं बेस्ट्यांनीं डिक्शनरी-कोश-इकडची तिकडे केली असेल तर कीं नाहीं ? आतांच उघडून पहा हवं तर मी ह्मणत्यें तोच उच्चार खरा आहे कीं नाहीं ! "

" बस, आपल्याला कबूल ! वेब्स्टरच्या डिक्शनरींत मी ह्मणतों तसा उच्चार सांपडला, तर तूं काय हारशील ? "

" जें सांगाल तें ! "

" दोन्ही हातांनीं कान पकडून शंभर वेळ उठबशा काढशील ? आणि दरेक उठबशीचे वेळीं ' चुकलें, क्षमा करा. आजपासून भलताच हट्ट कधींहि करणार नाहीं. पायां पडतें ! ' असें बोलशील ? "

" हो कबूल ! नि तुम्ही जर हरलां तर तुह्मींहि असंच कान पकडून उठबशा काढाव्या, दरेक उठबशीला माझ्या पायां पडावं, माझ्या आज्ञेशिवाय कुठंहि जाऊं नये, अन् माझ्या मर्जीविरुद्ध वागूं नये ! "

अहाहा! केवढी मऊ मेणासारखी मागणी पण! पण जाउंद्या, फिकीर नाहीं. माझी पक्की खात्री होती होती कीं, आमच्या राणीसाहेबच्च हरावयाच्या अन् आपल्याला कान पकडण्याची पाळी यावयाची नाहीं. ह्मणून मींहि तिच्या अटी कबूल केल्या.

वेब्स्टरची डिक्शनरी उघडली आणि माणकबाईचें तोंड काळेंठिक्कर पडलें.

"कसें काय बाईसाहेब !" मीं हंसत हंसत म्हटलें. "पैज जिंकलां ? हें हं, उठा उठा पाहूं कशा लौकर! पकडा कान, अन् म्हणा 'चुकलें पायां पडतें !' आतां उशीर नको !"

"असं कांहीं चालायचं नाहीं! माझी पक्की खात्री आहे कीं, याचा उच्चार 'एप्टर' असाच आहे. कदाचित् जान्सन्‌च्या डिक्शनरीमधें मीं वाचलं असेन!"

"पण आपला ठराव तर वेब्स्टरमध्येंच पहाण्याचा होता. आपल्यापाशीं जान्सन्‌ची डिक्शन्‌री नाहीं, म्हणून असें ढोंग करतां वाटतें ?"

"का—य ? ढोंग ? ढोंग !" राणीसाहेब एकदम लालबुंद झाल्या. बापडा 'सुधारक' चोळामोळा होऊन कोठें कोनांत जाऊन पडला कोण जाणे ! माणकबाईनीं कोचावर एकदम अंग टाकलें व स्फुंदण्यास आरंभ केला.

'चोरीच्या चोरी आणखी वर शिरजोरी' ह्मणतात तो ही ! गंगा, यमुना प्रसन्न करून घेणें ह्मणजे बायकांच्या हातचा मळ! केवढाहि खंबीर पुरुष असो, या स्त्रियांच्या अपूर्व मायेपुढें त्याची मति कुंठित व्हावयाची! या दिवशीं आमच्या राणीसाहेबांस सारा दिवस भूक ह्मणून कशी ती लागली नाहीं. अन् मीहि पण त्याची मुळींच पर्वा केली नाहीं. उठून बाहेर चालता झालों.

पण या दिवसापासून रोजरोज रुसवारुसवी आणि जळफळाट सुरू झाला. माझी बाहेरून घरीं येण्याची वेळ झाली कीं राणीसाहेब कपाळा-

वरून गुरफटून पांघरूण घेऊन भिंतीकडे तोंड फिरवून बिछान्यावर 'सूं सूं' करित पडलेल्या आढळावयाच्या.

"काय, निजलीस कां?"

सामसूम!

"सांगशील कीं नाहीं काय होतें तें?"

जबाब नाहीं.

"बोलतेस, कीं जाऊं बाहेर?"

"पण कां मेला रोजरोज त्रास! जिवाला जरा बरं वाटत नाहीं."

"पण होतें काय?"

"कपाळ दुखतं."

"कशामुळें?"

"कळलं कळलं, तुम्हांला माझी केवढी माया आहे ती! मी मात्र मेली वेडी, कीं, दिवसरात्र दुसऱ्याकरितां जीव तोडित अस—"

भाषण पुरें होत आहे नाहीं इतक्यांत आकाश भरून यावें, विजा चमकाव्या व लवकरच माणकबाईंच्या डोळ्यांतून बराच वेळ एकसारखी वृष्टि सुरू व्हावी.

चौकशी करतां आढळून यावें कीं, बाईसाहेब तर सारा दिवस सगळ्यांबरोबर हंसतखिदळत होत्या व संध्याकाळच्या न्यहारीवर यथेच्छ ताव मारून नुकत्याच खोलींत गेल्या आहेत.

अशा प्रकारच्या या ढोंगासोंगांमुळें मी कंटाळून गेलों, तर त्यांत माझा कांहीं अपराध आहे का? ऑफिसामध्यें सारा दिवस मरेमरेपावेतों काम करून थकूनभागून घरीं यावें, तों त्या वेळीं मला नाहक दुःख देण्यास आमच्या सुशिक्षित राणीसाहेब तयार! त्या तिच्या रडण्याचा आणि फडफडण्याचा मला अखेरीस एवढा कंटाळा वाटूं लागला कीं, मी रात्रीच्या रात्री घराबाहेर काढूं लागलों.

माणकचा मला दिवसंदिवस अधिकाधिकच वीट येऊं लागला. तिच्या या ढोंगासोंगांनीं, विद्वत्तेच्या फाजील बढाईनें आणि ज्यांत

त्यांत अहंपणा मिरविण्याच्या तिच्या दुष्ट संवईनें मी अगदीं वैतागून गेलों. तिच्याशीं जेवढी जेवढी ह्मणून दोरी जास्त सैल सोडावी, तेवढी तेवढी ती तर आपली अधिकाधिकच डोक्यावर चढून बसावी. तिला हुकूम करण्याची तर माझी प्राज्ञाच नव्हती ! कारण, ती असली तसली का सामान्य बायको आहे ? एकदोन परीक्षा पसार झालेली व स्त्रियांचे हक्क पुरतेपणें जाणणारी ! ती दुसऱ्याचा अधिकार थोडाच चालूं देईल ! मी मात्र पुरा फसलों. आतां मला असें वाटत आहे कीं, अशा या कैदाशिणीच्या तोंडांत पडण्यापेक्षां लग्न न करतों तरच बरें होतें ! अशा या लग्नापेक्षां अविवाहित स्थितीच हजारपटींनें चांगली !

माझी ह्मातारी प्रिय आजी, या मिजासखोर पोरींविषयीं मला सांगत होती तेंच खरें, असें आतां मला वाटूं लागलें आहे. या फाजील शिकलेल्या स्त्रियांपासून मिळणाऱ्या सुखास मोहून मीं माझ्या सर्वस्वाचा घात करून घेतला. यापेक्षां साधारणच लिहिणेंवाचणें शिकलेल्या पण गरीब स्वभावाच्या मुलीशींच जर मीं लग्न केलें असतें, तर खचित मी कितीतरी सुखी असतों ! सांप्रत मला तोंड दाबून असा बुक्क्यांचा मार सहन करावा लागत आहे. याबद्दल अवाक्षरहि बाहेर बोलवत नाहीं व हें निमूटपणें घरीं सहनहि करवत नाहीं. कोणी दयाळु वाचक, या संकटांतून मुक्त होण्याचा मला मार्ग दाखवील काय ? माझ्या घमेंडीखोर माणकला कोणत्या युक्तीनें ताळ्यावर आणावी हें कोणी मला शिकवील काय ? कोणी एवढी मेहरबानी करील ?

# एक चित्र.

दारूबाजाचें घर. तेथें काय? मोठ्या कष्टानें दिवस चाललेले. कोण्या दिवशीं ओलें कोरडें तर कोण्या दिवशीं अर्ध्या पोटीं उपवास! चार मुलें घरांत. अशा स्थितींत बिचाऱ्या साळूबाईच्या दुःखास काय सीमा आहे ? भिक्षान्नावर किती दिवस चालणार ? हतभाग्य पति तर घराकडे पाहतसुद्धां नसे! साळूबाई अगदीं फिकी होऊन गेली होती. आपल्या सोन्यासारख्या मुलांकडे पाहून, क्षुधातुरतेमुळें त्यांचा कातरस्वर ऐकून, बिचारी डोक्यावर कराघात करित होती! अश्रुधारांनीं तिचें वक्षःस्थल भिजून जात होतें. अभागिनी नेहमीं रडत रडत ईश्वराचा धांवा करी कीं " नारायणा ! या दासीकडे एक वेळ तरी पहारे ! "

साळूबाईच्या मोठ्या मुलाचें वय दहा वर्षांचें होतें. नांव गोपाळ. गोपाळास एवढ्या वयांतच आईचें दुःख समजूं लागलें होतें. त्यालाहि पराकाष्ठेचें दुःख होत असे. त्याचीं लहान भावंडें रडूं लागलीं ह्मणजे हा त्यांचें समाधान करी व आपल्या खाण्यांतून त्यांनां खाऊ देई. कधीं कधीं कांहीं घरीं, खाण्यासाठीं कांहीं मागण्याकरितां तो उभा राहत असे. हा शोकजनक देखावा पाहून साळूबाईच्या डोळ्यांत वारंवार पाणी येई. ती मनांतल्या मनांत ह्मणे "बाळा लाडक्या! तूंच मला सुख देशील!"

आज दोन प्रहर होऊन गेले आहेत, तरी साळूबाईच्या कडेवरील अर्भकाच्या मुखांत एक चमचाभरहि दुध गेलें नाहीं ! क्षुधेनें तें कासाविस झालें आहे. गोपाळाचे दुसरे दोघे भाऊहि तडफडत आहेत. आज साळूबाईची अत्यंत निराशा झाली. निराशा झाल्यामुळें ती एकसारखी अश्रुवर्षाव करित बसली होती. इतक्यांत मागून गोपाळ आला, आणि आपला कोमल हात तिच्या तोंडावर व डोळ्यांवर फिरवून अत्यंत कष्टानें व रुद्धकंठानें ह्मणाला " आई ! कांग रडत्येस ? "

इतक्यांत दारावर एक भिकारीण भिक्षा मागूं लागली " भिक्षा वाढा बाई ! " तो तिचा करुणस्वर साळूबाईच्या कानांत घुमूं लागला.

शतग्रंथिमय वस्त्रें टाकून ती खालीं पडली होती ती उठून बसली, व डोळे पुसून करुणस्वरानें तिला म्हणाली "बाई, आज जा. आम्हांलाच कांहीं आज—"

सर्व शब्द तोंडांतून बाहेर पडण्यापूर्वीच तिचा कंठ दाटून आला व डोळ्यांतून टपटप् अश्रु पडूं लागले !

हा देखावा पाहून भिकारिणीच्या हृदयास तत्काल द्रव आला. ती अधिकच करुणरवानें विचारूं लागली "बाई ! आपण कां बरं रडतां ?"

साळूबाई मोठ्या मारामारीनें आपलें मन आंवरून म्हणाली "कांहीं नाहीं बाई, उगाच !"

भिकारीण विचारांत पडली. तिचा संशय अधिकच दृढ झाला. तेव्हां ती पुढें होऊन म्हणाली "नाहीं बाई, मला खोटं सांगूं नका. आज आपणांस खावयास मिळालं नाहींसं दिसतं."

साळूबाईचें मुख खालीं झालें. डोळ्यांतून पुनः पाणी पडूं लागलें. अर्थात् भिकारिणीस आपोआप उत्तर मिळालें. त्या दुर्भाग्य परिवाराचें सर्व संकट तिच्या ध्यानांत आलें. ती मनांत म्हणाली "भगवंता ! अशा लोकांच्या कपाळांतहि एवढं दुःख लिहिलं आहेस काय !"

नंतर एक दीर्घ निश्वास सोडून ती साळूबाईस म्हणाली "बाई ! वाईट मानूं नका. हे थोडेसे दाणे घेऊन लेंकरांस स्वयंपाक करून वाढा."

तिनें कांहीं तांदुळ जमिनीवर ओतले. साळूबाईनें खूप नको नको म्हटलें. ती म्हणाली "नाहीं बाई, तुझे तांदुळ तूं घेऊन जा. आमचं जें काय होईल तें—"

भिकारीण तें कांहीं न ऐकतां म्हणाली "तसं कसं होईल ? नेहमीं तुमच्याकडे मागून मी खात्यें, अन् आतां माझ्यानं हें कसं पाहवेल ! पुनः केव्हां तरी जास्त भिक्षा मागून घेईन." एवढें बोलून भिकारीण त्वरेनें निघून गेली.

गोपाळ हा वेळपर्यंत उगी होता; पण आतां त्याच्यानें राहवेनाच ! तो रडत रडत आपल्या आईस म्हणाला "आई, ती भिकारीण चार

दारांवर भीक मागून आपलं पोट भरते, अन् त्या भिकारणीकडील तांदूळ घेण्याचा वेळ आला का ग?" एवढें बोलल्यावर किंचित् विचार करून तो पुनः ह्मणाला " आई! बाबांजवळ जाऊन ते काय ह्मणतात तें तरी पाहतों."

या वेळीं साळूबाईसहि रडूं आलें. रडतां रडतां पुत्राचें चुंबन करून ती भग्नस्वरानें ह्मणाली " बाळा सोन्या ! तूं कुठं जातों ह्मणतोस ? ते काय भानावर आहेत? आजि असते तर काय अशी तुझी दशा झाली असती ? "

" तें कसेंहि असो. मी एक वेळ जाऊन पहाणार ! "

" दुपार झाले आहेत. तुझ्या पोटांत थोडं पाणीसुद्धां गेलं नाहीं. तूं एवढा रस्ता कसा चालणार बाबा? मी रांधत्यें, थोडंसं खाऊन जा."

साळूबाई त्याला कुरवाळूं लागली, व पुष्कळ समजावूं लागली. पण गोपाळ कांहीं केल्या ऐकेना. अनेक सबबी सांगून तो आपल्या पित्याकडे जाण्यास निघाला.

१. कृष्णाजीपंत अत्यंत मद्यपी. वडिलांनीं संपादन केलेली सर्व संपात्ति त्यानें दारूच्या पायीं घालवून टाकली होती. शेवटीं बायकामुलांस रस्त्यावर पडण्याची पाळी आणली. विसाजीरावांचें घर ह्मणजे एक दारूबाजांचा अड्डा होऊन बसला होता. तेथें कृष्णाजीपंत सारा दिवस कैफांत पडलेला असावयाचा. इकडे मुलेंबाळें अन्नाशिवाय तडफडत आहेतच! बिचारी साध्वी साळूबाई नवऱ्याचें हें निष्ठुर वर्तन, म्लान वदनानें सहन करित असे आणि मोठ्या दुःखानें ईश्वराची करूणा भाकित असे, त्यामुळें तिचें दुःख किंचित् कमी होई खरें, पण अनाहारामुळें म्लान मुख झालेल्या आपल्या मुलांकडे पाहून तिची छाती फाटून जाई. त्या वेळीं तिला आपलें जिणें दुःसह होत असे !

सुकुमार गोपाळ कासावीस होऊन मोठ्या कष्टानें एकदाचा पित्यापुढें जाऊन उभा राहिला. त्याचा तो निर्धन व हीनबुद्धि पिता, विसाजीरावाबरोबर धुंदींत पडला होता, आणि चारपांच जण चोहोंकडे बसून

त्याच्या रंगांत आणखी भर घालित होते. बरोबर गायनवादनाचीहि सर्व व्यवस्था होती. सारांश, त्या विलासभूमीवरून रसप्रवाह खूप वेगानें वाहत होता !

अशा ऐन रंगांत म्लानमुख गोपाळ तेथें गेल्याबरोबर काय विचारतां? सर्व रसभंग होऊन गेला. पुत्राची ही बेअदबी पित्याला सहन झाली नाहीं. तो क्रोधानें नेत्र लाल करून कर्कश स्वरानें त्याला ह्मणाला "क-कारट्या ! येथें क काय ह्मण-ण-हून आ-आ-आल्लास?"

निष्ठुर पित्याची ही कठोर भर्त्सना, त्या क्षुधातुर बालकाच्या अंतःकरणास फारच भेदली. एक मोठा उसासा सोडून त्यानें भीतिपूर्वक उत्तर दिलें "बाबा! अझूनहि आह्मांला खाण्यास कांहींच मिळालें नाहीं. धाकट्या गंगूसहि आज उपास पडत आहे—"

पापी पिता पुनः कर्कश स्वरानें त्याला ह्मणाला "त-तर य-येथें म-मरायला क-कश्शास आलास ? च-चल नि-नीघ येथ्थून !"

गोपाळ भीत भीत व अश्रु टाकित पुनः ह्मणाला "तर बाबा, आह्मीं उपाशींच मरावं काय ?"

पित्यास हें सहन झालें नाहीं. चारचौघांत गृहछिद्र बाहेर पडलें ह्मणजे काय ! तो तसाच पडत पडत उठून उभा राहिला व त्यानें त्या मुलावर जोरानें एक लाथ मारली !

"आई-ग !" अशी किंकाळी फोडून तें कोंवळें पोर, धाड्दिशीं खालीं पडलें. मुखांतून फेंस येऊं लागला—आणि हें काय ? अरेरे ! हें रक्तहि आलें पहा !

मुलाचा शब्द ऐकल्याबरोबर विसाजीराव व दुसरे तीनचार असामी येऊन त्यांनीं कृष्णाजीपंतास एकीकडे सारलें. पण हें सुरामत्त पिशाच्च ह्मणालें "प-पोर क-किती उद्ध-धट पहा तर खरां ! ए-एवढासा पोर्, अन् घरांहून येऊन म-माज्जी बे-बेदभी कर्तो आहे !"

नंतर त्यानें आपल्या पत्नीसहि दोनचार शिव्या हांसडण्यास कमी केलें नाहीं ! त्या पंडितपरिषदेंत यामुळें त्याची बरीच प्रशंसा झाली, हें निराळें सांगावयास नकोच !

विसाजीरावानें कांहीं विचार करून आपल्या नोकराकडे एक रुपया दिला, व तो गोपाळाच्या आईकडे देण्यास सांगितलें. बरोबर गोपाळा-सहि नेण्यास सांगितलें.

गोपाळ अझूनहि जमिनीवरच पडला होता. त्याला उठण्याची शक्ति नव्हती. तो मोठ्या दुःखानें ' हाय हाय ' करित पडला होता. पित्यानें पुनः एक ढेंकणा दिला. गोपाळ उठण्याचा यत्न करूं लागला, पण त्याचे यत्न निष्फळ होऊं लागले. तेव्हां चाकरानें त्याला पाठीवर मारलें, व मोठ्या सावधगिरीनें घरीं पोंचविलें. साळूबाईनें तर मोठ्यानें हंबरडा फोडून गोपाळास आपल्या पोटाशीं धरलें.

हाय हाय ! मातेचें धन मातेजवळ बसून मोठ्या कष्टानें ' आई-ग! आई-ग!' ह्मणूं लागलें. शरीर अगदीं अवसन्न झालें. पाहतां पाहतां डोळेहि मिटूं लागले. साळूबाईला कळून चुकलें कीं, मुलाचा आतां भरंवसा नाहीं! ती एकदृष्टीनें आपल्या आवडत्या रत्नाकडे पाहत राहिली ! तिचे नेत्र रतिमात्र हालेनासे झाले. इतक्यांत एकाच्या डोळ्यांतून एकदम रक्त बाहेर पडलें! आणि—हाय हाय! ते कोमल नेत्र त्या वेळीं जे मिटले ते पुनः कधींहि उघडले नाहींत ! !

निष्ठुर भवितव्या ! काय केलेंस हें ?

# ब्युबॉनिक प्लेग.

मुंबईसच नव्हे, मुंबई इलाख्यास नव्हे, हिंदुस्थानासहि नव्हे, तर संपूर्ण जगतास ज्यानें हालवून सोडलें; शेंकडों नव्हे, हजारों नव्हे, लाखों माणसांस रडविलें; हजारों—लाखोंजणांस बुडाविलें, धुळीस मिळविलें; बिचारे हजारोंजण घरादारांस मुकले; हजारों जण पितृविहीन झाले; हजारों इसमांचे पोशिंदेच मरण पावले; कित्येकांच्या घराचे खांब, संसाराचे आधारस्तंभ, परलोकीं गेले;हजारोंजणांचें सुख, जिवाचे विसावे, गळ्यांतले हार नष्ट झाले; कित्येकांचीं गोजिरवाणीं, लाडकीं, एकुलतीं एक आणि प्राणाहूनहि प्रिय अशीं सकुमार बालकें मृत झालीं; हजारों सुंदर तरुणींच्या जन्माची माती झाली. सौभाग्याची राख झाली; हजारोंजणांच्या संसारांत धूळ पडली; विश्रांतीचें स्थान, जिवाची करमणूक, प्रेमाचें निवासस्थल, अशा हजारों तरुण कांता, पतीला दुःसह विरहदुःखांत लोटून चालत्या झाल्या! हरहर! केवढा गहजब! केवढा अनर्थ! गरीब रडले, श्रीमान् रडले; स्त्री झटली नाहीं, पुरुष झटला नाहीं; लहानास वगळलें नाहीं, मोठ्यास सोडलें नाहीं; एकूणएकांस ज्या दुष्टानें रडविलें, हाय हाय करावयास लाविलें, त्या १८९७ सालच्या ब्युबॉनिक प्लेगचें नांव निघतांच अझूनहि सर्वांचा थरकांप व्हावा, यांत नवल तें कसलें?

कोर्टांतील लहानमोठ्या ऑफिसांत जा आणि बारिक नजरेनें तेथील प्रकार अवलोकन करा. क्लार्कलोकांमध्यें, दहापासून पांच वाजेपर्यंत ब्युबॉनिक प्लेग, ब्युबॉनिक प्लेग आणि ब्युबॉनिक प्लेगसंबंधींच गोष्टी! काल अटयाक्स किती, डेथ्स किती आणि टोटल मॉर्टालिटी किती? याशिवाय दुसरी गोष्ट नाहीं. ‘ तो अकाउंटंटमधला दामले मेला हो! ऑडीटमधला तो शामराव काल कींहो कामावर आला होता! अरेरे, फार वाईट झालें!! ’ या आणि यांच गोष्टी. गिरण्यांतील मजुरांतहि याच गोष्टी. मार्केटांतहि याशिवाय दुसरें कांहीं ऐकू येणार

नाहीं. ट्रॅममध्यें, रेल्वेमध्यें आणि आगबोटींतल्या उतारूंमध्यींहि हेंच पुराण ! खाणावळींमध्यें हीच चर्चा, इराण्यांच्या शॉपमध्यींहि हाच वादविवाद ! स्त्रीपार्लमेंटांच्या मीटिंगांत वादविवादास याशिवाय दुसरा विषय नाहीं आणि ' अवो परबांचा गनूप-अ-ती ' इत्यादि मनोरम काव्यांत तल्लीन होणाऱ्या बालूवर्गांतहि या गोष्टीशिवाय दुसरीचें नांव नाहीं ! सकाळींहि याच गोष्टी, दुपारींहि याच आणि रात्रींहि याच ! लोकांस ब्युबॉनिक प्लेगशिवाय दुसरा विषयच राहिला नव्हता.

पण आरंभापासून आह्मांला कांहीं निराळें—सर्वांच्या उलटच—वाटत असे व तो आमचा समज अझूनपर्यंत तसाच कायम आहेहि ! या सांथीमुळें लाखों जणांचें अपरंपार नुकसान होवो, हजारों लोक धुळीस मिळोत, परंतु इच्यापासून कालांतरानें कां होईना, मुंबई शहराचें खात्रीनें कल्याण झाल्याविना रहाणार नाहीं ! सुखामागून जसें दुःख, तसेंच भयंकर दुःखामागून महान् सुखहि खात्रीनें येणारच ! आह्मांला चांगले दिवस दाखविण्याकरितांच हे सांप्रत अनिष्ट दिवस आलेले आहेत. ईश्वर आह्मांवर कोपला नाहीं, तर उलटा प्रसन्नच झाला आहे. आमची त्याला करुणा आली आहे व आमच्या कल्याणाकरितांच त्यानें ही सांथ पाठविली आहे !

वाचणारे प्रिय बंधु आणि प्रिय भगिनी हो ! हंसूं नका, आह्मांला एकदम वेड्यांत ढकलूं नका, व आमच्या अज्ञानाबद्दल आश्चर्यांत पडूं नका. आह्मांला भ्रम झाला नाहीं, आमची विचारशक्ति आह्मांला सोडून गेली नाहीं, किंवा एखाद्या वेड्याप्रमाणें आह्मीं कांहीं तरी बरळत नाहीं ! आह्मीं ह्मणतों हें खरें कीं खोटें याचा निर्णय पुढील हकीगत वाचल्यावर आपणच कराल.

१८९७च्या फेब्रुआरी महिन्याची १२वी तारीख. सायंकाळचे पांच वाजले होते. पांच-दाहांची विरार लोकल चर्चगेट स्टेशनावर उभी होती. धावत धावत येऊन एकदा गाडी तर गांठली व सेकंड क्लासच्या एका कंपार्टमेंटमध्यें घुसलों. गार्डानें सिटी दिली व ट्रेन चालू झाली.

आह्मी ज्या कंपार्टमेंट—डब्यांतील एक खोली—मध्यें बसलों होतों त्यांतच पांचसहा तरुण पारशी, एकदोन युरोपियन, एक ह्मातारा वाणियाकाका व आमचा एक मित्र, एवढी मंडळी होती. पारशांचीं बाळें, मग तीं सत्तर, ऐशीं नव्हे शंभर वर्षांचीं अल्पवयी कां असेनात, एखाद्याची थट्टा करायाची, हें जसें कांहीं प्रत्येकाच्या पांचवीला पुजलेलें असतें ! रस्त्यांत एखादा एकटादुकटा भेटला पुरे, हीं बाळें मोठ्या मिन्नतवारीनें त्याला सलामच करतील; ' केम रावसाब कुथेंसी जाते ? ' ' केम ताते मुलकामंदीसी कवां आला ? इत्यादिच ह्मणतील; कोणाची टोपीच उडवितील; अमुकच करतील, तमुकच करतील ! हे लोक उगी ह्मणून बसावयाचे नाहींत. वाणिया काकांचा पोषाख किंचित् बावळटपणाचा पाहून आमच्या कंपार्टमेंट-मधील थट्टेबाज पारशी मंडळीनें त्याची गम्मत करण्याचा विचार केला. लागलीच एकानें मंडळीपुढें सूचना आणली. दुसऱ्या एकाचें तिला अनुमोदन मिळालें आणि क्षणार्धात सर्वानुमतें दरखास्त पसारहि झाली! आह्मांलाहि ती एक प्रकारची मौज वाटूं लागली व आतां पुढें काय प्रकार घडतो तो अवलोकन करण्यास आह्मीहि उत्सुक झालों.

ट्रेन चालू होतांच या तुफानी बार्कसांतील एकानें भोळेपणाचा आव घालून वाणियास विचारलें " केम काका ! तमे तो कुलाबासी आला असेल. तवां तिकरेस मरकीचा केस कसा बनते तो सांगसेल ? तमचा जोशी लोक सांगते के मुंबाई अठां डुबूनसी जाएल. ते खरी वात के?"

वाणिया ह्मणाला "बाबांनो! कुलाब्याहून मी तर हा परत चाललों आहें. पण लवकरच कित्येक इसमांला तिकडे जाऊन राहावें लागेलसें मला वाटतें. मुंबई बुडण्याबद्दल तुह्मी विचारतां, त्याचें उत्तर एवढेंच कीं, ज्याचें भरलें असेल त्याला मुंबई काय—सारी दुनियाच बुडाल्यासारखें आहे ! "

लोहाराच्या घरीं सुई विकण्याकरितां आलेलीं हीं कालचीं बाळें, वाणियाकाकाच्या या मोघम उत्तराचा खरा अर्थ न समजून त्याची

आणखीहि थट्टा करण्याच्या उद्देशानें ह्मणालीं "काका ! मुंबई डुबेल तवां तमे काय करेल ? तमचा समद्रा डल्लाची साथेच मंगवेल के ?"

काकानें जरा गंभीर मुद्रेनें उत्तर दिलें "तुह्मी तरुण आहां. ज्वानीमध्यें अंगांत मुसमुसणाऱ्या रक्तामुळें तुह्मांला दुनिया बुडणें हें आपलें एखाद्या नाटकांतल्या सीनासारखें पहायला मिळेल असें वाटत असेल; पण देव करो आणि तुह्माला कीं आह्माला तसें कांहीं विपरीत प्रसंग न येवो ! माझ्या स्वतःविषयीं ह्मणाल, तर आतां माझें काय ? सोनापुरांत लांकडें तर जाऊन पोहोंचलींच आहेत. फार फार तर पांचदहा वर्षें काढीन; परंतु तुह्मी जर देवदयेकरून वांचलां जगलां— आणि तुह्मी माझ्यासारखे ह्मातारे व्हा असा माझा तुह्मांला आशीर्वाद आहे—तर माझी आठवण काढाल. तुह्मी तुमच्याच डोळ्यांनीं पहाल कीं, या सांथीला लोक जे एवढे भिताहेत, तसें भिण्याचें कांहींएक कारण नाहीं. ईश्वर जें कांहीं करतो तें चांगलेंच करतो आहे. मुंबईतली ही मर्की, आज नाहीं पण पांचपंचवीस वर्षें लोटल्यावर कांहीं निराळाच—उत्तम प्रकार दाखवील. तो कोणता तें तेथपर्यंत वांचलों जगलों तर मीहि पाहीन, नाहीं तर तुह्मी हे निश्चयपूर्वक पहालच !"

असें बोलून काकांनीं असें कांहीं पुराण सोडलें ह्मणतां, त्यांच्या त्या उपदेशपर पण सगळ्यांनां पटणाऱ्या भाषणानें सर्व श्रोतेमंडळी गारीगार झाली ! वांद्र्याचें स्टेशन इतकें लवकर कसें आलें, याबद्दल आह्मां सर्वांस मोठा विस्मय वाटला. काकांनीं इकडचेतिकडचे कांहीं संस्कृत श्लोक कबिरादिकांचे दोहरे इत्यादि इत्यादि जी कांहीं सोडली ह्मणतां, कीं, त्यांची थट्टा करण्याकरितां ह्मणून सरसावलेला मंडळी आपला मूळचा संकेत पार विसरून उलट काकाजींची एकसारखी प्रशंसाच करूं लागली.

वांद्र्याचें स्टेशन येतांच आमच्या डब्यांतील बहुतेक मंडळी कमी झाली. काकाजीहि सर्वांस जयगोपाळ करून उतरले. गाडींत आह्मी दोनतीन इसमच कायतें राहिलों. मंडळीची गडबड कमी झाली होती; गार वाऱ्याच्या मजेदार झुळका येत होत्या; मघांच्या करमणुकीच्या

गोष्टींहि आतां खलास झाल्या होत्या; यामुळें सांटाक्रूसचें स्टेशन येण्या-पूर्वींच निद्रादेवीनें आह्मांला आपल्या जाळ्यांत गुरफटवून घेण्यास प्रारंभ केला. आमचा किंचित् डोळा लागला व आह्मीं एक सुंदर स्वप्न पाहिलें. खरोखर तें मोठें मजेदार आणि विचार करण्याजोगें होतें. तें पुढीलप्रमाणें:—

युरोप, अमेरिका वगैरे देशांत आह्मी व्यापारानिमित्त जे गेलों होतों, ते आजपासून सरासरी पंचवीस एक वर्षांनीं ह्मणजे इ० स० १९२०–२२ च्या सुमारास पुनः मुंबईस सहकुटुंब परत आलों आहों. बोटींतून उतरून शहरांत येतों तों जिकडे पहावें तिकडे आपलें सारें नवें नवेंच दृष्टीस पडूं लागलें. आह्मी चकित झालों.

आम्हांला अत्यंत विस्मयांत पाडणारी पहिली गोष्ट मुंबई शहराचें विलक्षण स्थित्यंतर ही होय! पूर्वींच्या त्या लहानलहान गल्लया, त्या लहानलहान शेऱ्या, ते वांकडेतिकडे घाणेरडे बोळ, अस्वच्छ आणि प्रकाश विरहित घरें, चाळी वगैरे पार नाहींतशीं होऊन त्यांचे जागीं मोठमोठे मोहल्ले, मोठमोठ्या वाड्या, सुंदर, सोईवार आणि हवाशीर घरें झालीं आहेत; लोहारचाळ, चिराबझार, फणसवाडी, वगैरे ठिकाणीं मोठ-मोठे राजरस्ते झाले आहेत; त्यांवरून विजेच्या ट्रॅम गाड्या फिरत आहेत व दोहों बाजूंचीं घरें मोठीं सुशोभित दिसत आहेत. शहराचे बहुतेक भाग आह्मीं मुद्दाम फिरून पाहिले. जिकडे तिकडे चक्क आणि स्वच्छ! घाण आणि ओंगळपणा कोठेंहि नाहीं! कामाठीपुरा, नागपाडा, डोंगरी, डंकनरोड, माजगांव येथील भाग किती तरी हवाशीर दिसूं लागले. असें एकाएकीं विलक्षण स्थित्यंतर होण्याचें कारण तरी काय, याचा पुसतपास करतां कळून आलें कीं, १८९७ सालीं मुंबई शहरांत जी भयंकर मरकी उत्पन्न होऊन जिनें अर्ध्यालाखाहूनहि जास्त मनुष्यांचे बळी घेतले होते, पाव कोटीहूनहि जास्त रुपयांचें चंदन उडविलें होतें, तीमुळें मुंबईची म्युनिसिपालिटी आणि सरकार शुद्धीवर येऊन त्यांनीं घाणेरडीं घरें, चाळी आणि गल्लया जाळूनपाडून साफ नाहींतशा करून त्या जागीं असे मोठमोठे मोहल्ले आणि हवाशीर घरें बांधविलीं

आहेत. एकेक मोहल्ला पुरा होतांच त्याच्या कोंपऱ्यावर मनाला आल्हाद देणारे, पाण्याचे बारिक तुषार उडविणारे कारंजे असलेले सुंदर रमणीय बगीचे केले आहेत. हा सारा अपूर्व देखावा पाहून आह्मीं मनांत ह्मटलें, वाहवारे सांथ आणि तुझा प्रताप!

रस्त्याच्या दुतर्फा लागून गेलेल्या मोठमोठ्या घरांवर आणि चाळींवर पाहावें तों कांहींकांवर P. B. Co., कांहींकांवर B. B. Co., कांहींकांवर K. B. Co., कांहींकांवर H. B. Co., कांहींकांवर M.B.Co., कांहींकांवर कांहीं आणि कांहींकांवर कांहीं दगडावर कोरलेलीं अक्षरें दिसूं लागलीं. यांचा अर्थ काय याबद्दल चौकशी करितां समजलें कीं, सांथीनंतर जुन्या मुंबईचा संहार करून नूतन मोहमयी मुंबई बांधण्याकरितां विलायतेंतील हजारों भांडवलवाले तयार झाले होते. परंतु त्या वेळीं निरनिराळया जातींच्या पुढाऱ्यांनीं पुढें सरून सरकारास स्पष्टकळविलें कीं "आह्मांला परकी लोकांचा पैसा नको. मरकीच्या प्रसंगीं आह्मीं आपल्या ज्ञातीकरितां स्वतंत्र हास्पिटलें स्थापून आपल्या स्वतःच्या पायांवर उभें राहण्यांत किती फायदा आहे, ऐक्याचें बळ केवढें आहे, याचा पूर्ण अनुभव घेतला आहे. यास्तव ज्या ज्या लत्त्यांत ज्ञातीची विशेष वस्ती आहे, तेथें तेथें त्या ज्ञातीचे लोक आपापसांत भांडवल जमवून आपापल्या धर्मास, सोईस आणि रीतीरिवाजांस अनुसरून घरें बांधूं."

बोलनच हे लोक स्वस्थ बसले नाहींत. लवकरच त्यांनीं करूनहि दाखविलें. पंचवीस पंचवीस रुपयांचा एकेक शेअर असे हजारों शेअर काढून लाखों रुपयांचें भांडवल जमविलें. हजारों गरीबलोकांनींहि ते खरेदी केले. शेअरांची विक्री झपाट्यानें होण्याकरितां सरकारच्या परवानगीनें 'डरबी' सोडतीप्रमाणें त्यांत सोडतीचाहि भाग ठेविला व त्यामुळें कैक लोकांचें भाग्यहि उघडलें. सगळ्या गोष्टींत पुढें सरसावलेल्या आमच्या पारशीभाईंनीं, आपल्या ज्ञातीकरितां घरें बांधण्यासाठीं कंपनी उभी करण्यांत आघाडी मारिली; त्यांच्यामागून भाटे, खोजे, बोहरी, मुसलमान इत्यादि ज्ञातींनींहि या गोष्टीचें अनुकरण केलें.

पारशी, मुसलमान, भाटे वगैरे ज्ञाती आपापलें कर्तव्य बजावून मोकळ्या झाल्या, तत्रापि आत्मघातकी, मत्सरग्रस्त, स्वाभिमानशून्य, आणि जगांत ओंवाळून टाकण्याच्या योग्यतेचा दक्षिणीसमाज बरींच वर्षे घोरत पडला होता. जणों त्याच्यांतील चैतन्य नष्ट झालें होतें ! परंतु ऑ. चंदावरकर, ऑ. डा. भाटवडेकर, ऑ. खरे प्रभृति वक्त्यांनीं कंठशोष करून, प्रभाकर, इंदुप्रकाशप्रभृति वजनदार वर्तमान-पत्रकारांनीं एकसारखा लेखांचा भडिमार करून व आनरेबल मेथा, वाच्छा इत्यादि पारशी गृहस्थांनीं दाक्षिणी लोकांच्या तोंडांत शेण घालून त्यांनां जागें केलें, व सर्वांमागून बऱ्याच वर्षांनीं दक्षिणी लोकांनांहि आपल्या ज्ञातीकरितां घरें बांधण्याची एक कंपनी उभारली.

तात्पर्य, मुंबईच्या एकंदर रंगरूपांत जमीनअस्मानाचा फरक पडला. जुनेपणा नाहींसा होऊन तिच्यांत सर्वच नवीनपणा दिसूं लागला. निरनिराळ्या ज्ञातींतील गरीब आणि मध्यम स्थितींतील हवाशीर घरांसंबंधीं होत असलेले हाल नाहींतसे होऊन गरिबांपासून तों श्रीमंतां-पर्यंत यच्चयावत् सर्वांस सुरेख आणि प्रकृतीस हितकारक अशी हवाशीर जागा मिळूं लागली. या नूतन घरांतील स्वच्छ हवेमुळें मुंबईच्या लोकांच्या अंगीं विलक्षण जोम दिसूं लागला व हे लोक सर्व गोष्टींत बरेच पुढें सरसावले.

हीं नूतन पद्धतीवरील टुमदार, हवाशीर आणि रमणीय घरें लोकांनां फार पसंत पडून त्यांच्या भाड्याचें उत्पन्न कंपन्यांस अटकळी-पेक्षांहि विशेष मिळूं लागून दिवसेंदिवस त्यांची भरभराटच होऊं लागली. या एका साहसांत अतोनात यश मिळाल्यामुळें नवीन नवीन साहस करण्याविषयीं ज्याच्या त्याच्या मनाची प्रवृत्ति होऊं लागली व उठलासुटला तो नवीन कंपनी स्थापूं लागला.

भाडेकरी मनुष्यांस सुख झालें, भांडवलवाल्यांसहि फायदा मिळाला, अर्थात्, अनायासें परमार्थसाधन घडून स्वार्थ साधूं लागला, त्यामुळें दुसऱ्या कित्येक आवश्यक गोष्टींचे पुरवठ्यासाठीं लहानलहान किंमतीच्या

शेअरांच्या को-आपरेटिव्ह आणि जॉइंट स्टॉक कंपन्या निघून आपापले ज्ञातीला धान्य, तूप लांकूड वगैरे जिन्नस माफक किंमतीनें पुरविण्याचीं कोणी दुकानें काढलीं, कोणीं कापडाचीं काढलीं व कोणीं चहा, साखर व स्टेशनरी वगैरे जिनसांचीं उघडलीं. शेअरहोल्डर लोक यात्र दुकानांतून घरखर्चास लागणाऱ्या वस्तु विकत घेऊं लागले व यामुळें त्यांस जिन्नस स्वस्त मिळून शिवाय भांडवलावरहि व्याज मिळूं लागलें. कंपनीची विक्री झपाट्यानें होऊं लागल्यामुळें तिला फायदाहि चांगला पडूं लागला. एवंच, गिऱ्हाइकांसहि आनंद आणि भांडवलवाल्यांसहि आनंद झाला.

मरकीच्या भयानें मुंबईंतले व्यापारी आणि कारागीर लोक थोड्या दिवसांकरितां ह्मणून जे बाहेरगांवीं पळून गेले होते, त्यांनीं, मरकी आतां लवकर बंद होत नाहीं असें पाहून, त्या त्या गांवीं आपापले व्यापारधंदे चालू केले. कित्येक मिलवाले पळाले होते त्यांनीं तिकडेच गिरण्या उभारल्या. छापखानेवाल्यांनीं आपले छापखाने तिकडेच सुरू केले व कारागिरांनींहि आपला धंदा तिकडेच चालविला. व्यापाऱ्यांनीं आपल्या भांडवलाच्या जोरावर धूमधडाक्यानें व्यापार सुरू केला. ते पुन्हा कांहीं मुंबईस आले नाहींत. यामुळें त्या त्या गांवाचें, आसपासच्या खेड्यापाड्यांचें आणि गरीब लोकांचें नशीब उघडून सर्वत्र सुखच सुख आणि उद्योगच उद्योग दृष्टोत्पत्तीस येऊं लागला. बाहेरचे गांव संपन्न झाले व त्या योगें मुंबईंतहि पूर्वीपेक्षां लक्ष्मी जास्त विलास करूं लागली.

"मुंबईंत पाप फार वाढलं, सत्याचा नाश झाला, सगळे देवास विसरले, म्हणूनच तो कोपून आम्हांला असें शासन करित आहे," अशा प्रकारचा जो एक समज मरकीच्या वेळीं सर्वत्र झाला होता व हिंदुलोक आपापल्या पवित्र मंदिरांमधून, पारशीलोक आपल्या अग्यारींमधून, मुसलमान मशिदींमधून आणि ख्रिस्ती लोक भजनालयांमधून देवास नानापरीनें आळवूं लागले होते, त्याची करुणा भाकूं लागले होते, क्षमा मागत होते व आपापल्या समजाप्रमाणें त्याला संतुष्ट करण्यास झटत होते, तो प्रकार कित्येक फाजील शहाण्या

लोकांच्या मतें योग्य असो वा नसो, पण त्याचा परिणाम असा घडला कीं, स्त्रीपुरुष, श्रीमंतगरीब, लहानथोर, विद्वान्‌अविद्वान् या सर्वांचे एकदम डोळे उघडले, भ्रमपटल दूर झालें व आजपर्यंत सर्वजण धर्माविषयीं जी उदासीनवृत्ति स्वीकारून होते ती एकदम दूर लोटून अत्यंत काळजी बाळगूं लागले. आपण जर आपापल्या धर्मतत्त्वांस धरून राहिलों असतों तर आपल्यास आज अशी दशा येती ना, हा सारा धर्मभ्रष्टतेचाच परिणाम होय, असें प्रत्येकास वाटूं लागलें.

जनसमूहाच्या मनावर वरील गोष्ट पूर्णपणें ठसल्यामुळें सर्व लोकांनीं एकविचारें धर्मोन्नतीचे उद्योग आरंभिले. प्रत्येक शाळेंतून, हायस्कुलांतून आणि कॉलेजांतून धर्मशिक्षण देण्याची व्यवस्था केली. जागजागीं धर्मोपदेशक नेमिले. आर्यसमाज, आर्यधर्मरक्षक मंडळी, वगैरे धार्मिक संस्थांचा महान् उत्कर्ष झाला. त्यांच्या गांवोगांवीं शाखा, उपशाखा झाल्या व एकंदर लोक आपापल्या धर्माप्रमाणें वागूं लागले. आर्यलोक वैदिक धर्मानुसार वागूं लागले, नित्य होमहवन करूं लागले व त्यायोगें हवा शुद्ध होऊन त्यांच्या प्रकृतीहि निरोगी आणि तेजःपुंज दिसूं लागल्या.

होळीबद्दल जे मूर्ख लोक हंसत असत, आर्यधर्माची थट्टा करीत, त्यांचे, प्लेगच्या वेळीं प्रत्येकानें घरोघर पेटविलेल्या होळीमुळें हवेंत झालेल्या चमत्कारिक फेरफारानें डोळे उघडले व होळी करणें हें धर्मदृष्ट्या असो वा नसो तथापि आरोग्यदृष्ट्या तरी खात्रीनें हितकर आहे असें त्यांनां कबूल करावें लागलें, व त्यामुळें सर्वांची पक्की खात्री होऊन चुकली कीं, आपल्या पूर्वजांनीं आपल्यास जे जे ह्मणून रिवाज घालून दिले आहेत ते फार दूरवर विचार करूनच दिले आहेत, व त्याप्रमाणें आपण वागणें यांतच आपलें कल्याण आहे. इत्यादि इत्यादि अनेक गोष्टी प्रत्येकाच्या मनावर या मरकीमुळेंच ठसल्या व त्याचा एकंदरींत फार हितकर परिणाम घडला.

आमचें स्वप्न अजूनहि चालू होतेंच. ट्रेन एकेक स्टेशन खलास करून नाला सोपारा स्टेशनावर आली व मघांच्या त्या तुफानी बार्कसापैकीं शिल्लक असलेला एकजण मोठ्यानें ओरडला " ताते! चालो अठां, तमे भाडेचा घेर खालीं करो. इस्टेचन आला ! "

पारशी बंधूच्या ह्या विनोदपर भाषणानें आह्मी एकदम खडबडून जागे झालों व गाडींतून उतरून मनांत परमेश्वराचे अनंत आभार मानित बिऱ्हाडाच्या रस्त्यास लागलों.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं, नवांच्या ट्रेनमधून येतेवेळीं, कालचे वाणियाकाका वांद्र्याच्या स्टेशनावर पुन्हा भेटले. त्यांनां आह्मीं आमच्या स्वप्नाची हकीगत निवेदन केली. ती ऐकून, जणों खरोखर तसें घडलेंच अशा आनंदानें काका ह्मणाले " भाई, परमेश्वर तुझें स्वप्न सफळ करो ! जें जें तूं स्वप्नांत पाहिलेंस तें तें तुला तुझ्या डोळ्यांनीं दिसेपर्यंत देव तुला वांचवो ! अगदीं सगळें जरी नाहीं, तथापि त्यांतील निम्मेशिम्मे भाग तरी तूं खात्रीनें पाहशील व तेव्हां माझी आठवण काढशील कीं, ह्यातारा वेणिशंकर काका सांगत होता तें खरें होतें! तूं तर अजून तरुण आहेस. ईश्वराची अगाध लीला तूं जाणत नाहींस. मीं या दुनियेमध्यें आणि संसारामध्यें अशीं असंख्य कौतुकें पाहिलीं आहेत कीं, मति गुंग होऊन जाते. जगामध्यें आपल्या डोळ्यांनां प्रथमदर्शनीं अहितकारक असें जें जें कांहीं दिसतें, त्याचा अखेरीस चांगलाच परिणाम घडत असतो, याबद्दल माझ्या मनाची तर पक्की खात्री होऊन चुकली आहे. विचारी पुरुषानें आपल्या स्वत:चेंच चरित्र सूक्ष्म दृष्टीनें ताडून पाहिल्यास त्याला स्पष्ट दिसून येईल कीं, त्याच्यावर आजपर्यंत जीं जीं ह्मणून विघ्नें आणि संकटें कोसळलीं असतील त्यांचें अखेरीस त्याला कांहींना कांहींतरी चांगलेंच फळ मिळालें असेल. उदाहरणार्थ माझी हकीगत पहा ! "

असें ह्मणून त्यांनीं आपली हकीगत पुढीलप्रमाणें सांगितली. काका ह्मणाले " माझा बाप अब्रूदार आणि मोठा श्रीमान व्यापारी असून

मी त्याचा नवसांनीं झालेला एकुलता एक मुलगा होतों. बापानें माझे लाड करण्यांत मुळींच बाकी ठेविली नव्हती. बाळपणीं माझ्यासारखें सौख्य दुसऱ्या कोणीं क्वचितच भोगिलें असेल! सर्व लोक मला मोठा भाग्यशाली समजत. पण हें माझें भाग्य लवकरच नष्ट झालें! माझ्या वयास नुकतें कोठें तेरावें वर्ष लागत आहे, तोंच माझ्या बापास व्यापारांत भयंकर चट्टा बसून त्याचें दिवाळें वाजलें. अब्रू आणि पैसा एकाच तडाक्यासरशीं नाहींशीं झाल्यामुळें त्याला अतिशय खेद झाला व त्या दुखांतच त्याचा अंत झाला. माझी स्थिति फार शोचनीय झाली. मी असा अनाथ आणि उघडा पडलेला पाहून सर्वांनां माझी फार दया आली, व ते ह्मणूं लागले—आणि मला सुद्धांहि वाटूं लागलें कीं, ईश्वरानें मजवर हा अगदीं कहर केला. माझ्या पोरवयाची सुद्धां त्याला मुळींच दया आली नाहीं! परंतु भाई, देवानें त्यावेळीं जें कांहीं केलें, तें अगदीं योग्य आणि माझ्या हिताचेंच केलें, असें मला आतां वाटत आहे व त्याबद्दल प्रत्यहीं मी त्याचे आभार मानित आहें. माझ्या पित्यानें माझे फाजील लाड केलें असल्यामुळें मी अगदीं बहकून गेलों होतों व दैवयोगात् माझा पिता माझ्याकरितां पुष्कळ पैसा ठेवून माझ्या तरुणपणीं मरण पावता, तर खचित तो पैसा मीं कुमार्गामध्यें खर्चून माझी दुर्दशा करून घेतली असती. जगाचा मला यत्किंचितहि अनुभव मिळाला नसता. 'माठूं थाय ते सारांने काजे' अशी आमच्या गुजराथींत एक ह्मण आहे. तिचा अर्थ हा कीं, वाईट होतें ते चांगल्याकरितांच; आणि याचा दुसरा अनुभव मला माझ्या धंद्यांत मिळाला. माझ्या पित्याच्या एका भल्या मित्रानें, माझी निराधार स्थिति पाहून मला आपल्या पेढीवर गुमास्त्यादाखल नोकरीस ठेविलें होतें. या ठिकाणीं मला व्यापारधंद्यासंबंधीं बरीच तालीम मिळाली. माझ्या वयास विसावें वर्ष लागण्याच्या सुमारास दुर्दैवानें तो भला गृहस्थ एकाएकीं मरण पावला व बापामागून मुलाच्या हातीं कारभार आला; परंतु तो गडी चैनी असून त्याचें व्यापारांत फारसें

लक्ष्य नव्हतें. बाप मरतांच व्यापारधंदा बंद करून रोकड पैसा गोळा करून तो स्वदेशीं निघून गेला. परंतु ती गोष्ट माझ्या पथ्यावर पडली. माझ्या यजमानाची पेढी बंद झाल्यामुळें, दुसरीकडे कोठें भिकार नोकरी न पाहतां मीं अल्प प्रमाणावर स्वतंत्र व्यापार करण्यासच सुरुवात केली. हळुहळू देवानें मला माझ्या व्यवसायांत हात दिला व कित्येक चढतीपडती पाहून आज देवदयेनें मी दोन पैशांनीं सुखी आहें. माझ्या पित्यानें बाळपणामध्येंच आमच्या एका श्रीमान् नातलगाच्या मुलीशीं माझ्या सोयरिकीची खटपट चालविली होती; परंतु त्याच्या अकाल मृत्युमुळें ती गोष्ट तेवढ्यावरच राहिली. ज्याच्या मुलीशीं माझी सोयरीक ठरलेली होती त्या गृहस्थाला एका महत्त्वाच्या कामीं माझा पिता उपयोगीं पडला असल्यामुळें तो आमच्या उपकारांखालीं होता. यामुळें मला वाटत होतें कीं, तो मागली गोष्ट स्मरून मला आपला जांवई करील व माझ्या धंद्यांत मला हातभार लावून माझी स्थिति सुधारील; परंतु तो बापडा माझ्याकडे अगदीं पाठ फिरवूनच बसला ! घाई घाई करून एका श्रीमान् कुटुंबामध्यें त्यानें आपली मुलगी खपविली व तो मला पार विसरून गेला. परंतु त्यामुळें माझें नुकसान न होतां उलट कल्याणच झालें ! त्याची मुलगी अशिक्षित, हट्टी आणि बापाच्या फाजील लाडांनीं बहकलेली होती. शिवाय, नेहमीं सासऱ्याच्या कह्यांत रहावें लागणार असल्यामुळें या लग्नानें माझा संसार बिलकूल सुखावह झाला नसता. त्याचप्रमाणें स्वतंत्रपणें आणि स्वकष्टानें पुढें येण्याची जी दुर्मिळ संधि मला प्राप्त झाली, तीहि मिळाली नसती. धंद्यामध्यें बरकत पावून दोन पैसे गांठीं केल्यावर, आमच्या ज्ञातीपैकींच एक शिकलेली, समंजस, सद्गुणी आणि सुंदर मुलगी देवदयेनें मला आढळली. तिच्याशीं विवाह करून मी आज आनंदानें संसारसुख उपभोगित आहें. असे एक का दोन, किती ह्मणून सांगूं ? हजारों हजार अनुभव मीं स्वतः अनुभविले आहेत व दुसऱ्यांनीं अनुभविलेले माझ्या डोळ्यांनीं पाहिले आहेत; आणि त्यामुळें माझी पक्की खात्री होऊन चुकली आहे कीं,

कांहीं तरी भयंकर प्रसंग ठेपलेला पाहतांच मनुष्यानें धीर सोडून एकदम घाबरून न जातां ईश्वरावर सर्व भरिभार घालावा, त्याच्यावरच विश्वास ठेवावा, सन्मार्गानें चालावें आणि त्यानें आपल्यास जी कांहीं थोडीथोडकी बुद्धि दिली असेल तिच्या सहाय्यानें प्रसंगांशीं टक्कर देत राहून आपली स्थिति सुधारण्याविषयीं रात्रंदिवस एकसारखी मेहनत करावी. ह्मणजे परिणाम खात्रीनें चांगलाच होईल. तूं अझून तरुण आहेस, तेव्हां कदाचित् मी सांगतों हें तुला कांहींसेंच वाटेल; ह्मातान्यानें आपलें कांहींतरी चऱ्हाट लाविलें आहे असें तूं समजत असशील; पण कांहीं कालानें तूंच माझी आठवण काढशील. ईश्वर तुझें कल्याण करो व तुला चांगली बुद्धि देवो. ”

असा आशीर्वाद देऊन काका उतरले व आह्मीहि आमच्या कामाला चालते झालों.

# बिचारी आनंदीबाई.

सुमारें पंचवीसतीस वर्षांमागें, मुंबई शहरामध्यें विष्णुपंत या नांवाचे एक गृहस्थ राहत असत. त्यांचा विलायत, चीन, सिलोन वगैरे देशांशीं मोठा व्यापार चालत असून, सालाची प्राप्तीहि बरीच मोठी होती. पांचपन्नास माणसांचा चरितार्थ त्यांच्या जिवावर चालत असे. विष्णुपंतांची पत्नी आनंदीबाई, ही मोठी समजुतदार आणि भल्या स्वभावाची बायको होती. तिचें आपल्या नवऱ्यावर अतोनात प्रेम असे व विष्णुपंतहि आनंदीबाईच्या अगदीं अर्ध्या वचनांत वागत. घरामध्यें देवदयेनें कित्येक चाकरनोकर खपत असतांनाहि, त्यांनीं घरचें बहुतेक कामकाज स्वतःच करावें व धनीण काम करते हें पाहून चाकरांनीं लज्जित होऊन आपापलें काम विशेष काळजीनें करित असावें. कित्येक अभिमानी स्त्रियांप्रमाणें हरएक क्षुलकहि काम आनंदीबाई चाकर लोकांस फरमावित नसत. श्रीमंतीच्या फाजील आणि मूर्खपणाच्या तोऱ्यानें मुळींच न वागतां त्या अगदीं साधेपणानेंच वागत असत.

आनंदीबाईंनां शांताराम आणि कमळा या नांवांचीं दोन सुंदर मुलें होतीं. या लेंकरांवर उभयतां नवराबायकोचा सारा जीव असे. दोन्हीहि मुलें ज्याप्रमाणें अत्यंत देखणीं होतीं, त्याचमाणें त्या उभयतांचें बोलणेंचालणेंहि मोठें मनोहर आणि गोड असे. त्यांनां पाहतांच कोणाच्याहि मनांत सहज प्रेम उत्पन्न व्हावें, अशी कांहीं अलौकिक शक्ति त्यांच्या ठायीं होतीं. वाडीमधील लहानथोरांचीं तीं आवडतीं झालीं होतीं. सगळींजणें मोठ्या कौतुकानें त्यांचे लाड करीत, त्यांनां अंगाखांद्यावर नाचवीत, खेळवीत, व खाऊ वगैरे आणून देऊन खुष करीत.

पंधरावीस वर्षें, विष्णुपंत आणि आनंदीबाई या उभयतांनीं पुष्कळ सुख उपभोगिलें. या अवकाशामध्यें दुःख ह्मणजे काय असतें

हें त्यांनां मुळींच समजलें नाहीं. जे जे लोक त्यांची ही स्थिति अवलोकन करीत, ते ते मनाशीं ह्मणत " खरोखर ! विष्णुपंतांसारखे पुण्यवान् प्राणी फारच थोडे ! "

पण, सगळेच दिवस सारखे जात नसतात. हिंवाळ्यामागून उन्हाळा, आणि उन्हाळ्यामागून पावसाळा, ही परंपरा नेहमीं चालावयाचीच ! बिचारे विष्णुपंत, या नियमाला अपवादक थोडेच होणार ! जगरीती-प्रमाणें एकदिवस त्यांच्यावर सुखाची छाया नष्ट होऊन एकाएकीं दुःखाचें वादळ कोसळलें. त्यांनां व्यापारामध्यें मोठी ठोकर बसली. परदेशांत लढाई सुरू झाल्यामुळें कापसाचा भाव एकदम अतोनात घटला व त्यांत त्यांनां पांच लक्षांवर बूड सोसावी लागली. परंतु विष्णुपंतांची दानत चांगली असल्यामुळें त्यांनीं सगळया देणेदारांचें पैनपै देणें वारून टाकिलें व असें करतांना त्यांच्यापाशीं असलेली सारी इस्टेट—आनंदीबाईच्या अंगावरील एकूणएक डागिन्यांसुद्धां—फडशा झाली.

असा दुर्धर प्रसंग गुदरल्यामुळें विष्णुपंतांस शंभर रुपये दरमहाचें घर सोडून द्यावें लागून कांदेवाडींतील एका सामान्य चाळींत, सात रुपये भाड्याचे खोलींत येऊन रहावें लागलें. काय करील बिचारा ! आलेले दिवस कसे तरी लोटले हे पाहिजेतच ! सगळ्या नोकरचाकरांसहि त्यांनीं रजा दिली होती, हें आणखी निराळें सांगण्याची गरज नाहीं. ते श्रीमंतीच्या थाटानें व गृहस्थीबाण्यानें आजपर्यंत वागत आलेले, त्यांनां अशा स्थितीमध्यें राहणें किती अवघड वाटलें असेल ! वारंवार त्यांची छाती भरून यावी, दुःखाचे उमाळ्यांवर उमाळे यावे व अश्रु-प्रवाह सुरू व्हावा. परंतु,भल्या स्वभावाच्या आनंदीबाईनीं नेहमीं आपल्या प्रिय पतीचें शांतवन करावें, त्याला धीर द्यावा व मधुर आणि प्रेमळ भाषणानें त्याचें दुःख दूर करावें.

अशा शोचनीय स्थितीमध्यें हीं नवराबायको आपले दिवस मोठ्या कष्टानें घालवित असतां, त्यांना अगदीं जीवप्राण असलेली त्यांची आव-डती मुलगी कमळी एकाएकीं देवी येऊन फार आजारी पडली व त्यांनीं

जीवापाड मेहनत घेऊन पुष्कळ औषधोपचार केले असतांहि त्यांचा कांहीं-एक उपयोग न होतां ती बापडी त्यांनां दुःखी करून चालती झाली !

अरेरे ! या दुर्दैवी दंपत्याच्या दुःखामध्यें ही जी आकस्मिक आणि अपरिहार्य वृद्धि झाली, ती केवढी करुणाजनक आणि हृदयभेदक होती ! पैशापेक्षांहि आपल्या सुंदर आणि गुणी मुलीच्या मृत्यूचें दुःख त्यांनां शतपट अधिक वाटलें ! चोहोंकडून दुःखाच्या ज्वालांनीं होरपळून गेलेल्यावर आणखी जशी अवचित वीज कोसळावी, तसें त्यांनां या वेळीं झालें. या प्रसंगीं आनंदीबाईनीं आपलें मन घट्ट केलें नसतें, तर या हतभाग्य कुटुंबाची आणखीहि काय विटंबना झाली असती, वर्णवत नाहीं ! बापड्या विष्णुपंतांच्या मनाची स्थिति एवढी नाजूक झाली होती कीं, ते दुःखसागरांत पार बुडून गेले होते ! या प्रसंगीं आनंदीबाईच्या जागीं विष्णुपंतांप्रमाणेंच कोंवळ्या मनाची आणि कमी धिराची कोणी दुसरी स्त्री असती, तर खरोखर हें हतभाग्य कुटुंब, दुःखाच्या पर्वताखालीं एकदम दबून गेलें असतें. समंजस आणि सद्गुणी स्त्रीची परीक्षा अशा प्रसंगींच होते.

विष्णुपंत आणि आनंदीबाई यांनीं जीं पंधरावीस वर्षे सुखामध्यें घालविलीं होतीं, तीं त्यांनां दहा घटकांएवढींहि भासलीं नाहींत; पण आतांचे हे तीनचार महिने, शंभर वर्षांहूनहि जास्त वाटूं लागले. विचारी स्वभावाच्या आनंदीबाईनीं वारंवार आपल्या प्रिय पतीस बोधाच्या दोन गोष्टी सांगून धीर द्यावा. त्याच्याजवळ बसावें व प्रेमयुक्त भाषणानें त्याचें शांतवन करावें. विष्णुपंत फारच दुःखी होऊं लागले ह्मणजे दुसऱ्या कोणाच्या तरी स्थितीचा दाखला देऊन त्याहून आपली स्थिति बरी आहे, असें त्यांच्या मनांत भरवावें व ह्मणावें "गडे, कोणाहि माणसाचे सगळे दिवस कांहीं सारखे जात नसतात. सुखामागून दुःख आणि दुःखामागून सुख, असं रहाटगाडगं नेहमीं चालत असायचंच ! दुःख येतं त्या वेळीं तें एकामागून असं एकसारखं येत असतं. दुःखाचा एक दिवस सुखाच्या शंभर दिवसांहूनहि मोठा भासतो. यास्तव,

आपल्यावर गुदरलेल्या दुःखापासून आपण आणि त्याचप्रमाणें लोकांनींहि धडा घेतला पाहिजे, कीं, देव ज्या वेळीं आपल्याला चांगले दिवस दाखवितो, आणि ज्या वेळीं आपल्या घरीं धनदौलत विपुल असते, त्या वेळीं आपण उन्मत्त होतां कामा नये, व श्रीमंतीच्या तोऱ्यानं आपण चढून जातां कामा नये. कारण, आपण दहा किंवा वीस वर्षं सुखांत, चैनींत राहूं. पण एखादे वेळीं फक्त एकच वर्ष असं एखादं भयंकर दुःख येऊन कोसळेल कीं, शंभर वर्षांचं सुख त्यापुढं कस्पटाप्रमाणं भासेल! यासाठीं देवावरच सर्व भरिभार घाला. त्यालाच आपली करुणा येईल व तोच आह्मांला पुन्हा चांगले दिवस दाखवील."

असें बोलतांना आनंदीबाईचे डोळे भरून यावे, कंठ गहिंवरून यावा व अंतःकरण सद्गदित व्हावें. विष्णुपंतांनीं तर डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा सोडित केंविलवाणी मुद्रा करून कपाळावर हात मारून घ्यावे. आईबापांची ही शोकजनक स्थिति पाहून बिचारा अल्पवयी पोर शांताराम, यानेंहि दीनस्वरानें एकसारखें रडत असावें. अरेरे! या हतभाग्य कुटुंबाची त्या वेळची ती स्थिति कोणाच्यानें पाहवली असती! असा पाषाणहृदयी कोण असेल, कीं, त्यांच्या स्थितीची कल्पना होतांच ज्याच्या अंतःकरणास द्रव येणार नाहीं!

अशा दुःखांत कांहीं दिवस घालविल्यावर, मुंबईत मुळींच चैन पडेना ह्मणून त्यांनीं आपल्या आयुष्याचे बाकीचे दिवस गोंव्यामध्यें आपल्या मूळ गांवीं जाऊन कंठावे असा निश्चय केला व त्याप्रमाणें मुंबईतली एकंदर थारवाथारव करून एक दिवस आगबोटींत बसून तीं गोंव्यास येऊन राहिलीं. त्यांनी मुंबई सोडिली, तथापि दुःखांनीं त्यांनां सोडलें नव्हतें. अद्यापहि दुःखाचे पुष्कळ पर्वत त्यांच्यावर कोसळावयाचे बाकी राहिले होते. नहमीं उदासीन वृत्ति आणि अति शोक यांनीं विष्णुपंतांच्या कोंवळ्या मनावर फारच वाईट परिणाम केला. गोंव्यांत आल्याला थोडे दिवस लोटले नाहींत तोंच त्यांनां क्षयाची व्याधि जडली व ते अंथरुणावर पडले.

क्षयाचें दुखणें असें कांहीं दुष्ट आहे कीं, त्यानें एकदा कोणास मिठी मारिली म्हणजे मग तुम्ही कितीहि औषधें आणि हवे ते उपाय करा, तें म्हणून ढळणार नाहीं. बापड्या विष्णुपंतांची अशीच स्थिति झाली. गोंवें प्रांतांतील मोठमोठ्या नामांकित वैद्यांनीं आपली शिकस्त केली, पण व्यर्थ! दिवसेंदिवस व्याधि बळावतच चालली. पोटांत अन्न जाईना, व हातापायांस सूज चढली.

आतां तर आनंदीबाईच्या दुःखास सीमा राहिली नाहीं. चोंहींकडून दुःखाच्या भयंकर तावडींत ती बिचारी गरीब गाय सांपडली. तिच्यावर एवढा भयंकर प्रसंग कोसळला होता, तरीहि त्या माउलीनें धीर म्हणून सोडला नाहीं! तिनें अंतःकरण दगडाहूनहि घट्ट करून नवऱ्याच्या औषधांत आणि पथ्यपाण्यांत काडीएवढें उणें पडूं दिलें नाहीं. रात्रबेरात्र नवऱ्याच्या बिछान्याशेजारीं जागत बसून मनोभावानें ती त्याची शुश्रूषा करी. नवऱ्याच्या पोटांत पैसाभर अन्न गेलें म्हणजेच त्या माउलीच्या जिवाला आराम व्हावा. नवऱ्यानें घांसभर तरी अन्न खाल्ल्याशिवाय ती साध्वी एक दिवसहि पाण्यासदेखील शिवली नाहीं! खरोखर, आनंदीबाईसारख्या पतिसेवानिष्ठ स्त्रिया फार विरळा. पण हाय हाय! बापडीच्या एवढ्या प्रयत्नांस आणि एवढ्या काळजीस देवानें यश दिलें नाहीं, ही फार दुःखाची गोष्ट होय!

आपण आतां अगदीं थोड्याच वेळाचे सोबती, अशी विष्णुपंतांच्या मनाची खात्री होतांच ते एक दिवस आनंदीबाईच्या गळ्यास घट्ट मिठी मारून एकसारखे ढळढळ रडूं लागले. तें पाहून आनंदीबाईसहि रडूं कोसळलें. विष्णुपंत अति दीन मुद्रा करून करुणस्वरानें म्हणाले "जिवलगे, आतां मी लवकरच तुम्हांला टाकून जाणार आहें. तूं माझी चाकरी करण्यांत आणि मला सुख होईल अशा रीतीनें वागण्यांत खरोखर कांहींच बाकी ठेविली नाहींस. परंतु माझ्या फुटक्या नशिबामुळें त्याचा उपयोग झाला नाहीं! तूं मजवर अतोनात प्रेम करित होतीस. मेल्यावर सुद्धां तुझें हें प्रेम मी कधींहि विसरणार नाहीं. अरेरे! माझ्या आवडत्या

बाळाला आणि तुला मी आतां अंतरणार ना ? आनंदी ! तूं माझ्यासाठीं केवढी खस्त खाल्लीस ? आपल्या जिवास केवढा त्रास सोसलास ? देवानें सर्वांस तुझ्यासारखीच भली बायको द्यावी. देव तुझें कल्याण करील. मी कपाळकरंटा तुमच्या पोटापाण्याची कांहींएक तजवीज केल्याशिवाय तुह्मांला अशा निराधार स्थितींत सोडून जात आहें. मला याबद्दल मोठें दुःख होतें, पण काय करूं ? तुमची पुढें होणारी स्थिति मनांत उभी राहतांच काळजाचें पाणी होतें ! माझ्यामागें तुझें आणि या बाळाचें कसें होईल ! तुह्मी कोणाच्या दारीं जाल !"

विष्णुपंतांचा हा अखेरचा शोक ऐकून सर्वांचे डोळे भरून आले. शांताराम तर एकसारखा हुंदक्यांवर हुंदके देऊन मोठमोठ्यानें रडूं लागला. आनंदीबाईहि मोठा आक्रोश करूं लागल्या. कोणी वज्रासारख्या कठोर अंतःकरणाचा निर्दय मनुष्य जरी यावेळीं तेथें असता तरी खचित त्या मुलाचा विलाप आणि त्या अनाथ बायकोचा आक्रोश पाहून, त्याच्या डोळ्यांतूनहि अश्रुधारा वाहल्यावांचून राहिल्या नसत्या. तो प्रसंग खरोखर अत्यंत करुणाजनक होता. बराच वेळ आक्रोश केल्यावर आनंदीबाई सद्गदित स्वरानें ह्मणाल्या "आतां ईश्वरच आमचा वाली आहे ! तोच आमचं रक्षण करील. आपण कष्टी होऊं नका. सुखानं जा— देव आह्मांला सांभाळील— " असे रडत रडत अर्धेमुर्धे शब्द उच्चारीत पुन्हा त्या अतिशयच आक्रोश करूं लागल्या.

त्याच रात्रीं विष्णुपंतांना दुष्ट यमानें उचलून नेलें. बिचाऱ्या आनंदीबाईवर आकाश कोसळलें. तिनें जो आकांत मांडला व तीं मायलेंकरें गाईसारखे जे हंबरडे फोडूं लागलीं, तो एकंदर हृदयद्रावक प्रकार पाहून, जमलेल्या मंडळीच्या काळजाचें पाणी पाणी झालें. त्यांचें समाधान कोणत्या शब्दांनीं करावें हें कोणाएकासहि सुचेना ! आनंदीबाईच्या दुःखास या वेळीं मुळींच पारावार राहिला नाहीं ! जगामध्यें सर्वत्र दुःख—दुःख आणि दुःखच तिला भासूं लागलें.

दोन वर्षांपूर्वी तिची केवढी श्रीमंती होती आणि आज ती बिचारी कोणत्या स्थितींत होती !

ज्या कित्येक बायका, आपल्या श्रीमंतीच्या जोरावर, गाडीघोड्यांच्या दौलतीवर, आणि बागबगीच्यांच्या ऐश्वर्यावर मिजासी बनल्या असतील, हरएक क्षुल्लकहि काम चाकराविना ज्यांनां उरकतच नाहीं अशा बडेजावींत पडल्या असतील, आणि संपत्तीच्या धुंदीमध्यें आपल्या अनाथ बंधुभागिनींच्या दुःखांकडे ढुंकूनहि पाहत नसतील, त्यांनीं हतभाग्य आनंदीबाईच्या दोन वर्षांपूर्वींच्या आणि आजच्या स्थितीकडे नजर पुरवावी. सुखदुःखाचें चक्र, या दुनियेच्या फेऱ्यामध्यें कोणावर आणि कधीं फिरेल याचा मुळींच नेम नाहीं ! तेव्हां त्यांनीं कशासाठीं ह्मणून मिजास बाळगावी ? कशासाठीं आपल्या अनाथ बंधुभगिनींच्या दुःखद स्थितीविषयीं बेफिकीर असावें ? आणि कशासाठीं ह्मणून हरएक क्षुल्लक आणि साधारणहि काम स्वहस्तें करण्यास आपली काया चोरून खोटी पतराजी मिरवावी ?

बापड्या दुःखी आनंदीबाईचें काय झालें ? तिनें वैधव्य आणि दारिद्र्य यांच्या कष्टतर दुःखामध्यें आपली सगळी भिस्त आपल्या एकुलत्या एक मुला—शांतारामा—वर ठेवून ती देवावर हवाला टाकून समाधानवृत्तीनें काळ कंठित राहिली. अखेरीस त्या परम कृपाळू देवालाच तिची दया येऊन त्यानें मुंबईतील तिच्या ज्ञातीच्याच एका श्रीमान् गृहस्थाच्या मनांत करुणा उत्पन्न केली व त्याच्याकडून त्या अनाथ मायलेंकरांस सहाय्य करविलें. त्या दयाळू अंतःकरणी सद्गृहस्थानें त्या उभयतांस आपल्या घरीं ठेवून घेतलें व मुलास इंग्रजी शाळेंत पाठवून त्याच्याकडून चांगला अभ्यास करविला. शांतारामानें आपली स्थिति लक्षांत वागवून रात्रंदिवस झटून मनापासून अभ्यास केला. लवकरच तो इंग्रजी भाषेंत चांगला निष्णात् झाला व पुढें वकिलीची परीक्षा पसार होऊन एक नमांकित वकील निपजला. या धंद्यामध्यें त्यानें प्रामाणिकपणानें अपार दौलत कमविली व आपली

पूर्वस्थिति प्राप्त करून घेऊन, ' देवावर भरंवसा ठेवून राहिल्यास तो आपल्यास कधींहि विसरावयाचा नाहीं ' ही जी आनंदीबाईंची ठाम समजूत, तीस बळकटी आणली. आनंदीबाईंनीं पुन्हा चांगले दिवस पाहिले. बरींच वर्षें वांचून त्यांनीं आपल्या नातवंडांचें कौतुक करित पुष्कळ सुख उपभोगिलें, व एक दिवस शांतचित्तानें मुलाच्या मांडीवर मस्तक ठेवून प्राण सोडला.

वाचणाऱ्या भगिनींनों ! तुम्ही आनंदीबाईच्या या वृत्तांतापासून बऱ्याच गोष्टी ध्यानांत धरा. या दुःखमय मृत्युलोकामध्यें, प्रत्येक मनुष्यावर कमी अधिक मानानें दुःख हें गुदरल्यावांचून रहावयाचेंच नाहीं! या जगामध्यें संपूर्ण सुख कोणालाहि लाभत नाहीं. असें ज्या पक्षीं आहे, त्या पक्षीं स्वतःवर आलेलें दुःख सहन करण्यास प्रत्येकानें राजी असलें पाहिजे. आपल्या शरीरास थोडी अधिक मेहनत देऊन श्रम सोसण्याची त्यास संवय केली पाहिजे. आपल्यापाशीं चाकर नोकर असतांहि घरामधील थोडेंबहुत काम स्वहस्तें करण्याचा प्रघात ठेविला पाहिजे. खोटी पतराजी आणि रिकामा डौल मिरवितां कामा नये. त्याप्रमाणेंच दुःखाच्या दिवसांमध्यें मन घट्ट करून संतोषवृत्तीनें दिवस काढले पाहिजेत. सुख कांहीं सर्वांच्याच दैवीं नसतें. परंतु दुःख मात्र कमीअधिक प्रमाणानें प्रत्येकाच्या ललाटपटलावर खोदलेलें आहे, हें पक्कें ध्यानांत धरावें !

विपत्तीच्या दिवसांमध्यें आपल्यावर संकटाचे पर्वत कोसळले असें वाटूं देतां कामा नये. तर आपल्याहूनहि जे अधिक दुःखी असतील त्यांच्याकडे पाहून मनाचें समाधान केलें पाहिजे. आपल्याहूनहि विशेष दुःख भोगणारे जगांत पुष्कळ आढळतील. त्यांच्याकडे पाहून आपण मनांत ईश्वराचे आभार मानावे कीं, त्यानें आपल्यास त्यांच्याहून किती तरी सुखी ठेविलें आहे ! आपल्यावर ईश्वरीकोपामुळें जें दुःख येऊन पडलें असेल तें आपण आपल्या बेअक्कलीपणानें आणि अविचारानें न वाढवितां कमी करण्याच्या तजविजीस लागलें पाहिजे.

# आनंदकुमारी.

सुमारें चारशें वर्षांपूर्वीची गोष्ट. मुसलमानांचें आणि हिंदूंचें हाडवैर होतें. हिंदूंची पवित्र देवळें, पूज्य देव, प्रिय स्त्रियाभगिनी, भ्रष्ट करण्याचा दुष्ट यवनांनीं सारखा तडाका लाविला होता. या अपमानानें आणि अत्याचारामुळें अत्यंत युद्ध होऊन जुलमी यवनांनां जमीनदोस्त करण्यासाठीं हातावर शीर घेऊन अनेक आर्यवीर बाहेर पडले होते. त्यांतीलच आमचा करुणसिंह हा एक होता.

या सरदारपुत्राच्या अंगीं लोकोत्तर वीरश्री संचरली होती. त्याची छाती आकाशासारखी विशाल आणि सागरासारखी अफाट होती. त्याच्याच वयाचे अनेक क्षत्रियपुत्र जिवावर उदार होऊन त्याच्या सहाय्यास निघाले होते. दुष्ट यवनांच्या नरडीचा घोंट कधीं घेईन, असें प्रत्येकाला झालें होतें! करुणसिंह अगदीं तरुण, वीस वर्षं उमरीचा जवान गडी होता. भय ह्मणजे काय पदार्थ आहे, हें त्याला स्वप्नांतहि ठाऊक नव्हतें. तो असाधारण हिंमतवान होता व यामुळेंच त्याच्या सैन्यांतील एकूणएक शिपाई विलक्षण धाडसी बनले होते.

एके दिशीं सकाळीं करुणसिंह आपल्या तंबूमध्यें एकटाच कांहींसें लिहित बसला असतां, कागदावर पाठीमागून एकदम कसलीशी छाया पडली. त्याबरोबर मान वर करून त्यानें मागें दरवाज्याकडे वळून पाहिलें, तों पंधरासोळा वर्षें उमरीचा, अत्यंत मनोहर असा एक तरुण मुलगा, सांशक मुद्रेनें उभा आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्याचें प्रसन्नमुख आणि पाणीदार नेत्र, यांनीं करुणासिंहाचें मन एकदम आकर्षून घेतलें व जशी एखाद्याची जन्मापासूनच ओळख असते व एकमेकांची दृष्टादृष्ट होतांच उभयतांस प्रेमाचा पाझर फुटतो, तशासारखें कांहीं त्याला झालें. तो बाणासारखा एकदम खुर्चीवरून उठला आणि त्या मुलापाशीं जाऊन ह्मणाला "मित्रा! तुला काय पाहिजे? तूं कां आलास?"

"आपणच सरकार !" तो तरुण कांपत कांपत ह्मणाला. "मला चाकरी पाहिजे !"

"काय, चाकरी ?" करुणासिंह गंभीर स्वरानें ह्मणाला. "माझ्यापाशीं तर तुला देण्याजोगी सध्या एकहि जागा रिकामी नाहीं. बरें, पण तूं काय काम करशील ?"

"मला लिहितांवाचतां चांगलं येतं. मी आपलीं पत्रं वगैरे लिहि—"

"पण सध्या त्या कामावर तर दोन मनुष्य आहेत. आह्माला फक्त शिपाईगड्याचीच जरूरी आहे, आणि तूं तर अगदीं नाजूक दिसतोस. शिपायाचें काम तुला झेपेलसें वाटत नाहीं."

"होय महाराज ! पण मी अगदीं अनाथ आहें. माझा जन्म मोठ्या कुळांत झाला असून सध्या भुकेमुळं माझे प्राण जाऊं पहात आहेत! मला कोणाचाहि आसरा नाहीं. आपण सांगाल तें काम मी इमानेंइतबारें करून सरकारास रात्रंदिवस दुवा देईन." तो मुलगा करुणासिंहाला अगदीं काकळुतीनें सांगूं लागला.

"पण तूं एकला, एवढ्या लांबीच्या पल्ल्यावर, या भयंकर प्रदेशीं कसा बाबा आलास ?"

करुणासिंहाच्या या प्रश्नाचें कांहींएक उत्तर न देतां त्यानें अति दुःखी मुद्रा करून तोंड भूमीकडे केलें.

"हरकत नाहीं, तुझ्यानें तें सांगवत नसल्यास माझा विशेष आग्रह नाहीं. पण तुला कोणतें काम द्यावें ? लष्करांतलें काम तर तुझ्यानें मुळींच व्हावयाचें नाहीं. शिवाय, आतांशा पैशांचीहि मोठी टंचाई झाली आहे. फार जपून वागावें लागतें."

"त्याबद्दल कांहीं काळजी नको सरकार ! मला पगार मुळींच न मिळाला तरी चालेल. फक्त पोटाला देऊन जरी आपण ठेवाल तरीहि मी मोठ्या इमानानं सरकारची चाकरी बजावीन. मला पगारबिगार कांहींएक नको !"

" ठीक आहे. मी तुला माझ्या पगारांतून दरमहा पंचवीस रुपये देईन. तूं सदोदित माझेबरोबरच असावेंस आणि माझें खासगी काम करावें. बरें, तुझें नांव ? "

" आनंदसिंह, महाराज ! "

आणि त्या दिवसापासून हा आनंदसिंह करुणासिंहाच्या पदरीं नोकरीस राहिला. तो जरी नाजूक बांध्याचा होता, तरीहि मेहनती आणि चंचल होता. त्याच्यानें विशेष कष्टाचें काम होत नसे, तत्रापि सर्व गोष्टींत तो करुणासिंहाचें मन हरण करून घेत होता. त्याला कोणतीच गोष्ट उणी पडूं देत नसे. त्याचें हस्ताक्षर मोत्याप्रमाणें सुंदर होतें. स्वभाव उदार आणि थोर होता. अंतःकरण कोमल होतें. थोड्याच अवकाशांत तो करुणासिंहाच्या गळ्यांतला ताईत बनला; एवढेंच केवळ नव्हे, तर लष्करांतील एकूणएक मंडळीचें त्यानें प्रेम संपादून घेतलें.

करुणासिंह अनेक भयंकर लढाया लढला व यवनांस त्यानें पादाक्रांत केलें. हा सर्व वेळपावेतों आनंदसिंह, करुणसिंहाच्या अगदीं सान्निध असे. कित्येक बिकट प्रसंगीं तो आपल्या यजमानाच्या फारच उपयोगीं पडला होता. एकदोनदा तर त्यानें धन्याकरितां आपला जीवहि महान धोक्यांत घातला होता. करुणासिंह हे उपकार मनांत स्मरून असे व त्याबद्दल त्याचे आभार वेळोवेळीं प्रदर्शितहि करी. उभयतां जरी यजमान आणि सेवक होते, तरी करुणसिंह आनंदसिंहाशीं नोकराच्या नात्यानें मुळींच न वागतां जिवलग मित्राच्या नात्यानेंच वागत असे. शिवाय, त्या दोघांचें समवय असून स्वभावांतहि बरेंच साम्य होतें. एकमेकांवांचून उभयतांस एक पळहि करमत नसे !

यवनांची बरीच खोडकी जिरवून सर्वत्र विजय संपादन केल्यावर आपल्यास अनुरूप अशा एखाद्या उपवर क्षत्रियकन्येचें पाणिग्रहण करून संसारसुखाचा लाभ घ्यावा, असें करुणासिंहाच्या मनांत आलें आणि वयपरत्वें तशी इच्छा होणें हेंहि स्वाभाविकच होतें.

एके दिवशीं सायंकाळीं बागेमध्यें सहल करित असतांना जवळपास दुसरें कोणीहि नाहीं अशी संधि पाहून करुणसिंह आनंदसिंहाला ह्मणाला " मित्रा, आज तुला एक गुप्त गोष्ट सांगावयाची आहे, व ती तूं उत्तम प्रकारें बजाविशील, अशी माझी खात्रीहि आहे. "

" मोठ्या खुषीनें महाराज ! आपल्याकरितां तर मीं हा देह आर्पिला आहे. आपलं कोणतंहि बिकट काम प्राणांचीहि यत्किंचित्सुद्धां पर्वा न करितां मोठ्या आनंदानं करण्यास मी एका पायावर तयार आहें. "

" शाबास मित्रा ! " करुणसिंह हर्षभरानें ह्मणाला. " मित्र असावा तर तुझ्यासारखाच असावा. तूं माझा जिवलग मित्र असल्यामुळें ही गोष्ट तुझ्यावरच सोंपवावी असा मीं निश्चय केला आहे. मीं काय सांगणार, हें तूं बहुतेक कळून चुकलाच असशील ! " असें ह्मणून व्याकुल होऊन त्यानें आनंदसिहाच्या गळ्यांत हात घातला. "आनंदसिंहा! काय सांगूं ? माझ्या जिवाला आतांशा मुळींच चैन नाहींसें झालें आहे. कशावरच लक्ष्य लागत नाहीं. स्त्रीसहवासाविना हें जगत् असार होय, असें मला भासूं लागलें आहे. गृहाची स्वामिनी असल्याविना गृहास शोभा कशी बरें येईल ? यासाठीं माझ्या कुलशीलास अनुरूप अशी एखादी सद्गुणी सुस्वरूप कन्या शोधून काढून मला या दुःसह विरहदुःखांतून मुक्त कर. ही नाजुक कामगिरी तुझ्यावांचून दुसऱ्याच्यानें योग्य रीतीनें होणार नाहीं. त्याचप्रमाणें तूंहि तुझ्या योग्य अशी एखादी सद्गुणी कन्या पहा. आपण उभयतां एकाच मुहुर्तावर विवाह करूं व संसार-सुखाचा अनुभव घेऊं. याउपर माझ्यानें आतां मुळींच धीर धरवत नाहीं. एवढें माझें काम तूं जरूर केलें पाहिजे. " असें ह्मणून करुणसिंहानें कामविव्हल होऊन आनंदसिंहाच्या मुखाचें एक चुंबनहि घेतलें.

परंतु इकडे आनंदसिंहाची अवस्था काय झाली होती ! त्याच्या अंगांत सडकून ज्वर भरला, छाती धडधडूं लागली, व गाल रक्तासारखे लाल होऊन तो एकसारखा श्वास टाकूं लागला.

त्याची अशी विचित्र स्थिति पाहतांच करुणसिंह विस्मित झाला. त्याला वाटलें होतें कीं, आपल्या या भाषणानें आपला मित्र हर्षित होईल. परंतु हा असा उलटच प्रकार आढळून येतांच तो अत्यंत आश्चर्यभरित होऊन ह्मणाला " मित्रा आनंदसिंहा ! तुझी मुद्रा आज दुःखी कां बरें दिसते ? "

" क्षमा करा महाराज ! मला आज कसंसंच होत आहे. " आनंदसिंह मोठया कष्टी मुद्रेनें ह्मणाला.

" पण त्याचें कारण ? "

" ती एक लांबलचक आणि कंटाळवाणी कथा होईल. आणि शिवाय मलाहि किंचित् लांच्छन—"

" छट् छट् ! आपण उभयतां प्रिय मित्र असतां तुला संकोच कां वाटतो ? मनामध्यें कसलाहि संकोच न बाळगितां तुझी एकंदर खरी खरी हकीगत मला सांग. तुला माझ्याकडून होईल तेवढें सहाय्य करण्यास मी सिद्ध आहें."

" आपला तसा आग्रहच असेल तर सांगतों." असें म्हणून त्यानें आपल्या वृत्तांतास सुरुवात केली. तो म्हणाला " पार्वती नदीचे तीरीं शिवपुर ह्मणून एक लहानसं नगर आहे. तेथें चतुरसिंह नांवाचा एक शूर सरदार राहत असे. त्यानं लढाईत बराच लौकिक संपादिला होता. भरतपूरच्या दरबारीं त्याचा मोठा मान असे. परंतु क्षत्रियाचं मरण फारच अनिश्चित असल्यामुळं दुर्दैवानं एका लढाईत तो पतन पावला. पतिनिधनाची अमंगल वार्ता कानीं पडतांच त्याच्या पतिव्रता स्त्रीनं अग्निकाष्ठं भक्षण करून नवऱ्याबरोबर सहगमन केलं.

"चतुरसिंह आणि संयोगिता यांची एकुलती एक आणि प्राणांहूनहि प्रिय कन्या आनंदकुमारी, आईबापांच्या अशा अवचित मृत्यूमुळं निराधार झाली ! या वेळीं त्या बापडीचं वय पुरतं नऊदहा वर्षांचंहि नव्हतं. आईबापांच्या पश्चात् तिचं योग्य प्रकारं पालन करण्यास कोणी खऱ्या कळवळ्याचं मनुष्य जवळ नव्हतं. शेवटीं शेजारीपाजारी जमून त्यांनीं

त्या मुलीस तिच्या एका लांबच्या नातेवाईक विधवा बाईच्या हवालीं केली. तिनंहि मोठा कळवळा दाखवून तिच्या एकंदर मालमत्तेसह तिला आपल्या घरीं नेली. त्या बिचाऱ्या अनाथ पोरीचं बालवय आणि पोरपण पाहून तिची बहुतेक जिंदगी त्या दुष्ट विधवेनं लवकरच दूर केली व नंतर त्या मुलीवर ती हवातसा अधिकार गाजवूं लागली. आनंदकुमारीचा तिनं फारच छळ मांडला.

"जसजसे दिवस जाऊं लागले, तसतसं आनंदकुमारीचं लावण्य विकास पावूं लागलं. साऱ्या गांवांत तिच्यासारखी रूपवान् मुलगी दुसरी कोणीहि नव्हती. मुलीचं हें लोकोत्तर लावण्य पाहून विधवेच्या जिभेस पाणी सुटलं. आनंदकुमारीला मागण्यांवर मागण्या येऊं लागल्या. परंतु लोभामुळं ती दुष्ट विधवा कांहीं कबूल होईना. कोणा वृद्ध श्रीमान् वराच्या गळ्यांत ही कन्या बांधून त्याच्यापासून पुष्कळसे पैसे मिळवावे अशा दुष्ट इच्छेनं, ती मुलीचं लग्न लांबणीवर टाकूं लागली. आनंदकुमारीला हा सगळा प्रकार कळून आला, परंतु बिचारी काय करील? तिला दुसरा आसरा कुठं होता?

"अखेरीस एक दिवस त्या कृत्येची फारा दिवसांची इच्छा तृप्त होण्याची महत्पर्वणी आली. विधवेकडे एका वृद्ध सरदारानं आनंदकुमारीविषयीं बोलणं केलं. तो कुलीन होता, कुटुंबवत्सल होता, लाखोपती होता; फक्त त्याची उमर काय ती आनंदकुमारीच्या उमरीच्या चौपटीहून थोडीशी जास्त अर्थात् ७० वर्षांची होती! आनंदकुमारीबद्दल त्यानं मागाल तेवढी रकम देऊं, असंहि सांगितलं. मग विधवेच्या आनंदास काय पारावार विचारायचा! तिला आकाश अगदीं ठेंगणं भासूं लागलं व ती आनंदसागरांत गटंगळ्या खाऊं लागली! परंतु आनंदकुमारीला ही गोष्ट कळतांच तिनं आकांत केला. रडूनरडून आणि आक्रोश करून घरदार हालवून सोडलं. अन्नपाण्यास हातहि लाविला नाहीं. विधवेनं तिला नानाप्रकारं समजाविलं, धमकीहि दिली, परंतु आनंदकुमारी कांहीं केल्या तिच्या ह्मणण्यास मान्य होईना. शेवटीं तिला वठणीवर आणण्याच्या उद्देशानं घरांतून हाकलून

देण्याची विधवेनं धमकी दिली व त्याप्रमाणं एक दिवस घराबाहेर ओढून घातलंहि! बिचारी अनाथ, अभागी पोर, रडत रडत व नशीबाला दूषण देत निघून गेली."

आनंदसिंहाच्यानें पुढें बोलवेना. त्याचा कंठ भरून आला. डोळे पाण्यानें थबथबले व व्याकुळ होऊन तो स्तब्ध राहिला.

"पण तुझी गोष्ट तर अर्ध्यावरच राहिली!" करुणासिंह चकित होऊन ह्मणाला. "त्या मुलीचें पुढें काय झालें व या गोष्टीशीं तुझा काय संबंध पोहोंचतो, तें तर तूं अझून सांगितलेंच नाहींस!"

"घरांतून बाहेर पडतेवेळीं त्या बिचारीपाशीं एक फुटकी कवडीहि नव्हती! आपण जावं कुठं व करावं काय, हें कांहींएक तिला सुचेना. पायांत चालण्याची शक्ति होती तोंपर्यंत ती एकसारखी चालत होती; परंतु पाय थकतांच तेथेंच थोडा वेळ विश्रांति घ्यावी असं तिच्या मनांत आलं. भूकहि सपाटून लागली होती. परंतु तिची शांति व्हावी कशी? भिक्षा मागून पोटाची आग शमवावी, तर तसं करण्याचं धाडस तिला होईना. ती तशीच उपाशीं एका झाडाखालीं निजली. दुसरे दिवशीं सूर्योदय होतांच पुनः वाट चालूं लागली. कसाबसा हाहि दिवस तिनं काढला. परंतु तिसऱ्या दिवशीं तिचा पाय जाग्यावरून हालेना. सर्वांग कांपूं लागलं व अंगांत ज्वरहि भरला. अखेरीस धाडस करून खिन्न वदनानं तिनं चार घरीं भिक्षा मागून क्षुधाग्नीची थोडीशी शांति केली. याप्रमाणं तिनं कांहीं दिवस घालविले; परंतु तिच्या लोकोत्तर लावण्यामुळं, तिला भिकारणीच्या वेषांत अब्रूनं राहतां येणं महान् दुर्घट आहे असं वाटूं लागलं. तिला पदोपदीं अपमान, कठोर शब्द आणि दुर्वाक्यं ऐकण्याचा प्रसंग येऊं लागला, व कित्येक नराधम तर तिचं सतीत्व भ्रष्ट करण्याविषयींहि प्रयत्न करूं लागले. शेवटीं तिला एक युक्ति सुचली. आपण जर हा मुलीचा वेष टाकून देऊन पुरुषाचा वेष धारण केला तर आपली अशी विटंबना न होतां आपल्यास अब्रूनं पोटापुरतं कमावितां येईल, अशी कल्पना तिच्या मनांत आली. लगेच त्याप्रमाणं तिनं केलंहि.

पुरुषाचा एक साधा पोषाख तिनं विकत घेतला. परंतु तिचे कमरेपावेतों लोंबणारे भ्रमरासारखे काळेभोर लांब केश तिला भारी नडूं लागले. कातरीबाईनं तिची तीहि नड दूर केली! तिनं आपले सर्व केश कापून टाकले व एकंदर मर्दानी पोषाख चढवून ती स्त्री होती तिचा एकदम पुरुष बनली!

"पुरुषवेष धारण केल्यावर तिनं बऱ्याच ठिकाणीं नोकऱ्या पत्करल्या. तिला श्रमांचीं कामं पुष्कळ मिळत, परंतु त्या बिचारीकडून तीं बरोबर रीतीनं होत नसत. इकडून तिकडे तिकडून इकडे, ती पुष्कळ दिवस एकसारखी नोकरीकरितां भटकत होती. तिच्या पोटाचे फार हाल होऊं लागले. पुढं तिच्या कानीं आपल्या लष्कराची कीर्ति जातांच महत्संकटांसहि न जुमानतां ती इतका दूरचा पल्ला झेपून इकडे आली."

"इकडे!" करुणसिंह आश्चर्य पावून म्हणाला. "इकडे कुठें? कोणत्या पलटणींत?"

"आपल्याच!" एकदम खालीं मान घालून मृदुस्वरानें त्या वेषधारी आनंदसिंहानें उत्तर दिलें.

"अं! तर मग तूं स्त्री आहेस?" एकदम खांद्यावरून हात काढून परम चकित होऊन करुणसिंहानें प्रश्न केला.

तो अविवाहित होता व किंचित् लाजाळूहि होता. यामुळें आनंदकुमारीनें लज्जेमुळें लाल होऊन खालीं मान घातलेली पाहतांच तोहि एकदम घाबरून जाऊन लज्जित झाला. महिन्यांचे महिने, अशा एका हिंमतवान पण अब्रूदार आणि प्रामाणिक स्त्रीबरोबर, अज्ञानामध्यें, त्यानें एकांतांत दिवस घालविले होते. उभयतां नेहमीं एकाच शय्येवर शयन करित असत. ही गोष्ट ध्यानांत येतांच त्या पापभिरु तरुणाच्या अंतःकरणाचें पाणी पाणी होऊन गेलें! त्याला फार दुःख वाटलें, आश्चर्य वाटलें, दयाहि आली. आनंदसिंहाच्या एकंदर वर्तनांत आणि चालीरीतींत वेळोवेळीं जो नाजुकपणा व सुकुमारता अनुभवास येत असे, त्याचें मर्म त्याला आतां कळून आलें, व त्याच्या मधुर भाषणानें आपण

वेडे होत असूं व अलौकिक सौंदर्यानें लुब्ध होत असूं त्याचें कारणहि कळून आलें व तो महदाश्चर्य पावून बराच वेळ स्तब्ध राहिला.

पुढें काय घडलें तें सांगितलेंच का पाहिजे? बरेच दिवसपावेतों उभयतांचा एकमेकांशीं निकट सहवास घडला असल्यामुळें परस्परांचे गुणदोष परस्परांनां पूर्णपणें कळून आले होते. यामुळें उभयतांचें पूर्वींचेंच प्रेम दृढ होऊन पुढें त्यालाच पतिपत्नीच्या प्रेमाचें स्वरूप प्राप्त झालें. एकाच मुहूर्तावर आणि एकाच लग्नमंडपांत उभयतांच्या मस्तकावर मंगलवाद्यघोषाच्या गर्दीमध्यें पवित्र अक्षतांचा वर्षाव झाला.

# अभागी यमुना.

गिरगांव, मुंबई, सोमवार,

ता० ५ एप्रिल, सन १८—.

प्रिय भगिनी गंगू!

तुझें पत्र पोंचलें. आईच्या अंतकालीं तुला येतां आलें नाहीं, क्रियाकर्मांतराचे वेळींसुद्धां तुझें येणें झालें नाहीं, याबद्दल तुला अतिशयित दुःख झालें ह्मणून लिहितेस. हो, दुःख वाटण्याचीच गोष्ट; पण उपाय काय? तूं पुण्याला किंवा सातार्‍याला असतीस, तर तुला सहज येतां आलें असतें; परंतु ग्वाल्हेर कांहीं जवळ का आहे? नुसत्या येण्या-जाण्याखालींच पन्नाससाठ रुपये उडून जावयाचे! नारायणरावजींची प्राप्तीहि अशी नाहीं, कीं, ते एवढा खर्च सोसूं शकतील. त्यांनां मिळणार अवघे साठ रुपये. कुटुंबवत्सलाचें घर. खायाला चार मंडळी. जेमतेम खर्च भागायाचीच मारामार. तूं काटकसरीनें वागतेस ह्मणूनच कसाबसा संसार चालला आहे. अशी स्थिति असल्यामुळें, केवळ नाइलाज झाल्यानें अंतकाळीं तुला आईची भेट झाली नाहीं, त्याबद्दल दुःख करूं नकोस. या जन्मीं आतां आई कधींहि आपल्या दृष्टीस पडणार नाहीं, तिची सेवाचाकरी आपल्या हातून आतां कधींहि होणार नाहीं, ही गोष्ट तुझ्याचशी काय, माझ्याहि अंतःकरणांत रात्रंदिवस एकसारखी सलत आहे. पण गंगू! आपण रडूनरडून नद्याहि वाहविल्या, तरी आई पुन्हा आपल्या दृष्टीस पडणार आहे काय? ती गेली! आह्मांला सोडून गेली!! कायमची टाकून गेली!!! आतां तिच्याकरितां शोक करून काय फळ? तिनें आपल्यास जें शिक्षण दिलें आहे, त्याप्रमाणें आपण वागून लोकांकडून भलें ह्मणवून घेणें, हेंच आतां आपल्या हातीं राहिलें आहे, व तसें केलें ह्मणजेच आपल्या आईच्या आत्म्याला परलोकीं शांति मिळणार आहे. यास्तव लाडके गंगू, तूं शोक सोडून देऊन आईच्या

सदुपदेशाप्रमाणें वागत जा, असें तुला आतां माझें वडील बहिणीच्या नात्यानें सांगणें आहे. तूं भिऊं नको. आतां मीच तुला आईच्या जागीं आहें. मलाच तूं आपली आई समज. मी तुला यत्किंचित्‌हि कमी पडूं देणार नाहीं. संसारांत लक्ष्य गुंतवून मनाचें कसेंतरी शांतवन कर.

तुला आईची भेट झाली नाहीं, याबद्दल तूं नारायणरावजींसमोर कधींहि दुःख प्रदर्शित करूं नको. ते पडले पुरुष. आपल्या बायकांसारखी त्यांची स्थिति नसते. आपल्याला दुःख होतांच आपण तें सारें बाहेर ओकून टाकतों. पुरुष आंतल्या आंत झुरत असतात. आपल्यापाशीं खर्चायास पैसे नसल्यामुळें बायकोला पाठवितां आलें नाहीं, याबद्दल ते बिचारे अगोदरच कष्टी झाले असतील. आणखी, तूं जर अशी एकसारखी शोक करित बसलीस, तर त्यांच्या मनाची स्थिति कशी बरें होईल? त्यांनीं मला जें पत्र पाठविलें आहे, त्यावरून त्यांनां याबद्दल कितीतरी दुःख झाल्याचें दिसून येत आहे. त्यांचें दुःख तूं आणखी दुणावूं नकोस. त्यांच्या मनास ज्या गोष्टीपासून यत्किंचितहि दुःख होईल, अथवा होण्याचा संभव असेल, ती गोष्ट तूं प्राणांतींहि करूं नकोस! स्त्रीला पति हेंच परम दैवत आहे. अनेक जन्मीं जेव्हां महान् पुण्य करावें, तेव्हांच कोठें पतिसेवेचा लाभ घडतो. म्यां अभागिनीनें पूर्वजन्मीं केवढें अघोर पातक केलें होतें नकळे, कीं, आज मी पतिसेवेला अंतरलें आहें! असो. या हतभागिनीच्या हकीगतीचें स्मरण देऊन मी तुला आणखी दुःखी करूं इच्छित नाहीं.

आईला मरून अझून पुरता महिनाहि झाला नाहीं, तोंच घरामध्यें विलक्षण स्थित्यंतर झालें आहे. दादाची स्थिति पूर्वीप्रमाणेंच आहे. एकना दोन! परंतु वैनीबाईंनीं मार उलटापालट करण्याचा धडाका लाविला आहे! बिचारी आपली म्हातारी काशी मोलकरीण आमच्या इथें आजकाल का नोकरीस राहिली होती? तुला, मला, नि दादालाहि तिनेंच अंगाखांद्यावर खेळविलें, लहानाचें मोठें केलें. ती आमची दुसरी आईच म्हटली तरी चालेल! त्या बापडीच्यानें वृद्धावस्थेमुळें आतां काम

होत नाहीं, ह्मणून वैनीबाईनीं कालपासून तिला रजा दिली! तिची त्या वेळची ती अति दीन मुद्रा, अश्रुभारित नेत्र आणि हृदयविदारक रोदन पाहून माझें अंतःकरण कसें दुभंग होऊन गेलें! काय करूं? वैनी अशा क्रुद्ध मुद्रेनें तिच्या अंगावर आली कीं, तिच्यापुढें बोलण्याचें मला साहस झालें नाहीं! आणि बोलून उपयोग तरी काय होणार होता? मलाहि भलभलतें ऐकून घ्यावें लागलें असतें. आतां कांहीं आपली आई राहिली नाहीं. वैनीचेंच राज्य! अरेरे! पोर आवडी, काशी जातेवेळीं कांहीं केल्या तिच्या कडेवरून उतरेना. तिला तिचा फार लळा लागलेला. काशीला घट्ट बिलगून राहिली होती. परंतु त्या निर्दय आई-वैनी-नें जोरानें एक चापटी मारून पोरीला काशीपासून हिसकावून घेतल्यामुळें तिनें रडून रडून आकांत केला. त्या वेळीं मलाहि फार रडूं आलें!

पत्र बरेंच लांबलें. आज अधिक लिहित नाहीं. रामू आणि लली यांची खुशाली कळीव. आवडी नी विनू बरीं आहेत. दादाहि खुशाल आहे. वैनीची अर्धशिशी पुन्हा उठली आहे. कारण दुसरें काय असणार? कुपथ्यच! नारायणरावजींची प्रकृति कशी आहे? उत्तर लवकर पाठीव. कळावें, हे आशीर्वाद.

तुझी
**यमूताई.**

---

[ २ ]

**बक्षींचावाडा, ग्वाल्हेर, शुक्रवार,**
ता० ९ एप्रिल, सन १८—.

परम प्रिय ताई!

तुझें पत्र कालच पोंचलें. रात्रींच जबाब लिहिण्याचें मनांत होतें, परंतु ललीनें असें भंडावून सोडलें कीं, कांहीं सुचेना! सटवी फारच दुःख देते. तिकडून किनई, तिला अगदीं डोक्यावर चढविली आहे.

या वेळीं रामू शाळेंत गेला आहे, लली निजली आहे, घरांत पूर्ण शांतता आहे व ह्मणूनच मी हें पत्र लिहिण्यास बसलें आहें.

ताई! आईला पाहिल्याला मला आज उणींपुरीं दोन वर्षें झालीं ग! या जन्मीं आतां तिची भेट होणार नाहीं हें मनांत आल्याबरोबर अंतःकरण कसें अगदीं भडभडून येतें! ती आपल्याला सोडून गेली हें कांहीं केल्या मनास खरेंच वाटत नाहीं! आपल्या माडीवर ती पाय पसरून बसली आहे, तूं तिला महाभारतांतील कथाभाग वाचून दाखवित आहेस, तो देखावा अझून माझ्या कसा डोळ्यांसमोर आहे ग! मी ज्यावेळीं ग्वाल्हेरीस यावयास निघालें, त्यावेळीं, अश्रुपूर्ण नेत्रांनीं माझ्याकडे एक-सारखी पाहत असलेली, व प्रेमातिशयामुळें कंठ दाटून आल्याकारणानें व्याकुळ मुद्रेनें मला पोटाशीं आलिंगून निरोप देतेवेळची ती तिची मूर्ति, आतां या वेळीं माझ्यापुढें कशी एकसारखी उभी आहे! हाय हाय! आई! तुझ्यासारखें ते अहेतुक प्रेम आतां या अभागिनीवर कोण ग करील? 'गंगू गंगू' ह्मणून प्रेमानें आतां मला कोण हांक मारील?

ताई! तुझ्यासाठीं आमचें काळीज कसें तिळतिळ तुटत आहे! वैनीचा स्वभाव कळलाना आतां तुला? तिच्या पोटांत विकल्प भरला आहे. आजवर आपली आई होती, त्यामुळें तिला कांहींहि बोलतां येत नसे, कीं, करतां येत नसे. परंतु आतां ती घरधनीण होऊन बसली आहे. नि तो धनीणपणा पहिल्याप्रथम बिचाऱ्या गरीब काशीवर गाजविला! वैनीबाईंचे रंगढंग मी केव्हांपासूनतरी ओळखून आहें. ही गोष्ट मी तुला आजच सांगतें आहें असें नाहीं. परंतु मी उगीच कांहींतरी संशय घेतें असें बोलून तूं मला दूषण देत होतीस व उपदेशहि करित होतीस! आतां तरी आलाना तुला अनुभव, कीं, खुळी गंगू ह्मणत होती तें खोटें नव्हतें! तिच्या माहेरच्या घराण्यांत कोणची बाई चांगली आहे, कीं हीच एक चांगली निपजेल?

तुझें पत्र तिकडेहि दाखविलें. ह्मणायचें झालें कीं, "गोविंदराव पुणेकर परवां पुण्यास जावयाचे आहेत. मे महिन्याच्या अखेरीस पुन्हा

इकडे येतील. त्यांनांच सांगतों काशीला बरोबर आणायला. राहील बिचारी झातारी मुलीला खेळावित आपल्या इथें!"

झातारीला अशा वयांत हांकलून लावणाराचें भगवान् कधींहि बरें करणार नाहीं. ही हकीगत वाचतांच मला तर इतका राग आला आहे ताई! काय करूं? दादाहि अगदीं लहानच का अझून? आज तीस वर्षें जी झातारी तुझ्या घरांत खपत आहे, आपणां सर्वांचें मळमूत्र जिनें काढलें, आपल्यास नाचविलें बागडविलें, तिला अपराधाशिवाय तुझी बायको घालवून देते, नी, तूं स्वस्थ राहतोस? बायकोला कांहींच बोलत नाहींस? ठीक बाबा! चांगलें केलेंस! मी जर आज मुंबईला असतें, तर काय झालें असतें तें झालें असतें, दादाला चांगलाच झाडला असता!

ताई! तूं जी नेहमीं नेहमीं एवढी भीत असतेस, त्या तुला एवढी भीति कसची ग? देवानें तुला अशा दशेस आणलें आहे, तरी अगदीं निराधार केली नाहीं. बायकोच्या सांगण्यानें, पाठीशीं पाठ लावून आलेला भाऊ कदाचित् परका होईल, परंतु ताई! पाठीस पाठ लावून आलेली बहीण कधींहि परकी होणार नाहीं! तुला तिकडे यत्किंचित् त्रास होत असल्यास तूं मोकळ्या मनानें आम्हांला लिहून कळीव; तुला पालखींत बसवून आमच्या घरीं आणूं व सगळ्या संसाराची मालकीण करूं! तुझ्यासारखी दयाळु वडील बहीण कोणाच्या दैवीं आहे?

तिकडच्या सांगण्यावरून मी हें एवढ्या जोरानें लिहित आहें. आणि माझा स्वभाव तर तुला माहितच आहे. योग्य तें बोलण्यास मी कोणाचीहि भीड धरणार नाहीं. मग प्रत्यक्ष भाऊ असो कीं दुसरें कोणी असो!

आह्मी सर्व मंडळी सुखरूप आहों. आपल्याकडील कुशल कळवावें. दर आठवड्यास पत्र पाठवावें. हयगय करूं नये, हे विज्ञापना.

तुझी लाडकी

गंगू.

[ ३ ]

बक्षींचा वाडा, ग्वाल्हेर, मंगळवार,
ता० २० एप्रिल, १८—.

ताई!

तुझ्याकडून बरेच दिवस पत्र न आल्यामुळें फार काळजी लागली आहे. तुला माझें मागचें ता. ९ शुक्रवारचें पत्र मिळालें कीं नाहीं? तुझी तब्यत ठीक आहेना ? तिकडूनाहि तुला दोन पत्रें पाठविणें झालें, तरीहि तुझ्याकडून उत्तर नाहीं! तुझा समाचार कळावा ह्मणून तिकडून दादांच्या नांवेंहि एक पत्र पाठविलें होतें, पण दादांकडूनहि जबाब नाहीं. याचा अर्थ काय? घरांत कोणी आजारी बिजारी नाहींना? वैनीनें कांहीं तंटाभांडण उकरून काढलें नसेलना? ताई! मी तुला हात जोडतें, तूं अशी निर्दय होऊन स्तब्ध राहूं नकोस गडे! आईच्या स्नेहाला तर मी आजन्म अंतरलें. आतां माझी थोरली बहीणहि तूंच आणि आईहि तूंच! हें पत्र पोहोंचतांच क्षणाचाहि विलंब न करितां, उलट टपालावरून तिकडील सविस्तर हकीगत कळीव. लली आणि रामू खुशाल आहेत. पोरीनें तर 'मावची केवा येनाल? मावची केवा येनाल?' असा एकसारखा ध्यास घेतला आहे. कळावें, हे विज्ञापना.

तुझी लाडकी,
गंगू.

---

[ ४ ]

गिरगाव, मुंबई, शुक्रवार,
ता० २३ एप्रील, १८—.

प्रियकर गंगू!

तुझीं दोन्हीं पत्रें योग्य वेळीं पोंचलीं. नारायणरावजींचींहि पोंचलीं. कामाच्या गडबडीमुळें आणि मातृशोकामुळें मन अस्थिर झाल्याकारणानें हा वेळपावेतों उत्तर पाठविणें झालें नाहीं. नारायणरावजी मला याबद्दल

क्षमा करतीलच. इकडील सर्व मंडळी सुखरूप आहे. आज कित्येक दिवस विनूला किंचित् ज्वर येत आहे. सध्या कमी आहे.

तूं नेहमीं काळजी करित असतेस हें ठीक नाहीं. माझेकडून एखादे वेळीं नियमित वेळीं पत्र न गेल्यास तूं एवढी काळजी कां करतेस? मला इकडे वेळ अवेळ नाहीं, संथपणें पत्र लिहिण्यास संधि सांपडत नाहीं, यामुळें उशीर होतो. तरी तूं भलताच विकल्प मनांत आणून काळजी करूं नकोस. माझ्या क्षुद्र जीवाची मेली एवढी मातब्बरी ती काय! वीतभर पोटाची खांच कुठेंतरी भरतां येईल. माझ्याविषयीं कांहींएक मनांताहे न आणतां तूं संसारांतच आपलें मन घाल आणि आनंदानें रहा. तूं खुशाल असलीस ह्मणजेच मला आनंद आहे. संवडी प्रमाणें पत्र पाठवित रहा, हे आशीर्वाद.

तुझी हतभागिनी ताई,
यमुना.

---

[ ५ ]

**बक्षींचा वाडा, ग्वाल्हेर,** सोमवार,
ता० २ मे, १८—.

ताई!

तुझें ता० २३ एप्रिलचें पत्र आज पोंचलें. एवढा उशीर होण्याचें कारण समजत नाहीं. पोष्टामध्येंच कांहीं गडबड झाली होती कीं काय तें समजण्यास साधन उरलें नाहीं. ललीनें सटवीनें पत्राचें कव्हर फाडून त्याच्या चिंध्या चिंध्या करून टाकल्या!

ताई! तुझी हकीगत आहे तरी काय? तुझें पत्र हातांत घेतल्याक्षणीं जीव कसा व्याकुळ होतो. एखादें परकी माणूस दुसऱ्या एखाद्या अपरिचित माणसास, जपून जपून जसें एकेक शब्द लिहित असतें, त्याप्रमाणें तूं हें पत्र लिहिलें आहेस! फार काळजी घेऊन पत्रांतील मजकूर लिहिला आहेस. एकेक वाक्यावर घटका घटका विचार करून

व घटका घटका थांबून मग दुसरें वाक्य लिहिलें आहेस. हें पत्र लिहिते वेळची तुझी स्थिति दुसऱ्या कोणाला न समजो, परंतु मी तर तुझ्याच आईच्या पोटीं जन्मलेली तुझी सख्खी बहीण! तुझ्या माझ्या शरीरांत एकाच आईचें रक्त खेळत आहे. असें असल्यामुळें, पत्र लिहिते वेळीं तूं एकसारखे उसासे टाकित होतीस व अश्रुवर्षाव करित होतीस याची साक्ष मला तुझें हें पत्रच देत आहे!

ताई! तूं माझ्याशीं मन मोकळें करून वागत नाहींस. तुझें दुःख तूं गुप्त राखित आहेस. आजपावेतों तूं आपल्या मनांतील व्यथा माझ्याशीं कधींहि लपविली नाहींस, मग आजच माझा असा छल करणें तुला बरें वाटतेंना? तूं तिकडे दुःख करित राहून तें मला इकडे कळूंहि नये व त्यामुळें माझा जीव इकडे रात्रंदिवस खालवर होत असावा, हें तुला पुरवतेंना? ताई! माझी तुला कांहींच काग दया येत नाहीं?

तुझ्या पत्रांतील शेवटचें एक वाक्य वाचून तर मन अत्यंत व्यथित झालें. "पोटाची वीतभर खांच मेली कुठेंहि भरेल," असें जें तूं लिहिलेंस, तें कां बरें ताई? दादा कांहीं बोलला का तुला? वैनीशीं कांहीं बोलाचाली तर झाली नसेलना? तुला माझ्या गळ्याची शपथ आहे—माझ्या ललीची तुला शपथ आहे! तूं मला अशी दुःखांत लोटूं नकोस. खरोखर काय प्रकार आहे तो न चोरतां न लपवितां सविस्तर लिहून कळीव. मी जर तेथें असतें तर कोणाची मगदूर लागली असती तुला सट कीं फट् ह्मणायला!

तुझें पत्र वाचून जीव मुळींच थाऱ्यावर राहीनासा झाला आहे. तूं जर या पत्राचें उत्तर मनापासून सविस्तर नाहीं लिहिलेंस, तर मी तुझीच शपथ वाहून सांगतें, माझ्यापाशीं जें खिडुकमिडुक आहे तें सारें विकून मी मुंबईस निघून येईन. मला अगदींच चैन नाहींसें झालें आहे.

तिकडून अझून कचेरींतून येणें झालें नाहीं. तिकडच्या येण्याची अझूनहि वाट पाहत बसल्यास आजची डांक चुकेल. यामुळें तिकडेस दाखविल्याशिवाय आज हें पत्र पाठवित आहें. कचेरींतून येणें होतांच

तुझें पत्र दाखवून मीं जबाब काय लिहिला आहे तोहि कळवीन-तिकडचें आणि माझें मत नेहमीं एकच असतें हें तूं जाणत असशीलच. आह्मां उभयतांत कोणाहि दिवशीं आणि कसल्याहि बाबतींत भिन्नमत ह्मणून होत नाहीं.

लली, रामू खुशाल आहेत. पत्राचें उत्तर अगदीं जरूर, उलट डाकेंतून पाठवावें. फार काळजी लागली आहे, कळावें हे विज्ञापना.

तुझी लाडकी,
गंगू.

---

[ ६ ]

बक्षींचा वाडा, ग्वाल्हेर, मंगळवार,
ता० ३ मे, १८—.

ताई!

तुझें पत्र काल रात्रीं वाचून पाहायचें झालें. पत्र वाचून क्षणभर स्तब्ध राहून ह्मणायचें झालें "पाहिलेंस! तूं जें मोठ्या रागानें यमूताईला पत्र पाठविलें होतें, तें कसें तरी तुझ्या कर्कशा वहिनींबाईच्या हातीं जाऊन त्यामुळेंच कांहींतरी रणकंदन उठलें असावें. तसें नसतें, तर बिचाऱ्या गाईसारख्या गरीब यमूताईला कोणीहि कठोर आणि अनन्वित शब्द बोलूं शकतेंना! मी खात्रीनें सांगतों, असेंच कांहींतरी घडलें असलें पाहिजे!"

तिकडचा हा तर्क खरा काय ताई? तसेंच जर असेल, तर तिला अशक्य अशी कोणतीच गोष्ट नाहीं. दुसऱ्यांचीं पत्रें, जी मालकाला नकळत चोरून वाचते, ती वेळीं, लोकांच्या मानेवर सुरी ठेवण्यासहि माघार घेणार नाहीं! शिव शिव! असले विचार आमच्या कधीं स्वप्नांतहि येणार नाहींत! मीं तुला लिहिलेलें पत्र वहिनीला वाचण्याचा काय बरें अधिकार? कुलीन घराण्यांतली तूं मुलगी, चांगली लिहावाचायला शिकलीसवरलेली, नि तूं जर आडून दुसऱ्यांच्या गुप्त गोष्टी ऐकतेस,

दुसऱ्यांचीं पत्रें फोडून चोरून वाचतेस, रात्रंदिवस तंटेभांडणें उपस्थित करतेस, मग लिहिणेंवाचणें शिकल्या नाहींत व ज्या केवळ अगदीं अडाणी, अशा कोळ्याकुणबटांच्या मुलींत आणि तुझ्यांत अंतर तें कोणतें? छीः छीः! असल्या बायकांचें मी तर कधीं तोंडदिखील पाहणार नाहीं!

माझी तर बाई मति गुंग होते. कुलीन घराण्यांतील मुलींच्या हातून अशीं अनन्वित कृत्यें घडतील अशी माझ्यानें कल्पनाहि करवत नाहीं! शिवाय, तुझ्याशीं कोणी भांडण करील हें तर मुळींच संभवत नाहीं. खराखरा प्रकार काय आहे तो कृपा करून लिहून कळीव. मला बिलकूल चैन पडेनासें झालें आहे.

तुझी लाडकी,
**गंगू.**

---

[ ७ ]

**गिरगांव, मुंबई,** सोमवार,
ता० ९ मे, १८—.

प्रिय भगिनी गंगू!

तुझें पत्र पावलें. उत्तर काय लिहावें तें सुचत नाहीं. तूं माझी धाकटी बहीण. माझ्यासाठीं तुझ्या जिवाला तळमळ लागणें साहजिकच आहे. मनाच्या आणि देहाच्या अस्वस्थतेमुळें माझें शेवटचें पत्र कांहींच्याकांहींच लिहिलें गेलें. तूं तें पत्र वाचून फार व्यथित झाल्याचें दिसतें. त्याबद्दल मला फार दुःख होत आहे. हा पडला मृत्युलोक. येथें वास करणाऱ्या मनुष्यमात्रावर, कितीक दुःखें, कितीक संकटें, कितीक वावटळी येऊन नेहमीं पडावयाच्या! जीवनाची इच्छा करणारांनीं तें सारें निमूटपणें सहन केलें पाहिजे. सुखहि भगवान् देतो, दुःखहि त्याच्याच इच्छेनें भोगावें लागतें. पूर्वजन्मीं केलेल्या पातकांचें प्रायश्चित्त या जन्मीं भोगिलें पाहिजे. आपल्या अदृष्टाला बोल लावण्याचा सोडून त्याचा दुसऱ्याला काय म्हणून दोष द्यावा?

तूं पत्रांत जो तर्क वितर्क केला आहेस, तशांतला कांहींएक प्रकार नाहीं. दादा तर संसारांत मुळींच लक्ष्य पुरवित नाहीं. 'कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुं' काय त्या एक वैनीबाई! शिवाय, त्या केवढ्या रागीट आणि अधिकारप्रिय आहेत, हें तुला ठाऊक आहेच. यःकश्चित् गोष्टीवरूनहि तिचें मस्तक खवळत असतें. ती भलभलते अनिर्वाच्य कुशब्द उच्चारिते व अनन्वित कृत्यें करिते. त्यामुळें मनाला अत्यंत दुःख तर होतेंच,पण दुःख मानून काय करायचें ? समस्त दुःख सहन करण्यासाठींच विधवेचें जीवन आहे ! माझ्यासाठीं कष्टी होऊं नकोस. वरचेवर पत्र पाठवून समाचार कळवित जा. कळावें, हे आशीर्वाद.

तुझी दुर्दैवी बहीण,
**यमुना.**

---

[ ८ ]

गिरगांव मुंबई, रविवार,
ता० २३ मे, १८—.

माझे छोटे गंगू!

किती दिवसांपासून तुला पत्र पाठवावें ह्मणत आहें, परंतु कोणी लिहिणारच सांपडलें नाहीं. आज कांदेवाडींतल्या वकिलीणबाईच्या सुनेनें बिचारीनें हें लिहून दिलें आहे. यावरून तुला सगळी हकीगत कळून येईल. आज महिना दीड महिना झाला, तुझ्या वैनीबाईनीं मला निरोप दिला. माझा अपराध एवढाच कीं, मीं तिला एकदोन वेळां ह्मटलें "लक्ष्मी ! आईसाहेब तर देवलोकीं गेल्या आहेत. अशा वेळीं बिचाऱ्या अनाथ गाईसारख्या गरीब यमूचा असा छळ करू नको. तिला तुझ्यावांचून आतां जिव्हाळयाचें कोणीहि राहिलें नाहीं." माझ्या या भाषणानें तुझ्या वैनीचें मस्तक एवढें भणाणून गेलें कीं, लिहायाची सोय नाहीं ! नाहीं नाहीं तसले भलभलते कठोर आणि मर्मभेदक शब्द बोलून माझी तिनें निर्भत्सना केली. कांनांनीं ऐकूंहि नयेत शब्द असे ती बोलली. त्या

वेळीं माझेंहि पण डोकें फिरून गेलें. कारण, आज म्हातारी होईंपर्यंत मीं तुझ्या आईबापांच्या हाताखालीं नोकरी केली, परंतु त्यांच्याकडून किंवा दुसऱ्या कोणाहि माणसाकडून कधीं सट कीं फट म्हणून घेतल्याची मला आठवण नाहीं. नि ही कालची पोर, जिला परकर नेसवितां नेसवितां माझे हात झिजले, ती आली मला ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी शिकवायाला व आपला धनीणपणाचा तोरा गाजवायला! मी तिचा बाष्कळपणा चालूं देतें थोडाच! मलाग आतां तिची भीति कसली राहिली आहे? मींहि अशीं सणसणीत उत्तरें दिलीं कीं, तिचें तोंड काळें ठिक्कर पडलें! वैनीची चांगली पूजा करून मी तडक घरीं निघून गेलें. पुन्हा कधींहि या सटवीचें तोंड म्हणून पाहावयाचें नाहीं असा निश्चय केला. परंतु आवडी आणि विनू यांच्यासाठीं जीव कसा एकसारखा तळमळत आहे. माझ्या बाळांना कधीं जाऊन भेटेन असें मला झालें आहे. बिचाऱ्या यमूची आठवण झाली म्हणजे कांहींएक सुचेनासेंच होतें! तिच्या हालांस आणि जाचणीस तर सीमाच नाहीं! माणूस राहूं द्या, पण रानांतील पशूहि तिचें दुःख पाहून आसवें ढाळतील! तिचा स्वभाव तर असा विलक्षण पडला कीं, आंतल्या आंत सारें दुःख गिळावयाचें. कांहीं केल्या म्हणून ती आपल्या वेदना दुसऱ्यास कळूं द्यावयाची नाहीं. आणि मला वाटतें, या तिच्या स्वभावानुसारच तिनें तुला आपल्या हालां-बद्दल कांहींएक कळविलें नसावें. पण मला तर बाई मोठी भीति वाटते कीं, न जाणो, ती आपल्या जिवाचें कधीं काय करून घेईल, याचा नेम सांगवत नाहीं!

तुझ्या माहेरची म्हणून पुन्हा कधीं पायरीहि चढावयाची नाहीं, असा मीं निश्चय केला होता. कारण, असली कर्कशा बायको जिथें आहे तिथें जाऊन विनाकारण आपला पाणउतारा तरी करून घ्या कशाला? परंतु विनूला आणि आवडीला पाहण्याची अनावर इच्छा झाल्यामुळें, पगार मागण्याचें म्हणून निमित्त करून कालच्या बृहस्पतवारीं गेलें होतें बाई निलाजरेपणानें तुमच्या घरीं. जाऊन पाहतें, तर अग बाई, एखादी

चवताळलेली वाघीण बिचाऱ्या निरपराध कोंकरावर जशी गुरगुरत असते, तशी ती तुझी चंडाळ वैनी, बापड्या माझ्या गरीब यमूच्या अंगावर येऊन नाहीं नाहीं तसले कठोर शब्द बोलत होती! "नीघ माझ्या घरांतून! कपाळ फुटकी अपेशी रांड! रांडेचें कधीं तोंडहि पाहूं नये!" वगैरे वगैरे जें कांहीं बोलत होती, शिवशिव, माझ्यानें पुन्हा उच्चारवत नाहीं! काळजास घरे पडणारे मर्मभेदक शब्द बोलून ती यमूला घरांतून निघून जाण्यास सांगत होती व दुसरीकडे कुठेंतरी भाड्यानें जागा घेऊन रहा, अथवा भीक मागून खा, असेंहि सांगत होती. अरेरे! आईसाहेबांच्या मागें त्यांच्याच लाडक्या मुलीला या चांडाळणीनें घराबाहेर चालती हो ह्मणावें? दैवाची गति विचित्र आहे! मला पाहिल्याबरोबर तर जसें आगींत तेलच पडलें! त्या राक्षसिणीनें एकेक डोळा एवढा एवढा करून माझ्यावरहि तोंड सोडण्यास सुरुवात केली. ती माझ्या अंगावर चालून येत आहे असें पाहतांच मी दरवाजावर उभी राहून व कमरबिमर सरसावून ये सटवे! तुझे दांतच पाडतें, असें म्हणून पुढें सरसावलें. मी तिची ओशाळी थोडीच होतें, कीं, तिला भिईन! तिला चांगल्या कानउघाडणीच्या दोन गोष्टी सांगितल्या. माझ्या भाषणानें तिला फार राग आला व ती मोठ्या फणकाऱ्यानें आंत निघून गेली. ती आंत जातांच मी इकडे यमूपाशीं आलें. त्या बापडीची आठवण होतांच मन अत्यंत व्याकुळ होतें. या वेळीं ती मान खालीं घालून रडत होती. तिच्या दोन्हीं डोळ्यांतून एकसारखा अश्रुवर्षाव चालला होता. "तूं कां दुःख करितेस? आज काय झालें?" वगैरे मीं तिला पुष्कळ खोदखोदून विचारलें, पण त्या सभागणीच्या तोंडून एक अक्षरहि निघालें नाहीं! जवळच नवी मोलकरीण उभी होती तिलाहि बापडीला यमूची अत्यंत दया आली. तिनें मला बाहेर एकीकडे नेऊन चावत चावत सगळी हकीगत सांगितली. तूं ग्वाल्हेरहून जें कसलेंसें पत्र यमूला पाठविलें होतें तें या चंडाळणीनें चोरून फोडून वाचलें व त्यामुळेंच आज असें रणकंदन माजलें आहे! अरेरे! बिचाऱ्या यमूचा

या सटवीनें केवढा छळ मांडला आहे! एकादशीच्या फराळाचे पैसेहि बंद करण्यांत आले! आणखी काय होणें राहिलें?

गंगू, तूं याची कांहीं तरी व्यवस्था करावीस ह्मणूनच आज तुला हें मुद्दाम पत्र लिहित आहें. नाहींतर यमू एक दिवस गळयास फांस घेऊन जीव देईल अशी भीति वाटत आहे. रक्तमासाचा देह अशा दुःसह वेदना कुठवर सहन करील? सगळें लिहीन ह्मटल्यास संपायचेंहि नाहीं व वेळहि नाहीं, हे आशीर्वाद.

तुझी ह्मातारी
काशी.

---

[ ९ ]

गिरगांव मुंबई, रविवार,
ता० ३० मे, १८—.

प्रिय भागिनी गंगू!

काय लिहूं! बायको माणूस जेवढें ह्मणून सहन करूं शकेल त्याहूनहि कितीतरी जास्त दुःख मीं सोसलें. वैनीनें आज दिवसपावेतों माझा जेवढा ह्मणून छळ केला तेवढा सारा, ब्राहि न उच्चारतां मीं सहन केला. आठवड्याचे आठवडे उपवास पडले, तरीहि विधवेला कष्ट होत नाहींत; जमिनीवर थंडींत कुडकुडत झोंपल्यानें विधवेचा निद्राभंग होत नाहीं; किंवा कर्णकठोर मर्मभेदक वाक्प्रहारांनीं विधवा मरत नाहींत! हें सगळें जर सोसवत नाहीं, तर विधवा झाल्यावर वांचण्याची इच्छा कां करावी? ज्या दिवशीं इहलोकींचा आधार स्मशानांत चितारूप होऊन गेला, त्याचवेळीं या भावी दुःखाचा अंत करण्यास्तव, नदी, विहार पाहून स्वतःचा अंत केला पाहिजे होता! तसें ज्यापक्षीं घडेल नाहीं, त्यापक्षीं दैवीं जडलेला छळ निमूटपणें सहन करणें भाग आहे. तथापि कोणत्याहि गोष्टीला सीमा असते! माझ्या अंतःकरणास ज्या वेदना होत आहेत त्या तुला कशा कळवूं! वैनीची गोष्ट राहूं द्या. किती झालें तरी ती परक्या रक्ताची! दादाकडे

पाहून आजवर सगळा छळ सहन करित आलें. परंतु तोच दादा— आमच्या आईच्या पोटीं जन्म घेऊन पाठींशी पाठ लावून आलेला सख्खा भाऊ— फिरला व वैनीच्या पक्षास मिळून त्यानेंहि माझा जो कांहीं छळ मांडला आहे, तो गंगू! तुला कोणच्या तोंडानें कळवूं?

वैनीनें दादाच्या मनांत असें भरवून दिलें आहे कीं, आईपाशीं बरेंच द्रव्य होतें व तिनें तें मृत्युसमयीं मला दिलें आहे. आज सकाळीं माझ्या पेटीची चावी वैनीनें माझ्याकडे मागितली होती. तिला मीं सांगितलें "काय हवें तें मला सांग, मीच काढून देतें." माझ्या या भाषणावर डोळे लाल करून "माझा विश्वास वाटत नाहीं?" असें ओरडून वैनी घरांत गेली व कुऱ्हाड घेऊन येऊन तिनें माझ्या देखत माझ्या पेटीचे तुकडे तुकडे केले! खोलींत असा गोंगाट चाललेला ऐकतांच बाहेरून दादा धावत आला. मी त्याला "दादा, हें बघ—" असें ह्मणून सगळी हकीगत सांगायास जात होतें, तों तो भिंवया चढवून मला ह्मणाला "यमू, बस, पुरे कर! आईचे पैसे तूं लपवून ठेविले आहेस याबद्दल माझा खात्री झाली आहे."

दादाच्या तोंडून नि असले शब्द मला ऐकावे लागावेना? आई-पाशीं तर एक फुटकी कवडीहि नव्हती हें तुलाहि ठाऊक असेलच. पेटीचा चक्काचुर करूनहि जेव्हां आंत कांहीं सांपडलें नाहीं तेव्हां तर वैनी अत्यंत चवताळली. त्यावेळीं ती जें कांहीं अनिर्वाच्य बडबडूं लागली, शिव शिव, आठवण होतांच अझूनहि काळीज थरथरून जातें! दादा, आमचा सख्खा भाऊ, काय बोलला ऐकलें? "मला तोच संशय आहे. उद्यां सकाळीं या अवदसेला घरांतून हांकलून दे.'

हाय! उद्यांपासून मी मुंबईतल्या रस्त्यांवर भिकाऱ्यासारखी फिरूं लागेन! भीक मागण्याची पाळी आल्याबद्दल मला एवढें दुःख वाटत नाहीं, परंतु दादाच्या तोंडून नि असले शब्द निघावे, याबद्दलच अंतःकरण जळून जात आहे! या जगांत एक नाहींसें झाल्यामुळें सख्खा भाऊहि असा निष्ठुर व्हावाना ग? सगळ्यांनांच जर या कपाळ

करवंटीचा कंटाळा आला आहे, तर मग मला तरी माझा जीव एवढा प्रिय कां ह्मणून वाटावा ? मेला नाहींसा होइनाका या जगांतून ! गंगू ! तूं तरी सुखी रहा. देव तुझें आणि तुझ्या लेंकरांचें कल्याण करो, हाच माझा तुला अखेरचा आशीर्वाद आहे. तुझी माझी अखेरची हीच भेट. तूं माझ्याकरितां मुळींच दुःख करूं नको.

तुझी कपाळकरंटी बहीण,

* * * *

यमुना.

हाय हाय ! बापड्या विधवा यमुनेनें असह्य छळास कंटाळून अखेरीस त्याच रात्रीं विहरींत उडी घेऊन जीव दिला ! ! !

# संसार असार !

आमचे नारायणरावजी ह्मणजे कांहीं विलक्षण गृहस्थ ! अगदीं लहानपणापासूनच स्वारीचें मन विरक्त झालें होतें. बारा तेराव्या वर्षींसुद्धां, एखाद्या वयोवृद्ध मनुष्याप्रमाणें मोठा पोक्तपणाचा आव घालून ' जगत् क्षणभंगुर ! धर्माशिवाय मनुष्यप्राण्याला सुख होण्याचा संभवच नाहीं ! संसार म्हणजे मानवीप्राण्याची परीक्षा पहाण्याकरितां केलेलें क्षेत्र ! ' वगैर वगैरे बडबड करीत ! संधि सांपडली पुरे, त्यांचा हा विषय निघालाच. त्यांचे त्या वेळचे समवयस्क सोबती तर त्यांनां दैत्यकुलांत उत्पन्न झालेल्या प्रल्हादाचा अवतार ह्मणत !

भ्रांतिमूलक मनोविकारांचा ह्मणून आपल्या मनावर पगडा बसूं द्यावयाचा नाहीं, असा नारायणरावजींचा पक्का निश्चय ! 'भक्ति, प्रेम, स्नेह, प्रीति इत्यादि सर्व मनोविकार भ्रांतिमूलक आहेत; यांत कांहींएक तथ्य नाहीं; हा नुसता शब्दांचा खेळ आहे; प्रेम ह्मणजे कांहीं नाहीं, आणि स्नेह ह्मणजेहि कांहीं नाहीं. सब झूट आहे ! फक्त चक्षुर्वैसत्यम् ! बाकीचें सब झूट ! ' असें ते ह्मणत असत. या सर्व भ्रांतिमूलक मनोविकारांचा पराजय करून त्यांनां पार हद्दपार करावयाचें, थारा ह्मणून द्यावयाचा नाहीं, हा त्यांच्या आयुष्यांतील प्रधान हेतु होता.

योग्य वेळीं नारायणरावजींच्या वडिलांनीं त्यांच्या विवाहाचें ठरविलें. रावजींनीं या गोष्टीला तिळमात्र अडथळा आणिला नाहीं. कारण, लज्जातिशयानें ह्मणा, अथवा तशाच दुसऱ्या कांहीं कारणानें ह्मणा, विवाहाला असम्मति दर्शविणें, हेंहि त्यांनां भ्रांतिमूलकच वाटलें !

मुलगी ठरली. मुहूर्तहि कायम झाला. परंतु नारायणरावजींच्या त्या प्रस्तरमूर्तिवत् मुखावर, आनंद वा आशंका, विषाद वा व्याकुलता, चिंता वा चांचल्य, कांहींएक दिसून आलें नाहीं ! असो. नेमलेल्या दिवशीं, शुभ मुहूर्तावर, नारायणरावजींचे दोन हातांचे चार हात झाले, तरीहि पण, आपल्या आयुष्यांतील एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट आज

घडून आली, अशी कल्पनासुद्धां नारायणरावजींच्या त्या विरक्त मनाला शिवली नाहीं. विवाहित जीवनांत ह्मणजे कांहीं विशेष जबाबदारी आपल्यावर येईल असेंहि त्या ‘ सब झूट ’ मानणाऱ्या गृहस्थाला वाटलें नाहीं; किंवा निदान तें शोधून पहाण्याचा तरी त्यानें यत्न केला नाहीं! फक्त ‘ प्रेम, प्रीति वगैरे भ्रांतिमूलक मनोविकारांच्या पगड्यांत ह्मणून सांपडावयचें नाहीं, ’ हा आपला संकल्प दृढ पाळण्याचा त्यांनीं निश्चय केला.

याप्रमाणें येथून नारायणरावजींच्या विवाहित जीवनाला प्रारंभ झाला. आईबापांनीं मोठ्या आवडीनें सुनेचें नांव रमाबाई असें ठेविलें; परंतु आमच्या ‘ सब झूट ’ मानणाऱ्या नारायणरावांच्या मनाला ती रममाण करूं शकेल कीं नाहीं, हा एक प्रश्नच होता !

नारायणरावजींचा आणि या भ्रांतिमूलक मनोविकारांचा तंटा होता. परंतु रमाबाईचें मन अद्यापपावेतों ‘ सब झूट ’ मानण्याजोगें संस्कारसंपन्न झालें नव्हतें. तेव्हां हें अगदीं स्वाभाविकच होतें कीं, गृहकृत्यांचा भार वाहण्याशिवाय, आपल्या पतीपासून आणखी कसली तरी जास्त अपेक्षा ती करूं लागली; परंतु कोरड्या ढगाकडे जलबिंदूच्या आशेनें पहाणाऱ्या चातकाप्रमाणेंच बिचारीची स्थिति झाली, हें निराळें सांगण्याची जरूर नाहीं ! पत्नीप्रेम हाहि एक मनोविकारच, अर्थात् झूट असल्यामुळें आमचे नारायणराव मुळीं त्या पत्नीचाच तिरस्कार करीत ! मग प्रेमाची गोष्ट कशाला विचारावी ?

शिडावर वायु आघात करूं लागला, ह्मणजे नौका जशी चंचल होते, तद्वत्, विवाहानंतर रमाबाई पतिप्रेमलाभासाठीं अत्यंत चंचल होऊन गेली. तिला प्रत्यहीं प्रेमाचीं स्वप्नें पडत, आणि तीं अत्यंत सुखकराहि असत. परंतु तीं स्वप्नेंच ! सुखाची ही एक प्रकारची छळणाच आहे ! असो. बिचारी रमाबाई याप्रमाणें मोठ्या दुःखामध्यें दिवस कंठूं लागली. ती ह्मणे “ ईश्वर दयाळू आहे. अशा दुःखदुर्दशेंत तो मला चिरकाल ठेवणार नाहीं. प्रभातकाल होण्यापूर्वीं ज्याप्रमाणें अंधकार पडतो,

त्याचप्रमाणें सुखाचे दिवस येण्यापूर्वी मला ही दुःखदुर्दशा भोगावी लागत आहे." दुःखरूपी अंधकारांत याप्रमाणें चांचपडत असतां बापडी हताश होई; परंतु पुन्हा तिच्या मनांत आशांकुर उद्भवून त्यावरच ती दिवस लोटी.

अशा न करून तरी बिचारी काय करील! मृत्युशिवाय या यातनांतून मुक्त होण्याला तिला दुसरा मार्गच नव्हता. आणि मृत्यु, ह्मणजे आपल्या प्रिय पतीपासून आपला चिरवियोग! याला तर तिचें मन मुळींच प्रवृत्त होईना! नारायणरावजींला तिचा हा विचार 'झूटच' वाटे. ते ह्मणत "ही तिची केवळ भ्रांति आहे." परंतु तिला ही भ्रांति पडली नसती, तर तिच्या या असल्या विलक्षण पतीचा संसार सुरळीत चालता कीं नाहीं, हें जरा संशयात्मकच होतें!

तें कसेंहि असो, कधीं अधीं अगदीं अतर्क्य असे असंख्य चमत्कार काळ घडवून आणितो. बिचाऱ्या रमाबाईनें अत्यंत दुःखानें पुष्कळ दिवस काढल्यावर तिलाहि त्या अंधकारांत आनंदाचा क्षीण प्रकाश दृग्गोचर होऊं लागला. लवकरच तिला एक पुत्ररत्न लाभलें. तेव्हांपासून ती या सर्व दुःखाला किंचित् विसरून त्यांतल्या त्यांत थोडा आनंद मानूं लागली. परंतु बायकोच्या अगदीं उलट आमच्या नारायणरावजींची स्थिति झाली. त्यांच्या छातींत धस्स झालें. कारण, इतक्या दिवस त्यांनां काय तो एकच शत्रु होता. परंतु आतां दोन झाले! स्वारीला मोठा विचार पडला. इतक्या दिवस पत्नीप्रेमाचीच धास्ती होती, आतां त्याच्या भरीला पुत्रस्नेह येऊन पडला, परंतु आमचे नारायणराव असे डगमगणारे गृहस्थ नव्हते. त्यांनीं लागलाच या भ्रांतिमूलक राक्षसांनां आपल्या हृदयांत ह्मणून बिलकूल थारा द्यावयाचा नाहीं, असा आपल्या मनाचा अगदीं पक्का निश्चय केला.

चिरदरिद्र्याला अवचित बहुमूल्य रत्नाचा लाभ झाल्यानें जितका आनंद होतो, त्याच्याहि पेक्षां जास्त आनंद, रमाबाईला पुत्ररत्नाच्या लाभानें झाला. ती त्याला जीव कीं प्राण करूं लागली. आमच्या विक्षिप्त

नारायणरावजींला मात्र त्याबद्दल राग येई. ते त्या मुलाचा अगदीं तिरस्कार करीत. ते ह्मणत " हीं पोरें आईबापांनां सुख देण्यासाठीं येत नसून, केवळ दुःख देण्यासाठींच निर्माण होतात. बाल्यदशेंत माकडासारखा अनिर्वाच्यपणा करून आईबापांनां शारीरिक दुःख देतात, आणि मोठीं झालीं ह्मणजे आईबापांच्या मनाविरुद्ध कृत्यें करून त्यांनां मानसिक दुःख देतात. "

मोठ्या आश्चर्याची गोष्ट कीं, नारायणरावजींनीं इतका तिरस्कार दाखविला, तरी ती पतिप्रेमवंचिता रमाबाई, आपल्या लाडक्या मुलावर अधिकाधिक प्रेम करूं लागली. मुलाचे लाड करतांना ती नारायणरावांच्या दृष्टीस पडली पुरे, ते तिचा फारच धिक्कार करीत. परंतु काय उपयोग? ते तेथून जाताल न जातात तोंच ती पुन्हा द्विगुणित स्नेहानें मुलाचें मुखचुंबन करी व मोठ्या प्रेमानें त्याला हृदयाशीं धरून पूर्वीपेक्षां त्याचे जास्त लाड करूं लागे. कधीं कधीं तर ती शिशुस्नेहातिशयामुळें पतीचा विरक्त स्वभावसुद्धां विसरून जाई!

आणखी कांहीं वर्षें लोटलीं. रामाबाईनां आतां तीन मुलें झालीं होतीं. आतां आतां कोठें नारायणजींच्या ध्यानांत येऊं लागलें 'जगत् मायामय! संसार अनित्य!' हें सगळें खरें, परंतु रोजचा संसार चालून निर्वाह होण्याला नित्य कांहीं तरी अर्थ अत्यावशक आहे. क्षुधा, तृषा वगैरे कित्येक अगदीं सामान्य विकार, खरोखरच या जगांत अस्तित्वांत आहेत. आणि ते खरे आहेत, 'झूट' नाहींत!

तेव्हां आतां या अर्थोपार्जनासाठीं कांहीं तरी व्यवसाय करण्याचा आमच्या नारायणरावजींनीं बेत केला. कोणाची चाकरी करण्याचा तर अगदीं लहानपणापासून त्यांनी तिटकारा. त्यांचा मोठा भरंवसा काय तो व्यापारांतील चंचल लक्ष्मीच्या कृपालाभावर! परंतु हा कृपालाभ संपादन करण्याला प्रारंभीं बऱ्याच भांडवलाची अपेक्षा असते, आणि त्याची तर यांच्याजवळ मोठी उणीव होती.

नारायणरावजींच्या आईजवळ मात्र कांहीं पैसा होता. त्यावर स्वारीची नजर गेली. त्यांच्या बायकोच्या अंगावरहि कांहीं दागिने होते. आणि रमाबाईसारख्या सुस्वभावी सरळ पत्नीजवळून हें स्त्रीधन तिच्या पतीला मिळणें ह्मणजेहि कांहीं कठीण नव्हतें! परंतु काय असेल तें असो, असें अनायासें मिळणारें भांडवल सोडून आईजवळचाच पैसा कांहीं युक्तीनें काढावा, असा स्वारीला लोभ सुटला. कदाचित् हाहि एक भ्रांतीचाच प्रकार असेल!

ज्या कौशल्यानें आपल्या इतर बंधूंनां धाब्यावर बसवून रावजींनीं आईजवळून युक्तिप्रयुक्तीनें पैसे उपटले, तें कौशल्य धर्म आणि नीतिशास्त्राला मान्य होतें कीं नव्हतें, याचा निर्णय करण्याच्या भानगडींत आह्मी पडत नाहीं.

आईजवळचे पैसे सगळ्या मुलांनां सारखे मिळाले, अगर ज्याच्यावर तिची अधिक ममता त्याला त्या पैशांचा बराचसा भाग मिळाला, अगर एखादा मुलगाच त्यापैकीं बराचसा भाग युक्तिप्रयुक्तीनें गिळंकृत करून बसला, तरी लोक त्याची फारशी पंचाईत करित नाहींत. नारायणरावजींच्या अगदीं जवळच्या आप्तमंडळीनें दोनचार वेळां या गोष्टीची चौकशी केली, परंतु लवकरच ते स्वस्थ राहिले. परंतु त्यांच्या भावजयांनीं मात्र आठपंधरादिवस बरेंच अकांडतांडव केलें. बिचाऱ्या रमाबाईला जावांचीं तीं मर्मभेदक भाषणें आणि कर्णकठोर दूषणें, चोरट्यासारखीं अगदीं मुकाट्यानें सहन करावीं लागलीं. कांहीं दिवसांनीं त्यांचीहि धुसफुस मंदावली. रावजींच्या व्यापाराला सुरुवात झाली.

मानवी व्यवसायांची स्थिति उच्छृंखल नदीच्या प्रवाहांत चालणाऱ्या नावेसारखी आहे. प्रवाहाच्या अनुरोधानें नांव चालत असली तर ठीक. परंतु दुर्भाग्यक्रमानें जर का ती विरुद्ध दिशेनें चालवावी लागली तर ती इच्छित स्थलीं जाईलच असें खात्रीनें म्हणवत नाहीं. मग त्यांतून विरुद्ध दिशेनें चालवून कोणी नाव इच्छित स्थलीं नेऊं शकला तर अशा मनुष्याची गोष्ट अगदींच स्वतंत्र.

नारायणरावजींनीं आपला व्यापार मोठ्या धोरणानें आणि बेताबातानें चालविला होता असें दिसतें. एकसारखा नफ्यावर नफा, नफ्यावर नफा मिळून तो त्यांच्या त्या भ्रांतिग्रस्त अंतःकरणाला आनंदोत्फुल्ल करित होता. त्यांनां चांगला पैसा मिळूं लागला, त्याबरोबर त्यांचा नांवलौकिकहि वाढूं लागला. आईजवळील पैसा एकट्यानेंच उपटला ह्मणून आतांपर्यंत जे भाऊबंद त्यांचें मुखावलोकनहि करूं इच्छित नव्हते, तेच आतां 'भाऊ, भाऊ' ह्मणून त्यांच्या पुढें पुढें करूं लागले. नारायणरावजी ह्मणत, ही सगळी परमेश्वराचीच लीला आहे.

नारायणरावजींनां पैसा मिळूं लागला, मानमान्यताहि मिळूं लागली; परंतु बिचाऱ्या रमाबाईला मात्र त्यापासून काडीचा देखील लाभ झाला नाहीं! इतक्या दिवस नारायणरावजी रिकामे होते तरीसुद्धां तिला त्यांचा दर्शनलाभ दुर्मिळ असे. आतां तर सदासर्वदा ते पेढीवर धंद्यांत गर्क; त्यांचा वेळ त्यांनांच पुरेना! मग बिचाऱ्या रमाबाईला दिवसेंदिवस पतिदर्शन अगदींच दुर्मिळ होऊं लागलें, यांत आश्चर्य कसलें?

परंतु, ती आपल्या मुलांकडे पाहून सर्व दुःख गिळून जाई. ती रोज देवाची प्रार्थना करी "देवा! दुसऱ्या कोणालाहि मात्र माझ्यासारखें दुःख देऊं नकोस." ती एकसारखी दुःखनिमग्न असे, तरीहि दुःखापासून सुटण्याकरितां देहमुक्त होण्याची तिनें कधींहि इच्छा केली नव्हती. पूर्वींसुद्धां तिला पतीला सोडून मरावेंसें वाटत नव्हतें; मग आतां तर ती मातृपदाला पोहोंचलेली. "आपल्या पश्चात् या लहान अर्भकांचें कसें होईल? सापत्न माता यांची योग्य काळजी घेईल? माझ्या लाडक्यांनां वेळच्या वेळीं खायलाप्यायलासुद्धां मिळणार नाहीं!" या विचारानें तिचें हृदय व्याकुळ होऊन जाई; आणि शिवाय रमाबाईसारख्या कोमल स्वभावाच्या सुशील स्त्रीला आत्महत्या हा शब्दच मुळीं भयंकर वाटावा, यांत नवल नाहीं!

भ्रांतीनें ग्रस्त झालेले आमचे नारायणरावजी मात्र सदासर्वदा आपल्या व्यवसायांत निमग्न असत. तृतीय संबंधाच्या भार्येबरोबर

सदा व्यस्त असणाऱ्या एखाद्या वृद्धाप्रमाणें, नारायणरावजी सदा आपल्या व्यापाराला वाहिलेले! एक क्षणाचीदेखील त्यांनां फुरसद नसे. रमाबाईच्या डोळ्यांत अश्रु आलेले जरी त्यांच्या नजरेस पडले, तरीसुद्धां त्याचें कारण काय हें विचारण्यास देखील त्यांनां वेळ मिळत नसे, आणि इच्छाहि होत नसे. अशाखालींच तीन वर्षें लोटलीं.

चौथ्या वर्षाच्या प्रारंभीं, व्यापार जरा मंदावत चालला. नारायणरावजींनीं बरेच दिवस धंदा मोठ्या धिमेपणानें परंतु अगदीं नेटानें चालविला होता. व्यापाराला तेजी यावी ह्मणून त्यांनीं अव्याहत परिश्रम केले. जमाखर्चावर सारखी नजर ठेविली. परंतु ईश्वराच्या कोपापुढें यःकश्चित् मानवाचें काय चालणार? बिचाऱ्याच्या दुर्दैवानें याचवेळीं साधलें. एका ब्यांकेचें दिवाळें निघाल्याची दुष्ट बातमी याचवेळीं येऊन थडकली. नारायणरावजींची सर्व ठेव बुडाली. प्रचंड वायु ज्याप्रमाणें लता, वृक्ष यांनां छिन्नभिन्न करून, धूळ आणि झाडांचीं पानें यांनीं आकाश व्याप्त करितो, त्याचप्रमाणें या दुष्ट बातमीनें बिचाऱ्याच्या सर्व आशा, सर्व उद्योग छिन्नभिन्न करून त्यांचें अंतःकरण विषाद आणि वेदना यांनीं ग्रस्त करून सोडलें. एवढाल्या मोठमोठ्या हिशोबाच्या चोपड्या उलथ्या पालथ्या घातल्या, परंतु त्यांतून एक पैसासुद्धां निघाला नाहीं! बिचारे नारायणरावजी कपाळावर हात मारून स्वस्थ बसले. त्यांनां सर्वत्र अंधकार दिसूं लागला.

भ्रांतिशून्य नारायणरावजी पुन्हा हिशेब तपासूं लागले, जमाखर्चाचीं तोंडं पुन्हा मिळवून पाहिलीं; परंतु कांहींएक निष्पन्न झालें नाहीं. मूळ भांडवल आणि इतक्या दिवस मोठया मेहनतीनें मिळविलेला नफा, ठार बुडाला! मोठया कष्टानें, पुष्कळ दिवस खपून, समुद्रकांठीं बांधलेलें मुंग्यांचें वारूळ समुद्राच्या एका लाटेनें जसें साफ धुऊन टाकावें, त्याप्रमाणें आमच्या नारायणरावजींनीं आजपर्यंत मोठ्या चातुर्यानें, मोठया यत्नानें केलेला अर्थसंग्रह दुर्दैवाच्या ह्या तडाख्यानें समूळ नाहींसा करून टाकिला!

विपत्तीला अगदींच अनभ्यस्त अशा आमच्या नारायणरावांला वाटूं लागलें कीं, आतां जगून तरी काय उपयोग ? आत्महत्या करावी हेंच चांगलें ! असा विचार करून पेढीवरून परत घरीं येत असतां त्या भ्रांतियुक्त नारायणरावजींच्या डोळयांपुढें पुत्रकन्यावेष्टित, विषादभाराक्रांत रमाबाईची मूर्ति प्रतिक्षणीं उभी राहूं लागली !

वर्षाकाळच्या मेघाच्छादित आकाशाप्रमाणें काळवंडलेल्या मुखानें नारायणरावजी घरीं आले. अंगणांत मुलें खेळत होतीं. सूर्यकिरणांनीं त्यांचीं तीं लावण्यमय मुखकमलें प्रफुल्ल झालीं होतीं. नारायणरावजींनां पहातांच त्यांची जेष्ठ कन्या वत्सला धांवत येऊन त्यांच्या अंगरख्याचा पदर धरून ह्मणाली " बाबा ! तुह्मी आज असे कांहो दिसतां ? "

कन्येच्या मुखांतून हे लडिवाळपणाचे शब्द कानीं पडतांच नारायणरावांच्या कपाळाची एकदम शीर उठली. मुलगी पुन्हा त्यांच्या तोंडाकडे पाहून " बाबा—" असें ह्मणते न ह्मणते तोंच त्यांनीं तिच्या त्या कोमल गालावर फाड्दिशीं एक चापट लगाविली ! बिचारी पोर फारच भ्याली व भयानें घाबरून पळत असतां तिरमिरी येऊन धाडकन् खालीं पडली. मुलीची ही दशा पहातांच नारायणरावजींच्या मनांत आजपर्यंत अगदीं अननुभुत असा प्रेमभाव उत्पन्न झाला. त्यांच्या जिवाला कसेंसेंच होऊं लागलें; परंतु ते हें लवकरच विसरून गेले. मुलगीहि न जाणों येथें राहिल्यास आणखीहि खाऊ मिळेल, या धास्तीनें झट्दिशी उठून पळून गेली. जरा दूर जाऊन तिनें एकदा भीति आणि निराशाव्यंजक अश्रुपूर्ण नेत्रांनीं आपल्या पित्याकडे पाहिलें. त्या कठोर पित्याला दिसून आलें कीं, तिच्या कपाळावर खोंक पडली आहे, आणि त्यांतून भळभळ रक्त वाहत आहे. पोरीच्या डोळ्यांतून अश्रु निघून ते टपटप तिच्या गालावर पडत होते. पोरगी तर निघून गेलीच !

मुलीची ती करुणदृष्टि आणि तें वेदनाक्लिष्ट वदन पहातांच नारायणरावजींच्या मनांत पुन्हा एकवार तो नूतनभाव जागृत झाला.

ते घरांत जाऊन आपल्या खोलींत एका आरामखुर्चीवर पडले. गडी "कांहीं पाहिजे कीं काय?" ह्मणून विचारण्यास आला तेव्हां "कांहीं नको! जा, जरूर लागल्यास हांक मारीन—" असें सांगून त्याला त्यांनीं घालवून देऊन ते स्वस्थ बसले. काय चमत्कार!! त्यांच्या डोळ्यांत आज आपोआपच अश्रु येऊं लागले. त्या अंधारमय सायंकाळीं, त्यांच्या हृदयांतील अप्रस्फुट कोमलता प्रस्फुट होऊं लागली. क्रमवर्धनशील बाष्पराशि, ज्याप्रमाणें शेवटीं मोठ्या वेगानें स्थानाधार विदीर्ण करून बाहेर पडूं लागते, त्याच वेगानें, त्यांच्या हृदयांतील कोमलता, कठोरतेचें आवरण भेद करून बाहेर पडूं लागली. तिच्या त्या वेगानें त्यांच्या अंगांतील शीरन् शीर कांहीं चमत्कारिक भावनेनें कंपित होऊन त्यांनां व्याकुल झाल्यासारखें वाटूं लागलें! नारायणरावजींनीं बराच वेळ अश्रुवर्षाव केला!

नंतर ते उठले. अनुताप आणि आत्मग्लानि यांच्याचबरोबर आज त्यांनां एक विशेष प्रकारच्या सुखाचा अनुभव येऊं लागला. या वेळीं सायंकाळ सरून रात्र होत होती. हळुहळू नारायणरावजी रमाबाईच्या खोलींत शिरले. मातेच्या सुकोमल अंकावर मस्तक ठेवून त्यांची ती हतभागिनी कन्या अगदीं निश्चल झोंप घेत होती. तिच्या त्या कपाळावर खोंक पडलेल्या जागीं कापडाची पट्टी बांधिली होती. तिच्या पाठीमागें तिची दुसरी बहीण आणि भाऊ निजलीं होतीं. दिव्याच्या चंचल प्रकाशांत त्यांचीं मुखकमलें दृष्टीस पडतांच नारायणरावजींला एकदम रडूं कोसळलें. हें पाहून रमाबाई तर अगदीं चकित झाल्या! नारायणरावजींनीं आज पहिल्या प्रथम एकामागून एक तिन्हीं मुलांचें मोठ्या प्रेमानें चुंबन घेतलें!

वसंतऋतूंत कोकिलरव कानीं पडतांच जशीं नाना तऱ्हेचीं पुष्पें विकसित होतात, त्याचप्रमाणें आज त्यांच्या हृदयांत स्नेह, प्रेमप्रभृति नाना कोमलभाव उदित झाले. त्यांनीं रमाबाईला आजपर्यंतचें सर्व वृत्त उघड करून सांगितलें. तें ऐकून आमच्या प्रेमळ रमाबाईला आनंदाचें भरतें आलें. त्यांच्या डोळ्यांतील अश्रुबिंदु मांडीवर निजलेल्या

त्या मुलीच्या मुखकमलावर एकसारखे टपटप गळूं लागले. पतिपत्नीच्या प्रेमाश्रूंचा, आज अगदीं प्रथमच संगम झाला!

आमच्या नारायणरावजींनां आज समजून आलें कीं, इतके दिवस दुःखांत घालवून आज आपल्याला ज्या सुखाचा लाभ झाला, तें अगदीं अतुल आहे! आजपर्यंत मोठ्या कष्टानें व्यापारांत मिळविलेल्या आणि शेवटीं दुर्दैवानें त्यांतच घालाविलेल्या धनाचीसुद्धां या अपूर्व धनाशीं तुलना व्हावयाची नाहीं! आज त्यांचें हृदय या नूतन उदय पावलेल्या कोमलतेनें तुडुंब भरून राहिलें!

त्या रात्रीं त्या पतिपत्नीच्या कितीतरी गोष्टी झाल्या! भ्रांतिपटलांतून बाहेर पडलेल्या आमच्या नारायणरावजींनीं, आपल्या नवपरिणिता वधूचा पूर्वीं जो आदर केला नाहीं, तोच आदर, आज त्या गृहिणी रमाबाईचा केला. जणूं काय, आज त्या नूतन उद्भवलेल्या कोमलतेनें, त्यांचें हृदयाहि अगदीं नूतन करून टाकिलें! त्या भ्रांतिमूलक प्रेमाला वश होतांच, ते आज या 'असार संसारांत'च अनुपम सुखाचा उपभोग घेऊं लागले. आज सर्व जगत् त्यांनां सुखमयच भासूं लागलें!

प्रभातकालीं उठून ते खिडकींतून बाहेर पाहूं लागले, तों प्रत्येक परिचित देखाव्यांत त्यांनां आनंदोपभोगाच्या वस्तु दिसूं लागल्या. त्यांनां आज सर्व कांहीं शोभामय, सर्व कांहीं सुंदर, दिसूं लागलें. या रम्य प्रभातकालीं, पक्षी मंजुळ रवानें गायन करित होते; पूर्वेकडे आकाशांत मेघमालांवर नवरागताम्रकिरणें चित्रांकित होऊन त्यांस एक अपूर्व शोभा आली होती; सुशीतल स्निग्ध वायु मंद मंद वाहत होता; त्याच्या झुळुके बरोबर नारायणरावजींच्या अंतर्गृहांतून कोणाचा तरी मंजुळ आवाज कानीं येत होता:—

"प्रीतिलता जोंवरि हो ह्या न फूलती,
शमदम हे मंद वायु जों न सूटती,
तोंवरि तें मंदिर नच रम्य जरि किती
रुक्ष मरुद्भूमि जशी असह्य भासती!"

# महर्षिरत्नमाला.

थोर स्त्रीपुरुषांचीं चरित्रें कित्त्यासारखीं आहेत. तीं मनुष्यांनां मनुष्यपणाचें उत्तम वळण लावितात; मनाची खरी सुधारणा करितात; धर्म, नीति, भक्ति, शांति, सदाचरण इत्यादिकांचा विकास करितात; धार्मिक, सामाजिक, नैतिक, राजकीय व अध्यात्मिक विषयांची त्यांपासून विशेष माहिती होते; आणि मनुष्याच्या मानसिक शक्तीच्या वृद्धीचीं तीं उत्कृष्ट साधनेंच आहेत. सूर्याचे किरण समुद्रांतील खारें पाणी आकर्षण करून जसे त्याचे गोडे मेघ बनवितात, तशीं, हीं थोर स्त्रीपुरुषांचीं चरित्रें, अज्ञानी जनांनां सज्ञानी, दुराचाऱ्यांना सुशील, अधर्मिकांनां धार्मिक, आळशांला उद्योगी—महापुरुषार्थी बनवितात.

परकीय देशांतील स्त्रीपुरुषांचीं चरित्रें वाचण्यापेक्षां स्वदेशांतील स्त्रीपुरुषांचीं चरित्रें वाचल्यानें वाचकांस अधिक लाभ होतो. अन्य देशांप्रमाणें आपल्या आर्यावर्तांतहि वेळोवेळीं अनेक थोर स्त्रीपुरुषरत्नें जन्मलीं आहेत. त्यांनीं आपल्या पवित्र आचरणानें व विविध ज्ञानदानानें जगावर मोठे उपकार केले आहेत. आपल्या देशांत जीं ब्रह्मर्षि, देवर्षि, राजर्षि वगैरे रत्नें निर्माण होऊन गेलीं आहेत, त्यांनीं निःस्वार्थबुद्धीनें तत्त्वज्ञान, न्याय, नीति, धर्म, ज्योतिष, व्याकरण, वैद्यक, संगीत, नृत्य, शिल्प, शस्त्रास्त्रविद्या, धनुर्वेद, विमानादि कला व मंत्रतंत्रादि विषयांचा करवला तितका अभ्यास, शोध व प्रचार केला आहे. यांतील चरित्रनायकांच्या जीवनवृत्तांतांत जागजागीं अद्भुत वृत्तांत आढळण्यांत येईल, पण, सत्यासत्याचा निर्णय करून केवळ सत्यसार ग्रहण करणारे वाचक त्याकडे दुर्लक्ष्य करून चरित्रनायकांच्या अनुकरणीय गुणकर्मस्वभावांचेंच अनुकरण करतील, अशी आशा आहे.

## देवर्षि नारद.

स्वायंभू मन्वंतरांत प्रजोत्पत्ति करण्याकरितां ब्रह्मदेवानें जे दहा मानसपुत्र उत्पन्न केले होते, त्यांपैकींच महर्षि नारद हे होत. हे पद्मकल्पांत व वराहकल्पांतहि होते. यांनीं प्रजोत्पत्ति करण्याचें काम नाकारिलें, हे आमरण ब्रह्मचारी राहिले. कडकडीत वैराग्य धारण करून केवळ ब्रह्मचिंतनांत व हरिकीर्तनांत हे सदा निमग्न असत. प्रथम हे मनूच्या सभेंत होते. ब्रह्मदेवांच्या वंशांतील एका गुरूपाशीं यांनीं विद्याभ्यास

केला. तोंपर्यंत हे विशेष जगप्रसिद्ध झाले नव्हते. पण, आपल्या तीव्र बुद्धिप्रभावानें हे लवकरच विलक्षण बुद्धिमान्, महायोगी व उत्तम विद्वान् निपजले. त्या वेळच्या देवर्षींत हे अग्रगण्य होते. हे परम धार्मिक, उत्साही, परदुःखभंजक, बुद्धिमान्, नीतिज्ञ, गानाविद्यापटु, चपल, पराक्रमी, भविष्यवादी, विनोदी, कलहप्रिय, उत्कृष्ट वक्ते, व तत्वज्ञ होते. प्रसंगोपात गमतीसाठीं, शुभ हेतु मनांत धरून, बाह्यप्रपंच रचून, यांनीं देवदानवांत कलह उत्पन्न करावे व शेवटीं त्यांतील खरें रहस्य सांगून ते यांनीं मिटवावे. हा यांचा विनोदी स्वभाव त्या वेळच्या लहानथोरांनां भारी प्रिय होता. हे महर्षि स्वेच्छाचारी होते. त्रिलोकीं यांचे गमन होतें. वाटेल तेथें हे जात असत. ब्रह्मचिंतन व हरिकीर्तन या आनंदांत हे सदैव निमग्न असत. देव, ऋषी, मुनी, लोकपालादिकांत कांहीं महत्त्वाचा निरोप कळविण्याचें काम या देवर्षींकडे असे. हें काम यांनां फार चांगलें साधलें होतें. ‘कलहप्रिय’ हें या देवर्षींचें नांव पुराणप्रसिद्धच आहे! अझूनहि परस्परांत कलह लावून देणाराला ‘कळीचा नारद’ असें ह्मणत असतात.

नारदमुनींची वाणी अति रसाळ, विनोदी व अत्यंत बोधक होती. त्या वेळच्या देवदानवांनां ती फारच प्रिय होती. त्यांत यांचें चांगलें वजन असे. यांनां ते सर्व पूज्य मानीत. यांची अंगकांति बदामी रंगाची असून अत्यंत सतेज होती. मस्तकावरील जटा पिंगट रंगाच्या होत्या. यांची शेंडी सदैव उभीच असे. यमुनातीरीं यांचा आश्रम होता, पण यांचें भ्रमण त्रिलोकीं असे. गायन विद्येंत व संगीतकलेंत हे ब्रह्मर्षि फारच निपुण होते. आपल्या मधुर गायनाच्या योगानें, यांनीं सर्वांनां अगदीं मोहित केलें होतें. यांची वक्तृत्वशक्ति इतकी रसाळ व मोहक होती कीं, श्रोत्यांचीं मनें हे सहज आकर्षित करून त्यांस अगदीं तन्मय करीत! यांची उपदेशाची रीत गद्यपद्यात्मक असे. गायनयुक्त उपदेशाचा ठसा मनुष्याच्या मनावर फार त्वरित उमटत असतो. रागतालयुक्त मधुर गायनकला, मनुष्याचें मन तेव्हांच आकर्षण

व तल्लीन करिते. नारदमुनींनां ही कला तर परिपूर्ण अवगत होती. त्यामुळें यांचा उपदेश देवदानवादिकांनां फार आवडत असे. यांचे उपदेशाचे विषय मुख्यत्वेंकरून ईश्वर, धर्म, नीति व अध्यात्म हे असत. हे निरिच्छ व निरभिमानी होते. भर चव्हाठ्यावर किंवा रस्तो-रस्तीं उभें राहून हे महर्षि, भक्तिवैराग्यनीतिपर सुरस पदें मधुर सुरावर व रागतालावर गात असत. हजारों लोक यांचा उपदेश मनापासून ऐकत असत. कधीं कधीं रात्रीच्या वेळींच हे गायनपटु महर्षि, आपली सुंदर वीणा व चिपळ्या घेऊन, गायनद्वारा लोकांस ब्रह्मज्ञानाचा उपदेश करित रस्तोरस्तीं फिरत असत. पूर्ण ज्ञान, रसाळ वाणी, व मधुर गायनकला यांच्या योगानें हे महर्षि, त्या काळच्या ब्रह्मर्षिमंडळांतहि अति प्रिय व परममान्य झाले होते. हे कडकडीत विरक्त असत. देव, दानवादिक यांचें वचन मोठ्या आदरानें मान्य करीत. त्यावेळच्या सर्व देवसभा, राजसभा व धर्मसभा यांतहि यांचें चांगलें वजन होतें. यांचें आगमन वीणावादन व नृत्यगान करित अकस्मात् व्हावयाचें. हरिकीर्तनाची यांनां आतोनात आवड होती. श्रीविष्णूला तर हे फारच प्रिय होते. त्यांच्या प्रत्येक गुप्त मसलतींत फार करून नारदमहर्षि असावयाचेच !

नारदमुनींची विद्वत्ता फार मोठी होती. त्यांची मोठी पाठशाळा असून तींत साठ हजार शिष्य अध्ययन करित असत. यांची शिक्षण-पद्धति फार सरळ असे. हे उत्कृष्ट ग्रंथकारहि होते. यांनीं तत्त्वज्ञावर जो 'नारदपंचरात्री' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे, तो विद्वन्मान्य आहे. त्यांत ब्रह्मज्ञानाचें फार चांगलें निरूपण केलें आहे. त्याची अस्सल प्रत सांप्रत मिळत नाहीं ! हल्लीं जी उपलब्ध आहे, तिच्यांत जागजागीं पुष्कळ फेरफार केलेला दिसून येतो. 'नारदस्मृति' या नांवाचा स्मृतिग्रंथ याच महर्षींनीं रचला आहे. हाहि ग्रंथ लोकमान्य झालेला आहे. एखाद्या धर्मप्रकरणाच्या निर्णयाच्या वेळीं, या स्मृतींतील प्रमाणें देत असतात. तीर्थस्थलांवर यांनीं एक उत्तम ग्रंथ रचला आहे.

संगीतकलेंत व गायनविद्येंत तर हे देवर्षि अत्यंत निपुणच होते. या उभय विषयांवर यांनीं जो ग्रंथ रचला आहे, तो इतका सरळ व भरपूर माहितीनें भरलेला आहे कीं, संगीत शास्त्रांत त्याची गणना मुख्यस्थानीं आहे. 'नारदपुराण' या नांवाचें एक पुराण आहे. पण, त्याचे कर्ते हे महर्षि नाहींत. त्यांत या देवर्षींचा सर्व वृत्तांत विस्तारपूर्वक वर्णिला आहे.

श्रीरामाच्या राजसभेंत हे एक धर्मशास्त्री होते. कुबेराच्या सभेंतहि यांचें जाणेंयेणें असे. इंद्रादि लोकपालांच्या सभांचें सुरस वर्णन धर्मराजापाशीं यांनींच केलें होतें, यांनींच धर्मराजाला नीतीचा उपदेश केला आहे. 'नारदनीति' नांवानें जो ग्रंथ प्रसिद्ध आहे, तो हाच. ह्या नीतिग्रंथाचें जो कोणी मार्मिकपणें अवलोकन करील, तो या देवर्षींनां त्या काळचा हर्बर्ट स्पेन्सर असें खचित ह्मणेल! आमच्या देशांत नीतिपर ग्रंथ नाहींत असें ह्मणणारांनीं नारदनीति एकवार अवश्य वाचावी. साम करण्यांत तर हे मुनिवर्य फारच प्रवीण होते. श्रीविष्णूचा लक्ष्मीशीं विवाह जुळविण्याची सर्व खटपट याच देवर्षींची. श्रीविष्णूच्या आज्ञेप्रमाणें इंद्रास अनुकूळ करून, पुरूरव्याचा उर्वशीशीं संबंध यांनींच जुळवून दिला. हे महर्षि मोठे कारस्थानी होते. सत्यधर्माचा व नीतीचा भंग करणाऱ्या अमभांचा नाश हे मोठ्या युक्तीनें करित असत. आपली स्त्री वृंदा ही महासती आहे, तेव्हां तिच्या सतीत्वप्रभावानें आपण हवें तें करूं, असा जालंधर दैत्यास मोठा गर्व झाला. त्यानें आपल्या दैत्यस्वभावाप्रमाणें देवांचा व मनुष्यांचा अतोनात छळ करून त्यांनां अगदीं त्राहि त्राहि करून सोडलें. परंतु या देवर्षींनीं, मोठ्या युक्तीनें त्या उन्मत्त दैत्याचा वध करविला. मदोन्मत्त होऊन अनीतीनें राज्य करणाऱ्या कंसाचा "कृष्ण मथुरेंत वसुदेवाच्या घरीं अवतार घेऊन वध करतील" अशी जी आकाशवाणी झाली होती, ती सत्य करण्यासाठीं याच देवर्षींनीं कंसाचें मन पुरें संशयी करून त्याकरवीं वसुदेवदेवकीला बंदींत ठेवविलें.

हे महर्षि भविष्यवादी होते. "वासवदत्तेचा पुत्र विद्याधरांचा राजा होईल," हें भविष्य याच मुनींनीं वर्तविलें होतें. "सती सावित्री आपल्या पातिव्रत्यप्रभावानें स्वपतीचा अपमृत्यु टाळील" हें भविष्य नारदमुनींनींच तिच्या बापास कळविलें होतें.

हे महर्षि मोठे विरक्त होते. पुत्रशोकामुळें अत्यंत व्याकुळ होऊन शोक करणाऱ्या चित्रगुप्ताला, तत्वज्ञानाचा उपदेश करून याच मुनींनीं पूर्ण विरक्त बनविलें. ब्रह्मपदाचा अखंड लाभ हेंच खरें सुख, अशी त्याची खात्री करून यांनींच त्याला निस्सीम ईश्वरभक्त होण्याचा उपदेश केला. चित्रगुप्ताला जो उपदेश केला आहे, त्यांतील सारांश असा आहे:--"या संसारांत कोणीच कोणाचें नाहीं! स्त्री, पुत्र, इष्टमित्र, धन, ऐश्वर्य हीं व्यवहाराच्या दृष्टीनें जरी सत्य आहेत असें वाटतें, तरी हे राजा! आपण कोण, आलों कोठून, व जाणार कोठें, या गोष्टींचा विवेकपूर्वक तूं आपल्या शुद्ध अंतःकरणांत नीट विचार करून पहा. सत्यस्वरूप जाणण्याचा योग्य प्रयत्न कर. तूं आपल्या तन, मन, धनाचा व तारुण्यादि अहंपणाचा गर्व सोडून दे. यांपैकीं एकहि तुझ्याबरोबर यावयाचें नाहीं. विकाळ काळ त्या सर्वांचें हरण करितो. ह्मणून तूं, या क्षणिक, नश्वर, मायामय जगाचा लोभ न धरितां, तें सत्यस्वरूप नीट ओळखून शेवटीं त्या सच्चिदानंदरूपीं लीन होऊन मोक्षसुखाचा चिरंतन लाभ करून घे." याच उपदेशानें चित्रगुप्ताचा मोह दूर झाला. तो कडकडीत विरक्त बनला, व यमनियमादि अष्टांग योगाभ्यास करून शेवटीं ब्रह्मसुखाला पात्र झाला.

ध्रुव, प्रल्हाद, ऋतुध्वज, वाल्मीकि वगैरे भक्तांस याच मुनींनीं ब्रह्मप्राप्ति करून दिली आहे. या नश्वर जगाचा मनापासून त्याग करून जो कोणी ईश्वरावर पूर्ण भक्तिभाव ठेवितो, सत्कर्में करतो, स्थिर चित्तानें निरंतर त्याचेंच चिंतन करितो, त्याला ब्रह्मदर्शन त्वरित होतें; परंतु, हें ब्रह्मदर्शन होण्याचा मुख्य मार्ग सत्संग—सद्गुरुकृपा. सत्संगतीचा महिमा फारच मोठा आहे. महात्म्यांच्या संगतीनेंच उत्तम

पदाचा लाभ होतो. महर्षि नारद हे खरे सद्गुरु होते. यांच्या संगतीनें पुष्कळ जनांचा उद्धार झाला आहे.

एके दिवशीं आपली देवदत्तवीणा वाजवित व हरिभजन कर्रीत फिरत असतां, हे सहज सरस्वतीतीरावर गेले. तेथेंच व्यासदेवांचा सुंदर आश्रम होता. नारदमुनि आपल्या आश्रमीं आलेले पाहून महर्षि व्यासांनां फार आनंद झाला. ते उठून उभे राहिले. आदरपूर्वक नारद मुनींचा त्यांनीं योग्य सत्कार केला. महर्षि व्यासांनीं आपला योग्य पूजासत्कार केलेला पाहून देवर्षि नारद फार प्रसन्नचित्त झाले. पण, ब्रह्मर्षि व्यासांची मुद्रा अप्रसन्न पाहून हे त्यांस ह्मणाले "हे ब्रह्मर्षे! आपलें चित्त आज अप्रसन्न कां? आपण महाभारतासारखा उत्तम ग्रंथ रचला आहे. त्यांत व्यवहार, धर्म, नीति वगैरे अनेक विषयांचें अति उत्तम निरूपण केलें असून इतिहासदृष्ट्या त्याची योग्यता फारच मोठी आहे. असें असतां आपली मुद्रा खिन्न कां? शिवाय, आपण नित्य नियमानें ब्रह्मचिंतन करित असतां. मग आपल्या अंतःकरणाला अप्रसन्न करणारा हा चिंतानल कसा उत्पन्न झाला? मला वाटतें, आपण रचिलेल्या महाभारतांत कांहीं उणेपणा आहे, ह्मणून आपल्या मनाला संतोष नाहीं."

देवर्षींचें हें भाषण ऐकून महर्षि व्यास ह्मणाले "हे देवर्षे! आपण ह्मटलें तें सत्य आहे. माझें अंतःकरण गुढतम दुःखानें व्याकुळ होत आहे. हे परब्रह्म परमात्मन्! आपण निराकार, रूपरहित असतां मीं आपल्या खऱ्या स्वरूपाचें वर्णन न करितां, आपल्या अवतारादिरूपाचे वर्णन करून मीं तीर्थयात्रादिद्वारा आपल्या सर्व व्यापित्वाचा नाश मात्र केला आहे. या माझ्या विकारजनित दोषाची मला क्षमा असावी."

हें भाषण करित असतां महर्षि व्यासांच्या नेत्रांतून अश्रु वाहत होते. हें पाहून देवर्षि नारद फारच गहिंवरले. ते ह्मणाले "हे महर्षे! आपल्या विशेष दुःखाचें कारण हें नाहीं. आपल्या महाभारतांत हरि-भक्तीचें विशेष निरूपण केलेलें नाहीं; त्यामुळें आपलें मन इतकें उद्विग्न

झालें आहे. त्याच्या गुणकीर्तनानें सर्व जग पवित्र होत आहे; भक्तजन निरंतर ज्याचें चिंतन, नामस्मरण व गायन करित आहेत, ज्याच्या सच्चिदानंदस्वरूपीं योगी जन लीन होऊन ब्रह्मानंद अनुभवित आहेत, त्या परब्रह्माचें निरूपण आपण आपल्या ग्रंथांत करून मनांतील खेद दूर करावा."

महर्षि व्यासांनीं नारदमुनींचा हा उपदेश परमादरानें मान्य केला. नंतर श्रीव्यासदेवांच्या मनाला पूर्ण शांति मिळावी ह्मणून योगाभ्यासानें व ब्रह्मकृपेनें प्राप्त झालेल्या स्वतःच्या पूर्वजन्माच्या ज्ञानाचें त्यांना या महामुनींनीं निरूपण केलें.

महर्षि नारद ह्मणाले "पूर्वजन्मीं मी एका ऋषीचा दासीपुत्र होतों. वर्षाकाळीं चातुर्मास्यांत योगी, ब्रह्मर्षि, देवर्षि, वगैरे एकमेकांच्या आश्रमास भेटण्यासाठीं जात येत असत. त्याप्रमाणें एके वेळीं सनकादि महर्षि आमच्या आश्रमास आले. आमच्या महामुनींनीं त्यांचा योग्य सत्कार करून त्यांना कांहीं दिवस आग्रहपूर्वक ठेवून घेतलें व मला त्यांची सेवा करण्याचें काम सांगितलें. मनापासून मी त्या महर्षींची सेवा करूं लागलों. मला मित बोलणारा, इंद्रियनिग्रही, कार्यदक्ष, बालक असून आज्ञाधारक व सुशील पाहून ते मजवर फार ममता करूं लागले. त्यांच्या सत्संगानें व पवित्र अन्नसेवनानें माझें चित्त पवित्र झालें. चित्त पवित्र होतांच सत्यधर्मावर माझें सहज प्रेम बसलें. त्यामुळें मला हरिगुणकीर्तन ऐकण्याची अतोनात इच्छा झाली. दिवसेंदिवस ती सारखी वाढतच चालली. प्रेममय परमेश्वराच्या ठायीं माझी वृत्ति अगदीं दृढ व तन्मय होऊन गेली. ते महर्षि नित्य नियमानें जें ब्रह्मकीर्तन करीत, तें ऐकून, माझ्या प्रेममय बनलेल्या अंतःकरणांत, भक्तिचंद्राचा पूर्ण उदय झाला. बालक असून शुद्धचित्त, जितेंद्रिय, धर्मनिष्ठ, गुरुसेवातत्पर व जिज्ञासु आहे, असें त्या दीनवत्सल महर्षींनीं जाणून, ते मजवर अत्यंत प्रसन्न झाले. साक्षात् ईश्वरप्रणीत गूढ इश्वरीज्ञानाचा मंत्रोपदेश त्यांनीं मला केला,

व मला देशपर्यटन करण्याची त्यांनीं आज्ञा केली. पण, मी पडलों आईचा एकुलता एक पुत्र. मजवर तिची अतोनात ममता होती. मी तिला जीव कीं प्राण होतों. पळभरसुद्धां तिला माझा वियोग सोसत नसे. या मातृमोहामुळें कांहीं दिवस मी तेथेंच राहिलों. महर्षीनीं उपदेशिल्याप्रमाणें मी नित्य नियमानें जप, तप, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान व ब्रह्मस्वरूपाचें चिंतन करित असें. याच्याच योगानें मला सत्यज्ञानाचा लाभ झाला. वनांत एकांत जागीं बसून ब्रह्मचिंतन करण्याची मला फार इच्छा झाली. पण, परम दयाळू आईचा मायापाश कसचा तुटतो? माउलीच ती! तिला मी कसें कष्टी करावें? एका बाजूनें ब्रह्मचिंतनासाठीं वनांत जाण्याची बळावलेली मनाची आवड, व दुसऱ्या बाजूनें आईच्या आज्ञेचा भंग कसा करावा ही चिंता, या उभय ओढाताणीनें माझें मन अगदीं उदास झालें. पण, शेवटीं मला एक युक्ति सुचली. चार समजुतीच्या गोष्टी सांगून मीं आईचें मन वळविलें. मजबरोबर यावयाला ती कबूल झाली. मला फार आनंद झाला. लागलीच आम्हीं देशाटन करण्याची तयारी केली. आश्रमांतील महर्षींचें वंदन केलें, त्यांचे आशीर्वाद घेतले, व निघालों. देशाटण करित असतां मार्गांत सर्पदंशानें माझी आई मरण पावली. मातृवियोगाचें दुःख मला फार झालें. पण, ज्या वेळीं जें होणार तें चुकत नाहीं; मनुष्यदेह नाशिवंत आहे; जीवित अति चंचल आहे; तत्त्वज्ञान्यानें त्याचा मोह धरूं नये वगैरे विचारांनीं मीं आपल्या मनाचें शांतवन केलें. ब्रम्हचिंतनाच्या महत्कृत्यांत ही एक अडचण होती, ती याप्रमाणें दूर झाली. इच्छित कार्यसाधनास मी आतां अगदीं मोकळा झालों. उत्साहवृत्तीनें घोर वनांत जाऊन एकांत स्थलीं ब्रह्मचिंतन करित बसलों. लवकरच पुनः देशाटन करण्याला निघालों. मधून मधून परमेश्वराच्या सत्स्वरूपाचें ध्यान करित करित उत्तर भागीं बराच प्रवास केला. अनेक सधन देश, भव्य, सुंदर व विस्तीर्ण शहरें, वनें, उपवनें, आश्रम व तीर्थादि पाहिलीं.

अशा रीतीनें प्रवास करित फिरत असतां मला एक निबिड अरण्य लागलें. मी त्यांतून तसाच पुढें चाललों, तों तेथें एक सुंदर व विस्तीर्ण सरोवर लागलें. तेथें मी थांबलों. चालण्याच्या श्रमामुळें मी अगदीं थकून गेलों होतों. माझीं सर्व गात्रें अगदीं शिथिल झालीं होतीं. क्षुधा व तृषा यांनीं जीव फारच व्याकुळ झाला होता. मीं त्या सरोवरांत शिरून स्नान केलें. तीरावर बसून फलाहार केला व वर थोडें पाणीहि प्यालों. माझे सर्व शीण दूर झाले. नंतर मी तेथील एका पिंपळाच्या झाडाखालीं जाऊन बसलों. एकाग्र मनानें परमेश्वराचें ध्यान केलें. मी ध्यानमग्न असतां माझें चित्त भवसागरांत बुडून फार व्याकुळ झालें. हृदय भरून आलें. नेत्रांतून अश्रु वाहूं लागले. वृत्ति प्रेममय झाली. इतक्यांत परमेश्वराचें क्षणमात्र मला दर्शन झालें. मी अतोनात प्रेमावेशांत आलों. अगदीं मुग्ध झालों. सर्व गात्रें आनंदमय झालीं. चित्त प्रकाशमय व स्थिर झालें. इतक्यांत तें ब्रह्मरूप झट् अदृश्य झालें ! ईश्वराच्या शुद्ध स्वरूपाचें दर्शन होतांच मी एकदम उठून उभा राहिलों. पुनः त्या शुद्ध स्वरूपाचा साक्षात्कार व्हावा ह्मणून मी अत्यंत आतुर झालों. पुष्कळ यत्न केला, पण तो सर्व फुकट गेला. त्यामुळें मी फार खिन्न झालों. इतक्यांत आकाशवाणी झाली "हे वत्स ! या जन्मीं तुला माझें दर्शन होणार नाहीं. कारण, इंद्रियासक्त योगी मला पाहूं शकत नाहीं. माझा जो तुला आतां क्षणभर साक्षात्कार झाला, तो केवळ तुझ्या प्रीतीच्या उन्नतिसाठींच ! साधुजन हळुहळू मजविषयीं प्रेमयुक्त होऊन सर्व कामनांचा त्याग करतात, तसा तूंहि कामनात्याग कर, महर्षींची सेवा कर व मजवर दृढ भक्ति ठेव. हा देह सोडून माझ्या लोकीं आलास ह्मणजे तुला माझें दर्शन होऊन पूर्वजन्माचें ज्ञानाहि होईल. संतोषवृत्तीनें ब्रह्मचिंतन करित समयाची वाट पहा."

अशी आकाशवाणी होऊन मला एक ब्रह्मवीणा प्राप्त झाली. ती वाजवून मी ब्रह्मभजनांत रात्रंदिवस अगदीं निमग्न होऊन राहिलों. या नाशिवंत देहाचा माझ्याशीं कधीं वियोग होईल व मी तें सच्चिदानंद

स्वरूप ज्ञानदृष्टीनें केव्हां पाहीन, असें चिंतन करित करित मी प्रवास यात्रा करित होतों. फिरत फिरत मी शिबी राज्याच्या राजधानीस गेलों. त्याची राणी कैकई फार सद्गुणी व सुशील होती. तिनें माझा चांगला सत्कार केला. तेथेंच पर्वतऋषीशीं माझी भेट झाली. आह्मी दोघे तेथें पुष्कळ दिवस राहिलों. आह्मां उभयतांचा असा संकेत ठरला होता कीं, परस्परांच्या मनांत जे विचार उत्पन्न होतील, ते एकमेकांनीं एकमेकांस स्पष्ट कळवावे. पर्वतऋषींला लग्न करण्याची इच्छा झाली. शिबी राजाच्या कन्येची त्यांनीं राजाजवळ मागणी केली. पण "माझी कन्या बिजवराला द्यावयाची नाहीं" असें त्या राजानें त्याला विनयानें सुचविलें. नंतर मला त्या राजकन्येशीं लग्न करण्याची इच्छा झाली. प्रथम मीं ती इच्छा पर्वतऋषींनां कळविली. ती ऐकून ते एकदम क्रोधवश होऊन "तूं कुरूप होशील !" असा त्यांनीं मला शाप दिला. त्याप्रमाणें मी तत्क्षणीं कुरूप झालों. मीहि पर्वतऋषींला शाप दिला "तुलाहि स्वर्गप्राप्ति होणार नाहीं!" असा शाप होतांच तो ऋषि पृथ्वीप्रदक्षणा करण्यासाठीं तेथून निघून गेला. मी कुरूप झालेलों तेथेंच ईश्वरचिंतन करित राहिलों. "आपल्यासाठीं ऋषीला (मला) विरूप व्हावें लागलें," हें वर्तमान राजकन्या दमयंतीला समजतांच ती फार कष्टी झाली. तिनें हें वर्तमान आपल्या बापास कळविलें. तोहि फार खिन्नचित्त झाला. माझें शुद्धाचरण व ब्रह्मनिष्ठा पाहून ती राजकन्या माझी नित्य सेवा करित होती. बराच काळ लोटल्यावर पर्वतऋषि पुन्हा माझ्यापाशीं आले. तेसमयीं आह्मीं परस्परांनीं विचार करून आपापले शाप टाळले. मी पुनः पहिल्यासारखा सुरूप झालों. लवकरच त्या राजकन्येशीं माझा विवाह झाला. जरी मी गृहस्थाश्रमी बनलों होतों, तरी स्थिर चित्तानें ब्रह्मचिंतन करण्याचा माझा क्रम अव्याहत चालूच होता. कांहीं काळानें मीं देहविसर्जन केलें. सत्कर्मानुसार मी स्वर्गसुखाचा अनुभव घेऊं लागलों. त्यानंतर भक्तवत्सल, दयामय प्रभूच्या कृपेनें मी ब्रह्मदेवाचा मानसपुत्र झालों. मी कडकडीत ब्रह्मचर्यव्रत धारण केलें आहे व त्याप्रमाणें वागत

आहें. ही देवदत्त मधुरवीणा वाजवून सुस्वर गायनद्वारा, ईश्वराच्या गुणकर्मस्वरूपाचा लोकांस बोध करित आहें. जेव्हां जेव्हां मी ही सुमधुर वीणा वाजवून सुस्वरानें हरिभजन करित असतों, तेव्हां तेव्हां परब्रह्मरूप माझ्या हृदयांत प्रगट होतें, चित्तवृत्ति आनंदमय होतात. त्याच परमेश्वराच्या कृपेनें मला हें पूर्वजन्माचें ज्ञान प्राप्त झालें आहे. ब्रह्मानंदांत मी सदैव निमग्न असतों, व तोच खरा आनंद आहे. तो सर्वांस मिळावा हीच माझी मनापासून इच्छा आहे व त्यासाठींच मी इतका झटत आहें. ”

हें देवर्षि नारदाचें भाषण ऐकून श्रीव्यासदेव अति प्रसन्नचित्त झाले. त्यांनीं भागवतद्वारा हरिभक्तीचें वर्णन करून ते शेवटीं संतोष पावले. सत्संगतीचा हा केवढा प्रभाव !

या देवर्षि नारदमुनींच्या चरित्रापासून आपल्याला पुष्कळ बोध मिळेल. ते पूर्ण ब्रह्मचारी, मोठे तत्त्वज्ञानी, महा पंडित, कडकडीत विरक्त, उत्कृष्ट वक्ते, उत्तम गायक, परम चतुर, विलक्षण व्यासंगी, खरे धर्मवीर, निस्सीम हरिभक्त, अत्यंत नम्र, सदाचारसंपन्न, समदर्शी, स्वोन्नति करून दुसऱ्याची उन्नति करण्यासाठीं निःस्वार्थवृत्तीनें सदैव झटणारे व महायोगी होते. ‘देह त्यागितां कीर्ति मागें उरावी’ हें समर्थांचें वचन या महर्षिरत्नानें पूर्णपणें सत्य केलें.

# महर्षि अगस्त्य.

हे महाधनुर्विद्याप्रवीण, परदु:खभंजक महर्षि, आपल्या पवित्र आचरणानें व अतुल पराक्रमानें या आर्यावर्तांत तेजस्वी ताऱ्याप्रमाणें चमकत आहेत ! जगांत सद्गुणांचा व सदाचरणाचा सर्वदा आदर होत असतो; सद्गुणांचाच सर्वत्र सत्कार होतो; सद्गुणांनींच मनुष्याची कुलमर्यादा व थोरवी वाढते. मोतीं शिंपींत जरी निर्माण होतें, तरी त्याचा कोणी अनादर करित नाहीं; किंवा कमळ पंकांत जरी उत्पन्न होतें, तरी त्याला कोणी तुच्छ मानित नाहीं. तसें अगस्त्यमुनींचें जन्म जरी कुंभापासून झालें असलें, तरी हे महर्षि आपल्या सद्गुण, सदाचरणादिकांनीं सर्वांस परम आदरणीय झाले आहेत. “ बापासारखा पुत्र होतो ” हें जरी सत्य आहे, तरी कधीं कधीं पूर्वसंचितानुसार बापापेक्षांहि मुलगा सवाईसद्गुणी व महापराक्रमी निपजतो. महर्षि अगस्त्य तसेच होते. यांचे वडिल मित्रावरुण, हे महा तपस्वी व मोठे तत्वदर्शी होते. नित्य जप, तप, ब्रह्मध्यान, अनुष्ठानादि कर्म उपासनेंत ते सदैव निमग्न असत. त्यांचा आश्रम समुद्रतीरीं होता. पण समुद्रानें त्यांचा फार छळ मांडला. त्यानें एके दिवशीं त्या मुनींचीं वस्त्रें, तर दुसरे दिवशीं आसन व कमंडलूच वाहून नेण्याचा क्रम चालविला होता. हें सागराचें उन्मत्त वर्तन पाहून मित्रावरुणानां फारच राग आला. त्यांनीं अशी प्रतिज्ञा केली कीं “ या उन्मत्त सागराचें सगळें पाणी पिऊन जाईल असा पराक्रमी पुत्र उत्पन्न करीन तरच मी नांवाचा मित्रावरुण ! ”

नंतर त्यांनीं एक अपूर्व कुंभ बनविला व त्यांत आपल्या तेजाची स्थापना केली. तो कुंभ त्यांनीं एकांत जागीं फार जपून ठेविला. पूर्णमास भरतांच तो कुंभ फुटून त्यांतून सूर्यासारखा तेजस्वी, व ब्रह्मचर्यदीक्षा धारण केलेला एक दिव्य कुमार प्रगट झाला. मित्रावरुण ऋषींनीं त्यांचें नांव ‘ अगस्त्य ’ असें ठेविलें. कुंभापासून यांचें

जनन झाल्यामुळें यांनां कुंभज असेंहि ह्मणतात. वैदिककाळीं वैवस्वत-मन्वंतरांत यांचें जन्म झालें होतें. बापाच्या आज्ञेप्रमाणें विद्याभ्यास करण्याकरितां हे काशीस गेले. तेथें यांनीं चौदा विद्या व चौसष्ट कलांचा उत्तम अभ्यास केला. अल्पवयांतच यांची महाविद्वानांत व पराक्रमी पुरुषांत गणना झाली. आमरण विरक्त राहण्याचा यांचा विचार होता. पण, बापानें गृहस्थाश्रमी व्हावें अशी यांस आज्ञा केल्यामुळें, हे निस्सीम पितृभक्त महार्षि, विवाह करण्यास तयार झाले. अनुरूप कन्यारत्नाचा यांनीं जागजागीं बहुत शोध केला; पण, योग्य नवरी मिळेना. तेव्हां यांनां फार चिंता लागली. लग्न करण्याची इच्छा इतकी दुणावली कीं, ती, या महर्षींनां रात्रंदिवस चैन पडूं देईना ! अनुरूप वधूचें चिंतन करित असतां यांनां असा शोध लागला कीं, वैदर्भ देशाचा राजा पुत्रप्राप्तीसाठीं स्वपत्नीसह तप करित आहे. त्याच्या स्त्रीच्या गर्भांत या महर्षींनीं आपल्या योगबलानें दिव्य तेजाची स्थापना करविली. विदर्भराजाची पत्नी गरोदर झाली. पूर्णमास भरतांच ती कन्यारत्न प्रसवली. कन्या रूपानें फारच सुरेख होती. आपल्या पोटीं कन्येचें जन्म झालेलें पाहून राजास फार आश्चर्य वाटलें. हें रूपांतर कसें झालें हें गूढ त्याला समजलें नाहीं. त्या कन्येचें नांव त्यानें लोपामुद्रा ठेविलें. ती रूपानें जितकी सुंदर होती, तितकीच ती सद्गुणसदाचरणांनींहि आदरणीय होती. उपवर होतांच राजानें तिचें स्वयंवर करण्याचा बेत केला. इतक्यांत, अगस्त्य मुनि येऊन त्यांनीं तिची मागणी केली. ती ऐकून राजा मोठ्या विचारांत पडला. कारण, अगस्त्य ऋषींचा प्रभाव तो पूर्णपणें जाणत होता. आपल्या पित्याला चिंतातुर पाहून ती चतुर राजकन्या मोठ्या विनयानें त्याला ह्मणाली "बाबा ! आपण कशाला इतके कष्टी होतां ? चिंता करण्याजोगें यांत काय आहे ? मी या महर्षींची धर्मपत्नी होऊन आपल्या जन्माचें सार्थक करून घेईन. मी आपल्याला मोठी नशीबवान समजत्यें. माझी आदल्या जन्माची मोठी पुण्याई ह्मणूनच

मला अशा पतीचा लाभ होत आहे. मोठ्या आनंदानें आपण माझा या महामुनींशीं विवाह करावा. ”

लोपामुद्रेचें हें निश्चयात्मक भाषण ऐकून राजास फार आनंद झाला. कन्येच्या मर्जीप्रमाणें त्यानें अगस्त्यमुनींशीं तिचें लग्न केलें. लग्न झाल्यावर महर्षि अगस्त्य आपल्या गुणवंत धर्मपत्नीसह काशीस जाऊन राहिले.

हे महर्षि महा तेजस्वी, परम पुरुषार्थी, तत्त्ववेत्ते, अत्यंत परोपकारी, वामनमूर्ति, मोठे बुद्धिमान्, विद्वान्, हिम्मतवान, दृढनिश्चयी, अत्यंत शोधक, व मोठे कल्पक होते. धनुर्विद्येंत तर यांचेसारखा निपुण त्या वेळीं कोणीच नव्हता. तिचा उपयोग हे केवळ परपीडानिवारणाकडे करित असत. स्वतः धनुष्यबाण घेऊन हे स्वदेशांत फिरत असत. धर्मनिंदक, प्रजापीडक, कुकर्मी, क्रूर कर्में करणारा, असा कोणी राजा आढळला असतां, त्याला हे महर्षि प्रथम सामोपचाराच्या चार गोष्टी सांगून शुद्धीवर आणित असत. पण त्या सामोपचारानें जो उन्मत्त राजा समजत नसे त्याच्याशीं हे महाधनुर्धर निकरानें लढत व त्याचा अगदीं पराभव करीत, इतकेंच नाहीं, तर त्याला पदच्युत करून त्याच्या जागीं योग्य राजाला बसावित असत. युद्धकर्म हें यांचें नित्यकर्म नव्हतें. फक्त सत्यधर्माच्या रक्षणासाठीं किंवा प्रजेच्या सुखासाठींच हे क्षात्रकर्म कारित असत. तसेंच ज्या ज्या वेळीं देशांत लुटारू व जुलमी लोकांचें प्राबल्य होत असे त्या त्या वेळीं हे परम पराक्रमी शस्त्रधारी होऊन त्या दुष्टांचा समूळ नाश करीत व आपल्या देशबांधवांनां दुःखमुक्त करित असत. अगस्त्यमहर्षींचा हा महापराक्रम पाहून त्या काळचे दुष्ट व उत्पाती लोक यांनां चळचळ कांपत ! इतका यांचा त्या वेळीं आर्यावर्तांत सर्वत्र दरारा बसला होता. आपल्या तपोबलानें व क्षात्र-कर्मानें या महर्षींनीं शेंकडों दुष्ट लोकांचा संहार केला. यांच्या या कडक बंदोबस्तामुळें पुष्कळ दुष्ट लोकांनीं आपापलीं दुष्कर्में सोडून दिलीं. स्त्रीबलात्कारादि पापकर्मांचाहि त्या वेळीं चांगला बंदोबस्त झाला होता.

हे महर्षि उत्तम अध्यापक होते. धनुर्विद्येंत यांची त्या वेळीं फार ख्याति होती. पुष्कळ क्षत्रियकुमार यांच्यापाशीं धनुर्वेद शिकण्यास येत असत. प्रख्यात धनुर्धर द्रोणाचार्य व द्रुपदराजा हे याच महर्षींचे पट्टशिष्य होते.

यांनां प्रवासाची फारच आवड होती. पृथ्वीवरील बऱ्याच देशांत यांनीं प्रवास केला. यांनींच नौकाशास्त्राचा विशेष शोध करून नौकादि जलयानांची रचना केली व स्वतः समुद्रांतील पुष्कळ लांबलांबचा प्रवास केला. नौकाशास्त्रावर यांनीं एक उत्तम ग्रंथ रचला आहे. पण तो धनुर्वेदासारखा सध्या दुर्मिळ झाला आहे. हा दुर्मिळ ग्रंथ आजला मिळाला असता, तर समुद्रांतील प्रवास शास्त्रसिद्ध नाहीं, असें ह्मणणारांचीं तोंडें सहज बंद करितां आलीं असतीं. दुर्दैव आमचें ह्मणूनच असा अत्यंत उपयुक्त विषयावरील ग्रंथ दुर्मिळ झाला आहे ! !

ज्योतिषशास्त्रांतहि हे महर्षि फार निपुण होते. अगस्तीच्या ताऱ्याचा प्रथम शोध यांनींच लाविला. या ताऱ्याचें महत्त्व आमच्या कालगणना शास्त्रांत विशेष मानिलें आहे. या महर्षींचेंच नांव त्या ताऱ्याला अझून अव्याहत चालत आहे.

हे महर्षि मोठे धर्मोपदेशकहि होते. निःस्वार्थवृत्तीनें देशोदेशीं हिंडून अत्युत्साहानें लोकांस यांनीं सत्यधर्माचा उपदेश करावा. यांच्या उपदेशांत प्रसाद होता. यांचीं धर्मव्याख्यानें लोक मोठ्या प्रेमानें लक्ष्यपूर्वक ऐकत असत. हे महर्षि यथार्थवादी होते. यांचा उपदेश सत्याला अनुसरून असे; त्यामुळें सत्यप्रिय लोकांनां तो फारच आवडत असे. यांच्या सत्यधर्मोपदेशानें हजारों अधर्मी लोक सुशील व धर्मनिष्ठ झाले. मुमुक्षु जनांनां तर यांचीं धर्मव्याख्यानें केवळ मोक्षमार्ग दाखविणारीं झालीं. अगस्त्यमुनींची लोकोत्तर बुद्धिमत्ता व निःस्वार्थी कार्यदक्षता पाहून त्या काळचे देव, दानव, ऋषी, राजर्षि व सामान्य जन यांनां अत्यंत पूज्य मानित असत. हे महर्षि आपले पूर्ण कैवारी

आहेत अशी त्या वेळच्या सामान्यजनांची पक्की खातरी झाली होती. ते यांनां चक्रवर्ति राजापेक्षांहि श्रेष्ठ मानित असत.

अगस्त्यमहर्षींनां दृढश्य व दृढस्यु असे दोन पुत्र होते, तेहि मोठे पराक्रमी व बुद्धिमान होते. तिसरा अग्निवेश्य नांवाचाहि यांचा एक पुत्र होता. दृढस्यु हा बाळपणींच इंधन एकत्र करित असे, ह्मणून त्याला इध्मवाह असेंहि नांव पडलें होतें. त्याला दहा पुत्र झाले. त्याचा वंशविस्तार मोठा आहे. त्यांचे तीन प्रवर मानले जातात. विस्तार-भयास्तव ती हकीगत येथें दिली नाहीं.

ब्रह्मर्षि वशिष्ठांशीं वैर करून विंध्यगिरी हा या महर्षींकडे आश्रया-साठीं आला. कार्य साधण्याकरितां तो यांचा केवळ दासानुदास बनला. अगस्त्यमुनींनीं त्याला आपल्या येथें आश्रय दिला. परंतु सूर्याचा भ्रमणमार्ग बंद करण्याच्या दुष्ट बुद्धीनें विंध्यगिरी आपली सेवा करित आहे, असें या महर्षींनां समजलें. यापासून पृथ्वीवरील सजीवनिर्जीव पदार्थांचें अतोनात नुकसान होईल असें जाणून त्या उन्मत्त व कपटी गिरीला योग्य शासन करण्याचा त्यांनीं निश्चय केला. नित्यनियमा-प्रमाणें तो विंध्याचल अगस्त्यमुनींचें वंदन करण्यास आला. त्यानें या महर्षींस साष्टांग दंडवत घातलें. अगस्त्यमुनींनीं "मी उठण्याची आज्ञा करीपर्यंत तूं असाच पडून रहा," अशी त्याला कडकडीत आज्ञा केली. विंध्यगिरीला या महर्षींचा प्रभाव ठाऊक होता. आज्ञाभंग केल्यास हा तपोधन आपला नाश करील, या भयानें तो तसाच पडून राहिला. याप्रमाणें विंध्याचलाच्या गर्वाचा व दुष्ट हेतूचा यांनीं परिहार केला. यावरूनच एखाद्या कार्याकरितां वायद्यांवर वायदे करणारांला 'अगस्तीचा वायदा करणारा' असें ह्मणण्याचा परिपाठ पडला आहे.

यांच्याच वेळीं आतापी, वातापी व इल्वल असे तीन असूर लोकांस फारच छळित होते. ते मोठे कपटी व दुष्ट स्वभावाचे होते. वनांत राहून त्यांनीं पुष्कळ मार्गस्थांचा व ऋषींचा कपटानें नाश केला. अशा कपटानें ते त्यांचा नाश करून त्यांचें सर्वस्व हरण करीत. त्यामुळें त्या

भागचे लोक अगदीं भिऊन गेले होते. कोणीहि त्या वनांत जात नसे. आतापी हा फलरूप होत असे, वातापी जलरूप होत असे व इल्वलें दाता बनून मार्गस्थांची वाट पाहत बसे. कोणी वाटसरू त्या मार्गानें जात असल्यास हा कपटी इल्वल त्याला मोठ्या विनयानें आपल्या आश्रमास नेई. तेथें त्यानें त्या वाटसराचा इतका आदरसत्कार करावा व खाण्यापिण्याची अशी उत्तम व्यवस्था करावी कीं, पांथस्थास तेथें राहण्याची इच्छाच व्हावी. इल्वलानें आश्रमांत आलेल्या पाहुण्याशीं जिवलग मित्राप्रमाणें वागून त्याला तऱ्हेतऱ्हेचीं गोड गोड फळें खाण्यास द्यावीं; स्वच्छ, शीतल व गोड पाणी प्यावयास द्यावें. पाहुण्यानें तीं फळें खाऊन वर तें पाणी प्यावें. कांहीं वेळानें त्याला आपल्या पोटांत कोणी आहे असें वाटावें, व कांहीं क्षणानें त्याचें पोट फाडून त्यांतून दोन असुर बाहेर यावे. अर्थात्, बिचारा वाटसरू गतप्राण व्हावयाचा व त्याची सर्व चीजवस्त या दुष्टांच्या पदरांत पडावयाची. उत्तरोत्तर या असुरांचें हें कपटी कर्म फारच वाढत गेलें. शेवटीं कांहीं ऋषी अगस्त्यमहर्षींकडे गेले व त्यांनां त्या दुष्ट असुरांचा तो जुलूम कळविला. अगस्त्य महर्षीला आणखी त्यांनीं असेंहि कळविलें कीं, " ते नीच असुर शिवाच्या वरप्रसादानें इतके उन्मत्त झाले आहेत, कीं, त्यांनां कोणाचाच शाप लागत नाहीं. "

महर्षि अगस्त्यमुनींनीं त्या ऋषींचें भाषण शांतपणें ऐकलें व " आपण भिऊं नका, मी त्या दुष्टांचा संहार करितों, " असें त्यांनां अभयवचन देऊन हे परदुःखभंजक महर्षि लागलेच तेथें जाण्यास तयार झाले. लवकरच हे त्या दुष्ट असुरांच्या आश्रमीं गेले. इल्वलानें अगस्त्यमुनींचा वरवर चांगला सत्कार केला. " आपल्या आगमनानें हा आश्रम आज पावन झाला. कांहीं दिवस आपल्या सेवेचा लाभ दिल्यास महत् उपकार होतील ! " अशी अगस्त्यऋषींची त्यानें विनंति केली. महर्षींनीं ती मान्य केली. इल्वलानें उत्तम फलांनीं भरलेलें एक पात्र व पाण्यानें भरलेला सुंदर कलश अगस्त्य-

मुनींपुढें आणून ठेविला. नंतर तो मायावी असुर मोठ्या विनयानें महर्षींस ह्मणाला “ महामुनींनीं हा फलाहार करून हें शीतल जलपान करण्याची कृपा करावी. या दासाची ही अल्पसेवा आहे. कृपा करून हिचा स्वीकार करून दासाला पावन करावें ! ”

अगस्त्यमुनींनींहि तसेंच गोड उत्तर दिलें. ते ह्मणाले “ तुह्मांला पावन करण्यासाठींच मी मुद्दाम येथें आलों आहें ! ” असें ह्मणून महर्षींनीं तो फलाहार केला व वरती पाणीहि प्याले. फलाहार व जलपान झाल्यावर त्यांनीं पोटावर आपला हात फिरविला. पोटावर हात फिरवितांच फलरूपानें व जलरूपानें उदरांत गेलेले आतापी व वातापी असुर अत्यंत व्याकुळ झाले. अगस्त्यमहर्षींच्या जठराग्नीचें तेज इतकें प्रखर होतें कीं, ते दुष्ट असुर त्यांत पचन पावूं लागले. पुष्कळ वेळ झाला, तरी अझून आपले बंधु मुनीचें पोट फाडून बाहेर येत नाहींत हें पाहतांच त्या इल्वल असुराला मोठी चिंता पडली. त्यानें त्यांस विचारलें “ बांधव हो ! तुह्मी आझून बाहेर कां येत नाहीं ? ”

त्यावर पोटांतूनच त्या दुष्टांनीं उत्तर दिलें “ आह्मी या महर्षींच्या प्रज्वलित जठराग्नींत पचत आहों, तुलाहि हा मुनी मारून टाकाल. ”

आपल्या बंधूंचें हें भाषण ऐकतांच इल्वल भ्याला. आत्मरक्षणासाठीं तो शस्त्रास्त्रधारी होऊन मुनींशीं लढूं लागला. पण या महापराक्रमी महर्षींसमोर हा किती वेळ टिकणार ? शेवटीं तो पराभव पावून पळत सुटला ! अगस्त्यमुनीहि त्याच्या मागें लागले. या महर्षींचा शक्ति-प्रभाव सर्वांस ठाऊक होताच; तेव्हां त्या दुष्ट असुराला कोणीहि आश्रय देईना. इल्वल अगदीं थकून गेला. शेवटीं कपटविद्येनें जलरूप होऊन तो सागरांत जाऊन मिळाला. महर्षि अगस्त्य त्याचा पाठलाग करितच होते. त्यांनीं सागराला सांगितलें “ हे सागर ! जलरूपानें लपेलल्या ह्या इल्वल असुराला तूं माझ्या स्वाधीन कर. ” पण सागरानें तसें करण्याचें नाकारिलें. त्यामुळें अगस्त्यमुनी अति कोपायमान होऊन आपल्या पराक्रमानें त्या उन्मत्त सागराचें त्यांनीं शोषण केलें.

सागराचा गर्व अगदीं उतरला. तो ठणठणीत कोरडा पडला. लक्षावधि जलचर प्राण्यांचा नाश झाला. तेव्हां सर्व देव एकत्र होऊन त्यांनीं सागरावर दया करण्याविषयीं या महर्षींस विनंति केली. देवांची विनंति ऐकून अगस्त्यमुनींनीं सागर पूर्ववत् जलमय केला. पण, तेव्हांपासून सागराचें पाणी खारें झालें ह्मणून ह्मणतात ! फलरूप व जलरूप होऊन मार्गस्थ लोकांचे प्राण घेणाऱ्या तिन्ही असुरांना आपल्या उदरांतच पचविलेलें पाहून महर्षींच्या जठराग्नीची प्रखरता सर्वत्र जाहीर झाली. अझूनहि पुष्कळ भाविक लोक भोजनोत्तर या महर्षींचें नांव घेऊन आपल्या पोटावर हात फिरवितात. असें केल्यानें खाल्लेलें अन्न पचन होतें, अशी त्यांची समजूत आहे.

अगस्त्यऋषींचा आश्रम एके जागीं नव्हता. वनवासप्रसंगीं सुतीक्ष्ण मुनींनीं श्रीरामाला वनांत जाण्याला जो मार्ग दाखविला आहे, त्यावरून पाहतां, यांचा आश्रम दंडकारण्यांत असावा असें वाटतें. हें दंडकारण्य गोदावरी नदीच्या उत्तरभागीं आहे. गयेच्या तीरावर यांचा आश्रम होता, असें महाभारतांत लिहिलें आहे. दंडकारण्यास हें नांव पडण्याचें कारण असें सांगतात कीं, पूर्वीं वैदर्भदेशांत दंडक या नांवांचा एक राजा होऊन गेला. पण, तो ...र जुलुमी व दुराचारी निपजल्यामुळें भृगुऋषींनीं त्याला, त्याच्या ताब्यांतील सर्व प्रजेला, व त्याच्या प्रदेशाला, शापून भस्म केलें. तेव्हांपासून तो प्रदेश निर्जन होऊन तेथें मोठें अरण्य वाढलें; त्यालाच दंडकारण्य ह्मणतात. कांहीं काळानें अगस्त्यऋषींनीं अमृतसिंचन करून तें वन प्रतिनंदनवन बनविलें व आपण सहकुटुंब त्या वनांत सुंदर आश्रम बांधून राहिले. तेथें त्यांची एक पाठशाळा होती. आर्यावर्त्तांतील जागजागचे पुष्कळ विद्यार्थी तेथें शिकण्यासाठीं येत असत.

त्या वेळच्या सुप्रसिद्ध नहुषराजाशीं यांचा फार स्नेह असे. दुष्ट व पुंड लोकांचा पराभव करण्याकरितां नहुषराजाची फौज घेऊन हे महर्षि देशभर फिरत असत. पण एके दिवशीं नहुषराजा आपल्या

विमानांत बसून जात असतां, चुकून त्याचा पाय या महर्षींच्या मस्तकास लागला ! राजानें या अपराधाची क्षमा न मागितल्यामुळें अगस्त्यमुनींनीं "तूं सर्प होशील" असा त्याला शाप दिला. राम, लक्ष्मण व सीता हीं वनवासांस जात असतां सुतीक्ष्ण मुनींच्या सूचनेप्रमाणें अगस्त्याश्रमास आलीं होतीं. अगस्त्यमुनींनीं त्यांचा फार चांगला सत्कार केला. लोपामुद्रेनेंहि सीतादेवीचें उत्तम स्वागत केलें. आपल्या आश्रमांत त्यांनीं यांस आग्रहपूर्वक ठेवून घेतलें होतें. प्रसन्न होऊन श्रीरामाला या महामुनींनीं अखंड चाप, अक्षय भाता, शस्त्रास्त्रें व एक प्रचंड तीक्ष्ण बाण, इतकीं लढाईचीं साधनें मोठ्या खुषीनें दिलीं. तो तीक्ष्णबाण देतांना हे महर्षि श्रीरामाला ह्मणाले " रावणापाशीं तुमचें युद्ध होईल, त्यावेळीं शेवटीं हा बाण त्यावर तुह्मीं सोडावा ह्मणजे खात्रीनें तुमचा जय होईल." श्रीरामानें मोठया विनयानें ती युद्धसामग्री ग्रहण केली. 'पंचवटीचा प्रदेश आपणांला रहाण्याजोगा आहे' असें श्रीरामाला या महर्षींनींच सांगितलें होतें. यांनींच श्रीरामाला शैवमताची दीक्षा दिली होती ह्मणतात.

हे महर्षि निरंतर ब्रह्मचिंतनांत निमग्न असत. मोठे कष्ट सोसून यांनीं तपश्चर्या केली होती देव यांजवर सर्वदा फार संतुष्ट असत. ऋग्वेदांत एके जागीं अगस्त्यमुनींनीं आपल्या पत्नीस असें म्हटलें आहे, " पहा ! आपण उभयतां तपाचरणानें अगदीं थकून गेलों आहों, पण तें व्यर्थ होणार नाहीं. कारण, आपलें तपाचरण पाहून देवता सुप्रसन्न झाल्या आहेत. त्या आपलें रक्षण करित आहेत. तपप्रभावानें आपण सर्व वस्तूंत व्यापून राहिलों आहों. अपरिचित भोगाच्या लाभांसाठीं आपण या जगांत जय मिळविला आहे " इत्यादि.

अशा रीतीनें धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चारी पुरुषार्थ संपादून हे महर्षि कीर्तिरूपानें आर्यावर्तांत अमर होऊन राहिले आहेत. यांच्या चरित्रांतील अतिशयोक्तीचा भाग सोडून दिला असतां, बाकीचा भाग मार्मिक वाचकांस बराच बोधकर होईल. हे महर्षि अत्यंत विद्वान्,

परदुःखभंजक, परोपकारी, पराक्रमी, सत्यप्रिय, शोधक, धर्मशील व निःस्वार्थी होते. हे सद्गुण, यांच्या चरित्रांत मूर्तिमंत दिसून येतात. अशीं महर्षिरत्नें ज्या वेळीं जन्मलीं, तो वेळ किती उत्तम व सुखाचा असावा ? अगस्त्यमहर्षींसारखीं धनुर्विद्याप्रवीण, नौकाशास्त्रनिपुण, खगोलविद्येचा अभ्यास करून अगस्तीच्या ताऱ्यासारख्या नवीन ताऱ्यांचा शोध लावणारीं व आमरण निःस्वार्थवृत्तीनें लोककल्याणासाठीं झटणारीं रत्नें, या दीन आर्यावर्त्तात पुनः निर्माण होतील काय ? अशीं महर्षिरत्नें पुनः निपजून आमचें दैन्य दूर करीपर्यंत त्यांचीं त्रोटक चरित्रें वाचून आपण आपल्या मनाचें समाधान करूं या !!

# महर्षि कश्यप.

ब्रह्मदेवाचे मानस पुत्र मारिचि यांचे हे पुत्र होत. महर्षि कश्यप प्रजापति होते. यांनांच अरिष्टनेमी ह्मणतात. यांच्या आईचें नांव कला. ही कर्दममुनींची कन्या. तिच्या भावाचें नांव कपिलदेव. महर्षि कश्यप, सुवर्णरसासारखे तेजस्वी होते. यांच्या पिंगट जटा अग्निज्वालेसारख्या होत्या. अग्निजवळ जसें जातां येत नाहीं, तसें या तेजःपुंज महर्षींजवळ कोणी जात नसे. इतके हे तेजस्वी व प्रतापी होते! त्या काळच्या सर्व महर्षिमंडळांत यांची मानमान्यता फार होती. हे त्यांत अग्रेसर असत. यांच्या संमत्तीवांचून कोणतीहि गोष्ट होत नसे. अठेचाळीस वर्षेपर्यंत पूर्ण ब्रह्मचर्य पालन करून हे महाविद्वान् वज्रदेही बनले. सांगोपांग वेदाध्ययन करून हे पुढें गृहस्थाश्रमी झाले. महाराजा दक्षप्रजापती यांच्या कन्या अदिति, दिति, दनु, दनायु, काला, कपिला, क्रोधा, प्राधा, इला, विनता, सिंहिका, मुनि व कद्रू, या तेरा मुलींशीं या महर्षींनीं विवाह केले! यांशिवाय यांनां आणखीहि स्त्रिया होत्या!! पण, सर्वांत अदितीवर यांचें प्रेम अधिक असे. तिच्या पोटीं बारा आदित्य व इंद्र वगैरे देवता उत्पन्न झाल्या. दितीपासून मयदानव वगैरे दैत्य उत्पन्न झाले. या कश्यपीसृष्टींत देव, दैत्य, मानव इत्यादि उत्पन्न झाले. या मंत्रद्रष्ट्या महर्षींच्या कुळांत हे स्वतः, यांचे पुत्र अवत्सार आणि असित हे तीन मुख्य होते. अवत्सार ऋषींचे पुत्र नैध्रुव आणि रेभ, रेभाचा रेभ्य, शांडिल्याचा शांडिल्य, अशी वंशपरंपरा आहे. अवत्सार ऋषींच्या पत्नीचें नांव काय व ती कोणाची कन्या, ही माहिती मिळत नाहीं; पण, असित ऋषींच्या स्त्रीचें नांव एकपर्णा असें होतें. नित्यऋषि व देवल हे शांडिल्यवंशांत उत्पन्न झाले. हा वंश पुढें फार भरभराटीस आला. कश्यप महर्षींच्या वंशांत मुख्यत्वेंकरून नैध्रुव, रेभ व शांडिल्य हे तीन वंशच फार मोठे आहेत. त्यांची प्रवरव्यवस्था अशी आहे—नैध्रुव कुळाचे प्रवर–कश्यप, अवत्सार व रेभ्य. शांडिल्य

कुळाचे प्रवर–कश्यप, अवत्सार व शांडिल्य. रेभ कुळाचे प्रवर–कश्यप अवत्सार व रेभ्य.

यांपैकीं शांडिल्य वंशाचा विस्तार अधिक झालेला दिसतो. याच कुळांतील कश्यप, अवत्सार व देवल हे तीन प्रवर; तसेच कश्यप, असित व देवल हे तीन प्रवर; असे आणखी तीन विभाग झाले आहेत. शिवाय यांतूनच वसिष्ठवंशाचाहि बराच विस्तार झाला आहे. याचे कश्यप, अवत्सार व वसिष्ठ असे तीन प्रवर आहेत. अशी या वंशाची प्रवरव्यवस्था आहे. सप्तमहर्षिमंडलांत हे अग्रेसर आहेत. यांचाच वंश विशेष विस्तार पावला आहे. इंद्राचें श्रेष्ठत्व कायम ठेवण्यासाठीं, व बलिराजाचा छल करण्यासाठीं, श्री विष्णूनें जें वामनरूप धारण केलें, तें याच महर्षींच्या कुळांत. वामनावतार अदितीच्या उदरीं झाला आहे. समुद्रमंथनसमयीं अमृतपानाविषयीं देवदानवांत मोठा तंटा उत्पन्न झाला. अति निकरावर गोष्ट येऊन पोंचली. पण श्री विष्णूनीं मोहिनीरूप घेऊन देवांनां अमृतपान करविलें व दैत्यांचा पुष्कळ संहार करविला. त्यावरून दानवांची माता जी दिति, तिला अतोनात दुःख झालें. तिनें देवांचा सूड उगविण्याचा निश्चय केला. तिनें कश्यपऋषींना प्रसन्न केलें. स्वपत्नीची निस्सीम भक्ति व पतिसेवा पाहून महर्षि कश्यपांनीं, तिला वरदान दिलें "प्रिये दिति ! पवित्र राहून एक हजार वर्षें जर तूं खडतर तप करशील, तर तुझ्या पोटीं महापराक्रमी पुत्र उत्पन्न होईल व तो इंद्रादिदेवांचा पराभव करील !"

त्याप्रमाणें दितीनें तपाचरण केलें व तिला वैनतेय–गरुड–पुत्राचा लाभ झाला. गरुडानें आपल्या अतुल पराक्रमानें, इंद्रादिदेवांनां किती जर्जर करून सोडलें होतें, हें पुराणप्रसिद्ध आहेच !

या महर्षींचा आश्रम मेरुपर्वतावर होता. तेथें हे आपल्या पत्नीसह ब्रह्मचिंतनांत निमग्न असत. एके दिवशीं, हरिभक्तिपरायण प्रल्हादाच्या सूचनेनें मयदानव व सूर्यप्रभ हे या महर्षींच्या आश्रमास आले. मोठ्या विनयानें त्यांनीं कश्यपऋषीचें वंदन केलें. बहुत वर्षांनीं आपले पुत्रांची

भेट झाली, ह्मणून महर्षीस फार आनंद झाला. या महामुनींनीं उभयतांनां आशीर्वाद देऊन मोठ्या प्रेमानें त्यांस आपल्या आसनाजवळ बसविलें व ह्मणाले " पुत्रा मयदानवा ! तूं सर्व विद्या शिकला आहेस; सर्वदा सन्मार्गानेंच वर्तत आहेस; सदा सत्यधर्मानें वागत असतोस; ह्मणून तूं सर्वप्रकारें स्तुतीस पात्र आहेस. हा सूर्यप्रभहि पुण्यशील आहे. त्याला विद्याधराचें राज्य मिळेल. तुह्मी सर्वदा धर्ममार्गानेंच जा. कधींहि अधर्माचरण करूं नका. जर तुह्मी सत्यधर्मानें वागाल, तरच तुह्मी सतत सुखसंपत्ति भोगाल. प्रथम देवांनीं तुमचा पराभव केला, पण आतां तसें होणार नाहीं. धर्मानें जय व अधर्मानें हानि होत असते हें तत्व नीट लक्ष्यांत ठेवा. असुरांनीं सत्यधर्माचा त्याग केला होता, ह्मणूनच ते इंद्राच्या आधीन झाले व कित्येकांचा देवांनीं नाश केला. पण, नाश पावलेले असुरच पुनः उत्पन्न होऊन वीर पुरुष बनले आहेत ! तुझाच धाकटा भाऊ जो सुमंडिक, तोच आतां हा सूर्यप्रभ नांवानें जन्मला आहे. "

या रीतीनें महर्षि कश्यप त्या दानवांशीं बोलत आहेत, इतक्यांत मध्यान्हसमय झाला. अदिति वगैरे कश्यपपत्न्या, पतीच्या आज्ञेप्रमाणें आन्हिक कर्मं उरकून तेथें आल्या. त्या येतांच मयदानवादि दैत्य लागलेच उठून उभे राहिले. मोठ्या विनयानें त्यांचें त्यांनीं वंदन केलें. अदिति वगैरे ऋषीपत्न्यांनीं त्यांनां आशीर्वाद दिले. सर्व तेथेंच बसले. इतक्यांत आपल्या लोकपालांसह इंद्रहि कश्यपमहर्षींच्या दर्शनासाठीं तेथें आला. इंद्रादि लोकपालांनीं कश्यपमहर्षींचें व अदिति वगैरे महर्षिपत्न्यांचें वंदन केलें. मयदानवादिकांनींहि इंद्रादिदेवांचें अभिवंदन केलें. सर्व मंडळी आपापल्या जागीं बसली. परस्परांत कुशलसंवाद चालू झाला. बोलतां बोलतां द्वेषभावानें इंद्र, सूर्यप्रभदानवाला कांहीं टोंचून बोलला. टोंचून बोलण्याचें कारण असें होतें कीं, सूर्यप्रभ दानवाला विद्याधराचें चक्रवर्तिपद मिळावयाचें होतें, तें त्याला रुचलें नाहीं. मयदानवालाहि तो टोंचून बोलला. त्यामुळें मयदानवाला फार

चाईट वाटलें. पण, त्यानें तें सर्व शांतपणें ऐकून इंद्रास असें उत्तर दिलें कीं " देवराज ! श्रीशंकरानें इंद्रपद तुमच्याकरितां व विद्याधराचें पद सूर्यप्रभाकरितांच निर्माण केलें आहे."

हें ऐकून इंद्राला अधिकच राग आला. त्याचा विवेक व विचार हीं साफ सुटलीं. तो गर्वानें उन्मत्त झाला. श्रुतवर्म्याचा विनाकारण पक्ष खेंचून मयदानवास त्यानें पुष्कळ उडवाउडवीच्या गोष्टी सांगितल्या. त्याला मयदानवानें शांतपणें फार मार्मिक उत्तरें दिलीं. इंद्र निरुत्तर झाला. पण, दुरभिमानामुळें त्याला मनस्वी क्रोध आला. आपण कोठें आहों, याचेंसुद्धां त्याला भान राहिलें नाहीं. क्रोधाच्या आवेशांत वज्रप्रहार करण्यासाठीं तो एकदम मयदानावर चालून गेला. पण, महर्षि कश्यप तेथें होतेच. त्यांनीं इंद्राच्या या उन्मत्त वर्तनाचा प्रतिकार केला. तेथेंच बसलेल्या अदिति वगैरे स्त्रियांनांहि राग आला. त्यांनीं इंद्राचा अगदीं धिक्कार केला.

महर्षि कश्यप व अदिति वगैरे स्त्रीमंडळ आपल्या अगदीं विरुद्ध झालेलें पाहून इंद्र मनांत भ्याला ! संतापानें खदिरांगारासारखी तप्त झालेली कश्यपमहर्षींची मुद्रा पाहून आतां हा महामुनि आपल्याला शापून भस्म करील कीं काय, या भीतीनें त्यानें तें वज्र आपल्या गवसणींत घातलें व लागलीच कश्यपमुनींचें वंदन करून खालीं मान घालून तो आपल्या जागीं जाऊन बसला. दुराग्रहानें क्रोधाच्या आधीन होऊन उन्मत्त कर्म करण्यास तयार झालेल्या इंद्राचा पश्चाताप पाहून कश्पऋषि शांत झाले. महर्षींचा कोप शांत झालेला पाहून इंद्राचें भय कमी झालें. त्यानें पुनः महर्षींस वंदन केलें व दोन्ही हात जोडून विनंति केली " महामुने ! श्रुतवर्म्याला मीं विद्याधराचें राज्य दिलें आहे. तें राज्य हरण करण्यासाठीं हा मयदानव युद्धाची सर्व तयारी करून आला आहे, तेव्हां मी काय करूं ? "

हें ऐकून कश्यपमहर्षि ह्मणाले " हे इंद्र ! श्रुतवर्मा तुला जितका प्रिय आहे, तितकाच हा सूर्यप्रभ शिवाला प्रिय आहे. शिवाचें

वचन निष्फल व्हावयाचें नाहीं. शिवाय, या कार्याला सूर्यप्रभाला सहाय्य देण्याची आज्ञा खुद्द शिवानेंच या मयदानवाला केली आहे. तेव्हां, मयदानवाला तूं काय ह्मणून दोष देत आहेस? याचा यांत कांहींच अपराध दिसत नाहीं. हा इतका आज्ञाधारक व मर्यादशील आहे कीं, अझूनपर्यंत यानें आमची कधींच अवज्ञा केलेली नाहीं. जर तूं याला दुःख देशील, तर आमची सर्वांची अवकृपा तुजवर होईल. तुला शापून भस्म करण्याला आह्मांला उशीर लागणार नाहीं. यासाठीं, तूं अनीतीनें वागूं नको. मला नीतिमार्गच प्रिय आहे. हा मयदानव नीतीनेंच वागत आहे. यामुळें हा विजयी आहे. याचा पराक्रम तूं जाणत नाहींस? याच्यापुढें तुझें कांहींच चालावयाचें नाहीं!"

हें ऐकून इंद्र लज्जित झाला. त्याचा गर्व साफ उतरला. पुनः कश्यपऋषि त्याला ह्मणाले "हे इंद्र! तुझा श्रुतवर्मा या सूर्यप्रभापुढें कांहींच नाहीं! हा तेजस्वी व दिव्य लक्षणांनीं परिपूर्ण आहे. विद्याधराच्या चक्रवर्ती राज्यपदाला हाच सर्वस्वी योग्य आहे."

हें महर्षींचें भाषण ऐकून तेथें बसलेल्या देव, लोकपाळ व स्त्रियांनींहि महर्षींच्या या भाषणास आपली संमत्ति दिली. मयदानवाचें सद्वर्तन व सद्गुण पाहून इंद्राच्यासमक्ष महर्षी कश्यपांनीं त्याला असें वरदान दिलें "हे पुत्र मयदानव! इंद्रानें अविचारानें तुझ्यावर वज्र उगारिलें असतां तूं शांतपणें बसून राहिलास, नम्रपणानें व निर्द्वेशवृत्तीनें वागलास, ह्मणून यापुढें तूं वज्रदेही होशील. तुला जरा व मृत्यूचें भय नाहीं. कोणत्याच शस्त्राचा घाव तुझ्या शरीराला लागणार नाहीं. तुझा बंधु हा सूर्यप्रभाहि तुझ्यासारखाच पराक्रमी होईल. कोणचाच शत्रु तुमचा पराभव करणार नाहीं. तुला जेव्हां जेव्हां तशीच कांहीं अडचण येईल, तेव्हां तेव्हां धैर्य व नीति न सोडतां शरत्कालच्या चंद्रासारख्या तेजस्वी अशा माझ्या शूर सुवासकुमाराचें तूं स्मरण कर! तो येऊन तुझें अवश्य सहाय्य करील!"

तेथें बसलेल्या लोकपालांनीं, ऋषिवृंदांनीं व अदिति वगैरे ऋषिपत्न्यांनींहि त्याला वरदान दिलें. अदिति देवी इंद्रास ह्मणाली " हे पुत्र ! यापुढें तुं असा उन्मत्तपणानें वागूं नको. मयदानवाची समजूत कर. त्याच्याशीं प्रेमानें वाग. विनयाचें फळ किती गोड असतें, हें तूं आतांच पाहिलेंस. विनयामुळें त्यांनां मिळालेलें वरदान पण तूं ऐकलें आहेस ! "

अदितिमातेचा हा उपदेश ऐकून इंद्र अत्यंत सद्गदित झाला. त्याचा हृदयसमुद्र बंधुप्रेमानें भरून गेला. मयदानवहि झट आपल्या जागेवरून उठला. उभयतांचीं प्रेमालिंगनें झालीं ! महर्षीचें व ऋषिपत्न्यांचें त्यांनीं अभिनंदन केलें. सर्वांस मोठा आनंद झाला, व नंतर जे ते आपापल्या स्थानीं गेले.

महर्षि कश्यप अत्यंत नीतिप्रिय होते. जो कोणी धर्मनीतीनें वागत असे, त्याचा हे महर्षि फार सत्कार करीत. हे सदैव समवृत्तीनें वागत असत. तथापि अनीतिमान व अधर्मी मनुष्याचा ते कधींच पक्ष घेत नसत. हे फारच सत्यनिष्ठ होते. त्यांनां असत्य मुळींच आवडत नसे. प्रत्यक्ष पुत्र जरी असला, तरी त्याचीसुद्धां हे पर्वा ठेवित नसत ! जें सत्य, तेंच हे प्रतिपादन करीत व त्याप्रमाणें शेवटपर्यंत स्वतः वागत. वर दिलेल्या इंद्रमयदानवप्रसंगावरून, या महर्षींच्या सत्यनिष्ठ वर्तनाविषयीं वाचकांची पूर्ण खातरी होईल. याच महर्षींच्या सत्संगतीनें नरवाहन राजा चक्रवर्ती झाला; इतकेंच नाहीं, तर तो परमधार्मिक, महापरोपकारी व अत्यंत प्रजावत्सल झाला. सत्संगतीचें हें केवढें उत्तम फल !

प्रजापति या नात्यानेंहि यांची योग्यता फार मोठी होती. प्रजावृद्धीच्या कार्यास हे महर्षि जितके झटत, तितकेच हे तिच्या ऐहिक व पारलौकिक सुखासाठीं रात्रंदिवस निरिच्छ बुद्धीनें प्रयत्न करीत. त्यामुळें यांची प्रजा सुशील, सुखी, पराक्रमी, स्वराजनिष्ठ, स्वाभिमानी व परमधार्मिक झाली होती. हे महर्षि स्वतः तत्वदर्शी असल्यामुळें यांच्या स्त्रियाहि महाज्ञानी, अत्यंत बुद्धिमान् व सदाचारसंपन्न होत्या.

हे उत्तम धर्मोपदेशकहि होते. सत्यधर्माचा उपदेश करण्यासाठीं हे सर्वत्र फिरत. महर्षि कश्यप यांचें वक्तृत्व फार मोहक होतें. हे जसें बोलत, तसे चालत! सत्य हेंच यांचें मुख्य व्रत होतें. हे योगविद्येंतहि निपूण होते. यांनां त्या वेळचे सर्व लोक 'कश्यपभगवान्' ह्मणत असत. यांनीं एक स्मृतिग्रंथ रचला आहे. त्या वेळचे इंद्रादिदेव, दानव आणि मानव, यांची आज्ञा मनापासून पाळित असत. शिव जसा कैलासपर्वतावर, तसे हे महर्षि मेरुपर्वतावर रहात असत. तेथें यांचा बहुतेक काळ ब्रह्मचिंतनांत जात असे. अशा रीतीनें या महर्षींनीं आपलें आयुष्य सत्कर्मांत घालवून धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चाऱ्ही पुरुषार्थ संपादून शेवटीं हे ब्रह्मस्वरूपीं लीन झाले.

या महर्षिरत्नाच्या चरित्रांतील अतिशयोक्ति वजा करून बाकीच्या भागाचा विचार केला असतां, तो किती बोधप्रद आहे हें सत्यप्रिय वाचक सहज जाणतील. पूर्ण ब्रह्मचर्य, सांगोपांग वेदाध्ययन, दृढनिश्चयी वृत्ति, निस्पृहता, सत्यवक्तृत्व, समदृष्टि, पवित्र आचरण, प्रजावात्सल्य, नीतिप्रियता, लोककल्याणार्थ निःस्वार्थवृत्तीनें सतत झटण्याची आवड, व मोक्षसुखासाठीं सदैव चालू असलेलें ब्रह्मचिंतन, वगैरे गोष्टींचा लाभ या महर्षींच्या चरित्रापासून वाचकांस बराच होईल. कश्यपांसारखीं महर्षिरत्नें, आपल्या आर्यावर्त्तांत पुनः निपजतील काय? हल्लींच्या देशकालानुरूप जी सुधारणा होणें अत्यंत इष्ट आहे, ती करण्यासाठीं अशा महर्षिरत्नांची किती आवश्यकता आहे ? परम दयाळू परमात्मा, अशीं महर्षिरत्नें, येथें पुनः निर्माण करो व आमचें दैन्य व अज्ञान दूर करो, एवढेंच त्याच्या पाशीं अनन्यभावानें मागणें आहे.

# महर्षि वसिष्ठ.

हे तत्वदर्शी, सत्यवक्ते ब्रह्मर्षि, ब्रह्मदेवाचे मानस पुत्र होते. ब्रह्मदेवाच्या प्राणवायूपासून जन्मलेले जे कर्दममहर्षी त्यांचे हे जामात होते. यांच्या पत्नीचें नांव देवि अरुंधति. कर्दम महर्षींची ही आठवी कन्या. ही फार सुशील, सद्गुणी व विदुषी होती. या महर्षीस ऊर्जा नांवाची आणखीहि एक स्त्री होती. तिला चित्रकेतु वगैरे सहा पुत्र झाले होते. देवी अरुंधतीलाहि हविंद, सुकृत, मूर्ति, आप, ज्योति, अयव, अनिस्मय असे पुत्र होते.

स्वायंभु मन्वंतरांत उत्पन्न झालेले ब्रह्मदेवाचे दहाहि मानसपुत्र शिवाच्या शापानें नाश पावले, त्यांतच या महर्षींचा पण अंत झाला; परंतु वैवस्वत मन्वंतरांत ब्रह्मदेवानें पुनः दहा मानसपुत्र उत्पन्न केलें त्यांतच हे महर्षि पुनः उत्पन्न झाले. ब्रह्मदेवानें यांनां अग्नीपासून उत्पन्न केलें. या वेळच्या यांच्या स्त्रीचें नांव अक्षमाला असें होतें. हीसुद्धां मोठी विदुषी होती. त्या वेळच्या सूर्यवंशांतील इक्ष्वाकु कुळाचे हे कुलगुरु होते. इक्ष्वाकुवंशांतील तिसरा राजा नेमी राज्यासनावर असतां या महर्षींनीं त्याच्याकरवीं बहुत यज्ञ करविले. एके वेळीं नेमी राजानें एक हजार वर्षांच्या यज्ञाचा संकल्प करून तो महर्षि वसिष्ठ मुनींस कळविला. वसिष्ठ मुनींस या यज्ञकर्मांत मुख्य उपाध्याय होण्याची राजानें विनंति केली. पण, ती या महर्षींनीं नाकारली. कारण, इंद्राकडील पांचशें वर्षांच्या यज्ञाचें आमंत्रण या ब्रह्मर्षींनीं पूर्वींच घेतलें होतें. “इंद्राकडील यज्ञ समाप्त झाल्यावर मी आपल्याकडे अवश्य येईन. तोंपर्यंत आपण यज्ञास आरंभ करूं नये,” असें नेमी राजास सांगून हे महर्षि यज्ञकार्यासाठीं इंद्रलोकीं निघून गेले. इंद्राकडील यज्ञकर्म समाप्त झाल्यावर महर्षि नेमी राजाकडे आले. पहातात, तों त्यानें गौतममुनींस मुख्य उपाध्याय करून यज्ञास आरंभ केला आहे! राजानें आपली आज्ञा मानली नाहीं ह्मणून या महर्षींस पराकाष्ठेचा राग आला. नेमी राजाला यांनीं शाप दिला कीं “तुझा देह नाश पावेल!” नेमी राजानेंहि वसिष्ठमुनींस उलट शाप दिला “आपलाहि देह नाश पावो!”

त्याप्रमाणें दोघांचेहि देह पतन पावले. वसिष्ठमुनींची ही अशी स्थिति पाहून त्या वेळच्या ब्राह्मणांस फार वाईट वाटलें! शेवटीं त्यांनीं वसिष्ठ-मुनींस कळविलें कीं " आपण मित्रावरुणाच्या येथें पुनः जन्म घ्यावा. तेथें आपलें नांव वसिष्ठच ठेवतील. आपण तत्वदर्शी व योगविद्येंत महानिपूण व सत्याचरणी आहां, तेव्हां पूर्वीच्या दोन्हीं जन्मांच्या ज्ञानाचें स्मरण आपणांस अवश्य राहील. "

त्याप्रमाणें मित्रावरुणाच्या तेजांत यांनीं प्रवेश केला. पुत्ररूपानें हे महर्षि त्या कुळांत जन्मले. यांच्या आईचें नांव कुंभा होतें. मित्रा-वरुणानें यांचें नांव वसिष्ठच ठेविलें. इक्ष्वाकुवंशांत जन्मलेल्या विकुक्षी आणि शशाद राजाचे हे पुनः कुलगुरु झाले. देवर्षि नारदमुनींच्या बहिणीशीं यांचें लग्न झालें होतें, तिचें नांव पण अरुंधतीच होतें. नारदमुनींची ती बहीण, आणि महर्षि वसिष्ठ मुनींची धर्मपत्नी, तेव्हां तिची योग्यता काय वर्णावी ! वसिष्ठ महर्षींनीं उत्तम शिक्षण देऊन तिला महासती, बुद्धिमती, परमज्ञानी व अत्यंत सुशील बनविलें. अरुंधतीनें वेदावर भाष्य केलें आहे. वेदासारख्या अलौकिक धर्मग्रंथावर भाष्य रचण्याचें जिचें बुद्धिसामर्थ, ती स्त्री पंडिता नाहीं, असें कोण ह्मणेल ! अरुंधतीविरचित वेदभाष्य जर या वेळीं कोठें कोणापाशीं मिळेल, तर त्यापासून या महापंडिता बाईची असाधारण बुद्धिमत्ता सहज कळून येईल व वेदांचें खरें रहस्य पुष्कळ लोकांस चांगलें समजेल ! महर्षि वसिष्ठ, आपल्या विदुषी स्त्रीसह, केवळ समवृत्तीनें व शांतपणें लोकांशीं वागत असत. हें दंपत्य, साक्षात् धर्मरूप आहे, असें त्या वेळच्या सर्व लोकांस वाटत असे. शक्ति वगैरे शंभर पुत्र या महासतीला झाले. तेहि परम विद्वान्, जितेंद्रिय, आज्ञाधारक व धर्मशील होते. महर्षि वसिष्ठ, वैदिक धर्माचे पूर्ण अभिमानी होते. हे गृहस्थाश्रमी असूनहि केवळ विरक्ता-सारखे वागत असत. यांची दाढी बरीच लांब होती. मस्तकावरील जटा केशरी रंगाच्या असून, त्या, हे मुकुटाप्रमाणें शिरावर बांधित असत.

त्यांचा प्रथम आश्रम हिमालय पर्वताच्या एका शिखरावर होता. अझूनहि त्या शिखराला वसिष्ठाश्रमच ह्मणत असतात.

वसिष्ठ मुनींचा विद्याभ्यास, विष्णुक्षेत्रीं महर्षि कौशिकमुनी यांच्या जवळ झाला. अठ्ठेचाळीस वर्षेंपर्यंत पूर्ण ब्रह्मचर्य पालन करून वेदवेदांगांचें यांनीं संपूर्ण ज्ञान संपादन केलें. यामुळें हे महाविद्वान्, तत्त्वदर्शी, योग्याभ्यासी, कर्म, उपासना व ज्ञान या तिन्ही विषयांत अत्यंत निपुण, निस्पृही, सत्यवादी, निरिच्छ, शांतचित्त, क्षमाशील, समदर्शी, अत्यंत दयाळू, परोपकारी व त्रिकालदर्शी निपजले! देवादिकांत यांची मानमान्यता फारच वाढली होती. यांचें ज्ञानदान अतोनात होतें. भेदाभेद न ठेवितां, समवृत्तीनें तें सर्वांस मिळत असे. त्यामुळें यांच्या आश्रमांत, विद्यार्थ्यांचा मोठा भरणा होता. श्रीराम, भिष्माचार्यादि थोर थोर यांचे शिष्य होते! यांचें पवित्र आचरण व योगक्रिया पाहून कामनंदिनी नांवाची कामधेनु या ब्रह्मर्षीला प्रसन्न झाली. तिच्या प्रसादानें हे महार्षि, आश्रमीं येणाऱ्या अतिथींनां इच्छाभोजन देऊन तृप्त करीत. त्या कामधेनुमुळें यांनां कोणत्याच गोष्टीची अडचण पडत नसे. एके दिवशीं आपल्या चतुरंग सैन्यासह राजर्षि विश्वामित्र, दर्शनासाठीं यांच्या आश्रमास आले. महर्षि वसिष्ठांनीं त्यांचा सत्कार केला. त्यांच्या सर्व सैन्यास पंचपक्वानांचें भोजन घालून अत्यंत तृप्त केलें. हें पाहून विश्वामित्र फार चकित झाले. वसिष्ठमहर्षि वनवासी असतां, त्यांनीं भोजनाचें इतकें साहित्य कोठून आणलें, याचा त्यांनीं फार बारकाईनें शोध केला. शोधांतां त्यांची अशी खात्री झाली कीं, या महर्षींजवळ एक कामधेनु आहे व तिचाच हा सर्व प्रभाव आहे. ती कामधेनु आपल्यापाशीं असावी, असा विश्वामित्रांस लोभ झाला. लोभ ही वृत्ति जोंपर्यंत विवेकाच्या आधीन असते, तोंपर्यंत ती अनीति करण्याला प्रवृत्त होत नाहीं पण तिचा तो दाब कमी होऊन, ती अविवेकाची मैत्रीण बनली, कीं, मग मात्र ती अगदीं स्वैर बनून जें न करण्या जोगें असतें, तेंसुद्धां ती सहज करविते! राजर्षी विश्वामित्र, न्यायशीळ

असूनहि या वेळीं अविवेकी होऊन कुलोभाच्या आधीन झाले ! त्यांनीं ती कामधेनु महर्षि वसिष्ठांपाशीं मागितली. वसिष्ठमुनींनीं ती देण्याचें अर्थात्च नाकारलें. शेवटीं ती धेनु बलात्कारानें नेण्याचा विश्वामित्रानें निश्चय केला. पण त्या कामधेनूस तो बलात्कार सहन झाला नाहीं. ती विश्वामित्रांवर अतोनात क्रुद्ध झाली. तिनें आपल्या अद्वितीय शक्ति-प्रभावानें, म्लेंच्छादि प्रचंड सैन्य उत्पन्न केलें. त्या सैन्यानें विश्वामित्रांचा अगदीं पराभव केला. लज्जित होऊन त्यांनीं ती कामधेनु वसिष्ठमुनींच्या आश्रमीं परत पाठवून दिली; परंत, कांहीं दिवसांनीं विश्वामित्र आपल्या शंभर पुत्रांसह पुष्कळ सैन्य घेऊन वसिष्ठमुनींशीं लढण्याला पुनः आले. या वेळींहि नंदिनीचा अद्वितीय शक्तिप्रभाव विश्वामित्रांस दिसून आला. या लढाईत त्यांच्या नव्याण्णव पुत्रांचा वध झाला. बाकीच्या सर्व सैन्याची अगदीं वाताहात झाली.

ब्रह्मतत्वाच्या बळापुढें क्षत्रियतत्वबळाची श्रेष्ठता कांहींच नाहीं, अशी विश्वामित्रांची पूर्ण खात्री झाली. ब्रह्मतत्वाची श्रेष्ठता, त्यांना चांगली समजून आली. ते क्षात्रतेजाचा उघड उघड धिक्कार करूं लागले ब्रह्मतत्व मिळविण्यासाठीं ते राजर्षि तपश्चर्या करण्याल हिमालयावर तसेच निघून गेले. तेथें त्यांनीं एक हजार वर्षेपर्यंत खडतर तपाचरण करून बरीच शस्त्रास्त्रविद्या संपादन केली. नंतर सूड उगविण्याकरितां ते पुनः वसिष्ठाश्रमास आले. योगबलानें महर्षि वसिष्ठांनीं त्यांचा बेत तेव्हांच जाणून आपला सतेज ब्रह्मदंड घेऊन ते विश्वामित्रांच्या पुढें येऊन निर्भय उभे राहिले. विश्वामित्रांनीं ज्या ज्या शस्त्रास्त्रांचे यांच्यावर प्रयोग केले, त्या सर्वांचा या ब्रह्मर्षीनीं तात्काळ उपसंहार केला. विश्वामित्रांचे सर्व प्रयोग संपले. ब्रह्मदंडापुढें ते अगदीं फिके पडले. हें पाहून विश्वामित्रांस पूर्ण ब्रह्मत्व मिळविण्याची फार इच्छा झाली. त्यांनीं आपलें राज्य, पुत्र, पुरोहितादिकांच्या स्वाधीन करून तपश्चर्या करण्याकारितां ते पुनः हिमालयावर निघून गेले. महत्कष्ट सोसून साठ सहस्र वर्षे त्यांनीं उग्र तप केलें. हें पाहून ब्रह्मादिदेवांनीं

विश्वामित्रांचा योग्य सत्कार करून त्यांनां 'ब्रह्मर्षि' पद दिलें. शिवाय ब्रह्मदेवादि अमर असेंहि ह्मणाले कीं "ब्रह्मर्षि वसिष्ठादि मुनिवृंद तुह्मांला आपल्या वर्गांत घेईल असा तुह्मीं प्रयत्न करावा. त्यावरून वसिष्ठमुनींनीं आपणाला 'ब्रह्मर्षि' ह्मणावें ह्मणून विश्वामित्रांनीं यत्न केला; परंतु, ब्रह्मर्षि वसिष्ठ, यांची राजसी वृत्ति जाणत होते. इतकी तपश्चर्या करून तिचा लोप झाला नाहीं, तेव्हां यांना 'ब्रह्मर्षि' कसें ह्मणावें ? हे त्यांनां 'राजर्षि' च म्हणत असत. त्यामुळें विश्वामित्र त्यांचा अधिक द्वेष करीत व त्यांच्याशीं स्पर्धेनें वागत असत.

सत्यव्रत किंवा त्रिशंकु हा इक्ष्वाकु वंशाचा राजा होता. तो वसिष्ठ मुनींचा यजमान होता. एके दिवशीं त्यानें ब्रह्मर्षि वसिष्ठमुनींस असें विनविलें कीं "मी स्वर्गलोकीं जाईन असा उपाय सांगावा."

वसिष्ठ म्हणाले "तुझ्यासाठीं तसा उपाय नाहीं."

हें त्यास न रुचून तो या महर्षींच्या पुत्रांपाशीं गेला. तेहि त्याला म्हणाले "गुरुवचनावर तुझा विश्वास नाहीं, तस्मात तूं म्लेंच्छ होशील." त्याप्रमाणें तो म्लेंच्छ झाला !

परंतु हें वर्तमान विश्वामित्रांस कळतांच ते त्या राजापाशीं आले. ब्रम्हर्षि वसिष्ठांचें भविष्य खोटें करण्याचें त्यांनीं त्या राजाला आश्वासन दिलें. वसिष्ठमुनींच्या ऐवजीं तेच त्या राजाचे मुख्य उपाध्याय बनले, व यज्ञकर्मास आरंभ केला; पण म्लेंच्छ यजमान व क्षत्रिय उपाध्याय, असा विचित्र प्रकार पाहून यज्ञांतील हविर्भाग घेण्याला यज्ञदेवता आल्या नाहींत ! त्यामुळें विश्वामित्रांस फार राग आला. आपल्या तपोबलानें त्यांनीं त्रिशंकु राजास स्वर्गलोकीं धाडून दिलें. पण, देवांनीं वसिष्ठमुनींचा मान राखण्यासाठीं त्या राजाला स्वर्गांतून खालीं लोटून दिलें. बिचारा त्रिशंकु राजा मध्येंच लटकत राहिला !!

वसिष्ठमहर्षींनीं आपणाला 'ब्रम्हर्षि' म्हणावें ह्मणून विश्वामित्र ऋषि सारखे झटत होते. त्रिशंकु राजानें जरी वसिष्ठमुनींचा अव्हेर केला,

तरीहि इक्ष्वाकुवंशांतील त्यांचें कुलगुरुत्व कायमच होतें. इक्ष्वाकु राजवंशाची मुख्य राजधानी जी अयोध्या, तेथील राजसभेंत हे ब्रह्मर्षि नित्य मुख्यस्थानीं बसत असत. वसिष्ठमुनींच्या योगानें ती राजसभा प्रत्यक्ष ब्रह्मसभाच आहे, असें पाहणारांस वाटे! एके दिवशीं विश्वामित्रऋषि सशस्त्र तेथें आले. ब्रह्मर्षि वसिष्ठांशिवाय सर्व सभासदांनीं, त्यांचा पूजासत्कार केला. वसिष्ठमुनी बसल्या जागेवरून "यावें राजर्षे!" ह्मणून म्हणाले. भरसभेंत वसिष्ठांनीं आपणाला 'राजर्षि' म्हटलें, हा आपला मोठा अपमान झाला, असें समजून तेल ओतलेल्या अग्नीप्रमाणें विश्वामित्रांचा कोपाग्नि प्रज्वलित झाला! पण तो त्यांनीं त्या वेळीं मोठ्या यत्नानें शांत केला. तरी त्यांची मुद्रा संतप्त झालेली दिसत होतीच. ते त्या वेळीं कांहींच बोलले नाहींत. परंतु तेव्हांपासून त्यांचें वसिष्ठमुनींशीं फार वांकडें पडलें. वसिष्ठ मुनि जें बोलत किंवा करीत, त्याच्या उलट विश्वामित्रांनीं करण्याचा प्रयत्न करावा. एके वेळीं त्रिशुंक राजाचा पुत्र सुप्रसिद्ध हरिश्चंद्र राजा, यानें राजसूय यज्ञ केला, त्यांत ब्रह्मर्षि वसिष्ठ हे मुख्य उपाध्याय होतेच. यज्ञ समाप्त झाल्यावर हरिश्चंद्र राजानें आपल्या पूज्य कुलगुरु वसिष्ठमुनींचें षोडशोपचारें पूजन केलें. वसिष्ठमुनि तसेच देवसभेस गेले. तेथेंहि इंद्रादिदेवांनीं यांचा योग्य पूजासत्कार केला. त्या वेळीं विश्वामित्र तेथें होते. त्यांनीं वसिष्ठमुनींस विचारलें "महर्षे! आज ही महापूजा आपणाला कोठून प्राप्त झाली?"

वसिष्ठ म्हणाले "महा सत्वशील हरिश्चंद्र राजा माझा यजमान आहे. त्याच्यासारखा सत्यवादी, दाता, पराक्रमी, धर्मशील, प्रजावत्सल राजा, सांप्रत पृथ्वीतळावर असला तर तोच आहे! त्याच्याकडून हा महासत्कार मला प्राप्त झाला."

ही प्रशंसा ऐकून विश्वामित्र ह्मणाले "मी त्या राजाला असत्यवादी, अदाता, अधार्मिक व सत्वहीन बनवीन तरच नांवाचा विश्वामित्र!"

ब्रह्मर्षि वसिष्ठ म्हणाले " तसें कालत्रयीं घडणार नाहीं ! "

पण विश्वामित्रांनीं आपली प्रतिज्ञा खरी करण्याचा निश्चय केला. त्यांनीं हरिश्चंद्र राजाचा अतोनात छळ केला. पण तो महा सत्वशील राजा आपल्या सत्यव्रतापासून एक अणुभरहि ढळला नाहीं ! विश्वामित्रांची प्रतिज्ञा खोटी झाली !

एकदा वरुणदेवतेला बलिदान करण्यासाठीं वसिष्ठमुनींनीं हरिश्चंद्र राजाजवळून एक महायज्ञ करविला. त्या वेळींसुद्धां वसिष्ठांनीं आपणाला 'ब्रह्मर्षि' ह्मणावें, अशी विश्वामित्रांनीं खटपट केली. पण " गुणकर्मावांचून ही पदवी देतां येत नाहीं, " असें वसिष्ठऋषींनीं विश्वामित्रांस स्पष्ट सांगितलें.

एके दिवशीं ब्रम्हर्षि वसिष्ठ, फलपुष्पांसाठीं स्वतः अरण्यांत गेले होते. सती अरुंधती पर्णकुटिकेमध्यें ब्रम्हचिंतन करित बसली होती. कामधेनु नंदिनी, आश्रमांत चरत होती. शिष्यवर्ग स्नानसंध्यादि नित्यकर्में उरकून आपापले पाठ पठण करण्यांत अगदीं गढून गेला होता. अशा वेळीं पृथुआदि अष्टवसु, स्वस्त्रियांसह क्रीडा करण्याला तेथें आले. तेथें ती कामधेनु त्यांच्या दृष्टीस पडली. तिला पाहतांच त्यांतील द्यौ नांवाच्या वसूच्या स्त्रीनें "ही धेनु कुणाची ?" असें आपल्या पतीला विचारलें.

द्यौ ह्मणाला "प्रिये ! ब्रह्मर्षि वसिष्ठांची ही कामधेनु आहे. जो कोणी हिचें नित्य दूध पिइल, तो अवश्य निरोगी, बुद्धिमान् व दीर्घायु होईल. मरेपर्यंत त्याला जरा प्राप्त व्हावयाची नाहीं ! "

हें ऐकतांच त्या स्त्रीनें ही धेनु मृत्युलोकीं असलेल्या आपल्या एका मैत्रिणीला नेऊन द्यावी, अशी आपल्या पतीला विनंति केली. त्या स्त्रीलंपट वसूनें महामुनींची पर्वा न करितां ती कामधेनु तेथून चोरून नेली. ब्रह्मर्षि वसिष्ठ फलपुष्पें घेऊन परत आल्यावर पहातात, तों आश्रमांत नंदिनी नाहीं ! महर्षि फार चकित झाले व लागलीच समाधिस्थ झाले. नंदिनीस वसूंनीं चोरून मृत्युलोकीं नेलें आहे, असें

त्यांनां समाधीमध्यें कळून आलें. वसूंचें हें निंद्य वर्तन पाहून "यापुढें तुह्मीं मृत्युलोकीं जन्म घ्याल," असा या महामुनींनीं त्यांनां शाप दिला. हें ऐकून ते अत्यंत खिन्न व भयभीत झाले. त्यांनीं कामधेनु वसिष्ठ मुनींच्या स्वाधीन केली. दिलेल्या शापाची क्षमा व्हावी ह्मणून त्यांनीं पश्चात्तापपूर्वक या ब्रह्मर्षींची प्रार्थना केली. सत्वशील वसिष्ठमुनींनां त्यांची दया आली. "एक एक वर्षाच्या अंतरानें सात वसु शापमुक्त होतील; पण नंदिनीचें हरण करणारा द्यौ मात्र पुष्कळ वर्षें मृत्युलोकीं राहील" असा वसिष्ठमुनींनीं त्यांनां उःशाप दिला.

सूर्यवंशांतील सुद्युम्न नामक राजा, श्रीशिवानें शापिलेल्या एका वनांत चुकून गेला. तेथें तो इला नांवाची स्त्री झाला. पुष्कळ दिवस तो स्त्रीरूपानें त्या वनांत हिंडत होता. प्राप्त झालेल्या स्त्रीत्वापासून आपली कशी सुटका होईल, या चिंतेंत तो रात्रंदिवस पडला होता. शेवटीं त्यानें आपल्या परम पूज्य, महा दयाळू ब्रह्मर्षि वसिष्ठगुरूंचें चिंतन केलें. या महर्षींस तें योगबळानें तत्काळ समजलें. "आपला शिष्य चुकून संकटांत पडला आहे; आपला धांवा करित आहे; तेव्हां त्याला त्या संकटांतून अवश्य मुक्त केलें पाहिजे," असा विचार करून हे शिष्यवत्सल महर्षि तत्क्षणीं त्या वनांत गेले. आपल्या यजमानाची ती स्थिति पाहून यांचें मन दयेनें अगदीं भरून आलें. उशीर न लावितां, श्रीशिवाची यांनीं प्रार्थना करून त्याला सुप्रसन्न केलें. श्रीशिवाच्या अनुग्रहानें या परोपकारी ब्रह्मर्षींनीं त्या राजाला स्त्रीत्वापासून मुक्त केलें. याला ह्मणावयाचें कुलगुरुत्व आणि यालाच ह्मणावयाचें शिष्यवात्सल्य!

तसाच सुदास राजावरहि एक बिकट प्रसंग आला होता. त्या राजाच्या आजूबाजूचे कित्येक लोभी राजे रावीनदी उतरून ससैन्य त्याच्यावर चालून आले. पण ही गोष्ट वसिष्ठमुनींस तेव्हांच समजली. यांनीं त्या वेळीं राजास मोठा धीर देऊन आपण स्वतः शत्रूंशीं लढण्यासाठीं त्या सुदास राजाबरोबर समरांगणीं गेले व शत्रूंचा

पराभव करून त्यांनां सुदास राजाचे पूर्ण अंकित बनविलें. हा सुदास राजा दिग्विजय करण्यास निघाला होता, त्या वेळींहि या महामुनींचें त्याला पूर्ण सहाय्य होतें. केवढा हा यजमानाबद्दल अभिमान ? पुरोहित, कुलगुरु किंवा कुलोपाध्याय, असे शापादपि शरादपि असल्यावर समाजाची उन्नति कां नाहीं होणार ?

हे महर्षि मंत्रद्रष्टे होते. ऋग्वेदांत एके जागीं या ब्रह्मर्षींच्या संबंधानें पुढील उल्लेख आढळतोः–"हे वसिष्ठ! तुझ्या प्रार्थनेनें दहा राजांबरोबर झालेल्या लढाईंत इंद्रानें सुदासाचें रक्षण केलें आहे." यावरून ब्रह्मर्षि वसिष्ठमुनींचें वजन देवलोकीं विशेष असल्याचें दिसून येतें. आपल्या आश्रयास आलेल्याचा यांनीं कधींहि अव्हेर केलेला नाहीं; मग तो राजा असो वा रंक असो !

ब्रह्मत्वांत हे जितके निष्णात होते, तितकेच हे क्षात्रकर्मांतहि अत्यंत निपुण होते. सुदासाचे पुत्र सौदास, वीर्यसह व कल्माषपाद या राजांच्या येथें यज्ञाच्या निमित्तानें हे महर्षि बहुत दिवस राहिले होते. पण, याच संधीस एका वनांत राहिलेल्या दोन राक्षसांपैकीं एका राक्षसाचा वध सौदास राजानें केला होता. त्यामुळें दुसऱ्या राक्षसानें संधि साधून त्या राजाचा सूड घेण्याचा निश्चय केला व त्याप्रमाणें तो दुष्ट असुर तशा वेळेची वाट पाहत बसला. यज्ञकर्म करण्यासाठीं वसिष्ठऋषि सौदास राजाकडे होतेच. एकेदिवशीं स्नानसंध्यादि नित्यकर्में उरकण्यासाठीं ते तेथील नदीतीरीं गेले. ही वेळ आपलें काम साधण्याला उत्तम आहे असें पाहून तो दुष्ट कपटी राक्षस हुबेहुब वसिष्ठमुनि बनून राजद्वारीं आला. सौदास राजाला त्यानें सत्वर भोजन तयार करण्याची आज्ञा केली व भोजनाच्या पदार्थांत हळूच नरमांस मिसळून तो कपटी तेथून गुप्तपणें निघून गेला. इतक्यांत ब्रह्मर्षि वसिष्ठ स्नानसंध्यादि नित्य कर्में उरकून आले. भोजन तयार होतेंच. लागलेच ते भोजनास बसले. पण, भोजनाच्या पदार्थांत नरमांस वाढलेलें पाहून हे ब्रह्मर्षि पूर्ण शांतमूर्ति असतांहि त्या वेळीं प्रळयाग्नीसारखे कोपायमान झाले !

"तूं राक्षस होशील!" असा सौदासाला यांनीं शाप दिला. राजानें झालेला खरा प्रकार मोठ्या विनयानें या महर्षींस कळविला. त्यावरून हा राजा निर्दोषी आहे, अशी मुनींची पूर्ण खात्री झाली. "लवकरच तूं या शापापासून मुक्त होशील, " असा त्याला यांनीं उ:शाप दिला. थोर असतात ते एखाद्या वेळीं जरी संतापले, तरी खरा प्रकार जाणतांच ते शरत्कालच्या चंद्रासारखे शीतल होऊन दुसऱ्याचें हितच करतात!

ब्रह्मर्षि वसिष्ठांनीं आपणाला 'ब्रह्मर्षि' ह्मणावें व ब्राह्मणवर्गांत घ्यावें ह्मणून विश्वामित्र रात्रंदिवस नेटानें प्रयत्न करितच होते. ते पुनः मुद्दाम अयोध्येंतील राजसभेस आले. वसिष्ठमहर्षि तेथें होतेच. आपल्या यथार्थवक्तृत्वास बाध न यावा ह्मणून "यावें राजर्षि" या संबोधनानेंच विश्वामित्रांचें यांनीं या वेळींहि स्वागत केलें. हे शब्द विश्वामित्रांच्या काळजाला तीव्र विषाप्रमाणें झोंबले! पण काय करतात! वसिष्ठमुनींच्या ब्रह्मतेजापुढें यांचें क्षात्रतेज किती टिकणार? ब्रह्मदेवादि देवांनीं माझें ब्राह्मणत्व मान्य केलें असून हा वसिष्ठ मला द्वेषानेंच राजर्षि ह्मणत आहे; मी याचा पुरा सूड उगवीन; करवेल तितका मी याचा छळ करीन, " असा संकल्प करून विश्वामित्र त्या सभेंतून तसेच निघून गेले. वसिष्ठशापानें राक्षस झालेल्या सौदास राजाची त्यांनीं मुद्दाम भेट घेतली. वसिष्ठाविषयीं त्यांनीं त्याचें मन पूर्ण कलुषित केलें. त्या राक्षसाकरवीं त्यांनीं या ब्रह्मर्षीच्या शंभर पुत्रांचा नाश करविला. परंतु, वसिष्ठमुनींची शांति, विवेक व सात्विकता, हीं सागरासारखीं गंभीर, महाडोहासारखीं स्थिर व ध्रुवासारखीं अढळच राहिलीं होतीं!

विश्वामित्राचे सर्व उपाय थकले. "मी विश्वामित्राला 'ब्रह्मर्षि' ह्मणत नाहीं ह्मणून त्यानें माझे शंभर पुत्र मारविले, " हें वसिष्ठमुनि पूर्णपणें जाणत होते. कोणीं त्याबद्दल यांच्यापाशीं प्रश्न केला असतां हे सत्यवादी त्यांचें असें समाधान करीत कीं "अशा रीतीनें माझ्या पुत्रांचा नाश व्हावा असा ईश्वरीसंकेतच होता. तो फिरणें केवळ

अशक्य होतें. मग मीं त्याचा खेद काय ह्मणून करावा ? यापासून माझ्या सत्यव्रताचा व सात्त्विकवृत्तीचा मुळींच भंग झालेला नाहीं. "

अहाहा ! केवढी ही शांतवृत्ति व केवढी ही सहनशीलता !!!

" आपण वसिष्ठमुनींचे शंभर पुत्र मारविले. तेव्हां आतां तरी हे महर्षि भिऊन मला ' ब्रह्मर्षि ' ह्मणतील, " अशा गर्वानें विश्वामित्र ऋषि आणखी पुनः अयोध्येंतील राजसभेला आले. पण, तेव्हांहि ब्रह्मर्षि वसिष्ठांनीं त्यांनां राजर्षीच ह्मटलें. हें ऐकून विश्वामित्र अत्यंत संतप्त झाले. वसिष्ठमुनींस ठार मारण्याचा त्यांनीं निश्चय केला. एके दिवशीं गुप्तपणें ते वसिष्ठमुनींच्या आश्रमास गेले. हातांत शस्त्र घेऊन ते वसिष्ठमुनींच्या पर्णशालेच्या मागें लपून बसले. रात्रीची वेळ, पण शुक्लपक्ष असल्याकारणानें स्वच्छ चांदणें पडलें होतें. सुमारें सव्वा प्रहर रात्र उलटून गेली होती. आश्रमांत सर्वत्र शांतताच होती. अशा शांत वेळीं ब्रह्मर्षि वसिष्ठ आपल्या अनुरूप धर्मपत्नीशीं धर्मचर्चा करित बसले होते. विश्वामित्र ती बाहेरून ऐकत होते. अरुंधतीनें आपल्या पतीस असा एक प्रश्न केला कीं " सध्या जे ऋषी तप करित आहेत, त्यांत कोणत्या ऋषीचें तप श्रेष्ठ आहे ? "

ब्रह्मर्षि ह्मणाले " हे देवि ! तुझा प्रश्न फार महत्त्वाचा आहे. सांप्रत तपश्चर्या करणाऱ्या ज्या ऋषींची मला माहिती आहे, तीवरून माझी अशी खात्री झाली आहे कीं, विश्वामित्रऋषींचें तपोबल त्या सर्वांहून श्रेष्ठ आहे. तपस्वी मंडलांत ते अग्रेसर आहेत. "

वसिष्ठमुनींनीं विश्वामित्रांच्या तपाची यथार्थ प्रशंसा केली. ती तेथें लपून बसलेल्या विश्वामित्र ऋषींनीं ऐकली. "वसिष्ठांशीं आपलें हाडवैर असतांहि आपल्या मागें हे ब्रह्मर्षि आपली प्रशंसाच करितात ! हा यांच्या मनाचा केवढा मोठेपणा आहे ? " असा मनांत विवेकाचा विकास होतांच विश्वामित्रऋषींची सूड उगविण्याची दुष्टवृत्ति जागच्या जागींच मावळली. त्यांनां आपल्या वाईट कृत्यांचा पूर्ण पश्चात्ताप झाला. ते आपल्या मनाशींच ह्मणाले " अरेरे ! मी किती पापी आहें !

जे माझ्या मागें माझी स्तुतीच करित आहेत, त्यांचा वध करण्याला मीं तयार व्हावें काय? शिव शिव! धिक्कार असो मला!! या ब्रह्महत्येच्या महापातकांतून मी कसा मुक्त झालों असतों? निःसंशय मी घोरतर नरककुंडांतच पडलों असतों! संचय केलेल्या तपोधनाचा साफ नाश झाला असता! नांवाचा 'ब्रह्मर्षि' म्हणवून घेण्याचा मी व्यर्थ प्रयत्न करित आहें. मी यांच्या शंभर पुत्रांचा नाश करविला; यांच्या कित्येक यजमानांचाहि अतोनात छळ केला; तरी हे ब्रह्मपरायण मुनि, माझ्याशीं निर्वैरवृत्तीनेंच वागत आहेत, माझे गुणानुवाद गात आहेत, आणि मी द्वेशबुद्धीनें शस्त्रधारी होऊन यांचा वध करण्यास तयार झालों आहें! अहाहा! शुद्ध सत्वगुणांत व रजोगुणांत हें केवढें अंतर! धन्य धन्य हे पूर्ण सत्वशील ब्रह्मर्षि! खरे ब्रम्हर्षि ते हेच!"

असा पश्चात्तापपूर्वक विचार करून त्यांनीं आपल्या हातांतील शस्त्र दूर फेंकून दिलें व तसेंच पर्णशाळेंत जाऊन त्यांनीं वसिष्ठमहर्षींचे घट्ट पाय धरिले. अशा रीतीनें आलेल्या विश्वामित्रऋषींस पाहून वसिष्ठमुनि अमळ चकित झाले! व लागलेंच "यावें ब्रम्हर्षे, आपण आज एवढ्या वेळीं येथें कोठून?" असें आदरपूर्वक त्यांस विचारिलें.

वसिष्ठमुनींच्या मुखांतून 'ब्रम्हर्षि' शब्द निघालेला ऐकून विश्वामित्र "आपली इच्छा आज पूर्ण झाली" असें म्हणाले. त्यांस परम आल्हाद झाला. या हर्षभरांत त्यांनीं वसिष्ठमुनींस विचारिलें "हे ब्रह्मर्षे, इतके दिवस मी 'राजर्षि' होतों, व आजच 'ब्रम्हर्षि' कसा झालों?"

वसिष्ठ म्हणाले "ब्रम्हर्षिपदाला तुम्ही आजपासून योग्य झालांत. शुद्ध सत्वगुण, सत्यशीलता, निरभिमानवृत्ति, इत्यादि ब्राम्हणपणाच्या गुणकर्मस्वभावांचा तुमच्यांत प्रवेश होऊन शस्त्रास्त्रें धारण करणें, क्रोधाधीन होणें, वगैरे रजोगुणात्मक वृत्तींचा तुमच्यांतून साफ नाश झाला; म्हणून तुम्ही आतां 'ब्रम्हर्षि' झालां. जोंपर्यंत तुमचे गुणकर्मस्वभाव राजस होते, तोंपर्यंत मी तुम्हांला 'राजर्षि' म्हणत होतों;

आतां तुमचे गुणकर्मस्वभाव शुद्ध सत्वगुणप्रधान झाले, त्यामुळें तुम्ही ' ब्रम्हर्षि ' या पदाला सहजच योग्य झालांत. "

ब्रह्मर्षि वसिष्ठांची ही यथार्थवाणी ऐकून विश्वामित्रऋषि परम हर्षित झाले. त्यांस आपण आज कृतकृत्य झालों, असें वाटलें. तेव्हां-पासून ते परस्पर जिवलग मित्र झाले. महर्षि विश्वामित्र कृतकृत्य होऊन आपल्या आश्रमास गेले. सत्संगतीचा महिमा पहा कसा आहे तो!

परस्पर अत्यंत मित्रत्वानें वागत असतां पुष्कळ दिवसांनीं ब्रह्मर्षि वसिष्ठ विश्वामित्रऋषींच्या आश्रमास गेले. विश्वामित्रऋषींनीं त्यांचा योग्य पूजासत्कार केला. आध्यात्मिक विषयावर उभयतांचा पुष्कळ संवाद झाला. विश्वामित्रऋषींस परम संतोष होऊन त्यांनीं आपलें एक हजार वर्षांचें तपाचें फल वसिष्ठमुनींस अत्यादरानें अर्पण केलें. वसिष्ठमुनींनीं त्याचा स्वीकार करून जातांना आपलें एक घटकेचें फल विश्वामित्रऋषींस अर्पण केलें. हें पाहून विश्वामित्रमुनि अमळ विचारांत पडले! आपल्या एक हजार वर्षांच्या तपाच्या फलाची बरोबरी वसिष्ठमुनि आपल्या एक घटकेच्याच सत्संगतीच्या फलाशीं करतात, हें कसें, याचें त्यांनां मोठें कोडें पडलें.

विश्वामित्रऋषींची अशी संशयी वृत्ति पाहून महर्षि वसिष्ठ त्यांनां ह्मणाले " ब्रह्मर्षे विश्वामित्र! आपल्याला यांत कांहीं संशय येत असल्यास चला आपण उभयतां एखाद्या सत्यदर्शी महर्षींजवळ जाऊन याचा निर्णय करूं. "

विश्वामित्रांस ती गोष्ट मानवली. ते उभयतां सत्यलोकीं महर्षि शेषापाशीं गेले. शेषऋषींनीं त्यांचा उत्तम सत्कार केला व येण्याचें कारणहि त्यांस विचारून घेतलें. तें ऐकल्यावर शेषऋषींनीं अनेक प्रमाणें देऊन सत्संगतीची श्रेष्ठता विश्वामित्रांस निरूपण केली. ती ऐकून महर्षि विश्वामित्रांचें समाधान झालें. नंतर ते उभयतां आपापल्या आश्रमांस गेले. खरोखर, सत्संगतीचा महिमा फारच मोठा आहे. मोक्षसुखाचें मुख्यद्वार सत्संगतीच आहे!

महर्षि वसिष्ठ हे इक्ष्वाकुवंशांतील दशरथ राजाचे कुलगुरु होते, इतकेंच नाहीं, तर त्याच्या राजसभेंत हे मुख्य प्रधानहि होते. यांच्याच संमतीनें दशरथ राजा आपल्या राज्याचा कारभार चालवित असे. दशरथाला पुत्रसंतान नव्हतें. तें होण्यासाठीं महर्षि वसिष्ठांनीं त्याच्याकडून पुत्रकामेष्टी यज्ञ करविला. यज्ञाच्या प्रभावानें त्याला राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न अशा चार पुत्ररत्नांचा लाभ झाला. उपनयनसंस्कार झाल्यावर, राजानें हे चारी पुत्र, विद्याभ्यास करण्यासाठीं ब्रह्मर्षि वसिष्ठांच्या स्वाधीन केले. वसिष्ठमुनींनीं त्यांनां वेद, वेदांग, धर्मशास्त्र, राजनीति, युद्धकलादि विद्यांचें उत्तम शिक्षण दिलें. त्यांत श्रीराम हे फारच उत्तम शिष्य निपजले. वसिष्ठांनीं त्यांनां आध्यात्मिक व योगविद्येचें शिक्षण फारच उत्तम दिलें. श्रीरामांस उपदेशिलेला योगवासिष्ठ किंवा महारामायण हा लोकमान्य ग्रंथ ज्यांनीं थोडाबहुत वाचला असेल त्यांची या महर्षींच्या प्रगल्भ ज्ञानाविषयीं खात्रीच झाली असेल. वसिष्ठमुनींच्या उत्कृष्ट शिक्षणानें व सत्संगतीनें श्रीरामासारखे सुशील, बुद्धिमान्, महाविद्वान्, मोठे पराक्रमी, महत् संकटें सोसणारे, एकपत्नीव्रत पाळणारे, निस्सीम मातृपितृभक्त, शिष्य निपजले. रामायण हें त्यांच्या वरील गुणकर्मस्वभावाविषयीं पूर्ण साक्ष देतच आहे!

योगवासिष्ठासारखाच यांनीं ‘ वसिष्ठस्मृति ’ नांवाचा धर्मशास्त्रावर एक उत्तम स्मृतिग्रंथ रचला आहे. धर्मग्रंथांत त्याची गणना आहे. सामाजिक किंवा धार्मिक प्रकरणांचा निर्णय करतांना मनुस्मृतीप्रमाणेंच या स्मृतिशास्त्रांतील प्रमाणें देत असतात. या ब्रह्मर्षींनीं ‘ वसिष्ठसंहिता ’ नांवाचाहि एक ग्रंथ रचिला आहे. त्याचे एकंदर वीस अध्याय आहेत. मुख्यत्वेंकरून त्यांत वेदाचें श्रेष्ठत्व प्रतिपादन करून ते शिकण्याची किती आवश्यकता आहे याचेंहि उत्तम निरूपण केलें आहे. शिवाय, त्यांत आणखी असाहि उपदेश केला आहे कीं “द्रव्यसंचय करण्यापेक्षां, तपसंचय करणेंच विवेकी मनुष्याला अधिक

श्रेयस्कर आहे ! जो ब्राह्मण जसजसा प्रतिग्रह कमी कमी घेत जातो, तसतसें संतोषाच्या योगानें त्याचें ब्रह्मतेज वाढत जातें ! म्हातारपणामुळें शारीरिक शक्ति जरी क्षीण होते, तरी मानसिक तृष्णा तरुणच असते! ती सर्व दुःखांचें मूळ असून तीच अनेक अधर्माचरणें करविते. यासाठीं प्रथम तिचा त्याग करावा. सत्कर्म करून जें मिळेल त्यांत तृप्त राहून संतोषामृताचें पान करण्यांत जें सुख आहे तें दुसऱ्या कशांतहि नाहीं. सर्व काळ शांतचित्त, आनंदवृति, सत्यभाषण, कडकडीत वैराग्य, आणि तत्वज्ञान जाणण्याची आवड, हींच पांच, मनुष्याला शांतिसुख देणारीं आहेत. ”

योगवासिष्ठांत श्रीरामाला या महर्षींनीं अशा आशयाचा उपदेश केला आहे कीं “ हे राम ! मनाला जिंकलें असतां तें व त्याच्या सर्व वृत्ति केवळ शून्यवत् होतात. जीवात्मा केवळ चित्रासारखा स्थिर व मुग्ध होतो. स्फूर्तींचा प्रतिबंध होऊन फक्त एक साक्षिभूत आत्मा राहतो. यालाच ‘ तुर्यावस्थासंयमाभास ’ म्हणतात. या योगानें पंचप्राणमय सोहं व त्याची कुंडली हीं एकरूप होऊन प्रणवरूपानें आत्म्यांत संमीलन होतात. भृकुटीचक्रांत व्यापून राहणाऱ्या सोहंरूपी आत्म्याला त्या चित्स्वरूपाचें दर्शन होतें, तसेंच या गुप्त भासांत आत्म्याच्या ज्ञानशक्तीनें अंतःकरणाचे सर्व भाव चैतन्यतेला पावतात. सर्व कर्मेंहि स्फुरण पावतात. या भासालाच मायाभास म्हणतात. यामुळें या गुप्त भासाचे ज्ञाते—योगीश्वर अशा भासांकडे लक्ष्यच देत नाहींत. कारण, त्यांकडे लक्ष्य लाविल्यानें अनेक जन्मांतरांतील विविध जातींचीं कर्में सतत दिसूं लागतात. त्यामुळें, सत्यनिवृत्तीचा आनंदाभास मात्र होतो. म्हणून योगीजन निरंतर अखंड स्वरूपाच्या निर्विकल्प, शांत, समाधीच्या पूर्ण सुखांतच राहतात. याप्रमाणें वागलें असतां मायाभास, उपाधि हीं त्या योग्यांनां अडवित नाहींत. असें असतांहि, ते ज्ञाते—योगी, कित्येक प्रसंगीं आपल्या दिव्यदृष्टीनें केवळ आत्मरूप बनून, अद्वैतभावानें सर्व दृश्यादृश्य ब्राह्यांतर कृति पाहतात.

पण, त्या प्रसंगीं आपल्यावांचून दुसरा पदार्थ वेगळा दिसत नाहीं, केवळ असंग आत्मरूपच दिसतें. " इत्यादि.

आपले शंभर पुत्र विश्वामित्रांनीं कपटानें मारविले, आपला वंशच्छेद झाला, म्हणून या महर्षींनां भारीच खेद होत असे. एके प्रसंगीं यासंबंधानें विचार करित असतां यांचें मन अत्यंत उदास झालें. यांनीं जलसमाधि घेण्याचा निश्चय केला. लागलेच उठून हे एका खोल नदीप्रवाहांत जाऊन पडले. पण त्या नदीनें यांनां वरच्यावर तरंगत ठेविलें. तेव्हांपासून त्या नदीचें नांव विपाशा असें पडलें आहे. नंतर हे मुनि जलसमाधि घेण्यासाठीं हैमवतीनदीतीरीं गेले. तिच्या खोल प्रवाहांत यांनीं उडी घातली! पण त्या नदीनेंहि यांनां तरंगतच ठेविलें. तेव्हांपासून त्या नदीचेंहि नांव शतद्रु असें पडलें आहे. कोणत्याहि उपायांनीं मरण येत नाहीं, असें जाणून या महर्षींनीं स्वाश्रम सोडण्याचा निश्चय केला. हे घोर अरण्यांत जाण्यास निघाले. स्वाश्रम सोडून बरेच दूर गेल्यावर यांच्या कानीं एक ध्वनि पडला. त्यांत आपला वंशच्छेद होत नाहीं, असा अर्थ होता. हें ऐकून वसिष्ठमुनींस आनंद झाला. ही वाणी या महर्षींच्या सुनेची होती. यांच्या शंभर पुत्रांपैकीं शक्ति नामक पुत्राची ती धर्मपत्नी होती. तिचें नांव अदृश्यंती होतें. विश्वामित्रांनीं यांच्या सर्व मुलांचा नाश करविला, त्यांत शक्तीचाहि नाश झाला होता. त्यावेळीं अदृश्यंती गर्भवती होती. आपलाहि विश्वामित्र घात करील, या भयानें ती त्या वनांत गुप्तपणें जाऊन राहिली होती. वसिष्ठमुनींनीं तिला आपल्या आश्रमास आणून अरुंधतीच्या स्वाधीन केलें. लवकरच ती प्रसूत झाली. ब्रह्मर्षि वसिष्ठांनीं तिच्या पुत्राचें नांव पराशर ठेविलें. हेच पराशर पुढें आपल्या आजासारखे महर्षिपदास पावले.

वसिष्ठकुलांत वसिष्ठमहर्षिसुद्धां सात ऋषी मंत्रद्रष्टे झाले आहेत. पहिले खुद्द वसिष्ठ, दुसरे शक्ति, तिसरे पराशर, चौथे इंद्रप्रमति, पांचवे भरद्वसु, सहावे मैत्रावरुण आणि सातवे कुंडिन. यांपैकीं चौघांची

वंशमालिका चार प्रकारची झाली आहे, ती अशी :—पहिली वसिष्ठ; दुसरी कुंडिन; तिसरी उपमन्यु; व चौथी पराशर. पराशरकुलोत्पन्न गौर पराशरादि जे आणखी सहा भेद झाले, त्यांचे वासिष्ठ, शाकल्य व पाराशर्य असे तीन प्रवर झाले आहेत. पण विस्तारभयास्तव त्यांचें सविस्तर वर्णन या त्रोटक चरित्रांत देतां येत नाहीं.

वसिष्ठ हे जरी पूर्णतत्त्वदर्शी होते, तरी पूर्ववयांत हे फारच व्यवहार-दक्ष होते. व्यवहारज्ञानाचा प्रचार करण्यासाठीं हे महर्षि आस्थापूर्वक निरीच्छबुद्धीनें रात्रंदिवस अत्यंत झटत असत. आर्यावर्त्तांतील सर्व लोक व्यवहारांत फार कुशल, नेटानें व प्रामाणिकपणानें उद्योग करणारे होऊन सुखी असावे, अशी यांची फार इच्छा होती. यासाठीं हे किती झटत होते हें यांनींच रचिलेल्या वसिष्ठस्मृतीच्या अवलोकनानें स्पष्ट होतें.

वृद्धापकाळीं यांचें मन पारलौकिक किंवा तत्त्वचिंतनाकडे विशेष लागलें. कडकडित वैराग्य धारण करून आपल्या वैराग्यशील धर्मपत्नी-सह हे हिमालयावर जाऊन राहिले. आपण कोण, हें जग काय आहे, ईश्वरीज्ञान तें कोणतें, शारीरिक व मानसिक भाग कोणते, वगैरे गूढ विषयांवर, सनकसनंदनादिकांनीं जे शोध व जे निर्णय केले होते, त्यांचें विशेष अवलोकन व मनन करून यांनीं त्यांचा पूर्ण अनुभव घेतला असा अनुभव घेऊन हे ब्रम्हर्षि स्वस्थ बसले नाहींत. यांनीं या अध्यात्मिक विषयाचा, त्या काळच्या जिज्ञासू आर्यजनांस उपदेशहि केला. योगधर्माचे तर हे महर्षि मुख्य आचार्यच होते. प्रलयानंतरच्या मानवीसृष्टींतहि यांचा हा योगधर्म पुढील महात्म्यांनीं मोठा आस्था-पूर्वक पुढें चालविला. यालाच ऋषिप्रणित धर्म म्हणतात. हा धर्म वेदोक्तहि मानला आहे. परमहंस, संन्यासी इत्यादिकांत हाच धर्म चालू आहे. यांत यज्ञयागादि कर्मे करण्यास सांगितलीं आहेत, पण तीं सर्व जीवहिंसारहित करावीं असा निर्णय सांगितला आहे. इंद्रादि देवतांना ईश्वराच्या विभूति मानल्या आहेत. पण मुख्य सिद्धांत ईश्वर

सर्वव्यापक, एक, निराकार, निरंजन, निर्विकार, शुद्ध, सत्यस्वरूप असाच आहे. योगवासिष्ठ किंवा महारामायणांत ब्रह्मस्वरूपाचें निरूपण फारच उत्तम केलें आहे. वेदांत मतानुयायी मंडळी या ग्रंथांचें आस्थापूर्वक अध्ययन किंवा अवलोकन करितात. वेदांतील ज्ञानकांडाच्या आधारानें या वेदांतमताचें या महर्षींनीं प्रतिपादन केलें आहे. याच मतांत, मच्छिंद्र, गोरख, जालंधर, नवनाथ, चौऱ्याशींसिद्ध, योगेश्वर, गोपीचंद, भर्तृहरि, विक्रम, वगैरे वेदांतवादी व योगी निर्माण झाले. हे सर्व या मताचे मोठे अभिमानी व प्रवर्तक होते. या वेदांतमताचे बरेच सिद्धांत चार्वाक, बौद्ध, जैन वगैरे मतवाद्यांनीं घेतले आहेत. निरनिराळ्या धर्मांत जी थोडीबहुत योगक्रिया पाहण्यांत येते, तिचें मूळ याच धर्मांतून त्यांत गेलें असावें असा सत्यधर्माचा इतिहास शोधणारांचा तर्क आहे. या योगधर्माची अशी कांहीं खुबी आहे कीं, अझूनहि तिचा अनुभव घेणारीं माणसें मधून मधून आढळतात!

अष्टांगयोगाची पूर्ण सिद्धि करून हे तत्त्वदर्शी हिमालयावरील आपल्या आश्रमांत निरंतर ब्रम्हचिंतन करित होते. यांचे उत्तम गुण, पवित्र आचरण, महान् विद्वत्ता व ब्रम्हपरायणता पाहून त्या वेळच्या सर्व महर्षींनीं यांनां सप्तमहर्षिमंडळांत अत्यादरानें नेऊन बसविलें होतें. जरी हे महर्षि परम योगी होते, तरी शरीरपीडेनें यांनां सोडिलें नव्हतें. म्हातारपणीं हे नेत्ररोगानें फार पीडित असत. तथापि या महात्म्यांनीं मरेपर्यंत आपलें ऐहिक व पारमार्थिक कर्तव्य लेशमात्रहि सोडलें नव्हतें. राजा व प्रजा यांनीं सर्वदा अत्यंत प्रेमानें वागावें, एकमेकांच्या हक्कांचें न्यायपूर्वक रक्षण व्हावें, सत्य, धर्म, नीति, सदाचारादिकांचा लोप होऊं नये, म्हणून यांचा आमरण यत्न चाललाच होता.

या ब्रम्हर्षि वसिष्ठांच्या चरित्रांत बरीच अतिशयोक्ति आहे. परंतु सत्यासत्याचा निर्णय करून केवळ सत्याचेंच ग्रहण करणारे मार्मिक वाचक, अशा गोष्टीकडे सहज दुर्लक्ष्य करून जें सत्य तेंच ग्रहण

करितात. कोंराटीच्या फुलांच्या चारी बाजूंस असणाऱ्या कांट्यांनां मुळींच न शिवतां मधमाशी त्यांतील मध जशी जपून सेवन करते, तशा रीतीचेंच अनुकरण जर वाचक करतील, तर या महर्षींच्या चरित्रापासून त्यांनां पुष्कळ लाभ होईल! पवित्र आचरण, विद्वत्ता, ज्ञान, निस्पृहता, शांतता, दृढसंकल्प, सत्यशीलता, उदारता, समदृष्टि, उत्तम कुलगुरुत्व, तत्वदर्शित्व, पूर्ण योगाध्ययन व परोपकाची अत्यंत आवड, इत्यादि सद्गुणसदाचरणांचें महर्षि वसिष्ठ हे एक अद्वितीय रत्न होतें! ‘ तुम्ही तरुनी विश्व तारा ’ हा जो मुक्ताबाईचा महाबोध, तो आपल्या पवित्र आचरणानें या महर्षींनीं अगदीं सत्य करून दाखविला आहे. ब्रम्हर्षि वसिष्ठांसारखे तत्त्वदर्शी, स्पष्टवक्ते, दृढनिश्चयी, उत्कृष्ट, अध्यापक, कुलगुरु-पुरोहित, उपाध्याय, आमच्या देशांत पुनः जन्मोत व आमचे ऐहिक व पारलौकिक क्लेश दूर करोत, असें परमेश्वरापाशीं आपण अनन्यभावानें मागणें मागूं या.

# देवाचार्य बृहस्पती.

चालू मन्वंतरांतील ब्रह्मदेवाचे मानसपुत्र जे अंगिराऋषि, त्यांचे हे ज्येष्ठ चिरंजीव. यांच्या आईचें नांव श्रद्धा. ही यांची स्वायंभू मन्वंतरांतील माता. अग्निवंशाच्या संबंधामुळें यांनां तिसऱ्या पंक्तीचा अग्नि मानिलें आहे. कारण, अंगिराऋषींनीं वरुणयज्ञाच्या निमित्यानें अग्नीला आपला पुत्र मानिलें आहे. या देवाचार्यांच्या बंधूंचीं नांवें उतथ्य व संपर्ति. यांनां चार बहिणी होत्या. त्यांचीं नांवें कुहू, राका, अनुमति, व सिनीवाली. चालू वैवस्वतमनूंत मात्र यांची आई सुरूपा नांवाची होती. यांच्या बहिणी त्याच होत्या; पण, या वेळचे यांचे बंधु वेगळे होते. उतथ्य, पयस्य, शांति, घोर, विरूप, संतर्प व सुधन्वा अशीं त्यांचीं नांवें होतीं. बृहस्पति हे त्यांत ज्येष्ठ बंधु.

उपजतच यांची बुद्धि फार विलक्षण होती. पांचव्या वर्षींच अंगिरा ऋषींनीं यांचें मौंजिबंधन केलें. त्या काळच्या सामाजिक रीतीप्रमाणें यांनां वेदांचा व इतर शास्त्रांचा अभ्यास करण्याकरितां गुरुगृहीं धाडून दिलें. तेथें यांनीं अठ्ठेचाळीस वर्षेंपर्यंत कडकडीत ब्रह्मचर्य पालन करून वेदवेदांगांचें व इतर शास्त्रांचें सार्थ अध्ययन केलें. शस्त्रास्त्रविद्येंतहि हे अत्यंत निपुण झाले. यांची स्मरणशक्ति इतकी विलक्षण होती कीं, गुरूंनीं एक वेळ पाठ दिला कीं, तो यांच्या स्मरणपटावर कायम झालाच! लोकोत्तर समयसूचकता, अस्खलित मधुर वाणी, प्रत्येक विषयाची भरपूर माहिती व तो दुसऱ्याच्या मनावर पूर्णपणें ठसाविण्याची शैली, वगैरे गुण एकत्र असलेला सुशील शिष्य, गुरुजींचा कंठमणी कां नाहीं होणार! बृहस्पतींवर त्यांच्या गुरुजींची प्रीति अतोनात होती. "हा शिष्य आपलें बृहस्पति नांव सार्थ करील. व माझी गुरुदक्षिणा मला चांगली देईल" असें यांच्या गुरुजींनीं आपल्या आश्रमांतील महर्षींस म्हणावें. आपल्या लोकोत्तर गुणांनीं, ज्ञानानें व आचरणानें हा बृहस्पति देवाचार्य होईल, असें जें यांच्या गुरुजींस वाटत असे, तेंच शेवटीं सत्य झालें!

चौदा विद्या आणि चौसष्ट कला यांत अत्यंत निपुण झाल्यावर हे देवाचार्य गुरूची आज्ञा घेऊन आपल्या घरीं आले. विद्या, सद्गुण, सदाचरणादिकांनीं मंडित पुत्रास पाहून महार्षि अंगिरा फार संतोषित झाले. त्यांनीं यांचा समावर्तनसंस्कार केला. त्या प्रसंगीं जमलेल्या महर्षि मंडळीनें बृहस्पतींची विद्वत्ता व परम मोहक वक्तृत्व पाहून यांची फार तारीफ केली. "हा एक विलक्षण बुद्धीचा पुरुष होईल. देवलोकांत हा आचार्यपदास पात्र होईल," असें त्यांनीं भाकित केलें व शेवटीं हें अनुमान सत्यहि झालें.

बृहस्पतींस अनुरूप अशा दोन स्त्रिया होत्या. एक शुभा व दुसरी तारा. ह्या दोघी महा पतिव्रता होत्या. शुभा नांवाच्या स्त्रीपासून बृहस्पतींनां, भानूमति, राका, सिनीवाली, आर्चिष्मति, हविष्मति, आणि महामति अशा सात कन्या झाल्या. तारेपासून यांनां शंयु, निश्चवन, विश्वभुक्, वडवाग्नि, विष्टकृत् व कच असे सात पुत्र व स्वाहा नांवाची आठवी कन्या झाली.

देवलोकीं यांची योग्यता फार वाढली. सर्व देवांचे हे मुख्य आचार्य झाले. यांच्या संमतीवांचून देवेंद्र कांहीं करित नसे. यांनां सुरगुरु म्हणूं लागले. या देवाचार्यांनां चौथे व्यास म्हटलेलें आहे. वायुदेवता, स्तुतिदेवता, प्रार्थनादेवता व अग्निदेवता यांचें हें रूपांतर आहे, असा वेदांत एके जागीं उल्लेख आहे. यांनीं एक स्मृतिग्रंथ रचला आहे. त्यावरून यांची विशाल बुद्धिमत्ता वाचकांच्या सहज लक्ष्यांत येते. या स्मृतीला 'बृहस्पतिस्मृति' म्हणतात.

या देवाचार्यांची शुक्राचार्यांशीं मोठी स्पर्धा होती. हे देवगुरु व ते असुरगुरु आणि देवदानवांत वारंवार तंटे होत असत, त्या वेळीं बृहस्पति आपल्या शिष्यांनां ( देवांनां ) चांगली मदत करून युक्तिबलानें दानवांचा अगदीं पराभव करीत. त्यामुळें दानवांचा यांच्यावर फार डोळा होता. यांचा नाश करण्यासाठीं दानवांनीं अनेक उपाय केले, पण ते सर्व निष्फळ झाले. बृहस्पतींपुढें त्यांचे सर्व युक्तिपराक्रम हरले.

त्यांनीं शुक्राचार्यांच्या सहाय्यानें देवांचा पुष्कळ मोड केला. शुक्राचार्यांस संजीवनीविद्या येत होती; तिच्या योगानें लढाईंत देवांनीं मारलेले दानव पुनः जिवंत होत. ही विद्या आपणास प्राप्त व्हावी, ह्मणून देवाचार्यांनीं आपल्या कच नामक पुत्रास शुक्राचार्यांच्या येथें शिकण्यास पाठविलें. शुक्राचार्य जरी दैत्यपक्षाचे होते, तरी त्यांनीं कचाचा अव्हेर केला नाहीं. इतर शिष्यांप्रमाणेंच त्याला त्यांनीं आपल्या पाठशाळेंत ठेविलें. यावरून त्या काळचे आचार्य किती उदार मनाचे होते, हें स्पष्ट होतें.

देवाचार्य बृहस्पतींची धर्मपत्नी तारा, ही महासाध्वी असतां तिला पुराणांत असती ह्मणून वर्णिलें आहे! परंतु हें वर्णन सत्य नाहीं. कित्येक सत्यशोधक विद्वानांचा असा तर्क आहे कीं, देवलोकीं अशा अनीतीच्या गोष्टी घडल्या नसाव्या. देवांसारख्या शिष्यवर्गाला गुरु किंवा आचार्य परमपूज्य असावयाचा. गुरुपत्नी ही त्यांना मातेसारखी पूज्य असावयाची. देवाचार्य बृहस्पति जसे सदाचारसंपन्न होते, तशीच त्यांची सहधर्मचारिणी ताराहि फार सत्वशील होती. तेव्हां सोमा—चंद्रा—सारखा देव आपल्या गुरुपत्नीशीं अनीतीनें वागला असेल, असें वाटत नाहीं. जे देव मनुष्यादिकांस उत्तम नीतिमार्ग शिकविणारे व स्वतः त्याप्रमाणें वागणारे, ते असें नीच कर्म कसें करतील! ही कथा केवळ कल्पित असून एखाद्या वाममार्गी पुराणिकानें वेदव्यासांच्या नांवानें पुराणांत घुसडून दिली आहे. ज्या वेदव्यासांनीं वेदांतशास्त्र रचिलें, श्रुतिस्मृतींच्या व ब्राह्मणादि ग्रंथांच्या आधारानें महाभारतासारखा उत्तम ऐतिहासिक ग्रंथ रचिला—ते महानिपुण वेदव्यास—वैदिकधर्मानुयायी लोकांनीं अनीतिमार्गानें जाण्याजोग्या नीच कथा, आपल्या पुराणांत कशा लिहितील? देवांच्या दिव्य गुणकर्मस्वभावास असा कलंक कसा लावतील? वैदिकधर्माचा समूळ उच्छेद करण्यासाठीं रात्रंदिवस जीवापाड प्रयत्न करणाऱ्या बौद्धादि नास्तिकांनींच या अशा अधम कथा रचून देवांच्या पवित्रतेस कलंक

लावण्याचा यत्न केला असावा. उदाहरणार्थ, देवीभागवतांत यासंबंधानें अशी कथा आहे कीं "देवाचार्य बृहस्पति हे चंद्राच्या घरीं आले व हरण केलेल्या स्वपत्नीस परत मागूं लागले. तेव्हां चंद्रानें सुरगुरूला असें उत्तर दिलें कीं, तुझ्यासारख्या दरिद्री ब्राह्मणाला तारेसारखी परम सुंदर स्त्री काय कामाची ?"

चंद्रासारखा देवकोटींतील महात्मा, श्रीबृहस्पतींसारख्या अपरसूर्य आचार्यांची धर्मपत्नी बलात्कारानें चोरून नेईल व त्यांना वरील मासल्याचें उत्तर देईल, हेंच आधीं किती असंभवनीय आहे! यजुर्वेदाच्या तैतिरीय शाखेच्या श्रुतिग्रंथांत, ब्रह्मदेव, बृहस्पति, इंद्र, चंद्र इत्यादि देवतांची योग्यता अत्यंत थोर, पूजनीय मानली आहे. चंद्र किंवा सोम हा अष्टवसूंपैकीं एक मानिला आहे व त्याचा थोरपणा व सदाचरणहि अति उत्तम वर्णिलें आहे. असा उत्तम देव, आपल्या पितृतुल्य गुरूशीं व मातृतुल्य गुरुपत्नीशीं इतक्या नीचतेनें वागेल, हें अगदीं असंभवनीय आहे. ही चंद्रतारेची कथा निव्वळ कल्पित व क्षेपक आहे.

आतां, सोम या शब्दाचा अर्थ शिव असाहि होतो; तारा शब्दाचा अर्थ पार्वती पण होतो. यावरून पार्वतीचें शिवानें हरण केलें, म्हणजे तिचें पाणिग्रहण केलें. तारेला सोमापासून बुध नांवाचा पुत्र झाल्याचें वर्णन पुराणांत आढळतें. बुध नांव गणपतीचेंहि आहे. पूर्वजन्मीं चंद्राला तारा नांवाची स्त्री होती. ही दक्षकन्या. दक्षाच्या सत्तावीस मुलींशीं चंद्राचे विवाह झाले होते. त्यांत तारा व रोहिणी या फार सुरूप होत्या. फक्त रोहिणीस बुध नांवाचा पुत्र झाला होता. बाकीच्या सर्व स्त्रिया निपुत्रिक होत्या. बुधास रोहिणेय नांव यावरूनच पडलें आहे. या वर्णनावरून सहज निश्चय होतो कीं, बृहस्पति व चंद्रादि देवांच्या देवपणास कलंक लागण्याजोग्या अनीतिप्रचुर कल्पित कथा त्या काळच्या विधर्मी लोकांनीं मुद्दाम रचिलेल्या असाव्या. पण निव्वळ सत्यशोधक, सत्यासत्याचें संशोधन करून तेव्हांच निर्णय करितात.

हे देवाचार्य अत्युत्तम अध्यापक होते. यांची एक मोठी पाठशाळा होती. तींत देवादिकांचीं मुलें शिकत असत. यांची शिक्षणपद्धति इतकी सरळ व मोहक होती कीं, कसाहि विद्यार्थी यांच्या पाठशाळेंत आला तरी तो फार करून अविद्वान निपजावयाचा नाहीं. आमरण कडकडीत ब्रह्मचर्य पालन करून पूर्ण वैराग्यानें सदैव ब्रह्मचिंतन करणारे महायोगी शुकदेव, यांचेच पट्टशिष्य होते.

चार्वाक किंवा नास्तिक मताचे जनक हेच देवाचार्य असें ह्मणतात! या मताचा प्रसार यांनींच करविला. चार्वाक मताचे मूळ ग्रंथ यांनींच बनविले. हें मत उत्पन्न करण्याचें कारण असें झालें कीं, देवासुरांत उत्तरोत्तर अतोनात कलह वाढत चालला. असुर हे शैवमतानुयायी होते. कैलासवासी शिवरचित तंत्रग्रंथांप्रमाणें ते वागत असत. एके काळीं चीनदेशस्थ असुर त्रिविष्टप-तिबेट-देशीं आले. त्यांनीं कैलासवासी श्रीशिवाची अनन्यभावें भक्ति केली. त्या योगानें श्रीशिव सुप्रसन्न झाले. इच्छित वरदान मागण्याची त्यांस त्यांनीं आज्ञा केली. अशी शिवाची आज्ञा होतांच ते असुर ह्मणाले " हे महादेव ! देवलोकांतील शिल्पी विश्वकर्म्यानें देवांस विमानें करून दिलीं आहेत, त्यांत बसून ते तिन्ही लोकीं भ्रमण करितात. त्या अपूर्व साधनामुळें ते आमचा सहज पराभव करित असतात. तरी, या दासांची इतकीच विनंति आहे कीं, सकुटुंब राहून अंतरिक्षांत पक्ष्यांप्रमाणें भ्रमण करणारीं सोन्यारुप्याचीं व लोखंडाचीं विमानरूपी त्रिपुरें, कृपा करून आपण आह्मांस द्यावीं. तीं त्रिपुरें आपणावांचून कोणासहि भेदितां न यावीं, असें वरदान असावें. त्यांत आह्मी सकुटुंब राहून तिन्ही लोकीं देवांशीं रणसंग्राम करून त्यांचा पराभव करूं."

भोळ्या शंकरानें ही त्यांची विनंति मान्य केली. असुरांचा शिल्पी जो मयासुर त्याच्या हातून तीन त्रिपुरें करवून असुरांस दिलीं. असुर त्यांत बसून तिन्ही लोकीं फिरूं लागले. देवांचा त्यांनीं अगदीं पराभव केला. विजयमदानें ते अतोनात उन्मत्त झाले. जागजागीं त्यांनीं

लोकांचा फार छळ मांडिला. देवांस मोठी भीति पडली. आपलें इंद्रपद असुर घेतील, अशी रात्रंदिवस चिंता लागली. त्रिपुरांचा लाभ होऊन देवांवर जय झाल्यामुळें ते अगदीं निरंकुश झाले, अधर्मी बनले, त्यांनीं नीतिमार्ग सोडला. विपुल संपत्ति व निरंकुश अधिकार प्राप्त झाल्यावर राजस व तामस वृत्तीचे लोक फारकरून दुराचारी बनावयाचे. या असुरांची तीच स्थिति झाली. ते मद्यपी व अभक्ष्याभक्ष्य करणारे झाले. शुद्धाचरणाचा त्यांच्यांत लोप झाला. ते पुरे हिंसक, मोठे जुलमी व अत्यंत अधर्मी बनले.

इंद्रादि देवांस मोठा विचार पडला. सर्व देवांची सभा जमली. श्रीविष्णु त्यांत प्रमुखस्थानीं विराजमान झाले. प्रबल झालेल्या असुरांचा पराभव करण्याला काय युक्ति योजावी, याचा त्यांनीं फार खल केला. असुरांस प्राप्त झालेल्या त्रिपुरांचा नाश शंकराच्या हातून कसा करवावा, श्रीशिवाची इतराजी त्यांच्यांवर कोणत्या रीतीनें होईल, वगैरे गोष्टींचा विचार चालला असतां देवाचार्य बृहस्पतींनीं अशी एक युक्ति काढली कीं, ती सर्व देवांस पसंत पडली.

शिवाची असुरांवर अगदीं अवकृपा होऊन त्यांनीं त्यांचा संहार करावा, अशा हेतूनें या देवाचार्यांनीं चार्वाकमत उत्पन्न करून तें त्या उन्मत्त असुरांस शिकविण्याची खटपट चालविली. हे महर्षि स्वतः चार्वाक बनले, व दुसरे बरेच यति यांनीं तयार केले. त्यांनीं अहिंसाधर्माचें प्रतिपादन करून वेदविरुद्ध निरीश्वरवादाच्या कुतर्काचा उपदेश त्या उन्मत्त व दुराचारी बनत चाललेल्या असुरांत चालविला. त्यांचा हा देहात्मवादाचा उपदेश त्या असुरांनां फार मानवला. “ देह हाच आत्मा आहे. अन्नब्रह्मापासूनच हें शरीर बनलें आहे, ह्मणून देहच ब्रह्म आहे. दयाळू मनुष्यानें कोणत्याहि प्राण्याच्या देहाचा नाश करणें हें महापाप आहे. जो कोणी या देहरूपी आत्म्याचें हनन करितो, त्याला या जन्मीं अनेक दुखें भोगावीं लागतात. वेदांत जो पुत्रात्म्याचा वाद आहे, तो या देहात्मवादापासून भिन्न नाहीं. देह हा अन्नमय

कोश आहे. यालाच वेदांत ब्रह्म ह्मटलें आहे. देहरूपी आत्म्याचा विधिपूर्वक वध करणें हें अत्यंत निंद्य आहे, महापाप आहे. वेदांत व तंत्रग्रंथांत जीं विधियुक्त हिंसाकर्में करण्याचें लिहिलें आहे तीं सर्व क्रूर कर्में आहेत. निर्दय, क्रूर, दुष्ट, व अधम कर्में करविणारे आचार्य किती अविचारी व हिंसक असावे ? दिव्यापासूनच दिवा उत्पन्न होतो; अंधकारापासून तो कसा उत्पन्न होईल ? तसा दयेनेंच धर्म होतो, तो हिंसेनें कसा होईल? हिंसेनें पाप मात्र घडतें. प्रत्यक्ष देहरूपी आत्म्याचा वध करून अप्रत्यक्ष देवपितरांचें यजन करणें ह्मणजे केवळ गंगेचा शुद्ध प्रवाह सोडून शुष्क सरोवराची इच्छा करण्यासारखें आहे. जो देह एकदा गेला तो पुनः येत नाहीं; मग मेलेल्या देहाच्या नांवानें श्राद्ध केल्यानें तें त्यास कसें पोहोंचेल ? जीवंत प्राण्याच्या नांवानें आपण भोजन केलें असतां जर तें त्याला पोहोंचत नाहीं, तर मेल्यावर तें त्याला कसें पोहोंचेल ? नुसत्या ब्राह्मणाचा वध घडला असतां ब्रह्महत्या होत नाहीं. तर सर्व देहधारी प्राण्यांपैकीं कोणत्याहि जीवाचा वध केल्यास तिला ब्रह्महत्या ह्मणावें. ”

वरील आशयाच्या उपदेशाचा ठसा त्या असुरांच्या मनावर फार त्वरित उमटला. परंतु, त्यांतील एका असुरानें एके वेळीं एका चार्वाक यतीची परीक्षा पहाण्याकरितां मेलेल्या कुत्र्याचा एक शुष्क अस्थि पंजर आणून तो त्या यतीच्या मस्तकावर ठेविला व ह्मटलें “ हें तुमचें ब्रह्म! ”

हें पाहून त्या यतीला फार राग आला. त्यानें त्याचा निषेध केला व ह्मणाला “ हे असुरा ! तूं किती अज्ञानी आहेस ? या मृत देहाला तूं कसा स्पर्श केलास ? ”

हें ऐकून त्या शंकित असुरानें पुनः प्रश्न केला “ यतिमहाराज ! जर आपण देहालाच ब्रह्म ह्मणतां तर हें कुत्र्याचें शव अपवित्र कसें होईल ? ”

यति ह्मणाला “ मृत देह ब्रह्म नाहीं. तो चैतन्यविशिष्ट असतो, तेंव्हांच त्यांत ब्रह्म असतें. ”

यतीच्या या उत्तरानें त्या असुराचें समाधान झालें नाहीं. त्यानें त्या कुत्र्याच्या अस्थिपंजरांतून शिराचा भाग घेऊन तो त्या यतीच्या तोंडास लाविला. त्यामुळें यति त्यावर फार रागावला व " हे दुष्ट असुरा! हें अपवित्र मृत शवाचें तोंड माझ्या तोंडास लावून मला भ्रष्टविलेंस काय ? " असें त्याला त्यानें ह्मटलें.

त्यावर त्या असुरानें उत्तर दिलें " जिवंत शरीर जर पवित्र ब्रह्म आहे, तर त्यांत अपवित्रता कशी व कोठून आली ? "

हें ऐकून तो चार्वाक यति अगदीं कुंठित झाला! परंतु त्यानें त्या शंकित असुराचें समाधान करण्यासाठीं दुसऱ्या यतींस बोलावून आणलें. त्यांपैकीं एका यतीनें त्या असुराचें असें समाधान केलें " हे असुरा ! शरीरांत जो प्राण आहे तोच शरीराचें चलनवलन करितो, त्याला प्राणमय कोश ह्मणतात, तेंच शुद्ध ब्रह्म आहे. शरीर हें स्थूल आहे. ह्मणून तें शुद्ध ब्रह्म नाहीं. "

यानेंहि त्या असुराचें समाधान झालें नाहीं. त्यानें त्या यतीच्या मुखांत फुंक मारिली. यति त्यावर अतिशयित रागावला व ह्मणाला " हे दुष्ट असुरा ! माझ्या मुखांत तूं हा अपवित्र श्वास कां सोडिलास ?"

असुर ह्मणाला " प्राणवायु जर शुद्ध ब्रह्म आहे, तर तें अपवित्र कसें होईल ? "

हें ऐकून यति अगदीं निरुत्तर झाला. पण, जवळच एक दुसरा चार्वाक यति बसला होता, त्यानें त्यास असें उत्तर दिलें " असुरा ! प्राणमय कोश शुद्ध ब्रह्म नाहीं. याहून शुद्ध ब्रह्म वेगळें आहे. देहांत जो मनोमय कोश आहे, तेंच शुद्ध ब्रह्म आहे. "

त्यावरहि त्या तार्किक असुरानें असें उत्तर दिलें कीं " निद्रेंत मनाचा लय होत असतो. "

हें ऐकून या यतीचीहि मति कुंठित झाली. नंतर चौथा यति पुढें होऊन ह्मणाला " बुद्धिमय कोश हेंच शुद्ध ब्रह्म आहे. "

त्याचेंहि त्या असुरानें खंडन केलें तो ह्मणाला " बुद्धिहि निद्रेंत लय पावते. "

तोहि बापडा निरुत्तर झाला. शेवटीं पांचवा यति पुढें सरसावला. तो ह्मणाला " हे तार्किक असुरा ! देहांत जो आनंदमय कोश आहे तेंच शुद्ध ब्रह्म. निद्रेंतहि आनंद आहे. कारण, मी आज आनंदांत निजलों होतों, असा अनुभव सर्वांस होत असतो. "

हें मत मात्र त्या असुरास मान्य झालें.

याप्रमाणें चार्वाकप्रणित मतांचा त्या असुरांनीं स्वीकार केला. ते पुरे नास्तिक बनले. शैवमताचा त्यांनीं त्याग केला. असूर पूर्ण नास्तिक झालेले पाहून श्रीशिवाला पराकाष्ठेचा राग आला. श्रीशिवानें त्यांचा संहार करून त्यांस दिलेल्या त्रिपुरांचाहि नाश केला. यामुळेंच शिवाला 'त्रिपूरहर' असें नांव पडलें. याच चार्वाकमतापासून पुढें बौद्धमत उत्पन्न झालें.

अशा युक्तीनें प्रबल झालेल्या असुरांचा पराभव करविल्यामुळें बृहस्पतीची प्रतिष्ठा देवांत फारच वाढली. सर्व देव एकत्र जमून त्यांनीं या सुरगुरूंचें अभिनंदन केलें.

हे देवाचार्य मोठे ज्योतिषी होते. खगोलशास्त्राचें यांनीं फार मार्मिकपणें अवलोकन केलें होतें. यांनीं नवीन ग्रह शोधून काढिला व त्याला आपलेंच नांव दिलें. अझूनपर्यंत 'गुरु' किंवा 'बृहस्पति' हेंच नांव या ग्रहाचें अव्याहत चालू आहे. यांचें नांव चिरकाल रहावें ह्मणून देवांनीं सात वारांपैकीं एका वाराला 'बृहस्पतवार' किंवा 'गुरुवार' असें नांव दिलें. तेंच नांव अझून चालत आहे.

हे देवांचें मुख्य आचार्य होते. इतकेंच नाहीं, तर धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चाऱ्ही पुरुषार्थांच्या सिद्धीसाठीं हे निस्वार्थवृत्तीनें रात्रंदिवस मनापासून झटत असत. यांचें आचरण अत्यंत शुद्ध असून यांचा ज्ञानाचा व्यासंग फार मोठा होता. नवीन तर्क, नवीन शोध, नवीन सिद्धांत काढून त्यांचा सर्वांस लाभ व्हावा, अशी यांना फार इच्छा असे.

हे महाबुद्धिमान् असून अति नम्र व फार साधे होते. सत्याचा कायतो यांना अभिमान. राजनीतींतील साम, दाम, दंड भेदाप्रमाणें जरी हे शत्रूंशीं वागत होते, तरी यांची मूळ वृत्ति पूर्ण सात्विक होती. यांनीं आपलें अवघें आयुष्य शिक्षण देण्यांत व तत्वचिंतनांत घालविलें.

या देवाचार्यांच्या चरित्रांतील अतिशयोक्तीचा त्याग करून सत्य गोष्टींचा विचार केला असतां हे महर्षि स्वपराक्रमानें केवढ्या थोर पदाला जाऊन पोहोंचलें, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. देवांसारख्यांचें मुख्य ‘ सुरगुरुत्व ’ मिळवणें व आपलें नांव अमर करून ठेवणें किती महत्त्वाचें आहे ! गुणकर्मस्वभावानुसार मनुष्य कसकसा थोर पदाला पावतो, हें जर आमचे सध्याचे भूदेव लक्ष्यांत आणतील, तर या महर्षीसारख्या गुरूंची आमच्या देशांत किती उणीव आहे, हें त्यांना खचित समजून येईल. सुरगुरूंसारखीं महर्षिरत्नें आमच्या देशांत पुनः निपजोत व आमचें मानासिक दैन्य दूर करोत, एवढेंच परमेशापाशीं मागणें आहे.

# महर्षि कपिल.

या परम तत्वज्ञ महर्षींच्या वडिलांचें नांव महर्षि कर्दममुनि असें होतें. यांची आई देवहूति. ही स्वयंभू मनु महामुनींची कन्या. यांचें जन्मस्थान पुष्करतीर्थ. श्री विष्णूचे चोवीस अवतार मानिले आहेत; त्यांपैकीं महार्षि कपिलमुनि हे एक होत. श्रीविष्णूचा हा पांचवा अवतार. देवकोटींतील 'सिद्धांत' यांची गणना केली आहे. हे कोणत्या युगांत व केव्हां जन्मले, याचा निश्चयात्मक निर्णय करितां येत नाहीं. परंतु, यांचें जन्म केवळ परोपकारार्थ झालें होतें. बाळपणापासूनच 'हे विलक्षण बुद्धिमान् होतील' असें यांच्या गुरूंनीं भविष्य वर्तविलें होतें. पाठशाळेंत हे गुरुजींचे फार आवडते शिष्य होते. गुरुसेवा, गुर्वाज्ञा मनापासून पालन करणें व लक्ष्यपूर्वक अध्ययन करणें हे जे चांगल्या शिष्याचे मुख्य धर्म, ते या महर्षींच्या अंगीं मूर्तिमंत वसत होते. मूळचेच बुद्धिमान् असून उत्तम गुरुजींचा सुशिक्षासंस्कार मिळाल्यामुळें कपिलमुनींची बुद्धिमत्ता लोकोत्तर कां न व्हावी? आमरण कडकडीत ब्रह्मचर्यव्रताचरण करून मिळविलेल्या ज्ञानधनाचा मनुष्यमात्रास लाभ करून द्यावा असा यांनीं दृढसंकल्प केला. गुरुगृहीं सांगोपांग वेदशास्त्रांचें अध्ययन करून हे महार्षि गृहस्थाश्रमी न होतां संपादिलेल्या ज्ञानाचा देशभर उपदेश करूं लागले. हे मोठे तार्किक व विलक्षण कल्पक होते. त्या काळच्या स्थूल, सूक्ष्म, जड, चैतन्य पदार्थशास्त्राचा त्यांनीं अत्युत्कृष्ट अभ्यास केला होता. या विषयाचा त्यांनीं फार बारकाईनें शोध करून त्यावर एक सूत्रग्रंथ रचिला. त्यांत पुरुष व प्रकृति या उभय तत्त्वांचें फारच मार्मिक विवेचन केलें आहे. यालाच सांख्यदर्शन, सांख्ययोग किंवा सांख्यशास्त्र ह्मणतात. व्याकरणशास्त्रांत जसे पाणिनी किंवा योगशास्त्रांत जसे महर्षि पतंजली, तसे हे महार्षि सांख्यशास्त्रांत अत्यंत प्रवीण होऊन गेले आहेत.

या अत्यंत उपयुक्त शास्त्राचा प्रसार करण्यासाठीं हे महर्षि देशोदेशीं हिंडत होते. जागजागीं विद्वानांच्या मोठमोठ्या सभा भरवून तेथें हे महर्षि आपल्या सांख्यदर्शनाच्या सिद्धांतांचें प्रतिपादन करित असत. त्यावर कोणीं शंका काढली असतां हे शांतवृत्तीनें युक्तिप्रमाण-पूर्वक त्याचें समाधान करीत. यांचा सांख्यसिद्धांत असा आहे कीं " ब्रह्मविद्या ही आत्मनिष्ठ योगिपुरुषाच्या श्रेयाचें मुख्य साधन आहे. सुखदुःखाची निवृत्ति यानेंच होत असते. जीवाच्या बंधमोक्षाचें कारण चित्तच आहे. विषयादिकांत तें आसक्त झालें असतां जीवाला बंधन प्राप्त होतें. त्रिविध तापांची अत्यंत निवृत्ति केल्यानें व प्रकृति पुरुषाचें यथार्थ ज्ञान होऊन ब्रह्माच्या ठिकाणीं संलग्न झाल्यानें मोक्ष प्राप्त होतो. शरीरांतील आकाशादि तत्वांच्या स्वरूपाचें खरें ज्ञान होऊन प्राणापानादि स्थिर केल्यानें असंग चैतन्यरूप आत्मा ( परमेश्वर ) आपल्या स्वयंभू प्रकाशमान् ज्योतीच्या योगानें भासमान होतो, तेव्हांच या देहरूपी सर्व इंद्रियांचा व्यवहार क्षणिक व नश्वर आहे असें वाटूं लागतें. "

कपिलमुनींनीं जडाजडांचा चौकसपणें शोध करून चोवीस तत्वें सिद्ध केलीं आहेत. त्यांच्या यथार्थ ज्ञानानें मनुष्य मोक्षपदास पात्र होतो. " आत्मा ज्ञानमय, पुरुष चैतन्य आहे. तो केवळ अकर्ता साक्षी आहे. सृष्टि हें कार्य आहे. ती त्रिगुणात्मक प्रकृतीच्या विकृतींनीं बनली आहे. प्रकृति जड आहे. ती सृष्टीचें उपादान कारण आहे. पुरुष निमित्त कारण तो स्वयंभु, चैतन्यमय, साक्षी, अलिप्त, आहे. दोहींचा व्याप्य-व्यापक संबंध आहे. प्रकृतीचें रूपांतर होतें, पुरुषाचें तसें होत नाहीं. ह्मणून तो अविकृत. पुरुषाच्या निमित्तसंबंधानेंच प्रकृति स्वतः गतिरूप बनते. प्रकृतींचीं कांहीं कर्में आपलीं समजून मोहानें जीवात्मा बंधन पावतो. सुखदुःखें भोगतो. शुभाशुभ कर्में करून जन्मजन्मांतर घेत असतो. या जन्मरूपी रोगाला दूर करण्यासाठींच सूक्ष्म ( लिंग ) देहाचा संबंध साफ सोडतांच जीवात्मा मोक्ष पावतो. अनेक जातींचीं

सुखदुःखें हे प्रकृतीचेच धर्म आहेत. असें समजून आपण अकर्ता असें आत्म्याला यथार्थज्ञान होतें, व तेव्हांच त्याला मोक्षाचा लाभ होतो. आत्म्याच्या यथार्थ ज्ञानानेंच प्रकृतीच्या मोहाचा लय होतो. अर्थात्, प्रकृतीच्या बंधनाचा नाश होऊन शुद्ध चैतन्यच शेवटीं रहाते, व तेव्हांच मोक्ष होतो."

अशा आशयाचा या महर्षि कपिलाचार्यांचा सांख्ययोग आहे. सांख्ययोगाची प्रवृत्ति त्या कालीं विशेष झालेली दिसते. सांख्यशास्त्र अत्यंत तर्कमय व प्रमाणयुक्त आहे. गीतेंत श्रीकृष्णांनीं किंवा व्यासांनीं सांख्ययोगाला विशेष महत्त्व दिलें आहे. गीतेच्या दुसऱ्या अध्यायांत सांख्ययोगाच्याच आशयाचें निरूपण केलें आहे. यावरून सांख्यशास्त्राचें अध्ययन आमच्या देशांत पुरातन कालापासून चालत होतें. महर्षि कपिलमुनिप्रणीत सांख्यशास्त्राचें सार्थ अध्ययन करणाराला गीतेच्या दुसऱ्या अध्यायांतील सांख्ययोगाचें रहस्य अति उत्तम समजेल. शरपंजरीं पडलेल्या या अत्यंत उपयुक्त शास्त्राचें पठनपाठन पूर्ववत् होऊं लागल्यास पुरुष, प्रकृति व जीव, या तीन जडाजडत्वांचें खरें ज्ञान होऊन शुद्ध, पवित्र, एक, अद्वितीय, ज्ञानमय, परब्रह्माचें शुद्ध ज्ञान मनुष्यास होईल.

महर्षि कपिलमुनि निस्सीम मातृभक्त होते. हे आपल्या आईची नित्य सेवा करित असत. आपला मुलगा अलौकिक बुद्धिमान्, दृढ निश्चयी, सुशील, धार्मिक, परमदयाळू व महापरोपकारी पाहून, देवहुतीस अतोनात आनंद होत असे. अल्प वयांत आपल्या मुलानें मोठी सुकीर्ति मिळविली; त्याची अवतारी पुरुषांत गणना झाली; त्याची जागजागीं देवासारखी पूजा ( सत्कार ) होऊं लागली; ऋषि, महर्षि, देव त्याची मनापासून तारीफ करूं लागले; हें सर्व ऐकून, देवानें योग्य पुत्ररत्न दिलें झणून तिचें मन कृतज्ञतेनें भरून यावें. आपल्या पुत्राचा सांख्ययोग ती मोठ्या आवडीनें ऐकत असे. या उत्तम शास्त्राच्या श्रवणानें तिची चित्तवृत्ति प्रकाशमय झाली. जडाजडाचें ज्ञान तिला यथार्थ

झालें. तात्त्विक विचाराकडे तिचें मन सहज वळलें. श्रवणाभ्यासानें व जडनश्वरवस्तूविषयीं साहजिक वैराग्य उत्पन्न होऊन मोक्षप्राप्तीची तिला अत्यंत आस्था उत्पन्न झाली. आपल्या आईस मोक्षप्राप्तीची इच्छा झाल्याचें पाहून कपिलमुनींस फार आनंद झाला. योगेश्वर, भक्तीनें व एकाग्रतेनें ज्या पवित्रस्थलीं बसून ब्रह्मानंदाचा अनुभव घेत आहेत, त्या सरस्वतीक्षेत्रीं त्यांनीं आपल्या आईस ब्रह्मविद्येचा उपदेश केला. सांख्ययोगाच्या श्रवणज्ञानानें देवहुतीचें मन आधींच शुद्ध झालें होतें; खरी वैराग्यवृत्ति तिच्या अंगीं आली होती; तेव्हां ब्रह्मविद्येचा बोध तिच्या त्या पवित्र, शुद्ध, वैराग्यशील मनावर कायमचा कसा उमटणार नाहीं? ती मोठी ब्रह्मवादिनी झाली. या ठिकाणीं कपिलमुनींचा एक आश्रम आहे.

तेथून ते उत्तरभागीं गेले. तेथें त्यांनीं आपल्या सांख्यमताचा उपदेश मोठ्या कळकळीनें केला. शेंकडों लोक त्यांचे अनुयायी झाले. उपदेश करित करित ते गंगासागर येथें आले. त्याजागीं त्यांचा फारच सत्कार झाला. तेथील समुद्रदेवानें त्यांचें सादर पूजन केलें. योगाभ्यासाला हें स्थल उत्तम आहे अशी त्यांची पक्की खात्री झाल्यावरून ते तेथें राहिले. त्यांनीं तेथें अष्टांगयोगाचें साधन केलें. त्यामुळें त्यांचें ज्ञानबल अतोनात वाढलें. तेथेंच त्यांनीं मुख्य आश्रम स्थापन केला. अझूनहि बंगाल्यांत तें स्थल कायम आहे. कपिलमुनींसारखे महर्षि जरी सध्या तेथें कोणी नाहींत, तरी प्रतिवर्षी हजारों लोक त्या आश्रमाच्या नुसत्या दर्शनासाठीं जात असतात.

महर्षि कपिल हे महायोगी होते. त्यांची योगशक्ति फार उग्र होती. सगर राजानें सांगोपांग ९९९ यज्ञ निर्विघ्नपणें केले. पण शेवटच्या अश्वमेधयज्ञाच्या वेळीं इंद्रास भय उत्पन्न होऊन त्यानें सगर राजानें पृथ्वी जिंकण्यासाठीं पाठविलेला अश्व हळूच चोरून तो पाताळलोकीं कपिलमुनींच्या आश्रमांत त्यांच्या पाठीमागें नेऊन बांधिला. कपिलाचार्य समाधिस्थ असल्यामुळें त्यांनां तें समजलें नाहीं.

त्या अश्वाचें रक्षण करणाऱ्या सगर राजाच्या वीस हजार पुत्रांनीं अश्वाचा जागजागीं फार शोध केला. पण त्याचा कोठें पत्ता मिळेना. शेवटीं ते अगदीं हताश होऊन बापाजवळ परत आले. सगरनें पाताळलोकीं त्या अश्वाचा शोध करण्याची त्यांनां आज्ञा दिली. आज्ञेप्रमाणें पाताळलोकीं शोध करित असतां तो घोडा कपिलाश्रमीं बांधलेला त्यांनीं पाहिला. ते सर्व एकदम आवेशांत आले. अविचाराची छाया त्यांच्यावर पूर्ण पडली. आपला अश्व याच मुनीनें बांधला असावा अशी त्यांची समजूत झाली. उन्मत्तपणानें त्यांनीं एकदाच सिंहनाद करून " हे मुने! हा घोडा आमचा आहे, तो तूं सोडून दे! " इतकें ह्मणून ते त्याला चोर समजून मारूं लागले. कपिलमुनींच्या समाधीचा भंग झाला. नेत्र उघडून त्यांनीं त्यांच्याकडे पाहिलें मात्र—नेत्रांतील क्रोधाग्नीनें ते सर्व भस्म झाले. हें अनिष्ट वर्तमान सगर राजास कळविण्यासाठीं एकहि जिवंत राहिला नाहीं. पुष्कळ काळ लोटला. पुत्रांचा व त्या घोड्याचा पत्ता नाहीं. ह्मणून सगर राजानें आपल्या अंशुमान नांवाच्या नातवाला त्यांचा शोध करण्याला धाडलें. शोध करित तो कपिलाश्रमीं आला. त्यानें परम विनयानें मुनींचें वंदन व पूजन केलें. 'हा अश्व आमचा आहे' असें मुनींस त्यानें मोठ्या नम्रतेनें कळविलें. कपिलमुनींनीं झालेला खरा प्रकार त्याला सांगून तो अश्व त्याच्या स्वाधीन केला, व " भस्म झालेले हे तुझे सर्व चुलते गंगेचा प्रवाह येथें आणल्यानें पावन होतील, " असेंहि त्याला सुचविलें.

या महर्षींचें सगळें आयुष्य तत्त्वविचारांत, त्याचा अनुभव घेण्यांत व त्याचा उदारवृत्तीनें प्रसार करण्यांत गेलें. हे महर्षि केव्हां व कोठें समाधिस्थ झाले, याचा शोध लागत नाहीं.

या महर्षिरत्नाच्या चरित्रांतील अतिशयोक्ति वजा करतां त्यांतील सार वाचकांचें अंशतःतरी हित करील, अशी आशा आहे. आमचे महर्षि कित्येक आधुनिक विद्वानांसारखे नवीन शोध, नवीन तर्क, नवीन सिद्धांत व नवीन तत्त्वविचार, निःस्वार्थबुद्धीनें झटून लोकांनां

कसे सांगत होते, हें या चरित्रावरून शिकण्याजोगें नाहीं काय ? पुरुषप्रकृतितत्त्वांच्यासंबंधानें कपिलमुनींनीं जो शोध केला आहे व त्यासंबंधानें त्यांनीं जीं अप्रतिम सूत्रें रचलीं आहेत, त्यांचें जर आह्मीं लक्ष्य लावून अध्ययन केलें, तर या चरित्रनायकांनीं ज्ञानमार्ग सुलभ करण्यासाठीं किती अविश्रांत श्रम केले आहेत हें कळून आमच्या ज्ञानांत अधिक भर पडेल. महर्षि कपिलदेव स्वर्गस्थ होऊन हजारों वर्षें जरी झालीं, तरी त्यांचें सांख्यशास्त्र या लोकीं अमरच आहे. तें एकदा आमच्या अवलोकनांत आलें कीं हें महर्षिरत्न ज्ञानरूपानें मूर्तिमंत आमच्यापुढें उभें आहे असें वाटतें. वाचकहो ! "त्रिविधदुःखात्यन्तनिवृत्तिरत्यन्तपुरुषार्थः" हें सांख्यवचन किती सत्य आहे, हें पूर्णपणें जाणून घेण्यास इच्छित असाल, तर काव्यनाटकादिकांनां क्षणभर बाजूला ठेवून सांख्यशास्त्राचें निदान एकदा तरी अवलोकन करा. शेवटीं परमेश्वर, माझ्या पवित्र देशांत पुनः प्रतिसांख्यशास्त्रकारांसारखीं महर्षिरत्नें निर्माण करो, अशी त्याची अनन्यभावें प्रार्थना करितों.

# महर्षि गौतम.

ब्रह्मदेवाचे मानसपुत्र जे अंगिराऋषि, त्यांचे हे पौत्र होत. यांचें जन्म त्रेतायुगाच्या आरंभीं झालें. यांचे वडील दीर्घतमाऋषि. ते हिमालयावर रहात असत. गौतममहर्षि तेथेंच जन्मले. जन्मतःच यांची बुद्धि अत्यंत तीव्र होती. व्रतबंधसंस्कार झाल्यावर वेदवेदांगांचें सार्थ अध्ययन करण्यासाठीं हे गुरुगृहीं गेले. मूळचेच विलक्षण बुद्धिमान् असल्यामुळें गुरुगृहीं यांनीं वेदशास्त्राचें सार्थ अध्ययन फार लवकर संपविलें. पूर्ण ब्रह्मचर्य व स्थूलसूक्ष्मजडाजड पदार्थांचें यथार्थ ज्ञान प्राप्त झाल्यामुळें हे महातेजस्वी, परम विद्वान्, तत्वज्ञ, तपोनिष्ठ, अचाट बुद्धिमान, उत्साही, निश्चयी, सत्यप्रिय, मार्मिक व अत्यंत न्यायदर्शी निपजले. बीजवत् निरूपण केलेल्या वेदांतील ज्ञानाच्या आधारानें नवीन शोध करून तो लोकांस कळविण्याची आवड या महर्षींनां अतोनात होती. यांनीं त्या काळच्या शास्त्रीय ग्रंथांचें सांगोपांग अध्ययन करून आपली बुद्धि इतकी तत्वदर्शी बनविली होती कीं, तिच्या साधनानें न्यायासारख्या अत्यंत कठीण विषयांवर करवला तितका शोध करून न्याय, तर्क, रसायन, पदार्थज्ञानविज्ञानादिकांच्या मूलतत्वांचे सिद्धांत व नियम यांनीं शोधून काढिले. या अपूर्व शोधामुळें यांची त्या काळच्या महर्षि व विद्वन्मंडळांत फार वाहवा झाली, व सप्तऋषिमंडळांतील एका पदास हे पात्र झाले. त्या काळच्या तत्वज्ञांत हे लवकरच अग्रेसर झाले.

अनुरूप अशाच पत्नीचा यांनां लाभ झाला होता. तिचें नांव अहिल्या. ती फारच रूपवान् व परम सुशील स्त्री होती. आपल्या पतीवर तिचें अतोनात प्रेम होतें. तिच्या अनुपम लावण्यास भुलून इंद्रादि देवांनीं तिच्याशीं लग्न करण्याचा पुष्कळ यत्न केला; पण तो फुकट गेला. ब्रह्मदेवानें तिचें स्वयंवर करण्याचा निश्चय केला

व स्वयंवराची सर्व तयारी केली. अहिल्येसारख्या लावण्यलतिकेला वरण्यासाठीं त्या वेळच्या रीतीप्रमाणें देव, दानव व मानव हे स्वयंवर मंडपांत येऊन बसले. त्यांतून आपल्या रूपगुणस्वभावाला अनुरूप अशा महर्षि गौतमांसच तिनें पसंत केलें. अहिल्येनें गौतममुनींशीं लग्न केल्यामुळें इंद्रास फार वाईट वाटलें. तो गौतमाचा द्वेष करूं लागला. अहिल्येची त्याला फार इच्छा झाली. आपली नीच कामवासना तृप्त करण्याचा त्यानें निश्चय केला. परंतु अहिल्या ही महासती होती. तिचें तें कडकडित पातिव्रत्य भंग करण्याची इंद्रास उघड छाती होईना. तेव्हां त्यानें कपटरूपानें तिचें सतीत्व भंग करण्याचा बेत केला. पंडिता, सुशीला, सहधर्मचारिणी आपल्या प्राणतुल्य पतीस धर्मार्थकामांत फार मदत करित असे. अशा सुशील, सुशिक्षित व सुरूप धर्मपत्नीच्या सहवासानें महर्षि गौतम आपल्या आश्रमांत प्रतिस्वर्गसुख भोगित होते.

पण इंद्रास तें सहन झालें नाहीं. त्याची ती नीच कामवासना त्याला चैन पडूं देईना. ती इतकी अनावर झाली कीं, त्यानें आपलें नंदनवन सोडलें. तो गुप्त रूपानें गौतमाश्रमीं आला. पण महर्षि गौतम आश्रमांत असल्यामुळें त्याचा अगदीं निरुपाय झाला. तरी तो आहिल्येला भ्रष्ट करण्याची वाट पहातच होता.

एके दिवशीं गौतममुनी कांहीं महत्त्वाच्या कामासाठीं बाहेर गेले होते. ही वेळ आपली अमंगळ वासना पुरी करण्याला बरी आहे असें पाहून इंद्रानें गौतमाचें रूप धारण केलें. हें कपटरूप सती अहिल्या देवीच्या लक्ष्यांत आलें नाहीं. कपटवेषानें इंद्र त्या सतीचें पातिव्रत्य भंग करित असतां गौतममुनी तितक्यांत तेथें आले. इंद्राचें हें नीच वर्तन पाहून त्यांनां अत्यंत कोप चढला. "तुला सहस्र भगें पडतील व तूं नपुंसक होशील!" असा त्यांनीं इंद्रास शाप दिला. आहिल्यादेवीनें झालेला खरा प्रकार आपल्या पतीस कळविला; पण त्यापासून महर्षि गौतमांचें समाधान झालें नाहीं. त्यांनीं तिलाहि "तूं जडशिला होशील!" असा शाप दिला. त्याप्रमाणें ती भोळी अहिल्या जडशिला झाली.

मुनिवर्य अत्यंत उदास झाले. त्यांनीं आश्रमाचा त्याग केला. ते हिमालयावर गेले. तेथें एकांत जागीं बसून त्यांनीं योगाध्ययन आरंभिलें. कांहीं काळानें श्रीरामचंद्र व महर्षि विश्वामित्र यांची त्यांनां भेट झाली. श्रीरामांनीं अहिल्यादेवीचें जडत्व दूर केलें. महर्षि विश्वामित्रांनीं अहिल्यादेवी ही निर्दोष आहे अशी गौतममहर्षींची खात्री केली. अहिल्यादेवी निष्कलंक जाणून महर्षि गौतमांनीं तिचा पुनः स्वीकार केला.

या महर्षींचे एकंदर आश्रम चार झाले. पहिला प्रयागाजवळ; दुसरा मिथिल देशांतील एका अरण्यांत; तिसरा हिमालयावर, व चौथा पुनः स्वपत्नीचा अंगिकार केल्यावर वरुणकाननांत. वरुणकाननांत हे शेवटपर्यंत होते. त्यांच्या आश्रमाला गौतमाश्रम असें ह्मणतात. तेंच नांव अझूनपर्यंत चालू आहे. शिवाय त्याला गौतमतीर्थ असेंहि ह्मणतात. तेथें त्यांची एक पाठशाला होती. शेंकडों विद्यार्थी तेथें जाऊन न्यायशास्त्र शिकत असत. त्यांत कनायन व निवाळी हे त्यांचे पट्टशिष्य होते. न्यायशास्त्रांत ते फार प्रवीण असत. या महर्षींची शिक्षणपद्धति फार सोपी असे. न्यायासारखा अवघड विषय ते आपल्या शिष्यांनां अत्यंत सुलभ रीतीनें समजून देत असत.

त्यांच्या पुत्रांचीं नांवें शतानंद व चिरकारी. कन्येचें नांव अंजनी. शतानंद हा बापासारखाच विद्वान् व सुशील निपजला. मिथिला नगरीच्या त्या काळच्या जनक राजानें शतानंदाची विद्वत्ता व सुशीलता पाहून मोठ्या आदरानें त्याला आपल्या येथें बोलाविलें. योग्य सत्कार करून आपल्या कुळाचें पौरोहित्य त्याला दिलें. यांनां पुराणी असेंहि ह्मणतात. द्वितीय पुत्र जो चिरकारी तोहि महापंडित व यथार्थद्रष्टा निपजला. महर्षिमंडळांत त्याची मानमान्यता फार वाढली होती. अंजनी ह या महर्षींचें कन्यारत्न—खरोखरच हें एक रत्न होतें! अंजनी विदुषी, सती व परम दयाळू होती. हिच्याच पोटीं पूर्ण ब्रह्मचारी, वज्रदेही व निस्सीम रामभक्त मारुतिराय जन्मले.

ज्यांचीं आईबापें सुशील, धार्मिक, विद्वान्, सात्विक व तत्वदर्शी असतात, त्यांची संतति फार करून त्यांच्यासारखीच निपजावयाची!

महर्षि गौतम जसे उत्कृष्ट अध्यापक होते, तसेच ते उत्तम ग्रंथकार आणि शास्त्रकारहि होते त्यांनीं 'गौतमस्मृति' नांवाचा एक विस्तृत स्मृतिग्रंथ रचला आहे. स्मृतिप्रमाणांत याची मान्यता कमी नाहीं. यांनीं रचलेल्या इतर ग्रंथांपेक्षां 'न्यायदर्शना'च्या संबंधानें यांची ख्याति सर्वत्र झालेली आहे. न्यायदर्शन किंवा न्यायविद्या ही सर्व विद्यांचें प्रदीप्त स्वरूप आहे. ऐहिक, पारलौकिक सर्व धर्मांचा मुख्य आश्रम किंवा पाया न्यायशास्त्र आहे.

न्यायदर्शनाचे पांच अध्याय आहेत. प्रत्येक अध्यायाचीं दोनदोन आन्हिकें असून प्रत्येक आन्हिकांत पुष्कळ प्रकरणें सूत्रोक्त वर्णिलीं आहेत. न्यायदर्शनांत जीवात्मा व परमात्मा यांचें यथार्थ निरूपण केलें आहे. परमेश्वराला भोगसाधनाचें शरीर, सुख, दुःख, द्वेषादि बंधनें नाहींत. तो केवळ सत्यज्ञान, शुभइच्छादिगुणयुक्त, सर्वशक्तिमान्, सकल चराचरांचा कर्ता आहे. सर्व शास्त्रांस न्यायशास्त्राची आवश्यकता आहे. सुराचार्य जे महर्षि बृहस्पति, यांनीं ह्मटलें आहे कीं, जो मनुष्य तर्कप्रमाणानुसार तात्पर्याचा नीट शोध करितो, तोच शास्त्राचें मर्म जाणून धर्माचा यथार्थ निर्णय करतो. न्यायदर्शनांत युक्तीचें मुख्य प्राधान्य मानिलें आहे. युक्तीच्या अत्यंत चिंतनानेंच मनुष्याची बुद्धि तीव्र झाल्यानें मनन करण्याची शक्ति वाढते; आत्म्याला परमात्म्याचें यथार्थ ज्ञान होऊन शेवटीं मोक्षपदाचा लाभ होतो.

विद्वानांच्या सभेंत हरएक विषयावर युक्तिप्रमाणयुक्त वादविवाद करण्याची रीति न्यायदर्शनांत फारच पद्धतशीर सांगितली आहे. न्यायदर्शनांतच तर्कशास्त्राचा समावेश करितां येतो. ज्या मूळ पदार्थांच्या परमाणूंच्या मिश्रणांनीं ही पृथ्वी बनली आहे, त्यांपैकीं प्रत्येक परमाणू नित्य व स्थायी आहे. त्याचा नाश होत नाहीं. ज्याचा

कधींच नाश होत नाहीं तेंच तत्व, व ह्मणूनच परमाणूंची तत्वांत गणना केली आहे; परंतु परमाणूंच्या मिश्रणानें उत्पन्न झालेला पदार्थ मात्र नित्य नाहीं. तो नाशवंत आहे. याप्रमाणें तत्वांची व्याख्या न्यायदर्शनांत या महर्षींनीं केली आहे. शिवाय, दुसऱ्या विविध विषयज्ञानाचाहि संक्षिप्त संग्रह या शास्त्रांत केला आहे. तत्वज्ञान हेंच आदिसृष्टीचें ईश्वरप्रणीत ज्ञान होय.

मोक्षप्राप्तीसाठीं मुमुक्षूस तत्वज्ञान अवश्य झालेंच पाहिजे. त्या ज्ञानानें दुःख, जन्म, प्रवृत्ति, दोष व मिथ्याज्ञान यांचा उत्तरोत्तर नाश होऊन मोक्षपदाचा लाभ होतो.

तत्वज्ञान कशानें होतें? याचा उलगडा न्यायदर्शनांत असा केला आहे कीं, प्रमाण, प्रमेय, संशय, प्रयोजन, दृष्टांत, सिद्धांत, अवयव, तर्क, निर्णय, वाद, जल्प, वितंडा, हेत्वाभास, छळ, जाति, निग्रहस्थान इतकीं तत्वें जाणल्यानें मुमुक्षु मोक्षपदप्राप्तीस पात्र होतो. या सोळा मुद्यांचें न्यायदर्शनांत विस्तारपूर्वक फार सुरेख निरूपण केलें आहे. तत्वज्ञानप्राप्तीचीं हीं मुख्य साधनें आहेत. न्यायानें तत्वांचें यथार्थ ज्ञान होतें; तत्वज्ञानानें अज्ञानाचा ऱ्हास होतो; दोषांची निवृत्ति होते; प्रवृत्तिमार्गाचा हळुहळू लोप होतो; प्रवृत्तीचा लोप झाल्यानें जन्म टळतो; जन्म टळल्यानें दुःखांची जी पूर्ण निवृत्ति तोच मोक्ष.

न्यायदर्शनांत नास्तिकमताचें व बौद्धजैनादिकांनीं मानिलेल्या मोक्षाचें अति उत्तम युक्तीनें खंडन करून खरा मोक्षमार्ग कोणता, याचें फार मार्मिक रीतीनें प्रतिपादन केलें आहे. त्यांत जगाचा कर्ता परमेश्वर आहे हें सिद्ध करून वेद ही त्याची वाणी कशी आहे हेंहि अनुमान व शब्दप्रमाणांनीं सिद्ध केलें आहे. सृष्टिशास्त्राचें यथार्थ ज्ञान होण्यासाठीं सृष्ट पदार्थांचें पृथक्करण कसें करावें, त्यांची उत्पत्ति कशी व केव्हां होत असते, त्याची स्थिति कोठवर असते व त्यांवरून तत्वज्ञानाचा बोध कसा होत असतो, वगैरे विषयांचेंहि बरेंच विवेचन

या दर्शनांत प्रसंगोपात झालेलें आहे. यावरून हे महर्षि सृष्टिशास्त्रांतहि बरेच प्रवीण असावेत, असें सहज अनुमान होतें.

जीव हाच आत्मा आहे. अज्ञानामुळेंच तो जीवरूप बनतो. ज्ञान व भक्तीच्या साधनांनीं तो शुद्ध होऊन परमात्म्याच्या ठायीं लीन होतो. आत्मा प्रकृतिरहित, स्वतंत्र, चैतन्यमय आहे. सारासारविचार करणें हा त्याचा मुख्य गुण. याच मूळतत्वापासून धर्माची उत्पत्ति. ही धर्मजिज्ञासा त्याच्यांत स्वाभाविकच आहे. हाच त्याचा पवित्र व स्वतंत्र गुण होय.

परमेश्वराविषयीं गौतम महर्षींचा असा सिद्धांत आहे कीं, कर्ता जो ईश्वर तो अनादि, स्वतंत्र, व्यापक असून त्यानें आपल्या अगाध निमित्तकारणरूपानें तत्वांचें नियमित संमीलन करून हें कार्यरूप जगत् बनविलें आहे. स्फुरणरूपी संकेतानें तो जीवाजवळून कर्में करवितो. कर्त्याच्याच कृपेनें यथार्थ ज्ञानाचा लाभ होतो. त्याच यथार्थ ज्ञानानें मोक्ष प्राप्त होतो. तो दृश्यादृश्य फळांचा दाता आहे. त्या कर्त्यावांचून दुसरें कांहींच श्रेष्ठ नाहीं. मोक्षकाळीं शरीर व जगत् हीं क्षणिक व नाशवंत असें सत्यज्ञान होऊन केवळ ज्ञानस्वरूप परमात्मा कायम शाश्वत रहातो. हेंच चैतन्यस्वरूप केवळ निराकार, ज्ञानगोचर आहे.

या महर्षींचें न्यायदर्शन, वरील महत्त्वाच्या विचारामुळें आर्यावर्तांत सर्वमान्य आहे. नदियाशांतिपुर, काशी, तैलंगणादि देशांत या शास्त्राच्या पाठशाळा अझूनपर्यंत चालू आहेत. गदाधरी, जांगदेशी, अनुमानचिंतामणी वगैरे न्यायदर्शनावर वात्स्यायनाचें विस्तृत भाष्य आहे. तें लक्ष्यपूर्वक वाचण्यासारखें आहे.

गोदावरीमहात्म्यांत या महर्षींच्या तपःप्रभावाचें वर्णन अतिशयोक्तीचें असल्यामुळें या त्रोटक चरित्रांत त्याचा उल्लेख करित नाहीं.

या महर्षींचे गोत्रज अझूनपर्यंत जागजागीं आहेत. यावरून यांचा वंशविस्तार बराच झाला असावा. हे महर्षि शेवटपर्यंत आपलें कर्तव्य

करित होते. ते प्रजापक्षाचे पूर्ण अभिमानी होते. लोककल्याणासाठीं ते फार झटत असत. सर्वांनीं न्यायानें वागावें, कोणीं कोणास गांजूं नये, हा त्यांचा मुख्य सिद्धांत होता. त्यामुळें ते त्या काळीं अत्यंत लोकप्रिय झाले होते. या रीतीनें हे महर्षि आपल्या स्वपराक्रमानें न्यायासारख्या अति गहन व उपयुक्त विषयांवरचें रात्रंदिवस चिंतन करून त्यांचे सत्य सिद्धांत ठरवून ते सर्वांस शिकवितां यावे अशी उत्तम व्यवस्था लावून कीर्तिमंदिरांत अखंड राहिले आहेत.

महर्षि गौतमांसारखीं न्यायरत्नें आमच्या देशांत पुनः निर्माण होवोत व आमच्यांतील अज्ञान दूर करून 'न्याय एव धर्मः' या महत् धर्मतत्वाचा सर्व आर्यावर्तांत उपदेश करोत, एवढेंच परमेश्वरापाशीं चिंतितों.

# अखेरीस निश्चय ढांसळला !

" पुनः लग्न करायचें ! प्रिया सरस्वती—सद्गुणांची केवळ खाणच मला सोडून गेली ! हा-य ! नी मी पुनर्लग्न करूं ? कालत्रयीं घडणार नाहीं ! माझ्या जिवलगेची ती सुंदर तसबीर, रात्रंदिवस मी माझ्याजवळ ठेवीन व अंतसमयापर्यंत तिचा मला वियोग होऊं देणार नाहीं ! "

वरील आत्मगत भाषण करणारे गृहस्थ, तिशीच्या जवळजवळ आले होते. त्यांनां मोठया हुद्यचाची सरकारी नोकरी होती. त्यांनां विधुरदशा प्राप्त होऊन तीनएक महिने झाले होते, व प्रियपत्नीची वारंवार आठवण देणारीं दोन लहान लहान मुलें होतीं.

ते रजा घेऊन आपल्या गांवीं आले होते. तेथें आल्यावर त्यांची आई, बहिणी व भाऊ त्यांनां पुनः लग्न करण्याविषयीं एकसारखा आग्रह करित होतीं. अशा तारुण्यावस्थेंत त्यांनीं लग्न केल्याशिवाय राहणें, त्यांच्या घरच्या माणसांनां बरें दिसेना. तीं म्हणत " अशा वयांत अविवाहित राहणें, हें सामाजिक व नैतिक दृष्टीनें गौण आहे ! कारण, त्यामुळें कदाचित दुष्परिणाम होण्याचा संभव असतो. "

पण विनायकरावांचें दुःख अझून जसेंच्या तसें होतें. इतके दिवस लोटले, तरी त्यांत फरक म्हणून पडला नव्हता. त्यामुळें घरच्या माणसांच्या सूचना व उपदेश यांचा ते धिक्कार करीत. त्यांनीं आपला निश्चय आईस कळविला. ते म्हणाले " मी विधुरदशेंतच प्राण सोडणार, व हा माझा निश्चय कधींहि ढळणार नाहीं ! "

" आमच्यांतील विधवा स्त्रिया पुनर्लग्न करित नाहींत. त्या आपलें आयुष्य पवित्र व शुद्ध आचरणांत घालवून आपल्या उभयकुलांनां शोभा आणितात. नी विधुरांनींच पुनर्लग्न कां करावें ? त्यांनींहि आपलें राहिलेलें आयुष्य कडकडीत ब्रह्मचर्यांत कां घालवूं नये ? आमच्या मनोविकारांवर आह्मांला इतकासुद्धां दाब ठेवितां येऊं नये ? आह्मी विद्वत्तेची, अकलेची व पराक्रमाची नुसती बढाई मारितों, पण

आमच्या हातून इंद्रियनिग्रह होत नाहीं! इतकेंच नव्हे, पण आमच्यापैकीं कांहीं थेरडीं बाळें, कामेच्छा समूळ नाहींशीं झाली तरीहि, आपली नात शोभेल अशा कुमारिकेशीं लग्न लावून तिच्या जन्माचें मातेरें करितात!!! हरहर! किती नीच स्वभाव हा!! मी तर या बाबतींत कोणाचेंच ऐकणार नाहीं. बस्स, ठरला निश्चय!"

याप्रमाणें आपल्याशींच पुटपुटत व मधून मधून विडी ओढित विनायकराव आपल्या दिवाणखान्यांत लोडाशीं टेंकून बसले होते. त्या वेळीं ते तेथें एकटेच होते. त्यांचे दोघे कनिष्ठ बंधु, नुकतेच पुनः लग्न करण्याबद्दल कडाक्याचा वादविवाद करून उठून गेले होते. कारण, ते दोघे वैवाहिक सुखाचा अनुभव घेत असतां आपल्या वडील भावानें कष्टमय विधुरदशेंत दिवस काढावे, हें कांहीं त्यांनां बरें वाटेना. वडील भावाच्या आयुःक्रमणमार्गांत एक मोठें खिंडार पडलें आहे, व तें त्याचें लग्न झाल्याशिवाय भरून येणार नाहीं, असें त्यांनां वाटत असे; पण या तर्कशास्त्राचा विनायकरावांच्या मनावर यत्किंचितहि परिणाम होईना. ह्मणून ते तो विषय तसाच टाकून उठून गेले होते.

"काय मूर्ख बेटे! लग्न करणें ह्मणजे आपखुशीनें गुलाम बनणें, हें यांनां कसें कळत नाहीं? ती सव्वा मणाची बिडी पायांत मुद्दाम ठोकून घेऊन आपली स्वतंत्रता नाहींशी करणारा खरोखर मूर्खच असला पाहिजे! वैवाहिक स्थितीमध्यें सुख काय असतें, याचा मीं तर पूर्ण अनुभव घेतला आहे. आतां मला उलट स्थितीचा अनुभव घेतला पाहिजे. काय होईल तें होवो, लग्न ह्मणून करायचें हें नाहीं!"

याप्रमाणें पुनः विनायकराव आपल्याशींच पुटपुटूं लागले. इतक्यांत तीन वर्षांचा एक सुकुमार व सुंदर मुलगा तेथें दुडुदुडु धावत आला, व विनायकरावांच्या मांडीवर बसला. तो त्यांचा वडील मुलगा होता. विनायकरावांनीं त्याच्या तोंडावरून हात फिरविला. त्या मुलानेंहि मांडीवर बसल्या बसल्या बापाच्या मिशा ओढण्यास आरंभ केला.

थोड्या वेळानें मुलानें विनायकरावांच्या गळयास आपल्या चिमुकल्या हातांनीं विळखा घातला व तो ह्मणाला " बाबा ! आईला ता घेऊन एत नाई ? ती तेवा एईल ? "

" बाळ, ती आतां यायची नाहीं बरं ! "

" ते ता बाबा ? "

" कारण, ती निष्ठुर आहे. ती तुझ्यावर, माझ्यावर व लहान्या जगूवर रागावली आहे. ती आतां कधींहि परत येणार नाहीं ! "

मुलाचे डोळे पाण्यानें भरून आले.

" नाई, ती एईल. मी तित्यातड दाईन. बाबा, माला तित्यातड न्याओ. " हां हां म्हणतां मुलगा रडूं लागला.

पण मुलाची समजूत विनायकरावांस करितां येईना. त्यांनीं त्याचें लक्ष्य दुसरीकडे जाण्याकरितां पुष्कळ खटपट केली. त्याला चेंडू व गोट्या दिल्या; चिमणीकावळयांच्या, हत्तीघोडयांच्या गोष्टी सांगितल्या; पण व्यर्थ! कांहीं केल्या त्याची समजूत होईना. तो एकसारखा स्फुंदून रडूं लागला. सरतेशेवटीं विनायकरावांनीं त्याला माजघरांत नेऊन आईजवळ दिलें व ते दिवाणखान्यांत येऊन बसले.

पुन्हा विनायकराव विचारतरंगांत दंग झाले. घरांत बायको असल्याशिवाय या मुलांचें कसें होणार ? हा प्रश्न पुढें उभा राहिला. विनायकरावांनां जिल्ह्यांत हिंडण्याचें काम असल्यामुळें, त्यांचा मुक्काम एका ठिकाणीं रहात नसे. त्यांच्या आईला आतां ह्मातारपणामुळें घर सांडेतां येईना. त्यांच्या बहिणी व भावजया, आपापल्या नवऱ्यांजवळ राहणार. तेव्हां मुलांचें कसें होईल, त्यांनां कोण खेळवील, मायेनें त्यांनां खाऊंजेऊं कोण घालील, वगैरे विचारांनीं त्यांच्या मनांत काहूर उसळून दिलें. थोडा वेळ विचार करून ते आपल्याशीं ह्मणाले " बायको नसली ह्मणून काय झालें? माझ्याहातून इतकें होणार नाहीं? त्यांनां खेळविण्याकरितां एक गडी ठेविला ह्मणजे झालें. आहे काय त्यांत ? "

याप्रमाणें विचारांवर विचार करकरून विनायकरावांनीं असें ठरविलें कीं, कोणत्याहि सबबीसाठीं पुनः लग्न ह्मणून करावयाचें हें नाहीं —नाहीं—नी ना—हीं !

वर लिहिलेली हकीगत घडल्याला बरेच महिने लोटले. विनायकराव आपल्या कामावर रुजू झाले. त्यांच्याबरोबर त्यांचीं मुलें, आई व लग्न झालेली एक बहीण, अशीं आलीं होतीं. बायको नसल्यामुळें गृहव्यवस्थेंत किती फरक पडतो, हें त्यांनां हळुहळू दिसून येऊं लागलें. कचेरींतून दमून भागून घरीं आल्यावर प्रेमयुक्त सस्मित मुखचंद्रमा त्यांच्या आतां दृष्टीस पडेना! भूक नसली तरी "चहा करूं का? साखरपाऱ्याची तरी वडी आणूं? थोडासा मोरावळा किंवा गुलकंद तरी खायचा होता!" असा आग्रहहि होईना. त्याचप्रमाणें जेवून उठल्यावर कचेरींत जाण्यापूर्वीं त्यांच्या हातांत मसालेदार गोविंदविडा अगदीं वेळेवर येऊन पडत होता, तसा आतां कुठून पडणार ! इत्यादि गत गोष्टींचें स्मरण त्यांनां वरचेवर होऊं लागलें.

पुनः पुनः त्यांच्या आईनें व बहिणीनें त्यांचें मन वळविण्याचा प्रयत्न करावा, पण तो सगळा व्यर्थ होई. त्यांच्या निश्चयरूपी किल्ल्याचा भेद कोणाच्यानेंहि होईना. केव्हां केव्हां ते त्यांनां रागें भरत व अपमानहि करीत. पण पुनः जरा शांत होऊन आपले मुद्दे त्यांनां समजावून देत. ते आज्ञाधारक व मायाळू होते खरे, पण फक्त या बाबतींत ते आपल्या आईची आज्ञा मानीनात व बहिणीच्या आर्जवाकडेहि लक्ष्य देईनात.

ज्या तालुक्याच्या गांवीं ते हल्लीं राहत होते, तेथील मुनसफ पोक्त वयाचे, विद्वान् व पेनशनीच्या मुदतीच्या जवळजवळ आलेले होते. त्यांची एक मुलगी लग्नाला झाली होती. पुढल्या सालीं सिंहस्थ असल्या-मुळें यंदा कसेंहि करून तिचें लग्न उरकून टाकणें त्यांनां भाग होतें. कारण, मुलीला हल्लीं तेरावें वर्ष लागलें होतें व ती अमळ उफाड्याची असल्यामुळें सुमारें पंधरा वर्षांची दिसत असे. तरी पण ती

मुनसफांची मुलगी असल्यामुळें गांवांतील सुधारणानिंदक मंडळी गप्प असे. तीच एखाद्या साधारण मनुष्याची असती तर या दुर्धारकांनीं त्याला ‘सळो कीं पळो’ करून सोडलें असतें! असो.

मुलीचें नांव मालती असें होतें. ती सौंदर्याची केवळ प्रतिमाच होती! आईबापांची एकुलती एक असल्यामुळें तिच्यावर त्यांचें फारच प्रेम असे. विनायकरावांच्या शेजारच्या वाड्यांत मुनसफ राहत असून त्या उभयतांचा बराच घरोबा पडला होता. विनायकरावांच्या बायकोचें व मुनसफीणबाईचें बरेंच सख्य होतें व त्या सरस्वतीबाईला आपल्या मुलीप्रमाणें मानित असत. पक्कान्नें करण्यांत सरस्वतीबाई फारच कुशल असल्यामुळें विनायकराव दररोज कांहींतरी फराळास करण्यास सांगत. त्यांनीं कधीं जिलब्या कराव्या, कधीं मोहनभोग, कधीं नानखतें, कधीं तारफेण्या, कधीं गपचिप, कधींकधीं तर इंग्रजी तऱ्हेचें पुडिंग, पंचरंगी भात, कोहाळेपाक, बदामरोट वगैरे नानातऱ्हेचीं पक्कान्नें करावींत. त्या मालतीला आठवणीनें हांक मारून तिची वांटणी तिला दररोज देत. मालतीलाहि सरस्वतीबाईच्या हातून वेणी घातल्याशिवाय चैन पडत नसे. आतां जरी सरस्वतीबाई स्वर्गस्थ झाल्या होत्या, तरीहि मालतीचें विनायकरावांच्या घरीं पहिल्यासारखें येणेंजाणें होतेंच! ती त्यांच्या मुलांस खेळवित असे. त्यांनां न्हाऊं घाली व खाऊ आणून देई. यामुळें तिचा त्यांनां फारच लळा लागला. तीं जर एखादे वेळीं रडूं लागलीं, तर मालतीला पाहिल्याशिवाय उगी रहात नसत. हें पाहून विनायकरावांचें मालतीवर प्रेम बसलें. त्यांनां आतां वाटूं लागलें, मालतीचें लग्न होऊन ती सासरीं गेली, अगर मुनसफांची किंवा आपली बदली दुसऱ्या गांवीं झाली, तर या पोरांचें कसें होईल?

दिवसोंदिवस मालतीशिवाय त्या मुलांचें चालेनासें झालें. ती असल्याशिवाय तीं मंमं व अंगाई करित नसत. ती वरच्यावर विनायकरावांच्या घरीं जाऊं लागल्यानें तिच्या मैत्रिणी तिची थट्टा करूं लागल्या. त्या जेव्हां “इश्श ग बाई, तूं बिजवराशीं का लग्न करणार?” किंवा

अशाच प्रकारची कांहीं थट्टा करण्यास आरंभ करीत, तेव्हां मालती न रागावतां लज्जेनें खालीं मान घाली व त्या वेळीं तिच्या चेहऱ्यावर स्मितहास्याची झांक दिसे ! या गोष्टी मुनसफांच्या व मुनसफीणबाईच्या नजरेस पडत असत, पण तीं तिकडे कानाडोळा करीत. असें करण्यांत त्यांचा कांहीं मतलब होता. असो.

याप्रमाणें कांहीं महिने चालल्यावर एके दिवशीं मुनसफांनीं विनायकरावांजवळ ओघाओघानें गोष्ट काढिली. विनायकरावांनीं मोठ्या शांतपणानें उत्तर दिलें. ते ह्मणाले "रावसाहेब! पुन्हा लग्न करून संसारयातनांत पडल्यानें मी मूर्ख ठरेन; एवढेंच नव्हे, पण विधवांनीं पुनर्विवाह न करितां आपलें आयुष्य ब्रह्मचर्यांत घालवावें असें माझें ठाम मत असल्यामुळें, मी अनीतिमान् व पक्षपाती ठरून लोकनिंदेस पात्र होईन."

मुनसफ ह्मणाले "विधुर जर लग्न करितात तर विधवांनींहि लग्न करावें, असें ह्मणणें गैरशिस्त आहे. स्त्री ती स्त्री, अन् पुरुष तो पुरुष ! त्या उभयतांमध्यें शारीरिक अगर मानसिक साम्य नाहीं. आणि ह्मणूनच पुरुषांइतके स्त्रियांना हक्क असूं नयेत, अशी ईश्वराची इच्छा आहे हें उघड दिसतें; व आमच्यासारख्या समंजस मनुष्यांनीं तर ईश्वराच्या इच्छेबाहेर एक पाऊलहि टाकण्याचा यत्न करूं नये. ज्या दोन वस्तूंत त्याला फरक ठेवावासा वाटतो, त्यांत आपण सारखेपणा कां आणावा?"

विनायकराव स्वस्थ बसून ऐकत होते. त्यांच्या मनांत अझून फरक पडला नव्हता. मुनसफांनीं आपलें भाषण चालू ठेविलें. ते ह्मणाले "विनायकरावजी! आह्मां उभयतांचा आतां वृद्धापकाळ झाला आहे. तेव्हां एकदा आमच्या डोळ्यांदेखत तुह्मांला जांवई करण्याची फार इच्छा आहे. याच्या पूर्वींच मी ही गोष्ट काढणार होतों, पण तुमच्या दुःखावर डागणी दिल्यासारखें होईल, ह्मणून आजवर गप्प राहिलों. मालतीशिवाय तुमचीं मुलें अगदीं राहत नाहींत व तीं तिला 'आई' या नांवानें हांक मारित असल्याचें मीं पुष्कळ वेळां ऐकिलें आहे.

मीं तुमच्याजवळ गोष्ट काढिली, याबद्दल राग मानूं नका. माझें कुलशील तुम्हांला माहित आहे, व तुमचेंहि मला माहीत आहे. तेव्हां माझ्या विनंतीला मान देऊन मालतीचा स्वीकार करावा. ती तुमच्या कुटुंबाइतकी सुंदर नसेल, तरी पण ती कुरूप नाहीं ! ”

विनायकराव कांहींच उत्तर न देतां उठून घरीं गेले. ते दिवशीं रात्रीं विनायकराव आपल्या निजावयाच्या खोलींत जाऊं लागले, इतक्यांत त्यांची बहीण खोलीच्या दाराशीं उभी राहून त्यांनां खोलींत न जाण्या-बद्दल हंसत हंसत सांगूं लागली.

“ कां ? ” विनायकराव आश्चर्यचकित होऊन म्हणाले. कारण, त्या खोलींत आपलीं मुलें निजलीं आहेत, हें त्यांनां माहीत होतें.

“ हें बघ दादा ! आज किनई, आमची एक वहिनी आली आहे व ती आपल्या मुलांसह आंत निजली आहे. ”

“ म्हणजे ! याचा अर्थ काय ? ”

त्यांची बहीण जास्तीच हंसूं लागली. इतक्यांत विनायकरावांच्या नजरेस पडलें कीं, खोलींत कोणी स्त्री दोन मुलांसह पलंगावर निजली आहे, व लागलीच एका मुलानें “ आई, तु दाउ ओको अं ! ” असें म्हटलेलें त्यांच्या कानीं आलें.

विनायकरावांनां हें काय गौडबंगाल आहे हें कांहींच कळेना. ते गोंधळून गेले. त्यांच्या बहिणीनें दरवाजावरचा हात काढिला. विनायकराव आंत गेले. पलंगाजवळ गेल्यावर त्यांनीं आपलीं मुलें ओळखलीं. पण त्यांच्याजवळची स्त्री त्यांनां ओळखतां येईना. तिनें तोंडावरून शालजोडी घेतली होती. ते अगदीं पलंगाजवळ गेल्या-बरोबर ती स्त्री चटकन् उठली व पदर सांवरून पलंगावरून उतरण्याचा प्रयत्न करूं लागली. पण तीं मुलें तिचा पदर सोडीनात. विनायकरावांनीं मालतीला पाहिल्यावर त्यांचा सगळा गोंधळ नाहींसा झाला ! मालती खालीं उतरूं पहात होती, पण मुलें तिला सोडीनात. हें पाहून विनायकराव हंसले व म्हणाले “मालती ! तूं इतकी भितेस कां ? तुला लाजायला काय झालं आहे ? ”

विनायकरावांची बहीण ही गंमत खोलीच्या दाराशीं उभी राहून पहात होती. ती पुढें येऊन ह्मणाली "हें बघ दादा, तिला वहिनीच्या जागीं निजलेली पाहिली ह्मणून ती लाजत आहे; अन् शिवाय मनांत असलेली गोष्ट होत असली, तरी ती मनांत नाहीं, असं दाखविण्याची आह्मां बायकांची चालच आहे !"

इतकें बोलून ती मालतीकडे पहात ह्मणाली " वहिनीबाई ! माझ्यावर रागावूं नका हो ! मी आपलं खरं खरं तें बोलल्यें."

इतक्यांत संधि साधून मालती खोलींतून पळून गेली. त्याबरोबर "आईला तुमी ता बाएर घालवली ? अं, अं अं—" असें ह्मणत मुलांनीं रडण्यास आरंभ केला. विनायकरावांनीं मालतीस आंत येऊन मुलांची समजूत घालण्याचा पुष्कळ आग्रह केला, परंतु ते खोलींतून बाहेर जाईपर्यंत ती आंत ह्मणून आली नाहीं !

दुसरे दिवशीं सकाळीं विनायकराव मुनसफांचे घरीं गेले व त्यांनीं मालतीची मागणी केली. सुमुहुर्तावर त्यांचें लवकरच लग्न झालें. एके दिवशीं त्यांच्या बहिणीनें त्यांस ऐकूं जाईलसें मोठयानें "अखेरीस निश्चय ढांसळला!" हें वाक्य आपल्याशींच उच्चारिलें. असो.

विनायकराव आणि मालती दोन्ही मुलांसह मोठ्या आनंदांत राहत आहेत. त्यांच्यासारखें एकमेकांवर प्रेम करणारें जोडपें फारच क्वचित् सांपडेल ! बिचाऱ्या एखाद्या गतभर्तृकेनें, अशा प्रकारच्या प्रेमाची इच्छा करणें, पाप आहे काय ? हाय ! पाषाणहि द्रवेल; परंतु—

# मातृचुंबन.

बाल्यावस्थेंतच परमप्रिय मातापित्यांच्या सहवाससुखास दुर्दैवानें मी अंतरलों होतों. माझी मायाळू जननी, मला माझ्या दहाव्या वर्षींच सोडून गेली. तिचा वियोग सहन न होऊनच कीं काय, माझा पिताहि तिच्या मागोमाग सहाच महिन्यांनीं मला अज्ञान बालकाला निराश्रित ठेवून आपण स्वर्गलोकीं निघून गेला. या अफाट जगतांत मी अगदीं एकाकी राहिलों. परंतु पुढें आपलें कसें होईल, ही चिंता करण्यापुरतें देखील ज्ञान त्या प्रसंगीं माझ्याठायीं नसल्यामुळें, मला कांहीं हें वियोगदुःख फारसें जाणवलें नाहीं. असो.

परमेश्वर कोणाचेंहि अडलें पहात नाहीं ह्मणतात, तें अगदीं सत्य आहे. तो कोणा ना कोणाच्या तरी मुखीं उभा रहातो! त्याच्याच पूर्ण सहाय्यानें मी आज दोन अक्षरें शिकून माझ्या चिमुकल्या गृह-राज्याचा सौख्यशाली अधिपति होऊन बसलों आहें! मी या स्थितीला कसा आलों, हें येथें सांगण्याची कांहींएक अवश्यकता नाहीं. इतकें सांगितलें ह्मणजे बस्स होईल कीं, बाल्यावस्थेंतच मी या जगतांत एकाकी राहिल्यामुळें दुसऱ्याच्या तोंडाकडे पहाण्याची अनिष्ट संवई मला मुळींच लागली नाहीं. त्याचप्रमाणें दुसऱ्याच्या ताबेदारीचाहि माझ्या मनानें अगदीं वीट घेतला. हल्लींसुद्धां कुटुंबभरणासाठीं मीं दास्यवृत्ति मुळींच पत्करिली नाहीं. सत्याची कांस न सोडतां परमेश्वरावर सर्वस्वीं भार टाकून एकनिष्ठेनें मीं कांहीं मित्रमंडळीच्या सहाय्यानें एक स्वतंत्र धंदा चालविला असून त्यांत हल्लीं हल्लीं पैसाहि मुबलक मिळत आहे. गृहसौख्याला अवश्य जीं जीं साधनें तीं तीं संपूर्ण मला ईश्वराच्या अमोघ कृपेनें लाधलीं आहेत.

माझी पत्नी सुशील, रूपगुणसंपन्न आणि माझ्या स्वभावाला अगदीं अनुरूप अशीच आहे. प्रत्येक सत्कार्यांत मला, तिची पूर्ण मदत असते. माझा शब्द ती कधींहि खालीं पडूं देत नाहीं. माझ्या सुखासाठीं

ती नेहमीं तत्पर असते. अपत्यसुखाविषयीं ह्मणाल तर त्याहि बाबतींत मजसारखा भाग्यशाली कोणीहि नसेल! साऱ्या दिवसाचें कामकाज आटोपून पेढीवरून अगदीं थकूनभागून मी घरीं येतों. व्यापारी लोकांना दोन पैसे अधिकउणे मिळतात खरे, परंतु त्यासाठीं कोण दगदग करावी लागते, किती धोरणें सांभाळावीं लागतात, तें आमचें आह्मांलाच ठाऊक! या एकंदर दगदगीनें मी तर पराकाष्ठेचा श्रांत होऊन जातों. परंतु जिन्यांत पाय ठेवण्याचाच अवकाश, माझीं लाडकीं मुलें मजभोंवतीं एकच गर्दी करून सोडतात; आपल्या निर्दोष बालचेष्टांनीं मला अगदीं भंडावून सोडतात; आपल्या बोबड्या गोड शब्दांनीं " बाबा आले ! बाबा आले ! " ह्मणून दररोज गोंगाट उडवून देतात! कोणी हात धरतो, तर कोणी अंगरखाच ओढूं लागतो! चिमुकली गंगू—टवळीला अजून बरोबरसें चालतांसुद्धां येत नाहीं तरी—फरपटत फरपटत येऊन माझें धोतरच ओढित सुटते! मग अशा अत्यानंदाच्या प्रसंगीं आमचा थकवा किती वेळ रहात असेल बरें! घरांत पाय ठेवण्यापूर्वींच मी अगदीं ताजातवाना होऊन आनंदसागरांत पोहूं लागतों. त्या मनोहर बालकांची ती बालक्रीडा, प्रफुल्ल कमलाप्रमाणें त्यांची ती टवटवीत मुखश्री, अमृतरसपूर्ण त्यांचे बोबडे बोल, कोणाला बरें स्वर्गसुखाचा किंचित्काल तरी अनुभव देणार नाहींत ! एका आधुनिक कवीनें ह्मटलें आहे—

" सुंदर ललना, स्थिर लक्ष्मी गृहिं, गुणवान् सुतही ज्याला !
* * * * तरि स्वर्गाधिक सुख त्याला ! "

अहाहा! हें कितीतरी सत्य आहे. मला तर या कवीच्या या सरस उक्तीची वारंवार सत्यता भासते, आणि त्या आनंदाच्या बहरांत मी माझ्या सुकुमार बालकांनां गाढालिंगन देऊन त्यांच्या गुलाबासारख्या गालांचीं एकसारखीं प्रेमानें चुंबनें घेत सुटतों. या चुंबनरसापुढें खरोखर अमृताची गोडीहि तुच्छ होय!

याच वेळीं दुसराहि एक अवर्णनीय आणि अनुपमेय देखावा नेत्रांना परितुष्ट करित असतो. मी काय ह्मणतों, तें माझे बरेच वाचक समजून चुकले असतील! अहाहा! तें साभिमान, आनंदपरिप्लुत, सरल, सुहास्य वदन, शिशुस्नेह क्षणोक्षणीं जींत व्यक्त होत आहे अशी ती धन्यतादर्शक दृष्टि, कोणत्या बरें प्रेमळ पतीला स्वर्गसुखांत मग्न करणार नाहीं! आपल्या निर्दोष बाललीलांनीं, शिशुसुलभ चंचलतेनें आपलीं लहान गोजिरवाणीं बालकें जेव्हां जनकाला भंडावून सोडतात, क्षणभर या दुःखमय जगतांतील यच्चावत् चिंतेपासून मुक्त करून सुखानंद सागराच्या लाटांवर त्याला हेलकावे खावවितात, तेव्हां त्यांच्या जननीला होत असलेला आनंद, वाटत असलेलें कौतुक, अभिमान आणि धन्यता, यांची केवळ कल्पना करणेंसुद्धां अशक्य, मग वर्णन करून सांगण्याची गोष्ट कशाला! मीतर हा प्रेक्षणीय देखावा पाहून देहभान विसरून शुद्ध वेडा बनतों ह्मटलें तरी चिंता नाहीं! माझ्या बुद्धीला मोह पडतो. क्षणभर मी माझ्या लाडक्या मुलांनांहि विसरतों आणि अधीरतेनें त्यांच्या जननीच्या त्या सहजानंदी, साभिमान, सस्मित मुखकमलाचें यथेच्छ मधुपान करण्यांत गुंग होतों! अस्तु.

"आज किनई, मी विसरलों बरं का बाळ! पण उद्यां तुह्मांला अगदीं पुष्कळसा खाऊ आणीन. कसा शहाणा आहे आमचा गोंदू! तुला रे काय हवं नाना?"

"मला किनई बाबा! काय बरं—हं, मला एक खंजिरी आणा वाजवायला. उद्यां अगदीं खचित आणालना पण?"

"आणीन बरं, उद्यां अगदीं खचित आणीन. अन् तुमाला ओ गंगूताई?" मीं छोट्या गंगूला वर उचलून तिच्या गुलाबासारख्या कोमल गालांचें लडिवाळपणानें चुंबन घेत घेत ह्मणालों.

गंगूला थोडेंच बोलतां येत होतें! परंतु तिच्या वतीनें बोलण्यास तिच्या अगदीं जिव्हाळ्याचीं सर्व मनुष्यें जवळ होतींच.

" गंगूला रंगाचं झबलं आणायचं, अन् एक केशरीगांठी. या लबाड गोंदूला नाहीं कांहीं आणायचं! आमची गंगू मग गांठी घालून शिमग्याची मजा पहायला जाईल!"

"बाबा, मया गाथी—" करून गोंद्यानें एकच कल्होळ करून सोडला.

प्रेमभरानें मीं त्याचा एक मुका घेऊन ह्मणालों " आणीन बरं बाळ, उद्यां सर्वांनां खाऊ आणीन."

मुलांचा आनंद मग काय विचारावा! त्या भरांत त्यांनीं सर्व घर दणाणून सोडलें. तीं नाचूं उडूं लागलीं, ज्याला त्याला सांगत सुटलीं, आणि त्या आनंदाच्या भरांतच भोजन उरकून सहज निद्रावश झालीं.

दुसरा दिवस उजाडला. नित्याप्रमाणें भोजन वगैरे आटोपतांच मी पोषाख चढवून पेढीवर जाण्यास निघालों. इतक्यांत मुलें अगदीं गडबडीनें धावतच समोर आलीं. पुनः कालचीच वेळ. प्रत्येकानें आपापल्यापरी मला अगदीं बजावून सांगितलें कीं, आज संध्याकाळीं खाऊ आणलाच पाहिजे. मींहि प्रेमभरानें त्या निर्दोष बालकांच्या सरल सुहास्यवदनांचें एक चुंबन घेऊन "आज मी अगदीं विसरायचा नाहीं, तुह्मी अगदीं माझी वाट पहात बसा संध्याकाळीं. पण कुणीं मस्ती वगैरे केल्याचें मला समजलें तर त्याला कांहीं मिळणार नाहीं बरें का!" असें ह्मणून प्रिय पत्नीनें दिलेला विडा चावित चावित घराबाहेर पडलों.

परंतु मी अगदींच विसरलों. आजचा दिवस म्हणजे शुक्रवार. विलायतला जाणारी मेल शनवारीं बंद होत असते, तेव्हां तिकडे जाणारीं पत्रें वगैरे शुक्रवारींच तयार करावयाचीं असतात. हा शुक्रवार ह्मणजे विलायतशीं व्यापार करणारांनां कोण धांदलीचा! पेढीवर गेल्यापासून मी हीं पत्रें वगैरे लिहिण्यांत गढून गेलों. कांहीं नवीन माल मागवावयाचा होता त्याची यादी वगैरे करतांकरतां संध्याकाळचे सात वाजले. शिवाय, नित्याप्रमाणें आज शुक्रवार ह्मणून दुसरे भागीदारहि पेढीवर जमले होते. विलायतेंत जाणारीं सर्व पत्रें सर्व भागीदारांच्या

अनुमतानें लिहावीं लागतात. पुढें गप्पागोष्टी होतां होतां आठ साडेआठ वाजले. भुकेनें काहूर उठविलें. गाडींत बसून तडक घरीं आलों. मुलांचा खाऊ आजहि या गडबडीखालीं विसरलों. अंगणांत पाऊल ठेवीपर्यंत मला त्याचें मुळीं स्मरणच झालें नाहीं!

आपणी सांगितलेल्या वस्तु आज खचित येणार अशी पक्की खात्री असल्यामुळें सारा दिवस मुलें त्याच आनंदांत गर्क होतीं. सायंकाळ होऊन माझी घरीं येण्याची वेळ जसजशी जवळ येऊं लागली, तसतशी त्यांची अधीरता अधिकाधिक वाढूं लागली. रस्त्याकडे डोळे लावून दोन्हीहि मुलगे माझी वाट पहात किती वेळतरी उभे राहिले. सहा वाजले, सात वाजले, त्यांच्या आईनें घरांत येऊन बसण्यास सांगितल्यामुळें अगदीं नाखुषीनें ते घरांत जाऊन आंत बाहेर, आंत बाहेर करित राहिले. आठ वाजले तरी त्यांना जेवणखाण देखील सुचेना. शेवटीं आईच्या पराकाष्ठेच्या आग्रहामुळें व किंचित् धाक-दपटशामुळें ते जेवावयास बसले! तरी त्यांचें सगळें लक्ष्य दरवाजाकडेच होतें. जेवणाकडे कोणाएकाचेंहि लक्ष्य नव्हतें. इतक्यांत मी येऊन पोहोंचलों.

कसचें जेवण नि कसचें काय! ते तसे उष्ट्या हातांनींच माझेभोंवतीं जमले आणि जो तो आपापली वस्तु मागत सुटला. डाव्याच हातांनीं त्यांनीं माझे खिसे, उपरणें, पागोटेंसुद्धां चांचपून पाहिलें! परंतु काय उपयोग? मला त्यांचा हा झालेला हिरमोड पाहून अति वाईट वाटलें. त्यांना मीं पुष्कळ प्रकारें समजाविलें. पेढीवर बरीच रात्र झाल्यामुळें मार्किटांत जाण्यास मला मुळींच फावलें नाहीं. उद्यां सकाळच्या प्रहरीं पेढीवर जाण्याच्या अगोदर तुमच्या वस्तु आणून देतों म्हणून सांगितलें. तोंपर्यंत समजुतीसाठीं त्यांना एकेक रुपयाहि देऊं लागलों; परंतु छे! मुलेंच तीं! त्यांनीं एकच हलकल्होळ करून सोडला. सारखीं रडूं लागलीं. गोंद्यानें तर त्या रागाच्या भरांत ताटच उडवून दिलें!

माझी पत्नी मघांपासून अगदीं त्रासिक मुद्रेनें हा एकंदर प्रकार पहात होती. मुलांनां समजावून सांगण्याचा तिनेंहि पुष्कळच यत्न केला; धाकहि दाखविला, परंतु ज्याचें नांव तें! दोघांपैकीं एकहि ऐकेना. त्यांच्या त्या आरडाओरडीनें धाकटी गंगुसुद्धां गडबडून उठली. झोंपमोड झाल्यामुळें तीहि रडतच उठली. मग काय विचारतां! घरभर सारा गोंधळ उडून गेला. त्याबरोबर त्या बालकांची आई अगदीं चवताळून गेली. घरांत सगळ्याभर खरकटें केलेलें पाहून तिचा क्रोध अनावर झाला. कांहीं केल्या मुलें ऐकेनात असें पहातांच क्रोधवश होऊन ती अविचारानें त्या अज्ञान अर्भकांनां मारित सुटली. परंतु मुलांनींहि आज अगदीं निश्चयच केल्यासारखा दिसला, कीं, माराबिराला कांहीं जुमानावयाचें नाहीं ह्मणून! हा अपर्व प्रकार पाहून मी थक्कच होऊन गेलों. यापूर्वीं माझ्या पत्नीनें असें अविचाराचें वर्तन केलेलें मला आठवतसुद्धां नाहीं!

बरें, यापासून परिणाम काय झाला! मुलें शांत का झालीं? छे छे! उलट जास्तच खवळलीं. त्यांनीं अगदीं आकांत मांडला. त्यांची ही स्थिति पाहून मला अतिशय वाईट वाटलें. त्यांच्या आईच्या अविचाराचा बराच राग आला; परंतु त्यांत तिचा काय अपराध बरें! आमच्या स्त्रियांनां जर मुळींच मातृशिक्षण मिळत नाहीं, शिशुसंगोपन कसें करावें हें त्यांनां मातृपदाला पोहोंचण्यापूर्वीं शिकविण्याची जर आह्मांला मुळींच आवश्यकता भासत नाहीं, तर अशा आर्यांच्या हातून मुलांनां चांगली वागणूक कशी मिळावी? मुलानें हट्ट केला, खोडी केली, कीं त्याला चौदाव्या रत्नासारखें दुसरें उत्तम औषधच नाहीं, ही समजूत जोंपर्यंत त्यांच्या हाडींमासीं खिळली आहे, त्यांची आई, मावशी, चुलती, वडील बहीण वगैरे सर्व याच औषधाचा मुलांवर प्रयोग करितांना जोंपर्यंत त्या पहात आहेत, खुद्द त्यांच्यावरहि हाच प्रयोग झाल्याचें त्यांनां आठवत आहे, तोंपर्यंत त्यांच्या हातून तरी अन्यथा आचरण कसें व्हावें? मारहाण करण्यापेक्षां मुलांनां

समजविण्याची दुसरीहि एखादी सामोपचाराची उत्तम युक्ति आहे, हें जोंपर्यंत त्यांनां समजण्याला बिलकूल मार्ग नाहीं, तोंपर्यंत त्यांनीं याच ठराविक युक्तीचा अवलंब केल्यास त्यांत त्यांचा काय अपराध बरें? आणि हा जर प्रत्यक्ष त्यांचा अपराध नाहीं, तर या अपराधाबद्दल आपण त्यांच्यावर रागवावें तरी काय ह्मणून ? उलट, आपण अशा आयांची कींवच केली पाहिजे ! वाचक हो, मलाहि माझ्या पत्नीची त्या रात्रीं पराकष्टेची कींव आली. ही तिची संवई घालविण्याचा मीं निश्चय केला. मला तिनेंच मागाहून सांगितलें कीं, मुलांनां अशा रीतीनें चूप करण्याची आपली नेहमींची संवई आहे.

मी त्या वेळीं कांहींएक बोललों नाहीं. किंवा माझ्यानें कांहींएक बोलवेचना ह्मणाना ! माझ्या अंतःकरणाची स्थिति कांहीं चमत्कारिक होऊन गेली होती. पोटच्या गोळ्यांनां अशा निर्दयतेनें त्यांची प्रत्यक्ष जन्मदात्री आई वागविते तरी कशी ? ज्या आईला आपल्या मुलांकडे दुसऱ्यानें नुसतें वांकड्या डोळ्यानें पाहिलेलें सहन होत नाहीं, मुलांच्या केशाला यत्किंचित् धक्का लागतांच ज्या आईच्या काळजाला तिडिक जाते, मुलें क्षणभर दृष्टीआड झालीं कीं जी नुसती कावरीबावरी होते, तीच आई, दयामाया पार विसरून हें असें अविचाराचें व निर्दयतेचें कृत्य करण्यास प्रवृत्त तरी कशी होते ? सर्वच गूढ ! अथवा हेंच खरें. मुळीं स्त्री हेंच या जगांतील अजब गूढ आहे ! जगाच्या आरंभापासून कितीजणांनीं तरी हें गूढ समजून घेण्याचा यत्न केला असेल आणि आजवर कितीजणतरी करित आहेत; परंतु अद्यापिहि सकल जगाला मोहिनीमंत्रानें वश करून टाकणाऱ्या या विलक्षण गूढाची पूर्ण मीमांसा करण्यास कोणीहि समर्थ झाला नाहीं. मग माझ्यासारख्या यःकश्चित् मनुष्याची गोष्ट कशाला !

मारूनधोपटूनसुद्धां जें काम झालें नाहीं, तें कांहीं काळानें निद्रादेवीनें सहज करून टाकलें. आरडूनओरडून थकल्यामुळें मुलें जागच्या जागींच निजलीं. मी आपला स्तब्ध विचार करित एका

आरामखुर्चीवर स्वस्थ पडलों होतों. मला त्या रात्रीं जेवण वगैरे कांहींएक सुचलें नाहीं. माझ्या पत्नीचीहि अवस्था तीच! मी आंत जाऊन पाहिलें, तों मुलांच्या बिछान्याच्या पायथ्याशीं बसून ती निःशब्दानें अश्रुमोचन करित आहे!

ह्या उद्वेगजनक गोष्टीला एकदोन दिवस लोटल्यावर नित्यनियमाप्रमाणें आह्मी समुद्रकांठीं फिरावयास गेलों होतों. प्रभातींचा रम्य समय होता. सहल करित करित आह्मीं बागेंत येऊन जरा बाजूस असणाऱ्या एका बांकावर बसलों. मुलें मोकळ्या जागेंत यथेच्छ विहार करित आपल्या बाललीलांनीं आमचें अंतःकरण परितुष्ट करित होतीं. आह्मीहि सुप्रसन्न अंतःकरणानें, साभिमान दृष्टीनें, बालकांच्या त्या निर्दोष चेष्टा सप्रेम अवलोकन करित होतों. किंचित्काळ इकडल्या तिकडल्या गोष्टी झाल्यानंतर त्या दिवशींच्या खेदकारक गोष्टीचा मीं अगदीं साहजिक उल्लेख केला. माझ्या पत्नीची आनंदवृत्ति तत्काळ मावळली. तिच्या मनाला ती गोष्ट नेहमीं खात असावी, असें मला वाटूं लागलें. मलाहि अत्यंत दुःख झालें; परंतु तो विषय तेथेंच सोडून देण्याजोगा नव्हता. मीं मोठ्या कष्टानें विचारलें "मुलांनां ताळ्यावर आणण्यास त्यांनां निर्दयतेनें मारहाण करण्याशिवाय दुसरा कांहीं सोपा उपाय नसावा, असें तुला वाटतें काय? अशी मारझोड केल्यानें का मुलें सुधरत असतात? त्या दिवशींचें तुझें तें अविचाराचें आणि निष्ठुरतेचें वर्तन पाहून माझ्या मनाची जी कांहीं स्थिति झाली ती काय सांगूं!"

माझ्या पत्नीच्या डोळ्यांत खळकन् पाणी आलें. कंठ दाटून आला. ती अडखळत अडखळत ह्मणाली "पोटच्या गोळ्यांनां अशा निर्दयतेनं वागविण्यांत आह्मांला आनंद का वाटतो! मुलांनां मारझोड करण्याचा प्रसंग आला ह्मणजे आमची जी कांहीं स्थिति होते, ती आमची आह्मांलाच माहीत. हातांनीं आह्मीं त्यांनां मारतों खऱ्या, परंतु त्या प्रत्येक आघाताबरोबर आमच्या काळजाचा एक एक तुकडा

तुटून पडतो ! परतु काय करावं ? मुलांच्या कल्याणाकडे नजर देऊन मन घट्ट करावं लागतं. आपणच नाहीं का नेहमीं सांगत असतां, कीं, लहानपणीं मुलांनां ज्या खोडी लागतात त्या मग जाणं अशक्य ह्मणून?"

"हो, हो, तें अगदीं अक्षरशः खरें आहे. परंतु त्या खोडी घालविण्याचा हा राक्षसीमार्ग मात्र आपल्याला सम्मत नाहीं. स्त्रियांचें हृदय नवनीतापेक्षांहि मृदु आहे असा माझा समज आहे, ह्मणूनच तर या गोष्टीचें मला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटतें. मुलांनां सुधारण्याचा दुसरा अगदीं सोपा उपाय आहे, आणि तो तुला समजला ह्मणजे आजपर्यंतच्या वर्तनाबद्दल तुझें तुलाच वाईट वाटेल."

माझे हे शब्द ऐकतांच माझी पत्नी आतुर दृष्टीनें माझ्याकडे पाहूं लागली. तिच्या डोळ्यांची पापणीसुद्धां हालेना. चित्रासारखी ती माझ्याकडे टक लावून पाहूं लागली. मी पुढें बोलूं लागलों "अशी मारझोड केल्यानें मुलें सुधरण्याऐवजीं उलट जास्त बिघडण्याचा मात्र विशेष संभव असतो. त्या दिवशींच तूं पाहिलें नाहींस का, गप रहाण्याच्या ऐवजीं तीं जास्तच आक्रोश करूं लागलीं तीं ? मुलांनां गप करण्याचा हा मार्ग नव्हे. मुलांनां कशा रीतीनें वागवावें हें फारच थोड्या माता समजत असतील. मुलांनां ताळ्यावर आणण्यास किंवा त्यांच्या खोडी सुधारण्यास, त्यांनां मारझोड करणें हें भयंकर अपायकारक आहे. मारापासून तीं कोडगीं बनतात. आईबापांविषयीं त्यांच्या मनांतील प्रेम, आदरबुद्धि समूळ नष्ट होऊन तेथें भीतिचें ठाणें बसतें; आणि या स्थित्यंतराचा परिणाम अत्यंत अनिष्टकारक असाच होतो. तीं समजून चुकतात कीं, आपण कांहीं केलें तरी फार फार तर आपल्याला पुष्कळसा मार मिळेल; तेवढा सोसला ह्मणजे झालें, आणि मग तीं पक्कीं निगरगट्ट बनतात. त्यांनां धाक कसा तो मुळींच रहात नाहीं. मुलांवर धाक असावा हें अगदीं इष्ट आहे; परंतु तो मारझोडीचा नसून प्रेमाचा असावा. ओल्या मडक्याचा कांठ हळुहळू लवविला तर जसा पाहिजे तसा लवतो, परंतु तोच जर

एकदम जोरानें दाबला तर त्याला कांहींएक आकार न येतां उलट निरुपयोगी मात्र होतो; कोमल तरु जपून नाजुक हस्तानें वांकविला तर आपणांस पाहिजे तसा वांकतो, परंतु अविचारानें जोराचा उपयोग केला किंवा एखादी काठी घेऊन त्याला झोडापितच सुटलें, तर वांकण्याऐवजीं तो तुटून जाण्याचा मात्र पक्का संभव आहे; " तद्वतच मुलांची स्थिति ! जपून, नीट लाडीगोडीनें, त्यांची मनोवृत्ति जशी पाहिजे तशी फिरविणें अगदीं शक्य आहे. हंसत खेळत मुलें जशीं शिकतात तशीं त्यांच्यावर जुलूम करून, त्यांनां धाकदपटशा दाखवून, किंवा निदानच्या पाळीला चौदाव्या रत्नाचा उपयोग करून तीं कधींहि शिकत नाहींत. त्यांच्यावर सक्ती करून मुळींच चालावयाचें नाहीं. तीं कुरठीं मात्र होण्याचा संभव असतो. आणि अशीं कुरठीं मुलें क्वचितच निरोगी असतात. तेव्हां या बारीकशा गोष्टीपासून केवढा अनर्थ होतो ! एक शरीर निरोगी नसल्यामुळें त्यांचें पुढील आयुष्य केवढ्या दुःखांत जातें, याचा यत्किंचित्तरी विचार मुलांनां मारझोड करण्यापूर्वीं एकातरी आईच्या मनांत येतो काय ? क्रोधानें अंध होऊन कोमल अर्भकांवर हात टाकल्यानें प्रसंगीं त्या बालकाचा हातपाय मोडण्याचा किंवा एखादा डोळाहि फुटण्याचा संभव असतो. आणि आजवर खरोखरच अशीं कितीतरी उदाहरणें घडलीं आहेत. मग या आयांच्या नांवानें त्या बिचाऱ्या अपंग बालकानें जन्मभर तळतळत रहावें. तुला हें बरें वाटतेंना ? कोमल अर्भकांचा त्यांच्या मातेकडूनच असा छळ व्हावा हें योग्यना ?—"

माझे हे शेवटचे हृदयविदारक शब्द ऐकण्यास माझी प्रियपत्नी देहभानावर कोठें होती ! दुःखाचे उमाळ्यांवर उमाळे येऊन तिच्या मनाची स्थिति अत्यंत करुणास्पद झाली होती. मलाहि अत्यंत गहिंवर आला. परंतु वाईट वाटून हा उपदेश करण्यास आलेली सोन्यासारखी संधि घालवावी, हें मला बरें वाटलें नाहीं. मी मन अगदीं घट्ट करून बसलों. माझी प्रियपत्नी, आतां माझ्या पायांवर मस्तक ठेवून अश्रुवर्षाव

करूं लागली. मीं मोठ्या प्रेमानें तिला वर उचलिलें आणि शेजारीं बांकावर बसवून शांत होण्यास सांगूं लागलों.

वाचक हो ! हें सगळें इतक्या कांहीं अल्प अवकाशांत आणि इतकें आकस्मिक झालें कीं, बागेंत दुसरें कोणी आह्मांला पहात होतें कीं काय, हें पहाण्याचें देखील भान मला राहिलें नाहीं. माझी पत्नी किंचित् शांत झाल्यावर मी ह्मणालों " तुला वाईट वाटेल हें मी जाणून होतों. तुला हा उपदेश करण्याची आवश्यकता नाहीं हेंहि मी जाणून आहें. तूं त्याबद्दल तिळमात्र विषाद मानूं नकोस. तुला आज हा उपदेश करण्यांत माझा कांहीं निराळा हेतु आहे. बालकांनां निर्दयतेनें वागविण्याची ही निंद्य चाल समूळ नष्ट व्हावी, अशी माझी फार इच्छा आहे; आणि ह्मणून मीं आज तुला जो उपदेश केला, तो जेथें संधि मिळेल तेथें प्रत्येक स्त्रीच्या कानीं जावा हें इष्ट आहे, परंतु माझ्याकडून तसें होणें शक्य नाहीं. तरी माझी ही इच्छा तडीस नेणें तुझ्यावर अवलंबून आहे. मी काय ह्मणतों तें आलें का तुझ्या ध्यानांत? "

" आणि मीहि आपणांस मनःपूर्वक विनंति करित्यें कीं, आपल्या या सदुपदेशापासून मला जर क्षणभर वाईट वाटलं असलं, तर त्याबद्दल आपण मला क्षमा करा. मी आपला हा उपदेश यावज्जीव विसरणार नाहीं. मी स्वतः त्याप्रमाणं वर्तन ठेवण्यास मनापासून झटेन, इतकंच नव्हे, तर माझ्या प्रत्येक भगिनीला जिथें जिथें संधि सांपडेल तिथें तिथें ही गोष्ट समजावून देईन. आणि ही दुष्ट खोड सोडण्याविषयीं त्यांनां उपदेश करीन. बरं, पण मारहाण केल्याशिवाय लाडीगोडीनं मुलांनां ताळ्यावर आणण्याची अशी ती दिव्य औषधी तरी कोणती? शेवट-पर्यंत हें नाहींच सांगायचं वाटतं ! "

तिच्या त्या सुहास्य मुखकमलाचें प्रेमभरानें चुंबन घेऊन मी हंसत ह्मणालों " हीच हीच! दुसरी कोणतीहि नाहीं! यासारखें रागावलेल्या मनुष्याला ताळ्यावर आणण्यास दुसरें रामबाण औषधच नाहीं! "

# शेवट तर गोड झाला.

कांहीं वर्षांपूर्वी मुंबईंत एक गृहस्थ, खाऊनपिऊन सुखासमाधानानें रहात असे. त्याचा धंदा ह्मटला ह्मणजे नाटकाचा. तो एका नाटक-मंडळीचा मुख्य मॅनेजर होता. त्याला एकुलत्या एक कन्येशिवाय दुसरें कांहीं मूलबाळ नसल्यामुळें त्या मुलीवर त्याचें अतिशय प्रेम असे.

कन्येची मुग्धावस्था संपून तिला प्रौढावस्था प्राप्त झाल्यावर सृष्टिनियमाप्रमाणें ती एका तरुणाच्या प्रेमपाशांत सांपडली, इतकी कीं, बापाला नकळत एक दिवस ती त्याच्याबरोबर पळून गेली ! मग ती आपण होऊन गेली, किंवा तिच्या प्रियकरानें तिला बळजबरीनें नेली, हें कांहीं कळलें नाहीं. आणि हें समजण्यास मार्गहि नव्हता. परंतु या योगें तिच्या बापाला फार दुःख झालें. आधींच त्याला दुसरें कोणीहि नव्हतें. त्यांत ही एकुलती एक मुलगी आणि तीहि अशी नाहींशी झाली. तो अगदीं विरक्त बनला, व त्यानें आपलें सर्व कामकाज सोडून दिलें. त्या दिवसापासून तो अगदीं एकांतांत बसून राही व रात्रंदिवस आपल्या प्राणप्रिय मुलीविषयीं विचार करी. तो आपल्याशींच ह्मणे "ही आपण होऊन मला सोडून गेली, किंवा मला दुःखसागरांत लोटण्याकरितां कोणीं दुष्टानें त्या अल्लड पोरीस माझ्यापासून हिरावून नेलें ?" पुनः त्याला वाटे "छे, ती असें कधींहि करणार नाहीं ! फार झालें तर लग्नाबद्दल मला तिनें सुचविलें असतें. पण—छे! प्रेमपाश मोठा कठीण आहे. प्रेमच मुळीं आंधळें आहे. त्याला मागलापुढला कांहीं सुमारच नसतो. तें कोणाची, केव्हां व कोठें भेट घडवील याचा नेम नाहीं. आतां जरी कोणी मला तिला आणून भेटवील तरी मी त्याला बक्षीस देईन व तिलाहि क्षमा करून तिच्याविषयीं मनांत मुळींच राग धरणार नाहीं. पण छे ! ती कसली आतां मला दिसते !"

तेव्हांपासून त्याचा एक दिवसहि सुखाचा गेला नाहीं किंवा कोणीं त्याला हंसतमुख पाहिलें नाहीं. त्याच्या प्रसिद्ध कंपनीचे नेहमीं नाटकप्रयोग होत. पण तुझी अमकें नाटक करा किंवा नका करूं, उत्पन्न किती झालें, वगैरेची तो कधींहि चौकशी करित नसे. त्यानें आपलें सर्व काम नाटकाच्या मदतगार मॅनेजरावर सोंपविलें होतें. मुख्य मॅनेजर दुःखावेगानें व्याप्त असल्यामुळें असिस्टंट मॅनेजर नाटकासंबंधीं कोणतीहि गोष्ट विचारून त्यास त्रास देत नसे.

यापूर्वींच या नाटकमंडळीनें एका नाट्यकलानिपुण विद्वानाकडून तयार करवून घेतलेला एक फारच अप्रतिम आनंदपर्यवसायी खेळ बसविला होता, व तो लोकांनां फार प्रियहि झाला होता. या नाटकांत मुख्य मॅनेजर यांचा बराच मोठा व महत्वाचा भाग होता, हें त्या असिस्टंट मॅनेजराचे लक्ष्यांत न राहून एके शनिवारीं त्यानें “ आमचा प्रसिद्ध व लोकप्रिय खेळ आज करणार आहों. ” अशा जाहिराती लाविल्या. खेळाचे दिवसापर्यंत मुख्य मॅनेजर याला तें कळविण्याचें असिस्टंट मॅनेजरास भान राहिलें नाहीं.

ह्या नाटकाचा सारांश समजण्याची वाचकांची उत्कंठा असेल ती अगोदर तृप्त करून मग पुढें जाऊं.

## नाटकाचा सारांश.

“ आर्तवीर्य नांवाचा एक वयोवृद्ध व सधन मांडलिक राजा होता. त्याला चंद्रकला नामें एक अति रूपवती व सद्गुणी कन्या होती. ही एकुलती एक व अत्यंत सुशील असल्यामुळें राजाचें तिच्यावर पराकाष्ठेचें प्रेम असे. तिची आई लहानपणींच वारल्यामुळें रात्रंदिवस तिला पित्याचा लळा होता. राजासहि या कन्येखेरीज दुसरें कांहीं मूलबाळ नसल्यामुळें त्याचें सर्व प्रेम या एकटीवरच होतें. आर्तवीर्य म्हातारा झाल्यामुळें आयुष्यांतील सर्व गोष्टींवरून त्याचें मन उडून या एकट्या

मुलीवरच कायतो त्याचा लोभ होता. फार काय, ती त्याचें जीवित-सर्वस्व होती, ह्मटलें तरी चालेल ! ती अंमळ डोळ्यांचे आड झाली कीं राजा ‘ चंद्रकला ! चंद्रकला ! ’ ह्मणून हांका मारित सुटे, व ती पुनः डोळ्यांसमोर दिसल्याशिवाय त्याला चैन पडत नसे.

हळुहळू ती यौवनदशेंत आली व सृष्टिनियमाप्रमाणें तिच्या शरीरांत मदनसंचार होऊं लागला. प्रेमाच्या गोष्टी दिवसेंदिवस तिला जास्त आवडूं लागल्या. याच सुमारास सार्वभौम राजाकडून दरबारचा एक तरुण राजपुत्र आर्तवीर्यमहाराजांस भेटण्याकरितां व पदवीदान करण्याकरितां मोठया थाटामाटानें राजाचे दरबारीं आला. हा सार्वभौम राजाकडून आल्यामुळें आर्तवीर्यमहाराजांनीं त्याला आपल्या राजवाड्याच्या एका चौकांत उतरण्यास जागा दिली होती, व त्याचा विशेष आदरसत्कार ठेविला होता. हा तरुण राजपुत्रहि मोठा रूपवान् व मोहक स्वभावाचा होता. त्याची व चंद्रकलेची सहज दृष्टादृष्ट झाली; एकमेकांचें प्रेम हळुहळू जमलें. पुढें पुढें तर एकामेकांशिवाय उभयतांस मुळींच चैन पडेनासें झालें. ह्मणून तीं बराच काळ एकमेकांचे समागमांत घालवीत; पण हें फार दिवस चाललें नाहीं. दरबारचें काम झाल्यावर तो राजपुत्र जाण्याच्या तयारीस लागला. तेव्हां मात्र त्यांनां एकमेकांची चूक कळून आली. चंद्रकलेनें आपल्या बापास विचारल्याशिवाय त्या परपुरुषाशीं स्नेह ठेविला, याचा तिला आतां पश्चात्ताप होऊं लागला, व राजपुत्रासहि फार वाईट वाटलें. आजपर्यंत झालें तें झालें, पण आतां पुढें काय करावयाचें, याचा त्या दोघांस विचार येऊन पडला. आर्तवीर्यमहाराजांस ही झालेली गोष्ट कळविण्याची दोघांसहि फार लज्जा वाटूं लागली व एकमेकांचा वियोगहि उभयतांस सहन होईना. ह्मणून त्या राजपुत्राचा व चंद्रकलेचा आर्तवीर्यमहाराजांस न विचारितां पळून जाण्याचा विचार ठरला. त्याप्रमाणें दुसरे दिवशीं तीं निघूनहि गेलीं. ”

## नाटकाचा उत्तरार्ध.

"राजपुत्र व चंद्रकला हीं दोघेंहि पळून गेल्यावर लवकरच ती बातमी आर्तवीर्यमहाराजांचे कानांवर गेली. त्यांनां फार दुःख झालें. एकुलती एक कन्या—सर्व प्रेमाचा आधार—तीच नाहींशी झाल्यावर आर्तवीर्य महाराजांस कांहीं सुचेनासें झालें व थोडक्याच दिवसांत त्यांनां वेड लागलें. 'चंद्रकला! चंद्रकला!' म्हणत ते रानावनांत भटकूं लागले. सदासर्वकाल चंद्रकलेचा ध्यास. आधींच वार्धक्यानें उतरलेले, त्यांत हा असा भयंकर धक्का बसल्यावर मग वेड लागलें, यांत कांहीं आश्चर्य नव्हतें. आर्तवीर्यमहाराज चंद्रकलेच्या वियोगानें फारच खंगले होते. त्यामुळें त्यांनां आतां मरण लवकर येईल तर बरें, असें वाटत होतें. मात्र मरणापूर्वी एकदा चंद्रकला दृष्टीस पडेल तर सुखानें मरण येईल, असें ते ह्मणत; पण काय उपयोग !

इकडे चंद्रकला आणि तो राजपुत्र एक अप्रसिद्ध व दरबारी लोकांस माहित नसलेली अशी नगरी पाहून तेथें दोघेंहि आनंदानें काळ घालवूं लागलीं.

राजपुत्र आपल्या सार्वभौम राजास आपण चोरून केलेलें कृत्य कळूं नये ह्मणून त्याचा दरबार सोडून या अप्रसिद्ध अशा नगरींत येऊन राहिला होता; पण ही गोष्ट फार दिवस लपून राहिली नाहीं. दरबारचे इतर मानकरी, सरदार दरकदार मंडळींनीं सार्वभौम राजाच्या कानांवर ती गोष्ट घातली. राजानें त्याच्या शोधार्थ मनुष्य पाठविले. राजपुत्राच्या कानीं ही हकीगत येतांच चंद्रकलेला तशीच त्या नगरींत टाकून तो राजदरबारीं परत जाण्याचा विचार करूं लागला. चंद्रकला यौवनसंपन्न, मुग्ध, सद्गुणी व सुशील असून तिला आजपर्यंत कधींहि एकटें असें राहण्याची संवय नव्हती. लहानपणापासून बापाजवळ लडिवाळपणांत तिचे दिवस गेलेले; पुढें प्रेमपाशांत गुंतल्यामुळें आपर्यंत राजपुत्राचे सहवासांत तिनें दिवस काढले होते, त्यामुळें

तिला राजपुत्र सोडून जातो असें कळतांक्षणींच अतिशय दुःख झालें. राजपुत्रास एकीकडे आड व एकीकडे विहीर असें झालें होतें. इकडे प्रेमपाशांत गुंतून रहावें तर आपली मांडलिक सत्ता सार्वभौम राजा हिसकून घेण्यास तयार; बरें, इकडे मांडलिक सत्ता न सोडतां सार्वभौम राजाच्या दरबारांत जाऊन हजर व्हावें तर प्राणप्रिय चंद्रकलेचा त्याग करणें भाग. असा दोन्हींकडून कचाट्यांत सांपडल्यामुळें राजपुत्र फार अडचणींत पडला. शेवटीं तो आपली मांडलिक सत्ता न सोडतां फलभारानें वांकलेल्या कोमल वल्लीप्रमाणें त्या चंद्रकलेस निष्ठुरपणानें तेथेंच टाकून चालता झाला. हें पाहून चंद्रकला बेशुद्ध होऊन धरणीवर पडली. पुढें कांहीं काळानें सावध झाल्यावर 'पुरुषाची जातच अशी निष्ठुर ! त्यांना दयामाया कांहीं नाहीं; कुसुमसमय संपतांच त्याग करून जाणाऱ्या भ्रमराप्रमाणें ही पुरुषांची नीच जात! ' अशीं दूषणें देत, आपला प्रिय पिता आर्तवीर्यमहाराज याच्याकडे यावयास निघाली.

मागें सांगितल्याप्रमाणें आर्तवीर्यमहाराज कन्येच्या वियोगानें आपले राहिलेले वार्धक्याचे दिवस दुःखातिशयांत कसे तरी लोटित होते. एक दिवस राजवाड्याच्या पुढील दिवाणखान्यांत, तर एक दिवस तिसऱ्या मजल्याच्या अंधार कोठडींत; एक दिवस संध्याकाळीं एकटेच गच्चीवर तर एक दिवस गंगातटाकीं एखाद्या किर्र झाडींत; असे जागजागीं एकांतस्थलीं भटकत असत. असेच एक दिवस राजवाड्याच्या मागील मोतीबागेंत जाईच्या निकुंजापाशीं एकांतस्थलीं भ्रमरांचा गुंजारव ऐकत व त्यांची क्रीडा पहात टक लावून बसले असतां, भ्रमराची ती कोमेजलेलें फूल सोडून जाण्याची दुष्ट कृति पाहून त्यांना एकदम दुःखाश्रु लोटले व त्यासरशी चंद्रकलेची आठवण होऊन ते मोठ्यानें टाहो फोडून आक्रोश करूं लागले. इतक्यांत अवचित चंद्रकला तेथें येऊन पोहोंचली. पित्याचा आपलेकरितां चाललेला शोक ऐकून ती एकदम पुढें धावत आली. आर्तवीर्यहि चंद्रकला या वेळीं भेटेल तर फार बरें होईल, या इच्छेनें दोन्ही बाहू पसरून

नेत्र मिटून हृदयद्रावक शोक करित होते. हें पाहून चंद्रकला तशीच धावत पुढें जाऊन पित्याच्या बाहूपाशांत पडली. तत्क्षणीं आर्तवीर्य-महाराजांचें दुःख कुठल्याकुठेंच जाऊन ते एकदम आनंदसागरांत डोलूं लागले व चोहोंकडे आनंदीआनंदच जाहला ! ”

असा नाटकाचा सारांश होता. मुख्य मॅनेजर यांजकडे त्या नाटकांतील अतिशय मोठें व महत्त्वाचें ह्मणजे अर्तवीर्यमहाराजांची भूमिका घेण्याचें काम होतें. ते तर असे दुःखाकुल झालेले—तेव्हा आजचा नाटकाचा प्रयोग होतो कसा, अशी त्या असिस्टंट मॅनेजरास मोठी काळजी पडली. नाटकाचीं तिकिटेंहि बरींच खपून प्रयोग सुरू होण्याची वेळ जवळ आली. प्रेक्षकांची खूप गर्दी झाली होती. आतां ही वेळ गप्प बसण्याची नव्हे, मॅनेजर यांस कळविलेंच पाहिजे, असा विचार करून मॅनेजर आपल्या खोलींत स्वस्थ बसले होते तेथें असिस्टंट मॅनेजर हळूच गेला व बोलण्यास सुरुवात करणार, इतक्यांत मॅनेजरच ह्मणाले “ आज कसला प्रयोग आहे ? ”

हा प्रश्न ऐकतांच असिस्टंट मॅनेजर कांपत कांपत “ शेवट तर गोड झाला, ” इतके शब्द गुळमुळत उच्चारून थांबला. हें ऐकून मॅनेजरच्या तळव्याची आग मस्तकास गेली. पण एकहि शब्द न बोलतां ‘ पोटाचा धंदा ’ असे शब्द उसासा टाकित ह्मणून बाहेर चालते झाले.

नाटक मात्र वेळेवर सुरू झालें. मॅनेजराच्या वास्तविक दुःखावेगामुळें त्या नाटकाचें चित्र चांगलें उमटूं लागलें. नाटक सुरू होऊन अर्धेंमुर्धें होऊन गेल्यावर यापुढें प्रेक्षक येण्याची मुळींच आशा नव्हती. असें असून अवचित दोन माणसें—एक स्त्री व एक पुरुष—मोठ्या जागेचीं तिकिटें घेऊन नाटकगृहांत शिरलीं. आंत शिरतां शिरतां दोघांचा खालीं लिहिल्याप्रमाणें संवाद झाला. “ दादा ! इथं तरी बाबा भेटतील का ? ”

“ हो ! इथें भेटतील तर, इथल्याशिवाय दुसरीकडे कोठें भेटायचे ? ”

" मग चल तर लवकर, मला एकदां त्यांचेकडे घेऊन ! "

" अग, पण जरा दम धर. थोड्या वेळानें काय होतें ? "

त्या पुरुषानें म्हणजे त्या स्त्रीच्या आतेभावानें, नाटकमंडळींतील एकदोघांस मॅनेजरची गांठ पडेल का, म्हणून विचारिलें. या वेळेस मॅनेजर कोणास भेटणार नाहींत, ते कामांत आहेत, असें त्याला उत्तर मिळालें. तें उत्तर ऐकून त्या दोघां स्त्रीपुरुषांस आणि विशेषतः त्या स्त्रीस फार वाईट वाटलें. ती प्रेमाच्या भरांत जरी आपल्या बापाला सोडून गेली होती, तरी हा प्रेमाचा नवा कोंब फुटण्यापूर्वींचा बापावरच्या प्रेमाचा कोंब जुनाच होता व तो, जरी हा नवा कोंब फुटून अंमळ दबला होता, तरी पहिला बापावरील प्रेमाचा कोंब अगदीं जळून गेला नव्हता.

हा कोंब मात्र तिच्या दुर्दैवानें अगदीं जळून खाक झाला. तिच्या नशीबाची पुरती परीक्षा झाली. ज्यावर तिचें प्रेम जडलें होतें तो अवचित दुर्दैवाचा घाला पडून अकालीं या जगांतून नाहींसा झाला. यामुळें हाताश झालेली व दुर्दैवानें पुरती पछाडलेली ती स्त्री निराश्रित होऊन दुःखातिशयानें वेडी होऊन गेली होती. तिचा आतेभाऊ, आपल्या भगिनीची अशी दीन दशा पाहून फार शोकाकुल झाला व तिला आपलेकडून होईल ती मदत करण्यास कबूल झाला. पण तिला कोणत्याहि गोष्टीनें बरें वाटलें नाहीं. ज्याला आपलें सर्व जीवित वाहिलें होतें व ज्याच्याबरोबर सर्व आयुष्य सुखासमाधानांत काढण्याचा तिचा कृतसंकल्प होता, तो तिचा आधार—तिचा जीवनधारणाचा मुख्य हेतु—इहलोकींचें सुखाचें दैवत—तोच नाहींसा झाल्यामुळें, तिला या जगांतील संसार असार वाटावा, यांत काय नवल आहे ? अथवा ज्यांत सारच राहिलें नाहीं, तो संसार तरी कसला ! तिच्या संसाराचें सार निघून गेल्यावर तिला सर्व जग निःसार वाटणें साहजिक आहे; म्हणूनच तिला तिच्या भावाचें कोणतेंहि करणें बरें वाटेना. आतां तिचा एक मात्र हेतु राहिला होता, आणि तो

आपल्यावर प्रेम करणाऱ्या आपल्या प्रिय पित्यास एकवार डोळेभरून पहाणें, हाच होय. मनाची ती तळमळ शांत होईपर्यंत तिचें कोठेंच लक्ष्य लागेना व तिला कांहींच सुचेना. आणि ह्मणूनच ती आज आपल्या आतेभावास बरोबर घेऊन बापाला भेटण्यास निघाली व नाटकाचे दिवशीं रात्रीं तेथें येऊन पोहोंचली.

मॅनेजर या वेळीं कामांत असून त्यांची भेट होणार नाहीं, हें ऐकून तिची फार निराशा झाली. नाटक संपेपर्यंत थांबणें भाग होतें. कष्टी मनानें नाटक संपण्याची वाट पहात ती थिएटरांत येऊन बसली.

नाटक बहरांत येऊन प्रेक्षकांकडून टाळ्यांवर टाळ्यांचा वर्षाव होत होता; पण या तरुण स्त्रीचें लक्ष्य तिकडे मुळींच नव्हतें. कांहीं वेळानें शोकभरानें व्याकूळ झालेले आर्तवीर्य महाराज रंगभूमीवर आले. आर्तवीर्याची भूमिका घेणारा मुख्य मॅनेजर खरोखरच दुःखानें व्याप्त असल्यामुळें त्याचें शोकरसाचें काम फारच हृदयद्रावक वठत होतें. चंद्रकलेविषयीं शोक करतां करतां आर्तवीर्य महाराजांची भूमिका घेणाऱ्या या मुख्य मॅनेजराच्या स्वतःच्या दुःखास अनावर उमाळा येऊन खरोखरच तो रुदन करूं लागला. अश्रूंनीं त्यानें आपलीं वस्त्रें भिजवून सोडलीं. या शोकरसाचा प्रेक्षकांच्या मनावरहि पुष्कळच परिणाम झाला. इकडे या तरुण स्त्रीच्या मनाची स्थिति काय झाली होती, याची वाचकांनींच कल्पना करावी! आर्तवीर्य महाराजांच्या भूमिकेंत बाबा यावेळीं चंद्रकलेसाठीं जसा शोक करित आहेत त्याहूनहि जास्त हृदयविदारक विलाप ते रात्रंदिवस ह्या अभागिनीविषयीं करित असतील, असें वाटून ती फारच व्यथित झाली व आतां जाऊन त्यांचे पाय धरून त्यांचें दुःख दूर करावें असे विचार तिच्या मनांत उभे राहून ती वारंवार आपल्या जागेवरून उठत असे, बसत असे, असे एकसारखे तिचे चाळे चालले होते. शेवटीं आर्तवीर्य महाराजांचा शोक इतका अनावर झाला कीं, सारा प्रेक्षकवृंद स्फुंदस्फुंदून रडूं लागला. मग त्या स्त्रीच्या मनाची स्थिति काय झाली असेल हें सांगावयासच नको! आर्तवीर्य महाराज

परमेश्वरास आळवित व दुःखाचा अंत करण्याविषयीं अनन्यभावानें त्याची करुणा भाकित हात पसरून उभे आहेत, हा देखावा पाहून ती स्त्री देहभान विसरून आपल्या जागेवरून उठून धावतच रंगभूमीवर गेली व पडद्यांतील चंद्रकला येण्याच्या पूर्वीच आपल्या पित्याच्या बाहूंत पडून त्याला तिनें मिठी मारली. मॅनेजरानें डोळे उघडून पाहिलें तों पडद्यांत नाटकांतील चंद्रकला उभी आहे! मग ही स्त्री कोण? चकित होऊन त्यानें तिच्याकडे निरखून पाहिलें, तों खरीच ती त्याची प्रिय कन्या! आपल्या प्रिय कन्येच्या भेटीनें झालेल्या आनंदातिशयानें त्याला मूर्च्छा आली व तो आतां खालीं पडणार तोंच नाटकांतील इतर पात्रांनीं त्याला सांवरून शेवटचा पडदा ( ड्रापसीन ) पाडला व नाटक संपाविलें! प्रेक्षकांतून एक स्त्री उठून रंगभूमीवर गेली हा चमत्कार पाहून सर्व प्रेक्षक थक्क झाले व कोणासच ह्या गोष्टीचा उलगडा होईना.

दुसरे दिवशीं प्रसिद्ध होणाऱ्या एका वर्तमानपत्रानें हें नाटकांत नाटक कसें घडून आलें ह्याचें गूढ उकललें पाहून सर्व मंडळांस कौतुक वाटलें.

# आमचीं पत्रें.

पत्र १ ल.

श्री.

फर्ग्युसन कालेज, पुणें,

ता० ३० आक्टोबर १८

अनेक आशीर्वाद विशेष.—

आईचा आणि तुझा निरोप घेऊन बुधवारच्या बोटीनें सांवतवाडीहून निघालों, तो शुक्रवारीं प्रातःकाळीं मुंबईत येऊन पोहोंचलों. लागलीच अकरांच्या गाडीनें येथें आलों. रस्त्यांत कोणत्याच प्रकारचे हाल झाले नाहींत. बोट मुळींच लागली नाहीं. या वेळीं रात्रीचे आठ वाजले आहेत. पुण्यास पोहोंचतांच पत्र पाठवीन असें तुला वचन दिलें होतें, त्याप्रमाणें आतांच हें पत्र लिहायास बसलों आहें.

जानकी ! खोलींतून बाहेर पडते वेळची ती तुझी उदासीन, म्लान आणि विव्हल मुद्रा प्रतिक्षणीं डोळ्यांपुढें एकसारखी उभी राहून हृदय कसें भरून येत आहे ! सांप्रत मित्रमंडळीनें गजबजलेल्या या रेसिडेन्सीच्या इमारतींत मी बसलों आहें खरा, पण मला तुझ्याशिवाय दुसरें कोणीहि दिसत नाहीं ! माझ्या कल्पनाचक्षूला एकसारखी तूं आपल्या निजायच्या खोलींत पलंगापाशीं उभी असलेली दिसत आहेस ! किंचित् मृदुहास्य करित, सप्रेमदृष्टीनें मजकडे अवलोकन करित असलेल्या त्या तुझ्या सुमनोहर मुखाच्या चुंबनलालसेनें * * * पण हा–य ! यावेळीं कुठें तूं, आणि कुठें मी ! मध्यें कितीतरी अंतर !

तुला पत्र लिहावें ह्मणून बसलों आहें खरा, पण ल्याहावें काय, हेंच बरोबर सुचत नाहीं ! टेबलावर कागद, दौतीमध्यें शाई आणि

हातांत पेन, अशा थाटानें बसलों आहें, परंतु पेनाचे पाय कांहीं बरोबर उचलत नाहींत ! येथें आल्याला अझून पुरता प्रहरहि झाला नाहीं, इतक्यांत तुला लिहावा तरी कोणता मजकूर ! तरीहि पत्र लिहूंच नये, अशीहि इच्छा होत नाहीं. एवंच, मोठ्या घोटाळ्यांत पडलों आहें. कांहींहि असो, ज्यापक्षीं पत्र पाठविण्याचें तुला वचन देऊन चुकलों आहें, त्यापक्षीं कांहीं तरी लिहिलें हें पाहिजेच !

जिवलगे ! तूं आतां कांहीं लहान नाहींस. तूं अझून मुलाची आई जरी झाली नाहींस, तरीहि तुझें पोरपण संपून बरेंवाईट जाणण्याची योग्यता तुला आली आहे. स्त्रीचें खरें कर्तव्य काय आहे हें तूं जाणतच असशील. ईश्वराचे दयेनें हा वेळपावेतों आई जिवंत असल्यामुळें घरखटल्याची सगळी काळजी ती वाहत आहे. तुला अझून कांहींएक पाहावें लागत नाहीं. परंतु आई वांचून वांचून आणखी किती वर्षें वांचेल ? जेव्हां ती आपल्याला सोडून जाईल—देव तिला उदंड आयुष्य देवो—त्यावेळीं संसाराचें सारें ओझें तुला एकटीलाच वहावें लागेल. यास्तव आतांपासूनच तूं आपलें कर्तव्य नीटपणें करित राहिलें पाहिजे. संसार ह्मणजे काय आहे, आपल्याला येथें काय काय करावयाचें आहे, कोणाशीं कसें वागलें पाहिजे, नोकरांचाकरांना कसें वागविलें पाहिजे, त्यांच्यावर आपलें वजन कसें बसविलें पाहिजे, गृहधर्म काय आहे, स्त्रीधर्म काय आहे, पत्नीधर्म काय आहे, हें नीटपणें समजून घेऊन त्याप्रमाणें वागण्याविषयीं तूं यत्न केला पाहिजे व हें सर्व तुला आईपासूनच समजण्याजोगें आहे. प्रत्येक गोष्टींत तूं तिचें अनुकरण करित असावें. ती दाखवील त्या मार्गानें जाणें यांतच तुझें व तुझ्या संसाराचें कल्याण आहे. ती तुला जी आज्ञा व जो उपदेश करील तो आदरपूर्वक शिरसा मान्य कर. मुलगी जशी मोठ्या प्रेमानें आईची सेवाशुश्रूषा करिते, त्याप्रमाणें तूं मनापासून तिची सेवाचाकरी करून तिला नेहमीं संतुष्ट ठेव. तिचे आशीर्वाद हेंच आपणां उभयतांचें मंगल आहे. आपल्या एखाद्या अयोग्य शब्दानें, किंवा अवहेलनेच्या कृतीनें

तीं एखादा निश्वासहि जरी टाकील, तर खात्रीनें सांगतों, त्यापासून आपल्याला अनेक दुःखें भोगावीं लागतील. वडिलांचें मन दुखविल्यास खरोखर तें महान् अमंगल आहे ! सासूला प्रसन्न ठेविलीस तरच तुला सुखाआनंदानें संसारयात्रा करतां येईल. परंतु तुझें एखादें कर्कश किंवा मर्मभेदक वाक्य तिच्या नेत्रांत एकच बिंदु अश्रु आणील, तर जानकी ! तूं निश्चयपूर्वक समजून ऐस, हा एक बिंदु, चक्रवाढीनें सहस्रबिंदूंचें रूप धारण करून क्षणोक्षणीं तुझ्या दोन्ही नेत्रांतून बाहेर पडून तुझें वक्ष भिजवून तुला विव्हल करील ! वडिलांचा कोप महा अनर्थाचें मूळ आहे !

आज याहून अधिक लिहित नाहीं. तुझ्याकडून पत्राचें उत्तर लवकरच येईल अशी आशा करितों. उत्कंठा फार लागली आहे. पत्र कसें लिहावें हें मीं तुला येते वेळीं समजून सांगितलेंच आहे व माझ्या पत्त्याचीं पंचवीस पाकिटेंहि तुझ्याजवळ देऊन ठेविलीं आहेत. तीं संपल्यावर इकडून दुसरीं पाठवून देईन. इकडील वर्तमान ठीक आहे. माझ्याविषयीं मुळींच काळजी करूं नको. आईच्या व आपल्या प्रकृतीस नीट जपत जा. वरचेवर पत्रद्वारें खुशाली कळीव.

घरून निघते वेळीं तूं जी उदास दिसत होतीस व डोळे भरून आणले होतेस, तशी नेहमीं राहूं नको. आनंदानें गृहकार्य करित रहा. पत्राचें उत्तर मात्र विलंब न लावितां पाठीव, हे आशीर्वाद.

सर्वस्वी तुझाच,

**सदाशिव.**

उत्तर

**श्री.**

सांवतवाडी, ता० ३ नवंबर १८—

सेवेशी वीज्ञापना वीशेश,

आपल्या कडून आले पत्र पावले. पत्र वाचूण मला फार आनद झाला तो पत्री लिहिये नाही. आपलं ईंकडून जाणं झाल ते दिशी

रात्रभर झोप आली नाही. दुसरे दिशीं सकाळी ऊठ वर घरामधे सगळे ओके दिसु लागले. काम करण्यास सूचत नवते. आपल्या खोलीकडे पाहिलें ह्मणजे माज्या पोटात धसका बसावा. परंतु आपल्या कडून आले पत्र पाहुच फार समाधान झाले. वाटेत आपल्याला मुळिच त्रास झाला नाही हे वाचूण फार आनद झाला येकटेच कोणा सोभत वगेरे नसता जाण झाल होत या मुळ जिव एक सारखा खालीवर होत होता. देवी शांतादुर्गाच्या आशीवादानें ती चिंता दुर झाली. सासू बाईशीं ज्या रीतीनें वागण्याविषी आज्ञा केली आहे त्याप्रमाणें वागण्यामधें कधीही अंतर करणार नाहीं. त्या माज्यावर किति तरी माया करीतात ईतकी माजी आई दिसील माज्यावर करीत नाही की नाही सांगता ये नाही. मला ज्या पासून सूक होईल आणि संवसाराच काम सूळीत पणान चालेल अस करण्याकड त्या फार झटत असतात. एखाद्वेळी माझ्याकडुन काही चुक झाल्यास ती त्या समजून देतात व हासत मुद्रेन चांगला उपदेश करीतात. आशा प्रकारान त्या माझ्याशी आईप्रमाण वागत असता मी त्यांच्याशी भलत्या रीतीनं वागले व नाही नाही ते बोलुन त्यांच मन दूखीवलं तर मग नरकातच जाव लागेल. माझ्या कडुन असो वाईट आचरण कधीच न होण्या मी यतन करीन. हे माझ पहीलच पत्र. इतके दिसात मी कधी पत्र लीहील नाही. या मुळ हा कापतो आहे. जासती लीहीवत नाही. हे लीहायावस तीन कादं फाडावे लागले. तरीही या पतरात शाहीचे डाग पडले आहेत याबद्दल फार वाईवाटते. रागाऊ नये. घरातल सर्व खूशाल आहे वरच्यावर पत्र पाठवीत असावे हीच चरणाशी नम्र विनंती आहे.

आपली नम्र दासी,

**जानकी.**

पत्र २ रें.

**श्री**

फर्ग्युसन कॉलेज, पुणें.
ता० १० नोवेंबर १८—

अनेक आशीर्वाद विशेष.—

तुझें ता० ३ नोवेंबरचें पत्र पोंचलें. तुझ्या सुकुमार हस्तानें लिहिलेलें पत्र, पोस्टाच्या शिपायानें माझ्या हातीं आणून देतांक्षणीं मला जो आनंद झाला, असा आनंद, आजपर्यंत कधींहि झाला नव्हता ! पाकीट फोडून आंतील मजकूर वाचण्यास मी इतका अधीर झालों × × इतक्या लवकर तूं पत्राचें उत्तर पाठविशील, अशी मीं स्वप्नांत देखील कल्पना केली नव्हती ! तुझें चिमुकलें सुंदर पत्र, मीं पुनः पुनः कितीतरी वेळ वाचलें व दरेक वेळीं मला आनंदच वाटला ! असो.

आपण आपल्या हातानें लावलेल्या व दीर्घ काळपावेतों मोठ्या काळजीनें आणि जोपासनेनें वाढविलेल्या वृक्षाचें फळ ज्याप्रमाणें अत्यंत प्रिय आणि मिष्ट लागतें, तद्वत तुझें आजचें हें पत्र मला कितीतरी सुखप्रद आणि प्रिय वाटत आहे ! आज मला मागल्या कितीतरी गोष्टी आठवत आहेत. तीन वर्षें झालीं. आपण उभयतां पवित्र अशा विवाहसंबंधानें एकत्र झालों. लग्न झाल्यावर सरासरी एक वर्षपावेतों तुझी माझी प्रत्यक्ष भेट किंवा यत्किंचितहि बोलाचाल झाली नव्हती. तूं कशा स्वभावाची स्त्री आहेस, तुला लिहितांवाचतां येतें कीं नाहीं, येत असल्यास कितपत येतें, तूं आजपर्यंत कोणकोणतीं पुस्तकें वाचलीं आहेस, कोणत्या गोष्टींकडे तुझा विशेष कल आहे, याविषयीं मला कांहीं माहीत नव्हतें. दुसरे जें कांहीं सांगत त्यावरच मनाची जिज्ञासा तृप्त करावी लागे; परंतु त्या सांगण्यानें व्हावें तसें समाधान होत नसे. पुढें तुझी माझी जेव्हां प्रथमभेट झाली, त्या वेळीं मला कळून आलें कीं, तुला तर फक्त मुळाक्षरें आणि बाराखड्या एवढेंच कायतें येत होतें ! मला वाटत होतें कीं, तूं बरीच शिकलेली असावीस ! परंतु त्या रात्रीं माझा

तो सर्व श्रम दूर झाला! त्याच रात्रीपासून तुला शिकविण्यास मीं आरंभ केला. पहिल्यानें तुला आणि मलाहि बराच त्रास पडला खरा, परंतु कितीहि विघ्नें आलीं तरी माघार ही घ्यावयाची नाहीं, असा मनाचा दृढ संकल्प असल्यामुळें ईशकृपेनें त्या सर्व श्रमांचें आज साफल्य झालें!

एक दिवस तुझ्यासाठीं मीं नवीन पुस्तक विकत आणलें होतें. तें पाहून तूं एकदम चकित होऊन, ह्मणालीस "अग बाई! हें घेऊन मी काय करूं? एवढं कठीण पुस्तक तीनवर्षांतहि माझ्यानं वाचून होणार नाहीं!" परंतु तेंच पुस्तक वाचून संपायला पुरते तीन महिनेहि लागले नव्हते!

या सगळ्या गोष्टी या वेळीं माझ्या डोळ्यांपुढें एकसारख्या उभ्या राहत आहेत. तूं झटून अभ्यास करावास ह्मणून मीं तुझ्यामागें एकसारखा तगादा लाविला होता; परंतु दिवसा खोलीमध्यें माझ्यापाशीं बसून शिकतांना तूं पराकाष्ठेची लाजत असस. घरांतील इतर मंडळीदेखत माझेबरोबर भाषण करावयासहि तुला फार शरम वाटे. मीहि मनांत विचार करीं, जाऊं द्या, आपल्या लोकांचे रिवाजच तसे विचित्र पडले! आणि याच अडचणीमुळें मला कधीं कधीं दोन दोन वाजेपर्यंत जागरण करावें लागे! आज माझे ते सर्व कष्ट, सर्व परिश्रम आणि तीं सर्व जागरणें सुफलित झालीं, असें मी समजतों!

तुझ्या या प्रथमच्या पत्रांत बऱ्याच चुका झाल्या आहेत. बहुतेक शब्दांतल्या अक्षरांचा तूं फराळ केला आहेस! शुद्धाशुद्धतेकडे मुळींच लक्ष्य पुरविलें नाहीं. विरामचिन्हांची आणि अनुस्वारांची तर कत्तल उडविली आहे! यांशिवाय दुसरेहि कित्येक प्रमाद घडले आहेत. या सर्वांचें कारण, तूं पत्र पुन्हा बरोबर वाचून पाहिलें नसावें, असें वाटतें. तरी आतां याबद्दल खबरदारी घे. पत्र लिहून झाल्यावर तें एकवार लक्ष्यपूर्वक वाचून पहावें व चुकांची दुरुस्ती करावी ह्मणजे बरेच दोष नाहींसे होतील. तरी एकंदरींत तूं पत्र चांगलें लिहिलें आहेस. तुझ्या योग्यतेच्या मानानें पाहतां, आंतील दोष विशेष महत्त्वाचे नाहींत. इतक्या थोडक्या वेळामध्यें तूं जो आपल्या मनांतील आशय स्पष्ट कळण्याजोग्या

भाषेनें लिहूं शकलीस, हेंच कांहीं थोडेंथोडकें नव्हे! तुझ्या शिक्षणाच्या मानानें हें किती तरी जास्त आहे असें मी समजतों. असाच प्रयत्न करित राहिल्यास दिवसेंदिवस तुझी याहूनहि सुधारणा होईल, हें उघड आहे.

मी इकडे पूर्ण आनंदांत आहें. माझी कोणतीच अडचण नाहीं. माझेविषयीं कसलीहि काळजी करण्याचें प्रयोजन नाहीं. मी इकडे येतेवेळीं तुला वाचायाला दिलेलें पुस्तक इतक्यांत वाचून संपलेंच असेल. तरी त्याबद्दल पुढील पत्रीं लिहून कळीव. आजरोजीं 'रामविजया'चें एक पुस्तक पोस्टांतून पाठविलें आहे. पूर्वीचें पुस्तक वाचून संपतांच हें एक वेळ अवश्य वाच. या पुस्तकांत श्रीरामाचें चरित्र सोप्या भाषेमध्यें वर्णिलें आहे. ह्या पुस्तकाच्या वाचनापासून वाचणाराच्या मनावर सुसंस्कार झाल्याविना राहणार नाहीं. पुस्तकाचा मोठा आकार पाहून, किंवा यांत काय असणार अशी खोटी कल्पना करून, हें वाचण्याची मात्र हयगय करूं नकोस. तूं हें लक्ष्यपूर्वक आणि दृढ निश्चयानें वाचूं लागलीस, ह्मणजे तुझ्या अनुभवास येईल कीं, हें खरोखरच मोठें मनोहर पुस्तक आहे! यामध्यें उपदेशपर आणि हृदयंगम अशा अनेक सुंदर सुंदर कथा आहेत. एखाद्या पुस्तकाचीं चारदोन पृष्ठें वर वर चाळून कठीण आहे असें वाटतांच तें वाचण्याचें सोडून दिलें, तर कांहींहि होणें नाहीं. निश्चयपूर्वक आणि मन लावूनच पुस्तकाचें अध्ययन केलें पाहिजे. कोणतेंहि पुस्तक असो, तें वाचतेवेळीं त्यांतील आशय आणि वाक्यरचना यांकडे विशेष लक्ष्य पुरवावें. जें पुस्तक वाचण्याकरितां हातीं घ्यावयाचें, तें एकाग्रतेनें वाचावें, केवळ त्याचीं पानें वर वर चाळलीं ह्मणजे झालें नाहीं. पुस्तकाचें इद्गत समजून घेतलें पाहिजे. पुस्तक लिहिण्यामध्यें लेखकाचा उद्देश काय तें ध्यानांत आणलें पाहिजे. भाषा आणि लेखनशैली यांकडेहि नजर पुरविली पाहिजे. एवंच, गुणदोषांचें पुरतेपणें परिशीलन केलें पाहिजे. याप्रमाणें सर्व गोष्टींकडे

लक्ष्य पुरवून फक्त एकच पुस्तक वाचल्यापासून जी ज्ञानप्राप्ति होईल, तिची सर, वरवर वाचलेल्या पन्नास पुस्तकांनांहि येणार नाहीं !

आईसंबंधीं लिहिलेली हकीगत वाचून फार संतोष वाटला. आईवर तुझी पूर्ण भक्ति आहे, प्रत्येक गोष्टीमध्यें तूं तिचें अनुकरण करित असतेस, नेहमीं तिच्या उपदेशाप्रमाणेंच वागतेस, कधींहि तिच्या आज्ञेबाहेर जात नाहींस व तिला तूं सख्ख्या आईप्रमाणें मानून तिच्यावर फार प्रेम ठेवितेस, हें ऐकून मला कां बरें आनंद वाटणार नाहीं ? परंतु जानकी ! तूं ही गोष्टहि पण ध्यानांत ठेव कीं, फक्त सासूशीं असें आचरण ठेविल्यानेंच कर्तव्य संपूर्ण होत नाहीं ! आपल्या घरांतील लहानथोर मंडळीशीं, शेजाऱ्यापाजाऱ्यांशीं व चाकरनोकरांशींहि योग्य रीतीनें वागणें अवश्य आहे. आपल्या पदरीं असलेल्या चाकरांशीं मर्यादेनें वागून त्यांच्या सुखाकडेहि नजर ठेविली पाहिजे. मात्र या लोकांशीं कारणापुरताच संबंध ठेवावा. उगीच चवचळपणा करित बसूं नये. कित्येक मूर्ख स्त्रिया, नोकरांचाकरांशीं इतका सलगीचा व्यवहार ठेवित असतात कीं, पुढें त्यांनां त्यांच्याकडून सर्वांसमक्ष अपमान पावण्याची पाळी येते. चाकरांशीं सलगी असली, ह्मणजे सेवकाच्या ठिकाणीं जी एक प्रकारची भीति असली पाहिजे, ती राहत नाहीं. अर्थात्, पदोपदीं, हुकुमाचा अनादर होऊन मानखंडनाहि होते. यास्तव सेवकांशीं मर्यादेनेंच वागावें. आतां लवकरच संसाराचें सारें ओझें तुझ्या शिरावर पडावयाचें आहे, ह्मणून तुला या बारीकसारीक पण लक्ष्यांत ठेवण्याजोग्या गोष्टी सुचवित आहें. आतांपासून तूं सावध राहून आपलें कर्तव्य योग्य प्रकारें बजाविण्यास तयार राहिलें पाहिजे.

आज इतक्यावरच आटोपतें घेतों. पुढें दुसऱ्या खेपेस सविस्तर लिहीन. हे आशीर्वाद.

सर्वस्वी तुझाच,

**सदाशिव.**

---

उत्तर.

श्री.

सावंतवाडी, ता० १५ नवंबर, १८—

शेवेशी वीज्ञापना विशेश.

आपण पाठविलेले पत्र पोचून मला आनंद झाला. ते वाचीत होते तेव्हां डोळ्यांतून आनंदाचे अशरू वाहत होते. त्यामधें असलेला ऊपदेश कीतीतरी पूष्कळ होता. पयल्या पयल्यानें आपल पत्र आल ह्मणजे माला कीनाई मोठी लाज वाटे होती. आतां आपल पत्र केवा येऊन माला वाचण्याला मिळेल असी ऊतकंठा लागती. आपण लवकर लवकर पत्र पाठवीता ह्याबद्दल फार आनंद वाटतो. आपल पत्र आल ह्मणजे जीतका आनंद होतो, पत्राचे ऊत्तर लीहवास बसले ह्मणजे तो सगळा मनांत जीरून जातो. आपल्यास पत्र लीवास बसली ह्मणजे माझ्या मनांत.ईतके कांहीं वीचार येत असतात की ते बरोबर येत लिहायास नाहीं. मनात राहून जातात. माला आझून शुद्ध लिहायास येत नाही. आक्षर फारच खराब आणि दुसऱ्याही अनेक चूका होतात ह्मणून मोठी लाज वाटती. राग एजार नाही असी प्रारथना करीते.

आपण पाठवीलेले रामविजय पुस्तक वाचीत आहे. पुस्तक मोठे सुंदर आहे. माला फार आवडतें. मी मोठी नशीबाची'ह्मणूनच आपल्या सारखा भाग्यवान पती माला मिळाला आहे * * * * सासूबाई खूशाल आहेत. जाउबाई केव्हा केव्हा त्याना फार दुःख देतात ते पाहून माला फार वाईट वाटते. काय करावे ? माज्याकडून होईल तीतके करून मी त्यांच्या मनाची समजूत करीते माज्यावर त्याच फार प्रेम असल्यामुळ मीं सांगीतलेल त्या आयकतात. आपल पत्र आल की नाही वारंवार वीचारतात त्यावेळी माला मोठी लाज वाटती खुशाल आहेत ईतक बोलून मी खाली मान घालते. सासूबाई आपली खुशाली कळण्याबद्दल फार काळजी करीतात करीता आपण वरचेवर पत्र पाठवीत असावे. तीकडे खुशाल असले बद्दल लीहीता

परंतु आमाला तें खरें वाटत नाही. कालीजालारजा केवां पडेल आणी आपण ईकडे केवा याल ते लीहावे. ईकडी खुशाल आहित.

शेवेशी श्रूत होय हे विज्ञापना

आपली चरणाची दासी
जानकी.

पत्र ३ रें.

**श्री.**

फर्ग्युसन कॉलेज, पुणें.
ता० १५ एप्रील १८.

अनेक आशीर्वाद विशेष.—

तुझें पत्र काल संध्याकाळींच मिळालें. परम आल्हाद झाला. आज सहासात महिने, तूं मला पत्रें पाठवित आहेस. दरम्यान केव्हां केव्हां पत्र पाठविण्याच्या कामीं तूं फारच दिरंगाई करून मला बरेच कष्ट दिल्यामुळें मीं कधीं कधीं तुझा थोडासा तिरस्कारहि केलेला मला आठवतो. प्रवासांत असल्यावेळीं प्रियजनांकडून पत्र येण्यास विलंब लागला असतां पराकाष्ठेचे कष्ट होत असतात, ही गोष्ट तूं आतां तरी नीट ध्यानांत ठेव.. मागें झालें तें झालें, हल्लीं दोनतीन आठवड्यांपासून तूं त्वरेनें पत्रोत्तर पाठवित असतेस, हें पाहून मनाला सुख वाटतें. मला दृढ आशा आहे, इत्युत्तर तरी, तूं कधींहि पत्राचें उत्तर पाठविण्यास विलंब करून प्रवासामध्यें माझें वियोगदुःख द्विगुणित करणार नाहींस.

ह्या खेपेचें पत्र तूं अति त्वरेनें पाठविलें आहेस खरें, परंतु तें पाहतांच स्पष्टपणें दिसून येतें कीं, तें अगदीं उतावळीनें एकदा कसें तरी खरडून टाकलें आहे. जागजागीं डाग काय पडले आहेत ! खोडाखोडीची गोष्ट तर विचारूंच नये ! कित्येक ओळी तर अगदीं हातघाईवर येऊन ऐकमेकींवर तुटून पडल्या आहेत ! चुकाहि बऱ्याच राहिल्या

आहेत. कित्येक शब्द अर्धेच राहून गेले आहेत. कित्येक अक्षरांचे काने तर कित्येकांच्या मात्रा, कित्येकांचे अनुस्वार तर कित्येकांच्या वेलांट्या, यांचा कुठें पत्ताच नाहीं ! कित्येक ठिकाणीं दोन दोन तीन तीन शब्द जोडूनच लिहिले गेले आहेत ! बरें, इतकी घाई करून मीं विचारलेल्या प्रश्नांचा खुलासा तरी निदान करावयाचा होता, तर तोहि नाहीं ! माझ्या कित्येक प्रश्नांला मुळीं उत्तरच नाहीं ! याचें कारण काय बरें ? मला वाटतें, पत्राचें उत्तर लिहितेवेळीं तूं माझें पत्र पुन्हा एकवार नीट लक्ष्य लावून वाचित नाहींस आणि यामुळेंच हें कांहींच्या कांहींच लिहिलें आहेस. यापुढें तरी असें दुर्लक्ष्य आणि अशी हयगय होणार नाहीं, अशी मी आशा करितों.

जानकी ! तुझ्या प्रत्येक पत्रांत कालेजाला सुटी कधीं होणार व मी घरीं कधीं येणार, हा प्रश्न असतो ! माझ्या भेटीकरितां खरोखरच का तूं इतकी अधीर झाली आहेस ? माझ्या दर्शनासाठीं जर तूं खरोखरच इतकी आतुर असशील तर मी तुझ्याशीं निष्ठुरपणानें वागून तुला कधींहि विव्हल करणार नाहीं ! परमेश्वर सती—साध्वी स्त्रियांची मनोवांच्छा पूर्ण करितो, तो तुझीहि मनकामना लवकरच पूर्ण करील ! कालपर्यंत माझा विचार या सुटीमध्यें घरीं येण्याचा नव्हता. एका स्नेह्यानें मला फारच आग्रह केल्यामुळें त्याचेबरोबर कोल्हापुर येथें त्याच्या घरीं जावें असा आम्हां उभयतांचा बेत ठरला होता; परंतु मी घरीं न आल्यास तुला फार दुःख होईल, यामुळें तो विचार मीं रद्द केला आहे. शिवाय, आतां रजेचे दिवस जसजसे जवळ येत आहेत, तसतसे मनांत घराकडील विचार जास्त जास्त उभे राहत आहेत. क्षणोक्षणीं तुझें तें मनोहर सुहास्यवदन डोळ्यांसमोर येऊन तुला भेटण्याची अनावर इच्छा प्रबल होत आहे. आतां कायते तीन आठवडेच मध्यें आहेत. तरीहि हा काल तीन वर्षांहूनहि जास्त भासत आहे !

परंतु हो ! तुला एक विचारावयाचें आहे. मी तिकडे आल्यावर सर्व दिवसांत तुझें दर्शन तरी होईलका ? मला पाहिल्याबरोबर तूं लज्जेनें सातां समुद्रांच्या पलीकडे जाऊन लपून तर नाहींना बसणार? 'दिवसाढवळ्या नवऱ्यापाशीं बसून स्त्रीनें प्रेमानें गोष्टी बोलणें हें काय कुलीन स्त्रीचें लक्षण ?' वेडी ! वेडी ! पतिपत्नींचा परस्परांशीं अत्यंत पवित्र संबंध आहे. त्यांत यत्किंतहि अपवित्र भाव असणें उचित नाहीं ! असें असतां, आपल्या अत्यंत प्रियकर सुहृदाजवळ मोकळ्या मनानें बोलण्याचालण्यांत मनामध्यें लज्जा कां उत्पन्न व्हावी ? यांतील गूढ निदान मला तरी बरोबरसें उलगडत नाहीं ! पतिपत्नींमध्यें अशा प्रकारची निष्कारण चोरी राहिल्यानें त्यांच्यांत अपवित्र संबंध उद्भवण्याचा मात्र संभव आहे. यास्तव ही अत्यंत निंद्य चाल मोडून टाकणें प्रत्येक समंजस पतिपत्नीचें आद्य कर्तव्य आहे व माझी पक्की खात्री आहे कीं, निदान माझी सहचरी तरी या वृथाजनलज्जेला झुगारून देण्याजोगी सुशिक्षित झाली आहे !

लज्जा ही स्त्रीवर्गाला अलंकाराप्रमाणें भूषविणारी आहे, हें मला सम्मत आहे व त्याचप्रमाणें लज्जाहीन होणें हा ललनागणाला एक मोठाच कलंक आहे, ह्यांतहि तिळमात्र संदेह नाहीं ! हें सर्व जरी खरें आहे, तरीहि, अनावश्यक लज्जाशीलतेच्या पायीं आपल्या कर्तव्याची अवहेलना करावी, हें मात्र कधींहि प्रशंसनीय होणार नाहीं. या बाबतीसंबंधीं पत्रामध्यें विशेष लिहिण्यास अवकाश नाहीं. तरी मला जें कांहीं सांगावयाचें आहे तें मी तुला समक्ष भेटीअंतींच सांगेन.

प्रत्यक्ष भेटीच्या वेळीं सांगूं, या आशेवर आजपर्यंत किती वेळां कितीतरी गोष्टी या हृदयांत सांठवून ठेविल्या असतील. रजेमध्यें कैक वेळां घरींहि गेलों असेन, परंतु तेथून पुन्हा पुण्यास आल्यावर पहावें तों मनांतल्या सर्व गोष्टी मनांतच राहिलेल्या ! पुष्कळ वेळीं दुसऱ्या कसल्या तरी गोष्टी बोललों असेन, परंतु मनामध्यें सांठवून ठेवलेली गोष्ट म्हणून आपली हटकून विसरायचाच ! मजप्रमाणेंच कितीतरी पती, आपल्या

प्रिय कांतेला उपदेशामृताचा लाभ करून देण्याचे मनांत बेत करित असतील, परंतु काय उपयोग ! पतिपत्नींची एक वेळ भेट झाली पुरे, परस्परदर्शनसौख्यामुळें त्यांच्या मनांतील इतर सर्व संकेत फार नष्ट होऊन तीं स्नेहानें वेडींच बनून जातात !

आज स्वच्छता व कपडेलत्ते यांसंबंधीं दोन शब्द लिहित आहें, हे नीट वाचून ध्यानांत ठेव. मनुष्यानें आपलें शरीर, वस्त्रपात्र, राहण्याची जांगा व इतर वस्तु स्वच्छ आणि नीटनेटक्या न ठेवणें हा मोठा दोष आहे. ईश्वरानें आम्हांला जें हें सुंदर शरीर दिलें आहे; आणि तें सजविण्याकरितां जीं उत्तमोत्तम वस्त्रप्रावर्णें दिलीं आहेत, तीं आह्मीं अव्यवस्थितपणानें वागून त्याचा दुरुपयोग करण्याकरितां कीं काय ? कित्येक मूढ स्त्रियांनां वाटतें कीं, शरीर, वस्त्रपात्र मळीण असणें, पोषाख, कपडालत्ता अव्यवस्थित असणें, हें एक गौरवाचेंच लक्षण आहे ! त्या दुसऱ्यांशीं बोलतांना कधीं कधीं अशा आशयाचे उद्गार काढतात " काय करावें हो ! हें मेलं काम ह्मणून कांहीं संपत नाहीं व घडीभर फुरसत मिळत नाहीं कीं नीटनेटक्या पोषाखाकडे व स्वच्छतेकडे लक्ष्य देईन ह्मणेन तर ! "

जानकी ! तुझ्या कानींहि कित्येकांच्या तोंडून असे उद्गार पडेल असतील; परंतु मी अगदीं निक्षून सांगतों, ही गोष्ट अगदीं झूट आहे ! जिला स्वच्छतेची मनापासून आवड आहे, ती हजार कामें करूनहि निर्मळ आणि व्यवस्थितपणानें राहूं शकेल. जी स्त्री एक काम करण्याच्या भरांत दुसरीं कामें पार विसरून जाते. तिला कोणतेंहि काम शिस्तवार रीतीनें करतांच येत नाहीं, असें समजावें.

कित्येक स्त्रियांचा तर असा मूर्खपणाचा समज असतो कीं, आपलें शरीर आणि वस्त्रें अमंगळ राखल्यानें लोक आपल्यास कार्यतत्पर आणि निरालस ह्मणतील ! ' मुलगी पण मुलगी हो ! कामापुढें बिचारीचें शरीराकडे लक्ष्य नाहीं, कीं कपड्यालत्त्यांकडे बारकाईनें पाहत नाहीं ! नाहींतर ती—तिला नटण्याथटण्यालाच तीन दिवस पाहिजेत !'

अशा प्रकारची लोकांकडून घातुक प्रशंसा संपादन करण्याकरितां ज्या आपलें शरीर आणि वस्त्रपात्र अमंगळ राखतात, स्वच्छतेकडे यत्किंचितहि लक्ष्य पुरवित नाहींत, आपल्या स्वास्थ्याचा भंग करितात, त्यांनां मूर्ख, आत्मघातकी व पापी ह्मणूं नये तर काय ह्मणावें ? ज्यांचा देह अमंगळ, ज्यांचा पोषाख अमंगळ, त्यांचें मन तरी मंगळ-शुद्ध-पापरहित कसें असूं शकेल ? ज्याला बाह्य पवित्रतेची आवड नाहीं, त्याला अर्थात् आंतरपवित्रतेचीहि नसावयाचीच ! अर्थात्, ती स्त्री पापीच समजली पाहिजे. ज्याचें शरीराकडे लक्ष्य नाहीं, नीटनेटकेपणाकडे दृष्टि नाहीं, तें मनुष्य नव्हे, पशूच समजलें पाहिजे ! परंतु पशु देखील आपल्या शरीराची फार काळजी घेतात !

हें सर्व मीं तुलाच उद्देशून लिहिलें आहे असें समजून तूं मनांत भलताच विकल्प आणूं नकोस. तुला स्वच्छतेची फार आवड असून अव्यवस्थितपणाचा तर तुला अत्यंत तिटकारा आहे, हें सर्व मला ठाऊक आहे. तरीहि निरोगी मनुष्यानें आपल्याला बिलकूल रोग होऊं नये ह्मणून प्रथमपासून फार खबरदारी घेतली तर त्यांत कांहीं गैर का आहे ? असो. पत्र बरेंच लांबलें. आणखी लांबवून तुला कंटाळा आणित नाहीं. आज इतक्यावरच आटोपतें घेतों, हे आशीर्वाद.

सर्वस्वी तुझाच,
**सदाशिव.**

उत्तर

**श्री.**

सावंतवाडी, ता. १८ माहे एप्रील, १८—

शेवेशीं विज्ञापना विशेष.

आपलें ता. १५ चें पत्र पोंचून परमानंद झाला. पूर्वीं कित्येक पत्रांचीं उत्तरें पाठविण्यांत मजकडून बराच विलंब झाल्याबद्दल आपल्यास माझा फार राग आला होता व मागचें पत्र घाईघाईनें लिहिल्या कारणानें त्यांत बरेच दोष राहेले, यामुळेंहि आपल्याला किंचित्

राग आल्यासारखें दिसतें, तरी या सर्व अपराधांबद्दल मी आपल्यापाशीं दोन्ही हात जोडून क्षमा मागतें. यापुढें असें न होण्याविषयीं माझ्याकडून होईल तितका प्रयत्न करीन. गडे! एक वेळ मला क्षमा करायचें होईलना?

आतां लौकरच रजा होईल हें ऐकून तर माझें मन आनंदानें एक-सारखें नाचत आहे! आतां लौकरच आपल्या भेटीच्या लाभानें माझ्या डोळ्यांचें पारणें फिटेल, हा विचार मनांत येतांच हृदय कसें अगदीं उचंबळून गेलें आहे! या सुटीमध्यें घरीं येण्याचा पूर्वी आपला मानस नव्हता, असें आपल्या पत्रावरून दिसून येतें. फक्त माझ्या-करितांच आपण घरीं येत असाल तर तसें करण्याचें प्रयोजन नाहीं. फक्त माझ्या सुखाकरितांच आपण आपल्या कर्तव्याची हेळसांड करावी, असें मी कधींहि सांगणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर माझ्यामुळेंच आपल्याला एखाद्या कामीं अडचण आली असें माझ्या कानीं आल्यास त्यापासून मला अत्यंत दुःख होईल. यास्तव दासीची चरणांपाशीं एवढीच नम्र विनंति आहे कीं, माझ्या विनवणीकडे लक्ष्य देऊन, किंवा मला सुख व्हावें ह्मणून, आपण आपल्या कर्तव्याची कधींहि उपेक्षा करूं नये.

काल रात्रीं मला एक सुंदर स्वप्न पडलें. सासुबाई नी मी माडीवरल्या खोलींत एका बिछान्यावर निजलों होतों. लौकरच मला झोंप लागली. मला असें दिसलें कीं, आपण माझ्या शेजारीं बसलां आहां व मधुर मधुर गोष्टी सांगून माझें मन रिझवित आहां! किती मनोहर तें त्या वेळचें आपलें मुख, आणि किती उत्तम तो उपदेश! पुढें आपण खिशांतून आपलें सोन्याचें घड्याळ काढून टेबलावर ठेवण्या-करितां माझेजवळ दिलें. मी तें ठेवण्याकरितां मोठ्या गडबडीनें टेबला-पाशीं गेलें; परंतु दुर्दैवानें तें हातांतून निसटून खालीं पडलें व त्याची कांच फुटली! त्यासरशी माझी अवस्था काय झाली ह्मणून सांगूं? भयानें एकदम दचकून मी जागी झालें व पहातें तर काय?--आपली

ती मनोहर मूर्तीहि नाहीं नि घड्याळहि नाहीं! सर्वच मिथ्या! मग मला फार दुःख झालें व मन अगदीं अस्वस्थ होऊन गेलें! या स्वप्नाचा अर्थ काय बरें गडे! मला कळवायचं होईल का? मला त्या वेळीं वाटलें, देवानें हीं स्वप्नें जर खरींच केलीं असतीं, तर मनुष्याला दुःख म्हणून कधींहि आलें नसतें! त्या वेळीं रात्रीचे तीन वाजले होते. मला कांहीं नंतर चांगलीशी झोंप आलीच नाहीं. उगाच या कुशीवरून त्या कुशीवर, त्या कुशीवरून या कुशीवर लोळत होतें.

घरीं येणें झाल्यावर दिवसाची मी भेटेन कीं नाहीं, म्हणून विचारायचें. आपणच सांगा, यावर मी काय बरें उत्तर लिहूं. आपण मला जो सदुपदेश केला आहे व प्रत्यहीं जो सुमार्ग दाखवित आहां, त्याच उपदेशाप्रमाणें व त्याच मार्गानें मी जाईन. त्याच्याविरुद्ध आचरण मजकडून ज्या दिवशीं घडेल, परमेश्वर करो आणि तोच दिवस माझा या जगांतील अखेरचा होवो!

पत्राच्या शेवटीं लिहिण्यांत आलें आहे कीं 'पत्र बरेंच लांबलें, आणखी लांबवून तुला कंटाळा आणित नाहीं.' कसली बरें थट्टा ही गडे! आपल्याला वाटत तर नसेलना, आपलीं लांब लांब पत्रें वाचण्याचा मला कंटाळा येत असेल म्हणून? आपल्या मनाला ही चमत्कारिक कल्पना शिवली तरी कशी, याचेंच मला मोठें आश्चर्य वाटत आहे! आपल्या कोणत्याहि पत्राचें, निदान चारपांच वेळां तरी पारायण केल्याशिवाय, माझ्या मनाची म्हणून कधीं तृप्ति होत नाहीं! खरेंच सांगूं का मी, आपण असें कां लिहिलेंत तें? पण आपल्याला राग नाहींना येणार? आपण आपल्या मनांतलीच खरी गोष्ट लिहिली आहे. माझीं वेडींविद्रीं, हजारों चुकयांनीं भरलेलीं व हजारों डाग पडून बोजड दिसणारीं पत्रें वाचतांना आपल्याला कंटाळा येत असला पाहिजे. तेव्हां आपल्या मनाच्या स्थितीवरून मलाहि तसाच कंटाळा येत असावा, असें आपल्याला वाटलें असावें; परंतु मजकडून असें कालत्रयींहि घडणार नाहीं! आपल्या पत्रांपासून मला जितका आनंद होतो, तितका दुसऱ्या कशा-

नेंहि व्हावयाचा नाहीं ! पत्र वाचूं लागलें म्हणजे मला असें वाटूं लागतें कीं, जणों आपण स्वतःच माझ्याजवळ गोष्टी बोलत आहां ! कधीं कधीं तर माझेपाशीं असलेली आपली रम्य तसबीर मी पत्र वाचते वेळीं माझ्यापुढें घेऊन बसतें. अहा ! त्यावेळीं मला जें अप्रतिम सुख होतें, त्याची कल्पना तुह्मां पुरुषांनां कधींहि होणें नाहीं! तें जाणण्यास स्त्रीचाच जन्म घेतला पाहिजे !!

इकडील सर्व मंडळी सुखरूप आहे; सासूबाईची प्रकृतिहि बरी आहे; कांहीं काळजी करूं नये. आपल्या शेजारच्या लक्ष्मीबाईची सून दागिन्यांकरितां हल्लीं दोनतीन दिवस भांडत आहे, धुसफुसत आहे, रागानें अन्नसुद्धां घेत नाहीं. तिचा स्वभाव थोडाबहुत आपल्याला माहीतच आहे. तेव्हां जास्त लिहिण्याची आवश्यकता नाहीं. दासीची निरंतर आठवण व्हावी, हीच विनंति,

आपली नम्र दासी,

**जानकी.**

---

पत्र ४ थें.

**श्री.**

फर्ग्युसन कालेज पुणें,
ता० २१ एप्रील, १८

अनेक आशीर्वाद विशेष.—

आजकाल गुरुवार म्हटला म्हणजे मला मोठ्या आनंदाचा दिवस होऊन राहिला आहे ! बुधवारीं रात्रीं निजावयाला जाण्याच्या वेळींच, उद्ईक तुझें प्रेमपूर्ण पत्र येईल, वाचून मनाला किती तरी आल्हाद होईल, आणि मी त्याचें प्रेमभरानें उत्तर लिहीन, वगैरे सुखद कल्पना मनामध्यें येऊन जो कांहीं आनंद होतो, तो पत्रीं लिहितां येत नाहीं ! तुलाहि याचा अनुभव येत असेलच ! आजहि तसेंच घडलें. मोठ्या पहांटेसच निद्राभंग झाला. शौचमुखमार्जनादि विधि उरकल्यावर

किंचित्कालपर्यंत पुस्तक हातांत घेतलें; परंतु मन कांहीं त्याकडे लागेना! पोस्टाचा शिपाई केव्हां येईल, आणि तुझी ती सुंदर प्रेमपत्रिका माझ्या हातांत केव्हां पडेल, असें होऊन चित्तवृत्ति अगदीं अधीर होऊन गेली. शेवटीं एकदाचा शिपाई येऊन पत्रें देऊन गेला. अहा! त्या वेळीं माझा आनंद काय पुसावा! बाकीचीं सर्व पत्रें बाजूस ठेवून अगोदर तुझें पत्र हातीं घेतलें व झटदिशीं उघडून अधाशासारखा भरभर भरभर वाचूं लागलों.

जानकी! आज कित्येक आठवडे तूं अगदीं नियमानें पत्र पाठवित असतेस, हें पाहून मला फारच आल्हाद होत आहे. ईश्वराच्या कृपेनें तूं सुभार्या होऊन पतीला सुखी करण्यास शिकली आहेस, तरी आतां तूं सुगृहिणी होण्यास शीक, सुजननी होण्यास शीक, आदर्श रमणी होण्यास शीक,—मनःपूर्वक मी तुला आशीर्वाद देतों—तूं सकल गुणांनीं मंडित, सकल विषयांत प्रवीण आणि सुशिक्षित होऊन कुटुंबांतील लहानथोर मंडळींच्या प्रेमाला आणि आदराला सर्वथैव पात्र हो! ईश्वरकृपेनें असा सुदिन येईल तेव्हांच मी परमानंदित होईन, आणि तेव्हांच तुला थोडेंबहुत शिक्षण दिल्याचा सदुपयोग झाला याबद्दल आपल्याला कृतार्थ मानीन! ज्या दिवशीं तुझ्या अनुकरणीय गुणांनीं पुत्रकन्या, बंधुबांधव, इष्टमित्र आणि दासदासी हृष्टचित्त होऊन नेहमीं तुझ्यावर अनुरक्त राहतील व एकसारखी तुझ्या गुणांची प्रशंसाच करतील; ज्या दिवशीं लहानमोठ्या, बारीकसारीक सर्व कार्यांत तुझी दृष्टि समान राहील; सारांश, ज्या दिवशीं तूं सर्वदोषविवर्जिता होऊन उदाहरणीय आर्यमहिलारूपानें विराजमान होशील, तोच माझ्या जीवनांतील अत्यंत आनंदाचा आणि उत्साहाचा दिवस असें मी समजेन! त्याच दिवशीं माझे सकल मनोरथ परिपूर्ण होतील. प्रियतमे! मी अंतःकरणामध्यें ही काय व्यर्थ आशा बाळगित आहें? माझी ही मनीषा पूर्ण होणार नाहीं काय? गेल्या तीन वर्षांच्या सहवासानें मला तुझ्या स्वभावाचा जो कांहीं परिचय झाला आहे, त्यावरून माझी ही आशा सुफलित होईल, अशी मला दृढ आशा आहे!

राम होण्याच्यापूर्वींच रामायण झालें आहे, हें तुला माहीत असेलच. मीहि त्याप्रमाणें तुला पुत्रकन्या यांची प्राप्ति होण्याच्या पूर्वींच त्यांनां भाग्यशाली कसें करावें, एतदर्थ थोडासा उपदेश करणार आहें! हें वाचून तूं गालांतल्या गालांत हळूच हांसत असशील! हांस बापडी! परंतु कार्याला प्रारंभ करण्यापूर्वीं तें कसें करावें, याची बरोबर माहिती नसली तर पुढें कसा घोटाळा होतो व काय फजिती उडत असते, हें तुला माहीत आहेना? ह्मणूनच हे दोन शब्द मी अगोदरच तुझ्या कानांवर घालून चुकलों आहें.

तूं जो स्वप्नाचा वृत्तांत लिहिलास, तशीं मलासुद्धां रोज कितीतरी स्वप्नें पडत असतात, परंतु या क्षुल्लक गोष्टी लिहिण्यांत कांहीं अर्थ नसल्या-मुळें त्यासंबंधीं मीं आजवर पत्रांत कांहींएक उल्लेख केला नाहीं. जानकी! अशीं स्वप्नें पडलीं म्हणजे घरीं येऊन तुला भेटण्याची इच्छा प्रबल होते. केवळ तुझ्याच आग्रहामुळें नव्हे, तर खुद्द मलाहि कधीं घरीं येईन, अशी उत्कंठा लागून राहिली आहे. जसजशी सुटी जवळ जवळ येत आहे, तसतशी ही उत्कंठा अधिकाधिक प्रबल होत चालली आहे. तूंच सांग, अशा अवस्थेमध्यें सुटीच्या दिवसांत मी येथें राहणें किंवा दुसरीकडे जाणें संभवनीय तरी आहे का!

सदाशिवरावांची पत्नी आनंदीबाई दागिन्यांसाठीं हल्लीं धुसफुसत असते वगैरे मजकूर लिहिलास, तो समजला; परंतु तिच्या अशा तऱ्हेच्या मूर्खपणाच्या हट्टाबद्दल विशेष आश्चर्य वाटावयाला नको! अशा स्त्रियांनां सर्वस्व एकीकडे आणि दागिने एकीकडे, असें वाटत असतें. अशिक्षित आणि क्षुद्रस्वभावी स्त्रियांनां दागिने ह्मटले ह्मणजे प्राणाहूनहि प्रियतर वाटत असतात! त्यापुढें त्यांनां पतिप्रेम, पतिप्रीति हींहि कमी महत्त्वाचीं! आणि ह्मणूनच स्त्रियांमध्यें या दागिन्यांमुळें वारंवार रागावणींरुसणीं उत्पन्न होऊन शेवटीं निकरावर पाळी येते व ही अलंकाररूपी व्याधि अनेक कुटुंबामध्यें दुःखाचें आणि क्लेशाचें मूळ होऊन बसते! मला लिहितांना अत्यंत विषाद वाटतो, स्त्रियांच्या

या मनस्वी अलंकारप्रीतिपासूनच अनेक दरिद्री पतींना अत्यंत मनःकष्ट भोगावे लागून अखेरीस दुःखामध्येंच आणि विपत्तीमध्यें बिचाऱ्यांच्या जीवनाचा अंत होतो!

आपल्या स्त्रिया या दागिन्यांसाठीं इतक्या वेड्या कां बनतात, हें माझ्यातरी नीटसें ध्यानांत येत नाहीं! कित्येक मूर्ख स्त्रियांना तर हा अलंकाराचा अभिलाष इतका प्रबल असतो कीं, शेजारणीपाजारणींचे दागिने उसने मागून आणून ते आपल्या अंगावर घालून मिरविण्यास त्यांना यत्किंचितहि शरम वाटत नाहीं! कित्येक अक्कलशून्य स्त्रिया चांदीच्या दागिन्यांना सोन्याचें गिलीट देऊन ते वापरण्यास कमी करित नाहींत! या कृत्रिम दागिन्यांचें बंड या पुणेंमुंबईकडे फार! परंतु हा सगळा प्रकार पाहून माझें हंसूं कांहीं केल्या आवरत नाहीं! या यांच्या वेडेपणाच्या नादाला काय ह्मणावें हेंच मला सुचत नाहीं! खंडीच्या खंडी सोनें आणि मूल्यवान रत्नमाणकें अंगावर धारण केलीं, म्हणजे का देहाची शोभा वाढत असते? खरी शोभा, खरें सौंदर्य, तें निराळेंच आहे! त्याला सोन्याचीहि जरूरी नाहीं, नी मोत्यांचीहि आवश्यकता नाहीं! सुशील, शांत, नम्र स्वभावी, सुशिक्षित, मृदुभाषिणी सदाचरणी, पातिव्रत्यरता, उदाचरिता साध्वीचा देह जसा सुमनोहर दिसतो व तिच्या सुंदर मुखकमलाची लोकोत्तर लावण्यप्रभा चोहोंकडे जशी विलक्षण रीतीनें फांकत असते, त्याची योग्यता, कोणी लक्षावधि रुपयांचे उत्तमोत्तम अलंकार आणि मूल्यवान वस्त्रें जरी ल्याली तरी यावयाची नाहीं! मी हें लिहित आहें, यावरून जानकी! तूं असें मात्र समजूं नकोस, कीं, मी हे सुवर्णादिकांचे अलंकार अगदींच तुच्छ समजतों! या अलंकारांच्या अंगीं स्वतः जरी कांहीं दोष नसला, तरीहि स्त्रिया त्यांच्याकरितां ज्या अगदीं वेड्या, अक्कलशून्य बनून जातात व त्यांच्या नानाप्रकारच्या गर्हणीय चेष्टा चाललेल्या असतात, त्या मात्र अत्यंत दोषार्ह आहेत, असें ह्मटल्यावांचून माझ्यानें राहवतच नाहीं! स्त्रियांनीं इतका अविचार कां करावा, समजत नाहीं! ज्यांना

ऐपत असते त्यांची गोष्ट वेगळी; परंतु जे बिचारे उदरंभरणाच्याच नेहमीं विवंचनेंत असतात, आजचा दिवस अब्रूनें गेला, उद्यांचा कसा जातो ही ज्यांच्या मनाला एकसारखी यातना, त्यांच्या घरीं स्त्रियांनीं आणखी दागिन्यांकरितां भाडणें केलीं, म्हणजे त्यांच्या अंतःकरणाची स्थिति काय होत असेल, याचा तूंच विचार कर ! तुह्मी हवा तो प्रयत्न करा व पाहिजे तेवढें समजावून सांगा, परंतु या मूर्ख स्त्रियांचा दागिन्यांचा हव्यास म्हणून कमी होत नाहीं !

जानकी ! तुला मी या सर्व गोष्टी लिहित आहें, ह्मणून तूं कष्टी मात्र होऊं नकोस ! तुला हें सगळें लिहिण्यांत माझा हेतु हाच आहे कीं, या गोष्टीबद्दल तूं बराच विचार करावा व आपल्या समवयस्क मैत्रिणींशीं वारंवार याचा ऊहापोह करून व त्यांनां समजावून त्यांचें अज्ञान दूर करावें आणि त्यांनां या भयंकर व्याधीपासून मुक्त करावें ! तूं नेहमीं लक्ष्यांत ठेव, आपण स्वतः सुमार्गानें वागलों ह्मणजे आटोपलें, असें होत नाहीं. तर होईल तितकें करून दुसऱ्यांनां उपदेश करून त्यांनांहि सुमार्गाला लाविलें पाहिजे ! सुशिक्षित आणि सुविचारसंपन्न ललना, आपल्या स्त्रीसमाजांतील दोष जसा सहज दूर करूं शकतील, तसे ते, आम्हीं पुरुषांनीं कितीहि प्रयत्न केला तरीहि दूर होणें शक्य नाहींत ! आणि ह्मणूनच आज तुला या सर्व गोष्टी लिहून कळविल्या आहेत. होईल का कांहीं या लिहिण्याचें सार्थक ?

'रामायण' कुठवर आलें? 'स्त्रियांचीं कर्तव्यें' आणि 'नारीधर्मप्रकाश' हीं पुस्तकें किती वेळ वाचून झालीं ! पूर्वीं अनेक वेळां सांगितलेंच आहे, परंतु पुनः आणखीहि एकदा सांगतों, कीं, जर तुझें स्वतःचें, तुझ्या पुत्रकन्यांचें आणि तुझ्या एकंदर कुटुंबाचें मंगल व्हावें अशी तुझी इच्छा असेल, तर हीं तिन्ही पुस्तकें, वारंवार वाचून त्यांत लिहिलेल्या उपदेशाप्रमाणें वागण्यास चुकूं नकोस ! हीं पुस्तकें ह्मणजे एक उत्तम सुहृदच आहेत. आणि आपल्या सुहृदांच्या उपदेशाची जें अवहेलना करील त्याचें कल्याण होणार नाहीं, हें अगदीं निश्चित समज.

ह्या खेपेचें तुझें पत्र मोठें छान लिहिलेलें आहे. पुष्कळ शोधलें, परंतु त्यांत चुकी ह्मणून नाहीं. तूं ही घेतलेली काळजी प्रशंसनीय आहे. तूं दर आठवड्याच्या आठवड्यास अशा दक्षतेनें आणि सुवाच्य अक्षरांनीं जर मला पत्र पाठविशील तर मी फार फार सुखी होईन, आणि परमेश्वर तुला लवकरच सुपुत्रवती करो, असा अगदीं अंतःकरणापासून आशीर्वाद देईन ! याहून मंगल आशीर्वाद मला तर कांहीं सुचत नाहीं !

तूं लिहितेस 'माझें पत्र वाचून आपल्याला कंटाळा येत असला पाहिजे.' गोष्ट कांहीं केवळ मिथ्या नाहीं ! तुझीं तीं अगदींच संक्षिप्त पत्रें वाचून मनाला विरक्ति वाटणें साहजीक आहे. ती दूर करशील अशी बळकट उमेद बाळगून आज एवढ्यावरच मोठ्या प्रेमानें तुझा निरोप घेतों. पत्रोत्तर त्वरित यावें, हे आशीर्वाद.

सर्वस्वी तुझाच,
**सदाशिव.**

उत्तर.

**श्री.**

सावंतवाडी, ता० २४ एप्रील, १८—

सेवेशीं विज्ञापना विशेष.

आपलें उपदेशपूर्ण पत्र वाचून मी सुखसागरांत मग्न झालें ! आपल्याला जसा गुरुवार, तसाच मला इकडे सोमवारचा दिवस वाटत असतो. रविवारीं रात्रीपासून माझें मन अगदीं चंचल होतें आणि कधीं एकदा सकाळ होईल व आपलें पत्र हातीं येऊन पडेल, असें होऊन जातें! पोष्टाचा शिपाई पत्र घरीं आणून देईपर्यंत धीर निघत नसल्यामुळें तो येण्याच्या वेळीं मी काशीला जरा रस्त्यावर उभी राहण्यास सांगतें, आणि जर का ती चट्दिशीं परत येऊन 'अद्याप शिपायाचा पत्ताच नाहीं' असें मला सांगूं लागली, तर तिच्यावर फारच रागावून 'मेले, इतक्या लवकर कां आलीस ? जा पुनः !' असें बोलून तिला

पुनः पाठवितें. त्या बिचारीला याबद्दल नेहमीं विनाकारण माझेकडून बोलून घ्यावें लागतें! आपल्याला खरोखर सांगतें, यदाकदाचित् आपण पत्र मुळींच जरी पाठविलें नसलें, तरी तें सोमवारीं सकाळीं आलेंच आहे, असें मला वाटतें, व शिपाई सर्वांचीं पत्रें देऊन जरी गेला, तरी माझें पत्र चुकून विसरला असेल असा संशय येऊन तो दुपारीं खास आणून देईल असेंहि वाटतें! कांहीं केल्या पत्र आलें नाहीं अशी मनाची खात्री ह्मणून होत नाहीं. माझ्या मनाची अशी अवस्था कां होते, हें येईल का आपल्याला सांगतां?

आपण पत्रांत पुष्कळच उपदेश केला आहे. जवळ जवळ एक लहानसें व्याख्यानहि ह्मटल्यास हरकत नाहीं! परंतु आपल्या शारीरिक कुशलतेबद्दल एक चकारशब्दसुद्धां नाहीं! असें कां? आपली कुशलवार्ता न लिहिल्यामुळें आह्मी इकडे कशीं एकसारखीं खालींवर होत असतों, हें आपल्याला कळत नाहीं का? बरें, रजा तर अगदीं जवळ आली; घरीं कधीं यायचें त्याचेंहि नांव नाहीं, याचा अर्थ काय? पत्र येतांच अगोदर सासूबाईंनीं 'घरीं कधीं येणार, आणि खुशाल आहे ना?' ह्मणून विचारलें. मी लाजून 'खुशाल आहेत' एवढेंच उत्तर दिलें. पहिल्या प्रश्नाचें उत्तर दिलेंच नाहीं. मला वाटतें, हें पत्र पोंचल्यावर त्याचें उत्तर पाठविण्यास बहुतकरून आपल्याला वेळ राहणार नाहीं. कालेजाला रजा होतांच पुण्याहून निघण्याला बिलकूल विलंब करूं नये. सासूबाई आपल्या येण्याचा अगदीं ध्यास घेऊन बसल्या आहेत!

मी मोठ्या भाग्याची, कीं, शेजारच्या लक्ष्मीबाईची सून आनंदीबाई दागिन्यांचा हट्ट घेऊन बसली असल्याची हकीगत आपल्याला कळविली, ह्मणून आपलें एक लांबलचक व्याख्यान मला ऐकावयास सांपडलें! दरिद्री पतीला दागिन्यांपायीं कष्ट भोगावयास लावणें हें महापातक आहे, ही गोष्ट कोणासहि नाकबूल करतां येणार नाहीं. पत्रांत एके ठिकाणीं आपण लिहिलें आहे, कीं, दागिन्यांसाठीं वेडें बनून जाणें आणि त्यांच्या सहाय्यानें आपलें सौंदर्य वाढविण्याचा प्रयत्न करणें

हें अत्यंत दोषार्ह आहे. खरें ह्मणाल, तर या बाबतींत एक अक्षरसुद्धां लिहायला मला लज्जा वाटत आहे. परंतु माझ्यानें इतकें लिहिल्यावांचून राहवतच नाहीं, कीं, आपण स्त्रियांवर जी इतकी आग पाखडली आहे, त्याला सर्वांशींच त्या पात्र नसाव्या! पुष्कळशा स्त्रिया दागिन्यांसाठीं एवढ्या वेड्या बनून जातात, त्यांत त्यांचा हेतु दागिन्यांनीं देह अलंकृत करून आपल्या पतीला तुष्ट करावें, इतकाच असतो. याहून त्यांची कांहींएक जास्त लालसा नसावी, हे मी खात्रीपूर्वक सांगूं शकतें. तुह्मां पुरुषमाणसांनां ही गोष्ट बरोबरशी समजावयाची नाहीं. बायकांनां जर का एकदा समजतें, कीं, आपल्या पतीला दागदागिने बिलकुल आवडत नाहींत, तर मी खात्रीनें सांगतें, सगळया बायकांनीं दागिने वापरण्याचें एकदम बंद केलें असतें! बरें, कित्येक स्त्रियांनां दागिन्यांची जी अत्यंत लालसा दिसून येते, तीहि केवळ पुरुषांचा दृष्टांत पाहूनच! अंगरख्याची इस्त्री जर का बरोबर नसली, अथवा शर्टला जर का किंचित् थोडी खळ कमी झाली, कीं, भरलीच त्या धोब्याची साडेसाती! कपड्यांनां कडकडीत इस्त्री नसली, धोतरबितर सुरेख धुतलेलें नसलें, उपरण्याची घडी बरोबर झालेली नसली, फेटा किंवा पगडी डोकीला नीट बसत नसली, बुटाला पॉलीश वगैरे लावून तो चकफक केलेला नसला कीं मग कांहीं कुठें सभेला किंवा अन्य समारंभाला जाण्याची बिलकूल सोय नसावयाची! कधीं कोणा इष्टमित्राला भेटायाला वगैरे जावयाचें झालें तरी हीच स्थिति! तुह्मां शहाण्यासुरत्या, समंजस, विचारी, अक्कलवंत पुरुषांची जर ही दशा, तर मग माझ्यासारख्या एखाद्या अज्ञ, असमंजस, अविचारी, मूर्ख स्त्रीला, चांगलेंसें बारिक अमदाबादी रेशमी लुगडें नेसून, सुंदरशी उंची काश्मिरी शाल पांघरून, आणि हातांत सोन्याच्या दोन बांगड्या घालून आपली सौंदर्यशोभा वाढविण्याची इच्छा झालीच, तर त्याकरितां त्या बिचारीवर एवढी आग कां पाखडली पाहिजे? हा दोष कोणाचा? चुकीचा मार्ग दाखविणाराचा, कीं, त्या दाखविलेल्या मार्गानें जाणाराचा? मला तर पूर्ण भरंवसा आहे कीं, पहिल्यानें

पुरुषच जर साध्या वेषाचें, साध्या चालचलणुकीचें अवलंबन करूं लागतील तर स्त्रियासुद्धां निश्चयेंकरून त्यांचेंच अनुकरण करतील! स्त्री ही पुरुषाची केवळ छाया आहे. आणि ह्मणूनच पुरुष जसा वागत असेल त्याचप्रमाणें स्त्री आपलें वर्तन ठेवील, असा पूर्ण संभव आणि प्रत्यक्ष अनुभवहि आहे. मी काय बरें यासंबंधीं अधिक लिहूं? पण गडे! मीं माझ्या मनाला जें काय वाटतें तें अगदीं स्पष्ट स्पष्ट लिहिलें ह्मणून राग तर नाहींना यायचा! माझ्या अल्पबुद्धीला जें वाटलें तें लिहिलें आहे. यांत कांहीं मजकडून प्रमाद घडला असल्यास पूर्ण प्रेमानें दासीला त्याची क्षमा व्हावी.

'रामायणा'चीं जवळजवळ अडीचशें पृष्ठें वाचून झालीं. 'स्त्रियांचीं कर्तव्यें' आणि 'नारीधर्मप्रकाश' ह्या पुस्तकांच्या दोन दोन आवृत्ति झाल्या. आपण येण्यापूर्वीं आणखी एकदां वाचून होतील, असा अजमास आहे. मला आतां महाभारत वाचायची फार इच्छा झाली आहे. जर एखादें सुबोध भाषेंत लिहिलेलें महाभारताचें पुस्तक असेल तर येतेवेळीं न विसरतां अवश्य अवश्य घेऊन यायचें. वरकड मजकूर अधिकोत्तर नाहीं. आह्मी सर्व खुशाल आहों. उत्तर पाठविण्यास अवकाश मिळाला तर अवश्य उत्तर यावें, एवढीच चरणांपाशीं नम्र विज्ञप्ति आहे.

आपली नम्र दासी,
**जानकी.**

पत्र ५ वें.

**श्री.**

फर्ग्युसन कालेज, पुणें,
ता० २ जून १८—

अनेक आशीर्वाद विशेष.—

पुनः या स्मशानांत येऊन पडलों! हां हां ह्मणतां रजा संपून गेली. सहवासलाभ घडतो न घडतो, तोंच विरह झाला! असो. याबद्दल

दु:खी होऊं नकोस. सुखोपभोगापेक्षां मनुष्यानें आपलें कर्तव्य करण्याकडेसच विशेष लक्ष्य पुरविलें पाहिजे.

येते वेळीं रस्त्यामध्यें तुझी पुनः पुनः आठवण होऊन मनाला अगदीं कसेंसेंच होत होतें. सगळ्या दिवसांत कांहींएक खाल्लें नाहीं. बोटींत फराळ करण्याची चांगली सोय असते, बरोबर डबाहि भरलेला होता, परंतु काय झालें कोणाला ठाऊक, थेंबभर पाणीसुद्धां पिण्याची इच्छा झाली नाहीं. पुण्याला सुखरूप पोंहोंचलों खरा, परंतु मन अगदीं उदास झालें आहे. कोणच्याच गोष्टीकडे लक्ष्य लागत नाहीं. मनाला कसा तो उत्साहच राहिला नाहीं. जणूं काय कांहींतरी विसरूनच आल्यासारखा भास होत आहे. अगदीं चुकल्याचुकल्यासारखें झालें आहे. सगळ्यांनां सोडून देऊन मी येथें एकटाच येऊन पडलों आहें !

मी तेथून निघालों तेव्हां आईची प्रकृति किंचित् अस्वस्थ होती. यामुळें फारच काळजी लागली आहे. मनापासून भक्तिपूर्वक तूं तिची सेवाशुश्रूषा करित जा. सांप्रत हेंच तुझें मुख्य कर्तव्य आहे हें मनामध्यें वागीव. त्याचप्रमाणें जावानणंदांचीं मुलें तीं आपलींच मुलें आहेत असें समजून तूं त्यांच्यावर प्राणापलीकडे ममता करीत जा, आणि जेणेंकरून त्यांचें मन आणि शरीर स्वस्थ राहून तीं सुदृढ होतील व त्यांनां लिहिण्यावाचण्याची गोडी लागून नेहमीं सत्कार्याकडेच त्यांची प्रवृत्ति होईल, असें हरप्रयत्नांनीं करण्यास झटत रहा.

चिरंजीव मोरू याचें आतां विद्याभ्यासाला आरंभ करण्याजोगें वय झालें आहे; परंतु अझूनपर्यंत तो केवळ खेळण्यांतच गर्क असतो, हें कांहीं ठीक नाहीं. बाल्यावस्थेंत बालकबालिकांच्या मनाची प्रवृत्ति ज्या गोष्टीकडे होईल, त्याच गोष्टीकडे मोठेपणींहि त्यांचें कमी अधिक लक्ष्य वेधेल. यास्तव, या वेळीं त्यांनां शिक्षणाची गोडी लाविली नाहीं, तर पुढें प्रौढ वयांत तें त्यांनां विषवत् वाटेल, आणि खेळ, नाचरंग, तमाशे यांशिवाय त्यांनां दुसरें कांहीं एक सुचावयाचें नाहीं ! ह्मणून सांगतों कीं, आतां व्यर्थ कालक्षेप न करितां,

चिरंजीव मोरू याच्या शिक्षणाला सुरुवात करणें अत्यावश्यक आहे. त्याचे आईबाप या गोष्टीबद्दल यत्किंचितहि काळजी घेत नाहींत ही मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे. तूं त्याच्या आईचें या बाबतींत मन वळविण्याचा यत्न कर आणि साधल्यास तूंच मोरूला रोज थोडथोडें शिकावीत जा. कारण, या वयांत त्याचें शिक्षणाकडे लक्ष्य लागलें नाहीं, तर या जन्मीं तरी कांहीं तें पुढें लागण्याचा संभव नाहीं!

दुसरी एक गोष्ट. उपदेश नुसता ऐकल्यानें कांहींएक व्हावयाचें नाहीं, तर त्या उपदेशानुसार वागावयास शिकलें पाहिजे. तरच त्याचा उपयोग. कर्तव्य कोणतें, अकर्तव्य कोणतें, कोणता मार्ग अवलंबनीय, कोणता मार्ग त्याज्य, हें बहुतकरून पुष्कळांना समजत असतें; परंतु त्याप्रमाणें प्रायः कोणीहि वागत नाहींत. अगदीं छाकटा मनुष्यसुद्धां हजार वेळां कबूल करील कीं, मद्यपान करणें हें अति निंद्य कर्म आहे! परंतु त्याचें मन इतकें कांहीं दुर्बल, बुद्धि इतकी कांहीं भ्रष्ट झालेली असते, कीं, जरी मद्यपान करणें अति निंद्य आहे हें त्याला पुरतपणें समजत असतें, तरीहि त्याचा त्याग करण्यास तो समर्थ होत नाहीं. दुसऱ्याचें अनिष्ट चिंतन करणें आणि परद्रव्याचा अभिलाष बाळगणें, हें अत्यंत पापमूलक आहे, सर्वथा त्याज्य आहे, हें सगळे जाणतात. तथापिहि कोणीसुद्धां हे दोष आपल्या अंगांतून काढूं शकत नाहींत! ह्मणूनच ह्मणतों, सुपथ नुसता माहीत असूनच होत नाहीं, तर त्या सुपथानें गमनच केलें पाहिजे. त्याचप्रमाणें आपण एकट्यानेंच सन्मार्गानें गेल्यानें इतिकर्तव्यता संपली असें नाहीं, तर साधेल तितकें करून आपले इष्टमित्र, बंधुबांधव, दासदासी, त्याचप्रमाणें आपल्या परिचयाचे इतर लोक, यांनांसुद्धां आपल्याबरोबर सन्मार्गानें नेण्याला झटणें आवश्यक आहे. कोणत्याहि घराण्यांतील एका व्यक्तीनें एखादें महत्कार्य केलें ह्मणजे ज्याप्रमाणें त्या व्यक्तीमुळें त्या घराण्यांतील सर्व मंडळी कमीअधिक मानानें गौरवान्वित होते, त्याचप्रमाणें किंबहुना त्याहूनहि जास्त, एखादें निंद्य आणि लांछनास्पद कृत्य केलें तर त्या

कुलांतील यच्चावत् मंडळी लोकसमाजांत कलंकित आणि तिरस्कारार्ह होते! अशा प्रकारें कुलांतील एखाद्या दुश्चरित्र आणि कर्तव्यज्ञानाविहीन व्यक्तीच्या दुर्वर्तनामुळें त्या कुलांतील अनेक कर्तव्यदक्ष सुजनांनांहि मनस्ताप भोगावा लागतो. ह्मणून ह्मणतों, आपण एकट्यानेंच सन्मार्गाचें अवलंबन करून आटोपत नाहीं, आपण एकटेंच सुजन झाल्यानें कार्यभाग होत नाहीं, आपल्या परिवारांतील प्रत्येक व्यक्तीला सन्मार्गाला लाविलें पाहिजे, प्रत्येक व्यक्तीला सुजन करण्यास झटलें पाहिजे आणि प्रत्येक व्यक्तीच्या वर्तनक्रमावर सूक्ष्म नजर ठेविली पाहिजे. यदाकदाचित् कोणी भ्रमप्रमादानें किंवा नीच लोकांच्या चिथावणीनें अथवा प्रोत्साहनानें कुमार्गाचें अवलंबन करील तर तत्क्षणींच त्याच्या अवलंबित मार्गाचा भयंकर परिणाम समजावून देऊन त्याला सन्मार्गाला लाविलें पाहिजे. नाहीं तर या एका व्यक्तीच्या पायीं त्या कुलांतील प्रत्येक व्यक्तीला एक दिवस निश्चयपूर्वक कलंकित होऊन लज्जेनें खालीं मान घालण्याचा प्रसंग येईल! या मायामय संसारांत प्रत्येक पाऊल पूर्ण विचार करूनच टाकिलें पाहिजे, नाहीं तर महा विपत्तींत पडण्याचा प्रसंग आल्याविना कधींहि रहावयाचा नाहीं, हें प्रत्यहीं मनांत वागवित जा. उलटपक्षीं, सारासार विचारानें कुमार्गाचा त्याग करून सन्मार्गानें वागण्याचा अभ्यास केल्यास त्या मनुष्याला विपत्ति सहसा स्पर्शीहि करूं शकणार नाहीं. असो उत्तर, त्वरित पाठवून तिकडील कुशलवृत्त कळीव, हे आशीर्वाद.

सर्वस्वी तुझाच,

**सदाशिव.**

उत्तर.

**श्री.**

सावंतवाडी, ता० ६ जून, १८––

शेवेशीं विज्ञापना विशेष.–

आपलें पत्र आजच पोंचलें. मनांतील सर्व काळजी दूर झाली. आपण इकडून निघाल्यावर थोड्याच वेळानें इकडे बराच पाऊस

पडला व वाराहि फार सुटला होता, यामुळें आम्ही सर्वजणें मोठ्या काळजींत पडलों होतों. परम दयाळु परमेश्वराच्या कृपेनें आमची ती काळजी दूर झाली. आपण गेल्यापासून माझ्या मनाची जी कांहीं स्थिति झाली आहे, ती लिहून कळवितां येणें अशक्य आहे. यापूर्वी कधींहि माझी अशी अवस्था झाल्याचें मला मुळींच आठवत नाहीं. आपलें इकडून जाणें झाल्या दिवसापासून मला कशी ती एक दिवस सुद्धां स्वस्थ झोंप लागली नाहीं. किंचित् डोळा लागतांच जीं कांहीं नानातऱ्हेचीं अतर्क्य स्वप्नें पडतात, तीं सांगून कधीं संपायचींसुद्धां नाहींत. आपलें कुशल समजून आज जो कांहीं हर्ष झाला आहे, तो पत्रीं लिहून व्यक्त करितां येत नाहीं. दिवसा मन अस्थिर झालें, चैन पडेनासें झालें, उदास वाटूं लागलें म्हणजे त्या वेळीं आपल्या सांगण्याप्रमाणें 'रामायण', 'स्त्रियांचीं कर्तव्यें' 'नारीधर्मप्रकाश' वगैरे मनोरंजक आणि उपदेशामृतानें भरलेलीं पुस्तकें वाचित बसतें. त्यांच्या वाचनानें मात्र जिवाला किंचित् शांतिसुखाचा अनुभव मिळतो, जाऊंद्या. या गोष्टी लिहिण्यांत फळ काय ?

सासूबाईंची प्रकृति हल्लीं पूर्वींपेक्षां पुष्कळ बरी आहे. त्यांच्यासंबंधीं आपण मनामध्यें बिलकुल काळजी बाळगूं नये. निश्चिंत मनानें आपलें कर्तव्य करित असावें. ईश्वर करो आणि त्यांच्या प्रकृतीला उत्तरोत्तर आराम पडो ! परंतु यदाकदाचित् त्यांची प्रकृति कमजास्त झालीच, तर मी ताबडतोब आसल्यास तारेनें कळवीन. माझ्या देहांत शक्ति आहे तोंपर्यंत त्यांच्या शुश्रूषेंत मजकडून तिळमात्र कसूर होणार नाहीं, हें आपण निश्चयपूर्वक समजावें.

आपल्या उपदेशानुसार चिरंजीव मोरू याच्या शिक्षणाला प्रारंभ करण्याविषयीं मीं यथोचित् प्रयत्न करून पाहिला; परंतु लिहिण्यास अत्यंत दुःख वाटतें, कीं, तो समूळ निष्फल झाला ! वन्संनीं माझी गोष्ट उडवाउडवीवरच घालविली. त्या हांसत हांसत म्हणाल्या " माझा मोरू अजून शिकण्यासवरण्याजोगा जाणता का झाला आहे ? अहो, नुकतं

कुठं त्याला सातवं. वरीस पुरं होत असेल नसेल ! हे काय त्याचें लिहिण्यावाचण्याचे दिवस ? मोठा झाला ह्मणजे आपापच शिकूं लागेल नी सगळं कांहीं होईल. त्याची एवढी घाई ती कशाला हवी ! ” तेथें असलेल्या सर्व मंडळीला वन्संचेंच हें ह्मणणें पसंत पडलें; अर्थात्, माझ्या म्हणण्याचा तादृश उपयोग झाला नाहीं. उलट, एक गोष्ट मात्र वाईट झाली! यापूर्वीं मोरू कधीं कधीं माझेजवळ येऊन बसत असे. मी त्याला हंसत खेळत तोंडानें ‘ क ख ’ वगैरे मूळाक्षरें उच्चारण्यास शिकवीं. त्याचप्रमाणें ‘एक दोन’ हे आंकडेहि त्याचेकडून पाठ ह्मणून घेत असें; परंतु त्या दिवसापासून तो माझ्या वाऱ्यासहि उभा राहीनासा झाला आहे. अर्थात्, पूर्वीं जीं कांहीं दोन अक्षरें ते शिकत असे, तेंहि आतां बंद झालें. त्याचे हट्ट तर जास्तजास्तच वाढले आहेत. ह्याच्यात्याच्यासाठीं आपला रुसून बसतो, आणि सारा दिवस एकसारखा खेळत असतो. याबद्दल त्याला बोलायचें, रागवायचें एकीकडेच राहिलें, उलट वन्सं त्याला भरच देत असतात.

हल्लीं हल्लीं माझी प्रकृति किंचित् अस्वस्थ झाली आहे. काय बरें याचें कारण असावें ? आपल्याला तरी सांगतां येईल का ? सगळा दिवस अंगांत जसा काय आळसच भरून राहिला आहे ! मस्तक फिरल्यासारखें होतें. घटकाभर बसून दोन ओळी लिहीन ह्मटलें, तरीसुद्धां अगदीं कंटाळा येतो. आणि ह्मणूनच आज कांहीं बाई माझ्यानें अधिक लिहवत नाहीं. त्वरित उत्तर पाठवून दासीला कृतार्थ करावें.

हो, एक लिहायचें राहिलें. आपल्या शारीरिक कुशलतेबद्दल या खेपेलाहि लिहिण्याची आपल्याला विस्मृति कशी झाली बरें ? नेहमीं या महत्त्वाच्या गोष्टीबद्दल आपल्याला विस्मृति पडते.! दासीची चरणांजवळ इतकीच विनंति आहे कीं, अनुग्रहपूर्वक दर पत्रीं आपल्या कुशलतेबद्दल एखाददुसरें अक्षर अवश्य लिहित जावें. जें जाणण्याविषयीं मन अथिर झालेलें असतें, तें मुळींच न लिहितां एखादें मोठें व्याख्यानच्या व्याख्यान लिहून धाडलें ह्मणून त्यापासून

का मन स्थिर व्हायचें आहे? आपल्याला हें कळत का नाहीं? पत्र येतांच सासूबाई आपलें कुशलवृत्त विचारतात, यासाठींच मीं हें एवढें लिहिलें आहे. राग मानूं नये. आपल्या पत्राची मी अगदीं चातकाप्रमाणें मार्गप्रतीक्षा करित आहें. रविवारच्या आंतच उत्तर येऊन माझें अस्वस्थ चित्त स्थिर होईल, अशी आशा आहे. हे विज्ञापना.

आपली नम्र दासी,
**जानकी.**

---

पत्र ६ वें.

**श्री.**

फर्ग्युसन कॉलेज पुणें,
ता० १५ जून १८—

अनेक आशीर्वाद विशेष.

तुझें ता० ६ जूनचें पत्र पोहोंचलें. अत्यानंद झाला. मागील पत्रीं केवळ नजरचुकीनें मी शारीरिक कुशल लिहिण्यास विसरलों होतों, व त्याबद्दल तूं बरीच कुरकुर केली आहेस. तरी या खेपेस प्रारंभींच लिहून ठेवितों कीं, ईशकृपेनें आजदिवसपर्यंत मी शारीरिक स्वास्थ्याचा पूर्ण अनुभव घेत आहें. मानसिक स्वास्थाविषयीं तुझ्या पत्रांत कांहींएक उल्लेख नसल्यामुळें मीहि ती गोष्ट सोडून देतों. या पत्रांत प्रारंभींच ही महत्त्वाची (!) गोष्ट लिहून चुकलों, तेव्हां आतां व्याख्यानाला आरंभ करितां येईल कीं नाहीं? मला वाटतें, अलीकडे अलीकडे हीं व्याख्यानें कानाला गोड लागत नाहींत! मला तर उलट इतके दिवस वाटत होतें कीं, व्याख्यानें ऐकण्याची आतां तुला संवईच पडून गेली असेल, आणि ह्मणून तुला आतां व्याख्यानेंच ऐकण्याची इच्छा होईल; परंतु आतां मला समजून आलें कीं, ती आमची कल्पना निराधार आहे! ती साधार असो वा निराधार असो, व्याख्यानें तुला ऐकावींशीं वाटोत वा न वाटोत, मी कांहीं माझें कर्तव्य सोडणार नाहीं! जेव्हां जेव्हां

ह्मणून संधि सांपडेल, जेव्हां जेव्हां ह्मणून योग्य विषय सांपडेल, तेव्हां तेव्हां आमचें व्याख्यान हें आपलें अवश्य सुरू व्हावयाचेंच! आतां तिकडे लक्ष्य देणें वा न देणें, हें मात्र अवश्य श्रोत्याच्या इच्छेवर अवलंबून आहे; परंतु एवढ्याचसाठीं व्याख्यानकार मात्र आपल्या कर्तव्याची हेळसांड करणार नाहीं! असो.

आतां तुझ्या पत्रांतील मजकुराकडे वळतों. वाचून फार फार खेद झाला, कीं, आपल्या सात वर्षांच्या मुलाचें अझून विद्यारंभ करण्याचें वय झालें नाहीं असा यमूताईनें तर सिद्धांतच करून टाकला आहे! मीहि तुला एक सिद्धांत सांगून ठेवतों. ज्या मुलाला सात वर्षे पूर्ण झालीं तरी त्याचें वय विद्यारंभास योग्य होत नाहीं, त्या मुलाचें वय या जन्मांत कांहीं फिरून विद्यारंभास योग्य होण्याची आशा नाहीं! बाळपणांत आईबापांच्या अति लाडांमुळें जें मूल लिहिण्यावाचण्याचा तिरस्कार करण्यास शिकतें, त्याचा भविष्य काळहि अज्ञानांधकारांतच जावयाचा, हाहि सिद्धांतच आहे. तुझ्या वन्संनां वाटत असेल, कीं, हातांत लेखणी धरण्याचाच काय तो अवकाश, आपला सुबुद्धिसंपन्न पुत्र, निमिषार्धांत एक अद्वितीय पंडित बनणार! किंवा कदाचित् तिचा गुणवान् पुत्र, सर्वश्रेष्ठ न्यायमंदिरांतील मुख्य न्यायाधिकारी होऊन सगळ्यांनां अगदीं चमत्कृत् करून सोडणार! प्रायः बहुतेक आईबापांनां आपलीं जडमूढ व लुलींखुळीं मुलें देखील अति सुलक्षणी आणि सुबुद्धिसंपन्न आहेत असें वाटत असतें, मग तुझ्या वन्संनां एकट्यानांच काय ह्मणून बरें हांसावें! वस्तुतः, जोंपर्यंत आमचा ललनासमाज उन्नतावस्थेस पोहोंचणार नाहीं, आपला स्त्रीसमाज जावत्काल उपयुक्त सुशिक्षण संपादून कर्तव्यपरायण होणार नाहीं, तावत्काल त्यांच्या संततीची योग्य उन्नति होण्याची आशा देखील करावयास नको! आईबापांच्या दोषानें किती मुलांच्या ऐहिक आणि पारलौकिक सौख्याची माती होऊन जात आहे त्याची कल्पना देखील करतां यावयाची नाहीं! परंतु दुःखाची गोष्ट ही कीं, या भारतवर्षांतील

बहुतेक आईबापांनां हें समजण्याचीसुद्धां शक्ति नाहीं! आपल्या दोषानें आपलीं मुलें मूर्ख निपजतात, हें कित्येकांनां खरेंसुद्धां वाटणार नाहीं! पितृशुक्र आणि मातृशोणित यांहींकरून बालकाचें शरीर गठित होत असतें. आणि ह्मणूनच पितृमातृसंस्कार आणि बुद्धि घेऊन बालक या जगांत प्रवेश करित असतें. तदनंतर शैशवावस्थेंत सदासर्वदा मातेच्या सान्निध्यांत राहिल्यामुळें न कळत प्रत्येक गोष्टींत तें मातेचेंच अनुकरण करण्यास शिकतें. मातेशीं बालकाचें जितकें सादृश्य असतें तितकें दुसरें कोणाशींहि नसतें. आणि ह्मणूनच बहुतकरून असें दिसून येतें कीं, बुद्धिमति मातेचीं मुलेंहि प्रायः सुबुद्धिसंपन्न आणि तेजस्वी निपजतात, सुशील आणि साध्वी स्त्रीचीं मुलें साधु आणि सच्चरित्र होतात, कुटिल आणि क्रोधपरवश स्त्रीचीं मुलें कुटिल आणि क्रोधी निपजतात; आणि अल्पबुद्धि स्त्रीचीं मुलेंहि अल्पबुद्धीच होतात. मातेच्या चरित्राचीं फळें तिच्या संततींत दिसून येतात, हें मला वाटतें, आतां तुला समजून आलें असेल. यास्तव सुपुत्रवती होण्याची इच्छा असेल तर अगोदर सुरमणी होणें आवश्यक आहे, हेंहि मला वाटतें, तुझ्या ध्यानांत आलेंच असेल. जानकी! तूंहि ईश्वरकृपेनें आतां थोडक्याच दिवसांत मातृपदाला पोहोंचशील, आणि याच कारणामुळें मीं आज या पत्रांत या गोष्टीचा उल्लेख केला आहे. या वेळीं तूं पुनः एकवार 'स्त्रियांचीं कर्तव्यें' या पुस्तकांतील 'गर्भिणी' आणि 'जननी' हे दोन निबंध अगदीं लक्ष्यपूर्वक अवश्य वाच. सद्यःस्थितींत तुला काय केलें पाहिजे तें हे दोन निबंध लक्ष्यपूर्वक वाचल्यानें अगदीं उत्तम रीतीनें समजून येईल.

हल्लीं हल्लीं तुझी प्रकृति किंचित् अस्वस्थ झाली आहे, आळसहि बराच वाढला आहे, तरी याचें कारण काय ह्मणून तूं मला विचारिलें आहेस. ठीक! परंतु जानकी! याचें 'खरें कारण' मजपासून गुप्त ठेवण्यासाठीं तूं हव्या तेवढ्या चेष्टा केल्यास, तरी देखील कसें ना कसें तरी तें मी समजून चुकलों आहें! आणि ह्मणूनच सांप्रत तुला 'गर्भिणी'

हा निबंध वाचण्याचा उपदेश करित आहें. तुझ्या जीवनांत विलक्षण स्थित्यंतर होण्याचा हा समय आला आहे. इतके दिवस तूं जें केवळ ऐकत होतीस, तें आज स्वतः करून दाखविण्याचा प्रसंग आला आहे. आज दिवसपर्यंत तूं आपल्या आईची 'लाडकी मुलगी' असल्यामुळें अनेक खस्ता खाऊन तुझ्या आईनें तुझें कोडाकौतुकानें लालनपालन केलें; परंतु आतां तुलाच स्नेहमयी जननी झालें पाहिजे. तुलाच स्नेहानें आणि यत्नपूर्वक शिशुसंगोपन केलें पाहिजे! मातृपदाला पोहोंचणें ह्मणजे सामान्य गोष्ट समजूं नकोस. संतानाची पुढील उन्नति अवनति, कल्याण अकल्याण, या सगळ्यांचा भार जननीच्याच मस्तकावर असतो. पत्रोपत्रीं लिहून या गोष्टी समजणें शक्य नाहीं. 'आर्यांचें कर्तव्य' मननपूर्वक वाचल्यानें हें अनायासें समजून येणार आहे. सारांश, इतकीच गोष्ट मनांत ठेव कीं,-सुजननी झाल्याविना सुपुत्राचा लाभ होणें शक्य नाहीं. गुणवती झाल्याविना गुणवान् पुत्र मांडीवर खेळत नाहीं. शृगालीच्या उदरीं कधीं तरी सिंहशावक निर्माण झाला आहे काय!

सद्ग्रंथांचें नेहमीं पठण करावें, सद्भाषण करावें, अंतःकरण पवित्र आणि शांतिपूर्ण राखावें, ईश्वरावर मनःपूर्वक भक्ति ठेवावी. मनांत नेहमीं वागवावें कीं, सर्वनियंत्या, मंगलमय परमेश्वराच्या कृपादृष्टि-व्यतिरिक्त एक क्षणभरहि जीवन धारण करितां येणें शक्य नाहीं. विपद्-ग्रस्त झाल्याविना मनुष्याला या गोष्टीची स्मृति होत नाहीं. आणि ह्मणूनच मनुष्याची दुर्गतिहि टळत नाहीं. पदोपदीं भक्तीच्या साहाय्यानें भगवंताच्या आशीर्वादाची याचना केल्यास तो आपल्या हृदयांत राहून आपल्याला सुपथ दाखवील, अंतःकरणास तेज आणि सत्साहस प्रदान करील, कुकार्यापासून विन्मुख ठेवील आणि आपल्या अगम्य लीलेनें आसन्न विपदावस्थेंतूनहि आमचा उद्धार करील. त्या जगदीश्वराच्या मनांत आलें, तर ही नद-नदी-पर्वत-सागर-जीव-जन्तुपूर्ण पृथ्वि, निमिषार्धांत अस्तंगत होईल, सर्व शून्याकार होऊन राहील. परंतु तो अनंतशक्तिसंपन्न आहे तरीहि निर्दय नाहीं. त्याची शक्ति अनंत, तशीच

दयाहि अनंत आहे ! भक्तिपूर्ण हृदयानें जे कोणी त्याला शरण जातात, त्यांच्यावर तो भक्तवत्सल प्रभुहि अजस्र करुणावृष्टि करित असतो. आणि जे कोणी भक्तिशून्य—त्या जगन्नियंत्याचें एक क्षणभरसुद्धां चिंतन करणें ज्यांनां आवश्यक वाटत नाहीं, त्यांनांसुद्धां तो परम कृपाळु परमात्मा विसरत नाहीं! त्यांच्यावरसुद्धां करुणादृष्टि करण्यास तो विरत होत नाहीं.

हल्लीं हल्लीं तुला किंचित् अस्वस्थता वाटते यांत कांहीं नवल नाहीं. हें अगदीं स्वाभाविकच आहे. पूर्वींच मीं सांगितलें आहे, मातृपदाला पोहोंचणें ह्मणजे सामान्य गोष्ट नाहीं. सदासर्वकाळ सावध राहून शरीरस्वास्थ्य राखण्यास मनापासून झटत जा. आणि आतां जरा लौकर लौकर पत्र पाठवित जा. प्रकृतीचें मान वारंवार सविस्तर कळवित जा. बिलकुल हयगय करूं नको. ईश्वर तुला सुखी राखो, हे आशीर्वाद !

सर्वस्वी तुझाच,

**सदाशिव.**

उत्तर

**श्री.**

सावंतवाडी, ता० २० जून, १८—

सेवेशीं विज्ञापना विशेष.

आपलें पत्र वाचून अत्यंत आल्हाद झाला. हें माझें लिहिणें आपणांस खरें वाटणार नाहीं ! कारण, व्याख्यानें ऐकणें मला आतां गोड वाटत नाहीं, लांबच लांब पत्रें वाचण्याचा कंटाळा येतो ! काय बाई तरी ! माझें दुर्भाग्यच हें ! आपणास मोठमोठ्या गोष्टी समजाव्या आणि ही अल्प गोष्ट समजूं नये ? या विश्वब्रह्मांडांतील सकल गोष्टी आपणास समजतात, आणि या हतभागिनीचे मनोभाव समजूं नयेत ! असें जर नसतें, तर आपलीं व्याख्यानें मला गोड लागत नाहींत, हा सिद्धांत आपण कसा केला असता? काय बाई तरी ह्मणायचें —व्याख्यान ! मला तर नाहीं आजवर कधीं चार पानांपेक्षां

मोठें पत्र आलेलें आठवत ! आणि त्याबद्दलसुद्धां हें एवढें लिहिणें—ही एवढी थट्टा ! माझी करुणा येऊन जर कधीं काळीं याहूनहि थोडें विस्तृत पत्र लिहून पाठविण्याची बुद्धि झाली, मग तर बाई कितीतरी ऐकून घ्यावें लागेल, किती तरी थट्टा सोसावी लागेल ! प्रत्येक पत्रांत आपलें शारीरिक कुशल लिहित जा म्हणून विनंति केली तर काय मोठा अपराध झाला कीं काय ? यांत अपराध झाला असेल किंवा यालाच जर कुरकुर म्हणायची असेल, तर कांहीं बोलणेंच राहिलें नाहीं! आपण कांहींहि म्हणा, परंतु मी अगदीं स्पष्ट कळवितें कीं, असला ‘ अपराध ’ करण्यास मी कधींसुद्धां भ्यायची नाहीं आणि याबद्दल ‘कुरकुर’ करण्यासहि मला कधींहि कंटाळा यायचा नाहीं ! पुढें आपण लिहितां कीं, आपल्या मानसिक स्वास्थ्याबद्दल मीं मुळींच जिज्ञासा केली नाहीं म्हणून आपणहि तत्संबंधीं कांहींएक लिहित नाहीं ! नाहीं का बरें यावरून स्पष्ट होत, कीं, आपण खरोखरच कांहींतरी मानसिक यातना भोगित आहां म्हणून ? परंतु मी तिचें निवारण करण्यास असमर्थ आहें म्हणून म्हणा, किंवा ती मला समजली काय आणि न समजली काय सारखेंच असें मानून म्हणा, आपण तत्संबंधीं मला कांहींएक लिहिलें नाहीं. मी काय म्हणून बरें यासाठीं आपणास दोष देऊं? हा मुळीं माझ्या अदृष्टाचाच दोष आहे ! मूर्ख, सदसद्विवेकशून्य, सुखदुःखहि समजण्यास असमर्थ, अशा मनुष्याचा तिरस्कार होणें साहजिक आहे. अशा मनुष्याला मन मोकळें करून लिहण्यास आपलें मन कांकूं करूं लागलें, तर त्याबद्दल मी कां बरें दुःखी होऊं ? परंतु आपलें दुःख जर मी समजूं शकत नाहीं, तर तें समजण्याबद्दल मला शिकविण्याविषयीं आपण यत्किंचित् देखील प्रयत्न केला नाहीं, म्हणून मात्र मला अत्यंत दुःख होत आहे. आम्ही स्त्रिया म्हणजे पशुच—आम्हांला सुखदुःख कसलें? आणि यासाठीं आपण कां बरें मग इतकें व्याकुळ व्हावें! अस्तु.

आज मला दोन याचना करायच्या आहेत. दयाळु होऊन त्या पूर्ण कराव्या. नाहीं तर मला अगदीं मर्मांतिक यातना होईल. पहिली याचना इतकीच आहे, येत्या पत्रीं आपल्या मानसिक स्वास्थ्याविषयीं सविस्तर खुलासा करावा. मी पशु, पक्षी, कीटक, पतंग किंवा काय पाहिजे तें जरी असलें, तरी हें जाणण्याची मला इच्छा झाली आहे. आणि दुसरी विनंति इतकीच आहे कीं, आपलें लांबलचक पत्र वाचून मला सुख होवो वा दुःख होवो, ती चिंता करून आपण संक्षिप्त पत्र पाठवित जाऊं नये !

पत्रांत एके ठिकाणीं लिहिलें आहे 'जेव्हां ह्मणून व्याख्यानाला योग्य विषय सांपडेल, तेव्हां तेव्हां व्याख्यान हें आमचें अवश्य सुरू व्हायचेंच.' मला तरी हेंच पाहिजे ! शिवाय, वक्त्याला इच्छा मात्र पाहिजे, विषयांला मुळींच तोटा नाहीं ! मला वाटतें, मीसुद्धां चारपांच विषय सुचवूं शकेन. आजच माझ्या मनांत किती तरी विषय आले आहेत. तेच घेतले तरी देखील मोठीं सुंदर सुंदर व्याख्यानें देतां येतील.

( १ ) हिंदुस्थानांतील स्त्रिया आणि पशुपक्षी यांत भेद काय ?

( २ ) अशिक्षित हिंदु स्त्रियांकडून त्यांच्या पतींनां होणारें दुःख.

( ३ ) जिवंत राहून पतीला कष्ट देण्यापेक्षां हिंदु स्त्रियांनीं आत्महत्या कां करूं नये ?

आणखी कितीतरी विषय आहेत ! मला तर हेच विषय चांगले आहेत असें वाटतें. मला मोठी अशा आहे कीं, येत्या पत्रीं यांतील तत्त्व काय आहे तें मला कळेल !

मातृपदाला पोहोंचणें ह्मणजे सामान्य गोष्ट नाहीं; तसेंच जननीचें कर्तव्य आति कठीण आहे, हें किंचित् किंचित् मला समजत आहे. आतांशा मी दुर्धर चिंतेंत पडल्यासारखी झालें आहें. कांहींकेल्या समाधान ह्मणून वाटत नाहीं. सदासर्वदा मनांत कांहीं भलभलत्या

आशंका उपस्थित होतात. पुढच्या काळजीनें मी व्याकुळ होऊन जातें. तशांत, आणखी शारीरिक स्वास्थ्यहि बरोबर नाहीं. प्रायः सदोदित कांहींना कांहीं अस्वस्थता वाटत असते. असें कां व्हावें, मला तर कांहीं कळत नाहीं. 'स्त्रियांचीं कर्तव्यें' या पुस्तकांतील 'गर्भिणी' आणि 'जननी' इत्यादि निबंध मला वाचण्याचा उपदेश होत आहे. मलासुद्धां तें सबंध पुस्तक पुनः एकवार वाचण्याची प्रबळ इच्छा झाली आहे; परंतु दुर्दैवानें आतां तें पुस्तकच कोठें सांपडत नाहीं. मला वाटतें, कोणी तरी अज्ञान मनुष्यानें तें कोठें तरी टाकून दिलें असावें. आतां आपण ह्मणालच कीं, माझ्याच निष्काळजीपणानें तें सांडलें असलें पाहिजे; परंतु तूर्त गुणदोषांचा विचार न करितां, बुकपोष्टानें 'स्त्रियांचीं कर्तव्यें' हें पुस्तक पाठविण्यांत येईल काय ? आह्मी हिंदु स्त्रिया—पशुपक्षीवत्! आमच्या गुणदोषांचा विचार इतक्या सूक्ष्म दृष्टीनें करणें शोभतें तरी ? या 'पशुपक्ष्यांनां' 'मनुष्यें' बनविण्यास्तव जो अमोल्य वेळ दवडितां, तो वेळ एखाद्या पुस्तकाच्या वाचनांत घालविला तर त्याचा कितीतरी सदुपयोग होईल !

जाऊं द्या त्या गोष्टी ! कृपा करून पत्राचें उत्तर त्वरित येईल अशी अपेक्षा आहे. आपलें शारीरिक मानसिक कुशलवृत्त समजण्याविषयीं अत्यंत अधीर झालेली,

आपली नम्र दासी,
जानकी.

पत्र ७ वें.

**श्री.**

फर्ग्युसन कॉलेज, पुणें,
ता० २३ जुन, १८—

अनेक आशीर्वाद विशेष.—

तुझें पत्र आतांच वाचून संपलें. माझ्या गेल्या खेपेच्या पत्रानें तुला किंचित् विषाद वाटल्यासारखें दिसतें. बुद्ध्या तुझी अवज्ञा करून

मीं माझ्या मानसिक स्वास्थ्यासंबंधीं समाचार पत्रीं लिहिला नाहीं, असा तूं आपल्या मनाचा भलताच ग्रह करून घेतल्यासारखें दिसतें. आश्चर्याचीच गोष्ट समजली पाहिजे ! जानकी ! माझ्याकडून असें वर्तन घडेल असें तुला वाटतें तरी ! इतक्या दिवसांनीं आज तूं या अशा विलक्षण भ्रमांत कशी पडली असावीस, कांहीं तर्क चालत नाहीं ! 'स्त्रिया तेवढ्या मूर्ख, सारासारविचारशून्य, सुखदुःखाहि समजण्यास असमर्थ, पशुपक्षीवत्' इत्यादि अपूर्व विधानें आह्मांला ऐकविण्याचा अर्थ काय बरें ? अशा प्रकारचे उद्गार मजकडून कधींहि निघाल्याचें तुला स्मरतें तरी? गेल्या खेपेच्या पत्रीं तूं केवळ माझें शारीरिक स्वास्थ्य जाणण्याचीच इच्छा प्रदर्शित केली होतीस; परंतु हें तूं अगदीं विसरलीस वाटतें, कीं, शारीरिक स्वास्थ्याबरोबर मानसिक स्वास्थ्य नसेल, तर मनुष्य कधींहि सुखी होऊं शकणार नाहीं. आणि ह्मणूनच कोणाचेंहि कुशलवृत्त जाण्याची जिज्ञासा असेल तर त्याचें शारीरिक, मानसिक, उभयविध कुशल विचारावें लागतें. नाहींपेक्षां वास्तविक कुशलता अवगत होत नाहीं. केवळ ही गोष्ट तुझ्या लक्ष्यांत यावी, एवढ्याच उद्देशानें मीं तसें लिहिलें होतें; परंतु त्याचा असा विपरीत अर्थ करून घेऊन तूं कष्ट पावशील—स्वप्नांतसुद्धां ही कल्पना मला शिवली नाहीं! अभिमानिनीचा मान राखण्याकरितां पुनरपि लिहितों, मी शारीरिक, मानसिक सर्व प्रकारें कुशल आहें; तरी पण माझ्या लिहिण्याचें इङ्गित न समजल्यामुळें अभिमानिनीला निष्कारण मनःकष्ट झाले हें पाहून मला फारच वाईट वाटत आहे!

बरें, मी आणखी असें विचारतों, तूं आपल्या अदृष्टाचा एवढी निंदा काय ह्मणून करते आहेस? स्त्रियांनीं आपल्या अदृष्टाची निंदा करणें अथवा पतीची निंदा करणें, मला वाटतें दोन्ही एकच! निदान माझा तरी असा समज आहे. पण या लिहिण्याचाहि नाहींना राग येणार ! 'स्त्रियांचीं कर्तव्यें' या पुस्तकाची एक प्रत पाठविण्यांत येईल का ह्मणून विचारलें आहेस. किंमतीचे पैसे आल्यास एकच कां, दहासुद्धा

पाठवूं शकेन. प्रिय सुहृदांकरितां एवढी तसदी घ्यावयाची नाहीं, तर मग कोणाकरितां घ्यावयाची !

तुझ्या प्रकृतीला आतांशा स्वास्थ्य वाटत नाहीं—किंचित् अस्वस्थता वाटत असते, व त्याबद्दल तूं बरीच घाबरून गेल्यासारखें दिसत आहे! मी तुला निश्चयपूर्वक सांगतों, तुझी ही भीति अगदीं निरर्थक आहे. ही अस्वस्थता लवकरच दूर होईल. त्यासाठीं तूं निष्कारण चिंता करित बसून कष्टी होऊं नकोस. तूं मनामध्यें पक्कें वागीव कीं, परम करुणामय परमेश्वरानें घालून दिलेले मंगलकर नियम यथायोग्य पाळले असतां, मनुष्य कधींहि कोणत्याहि प्रकारें विपद्ग्रस्त होणार नाहीं. सर्वसाधारणपणें असें दिसून येतें कीं, गर्भिणी स्त्रिया, प्रथमप्रसवप्रसंगीं अत्यंत भयाकुल होतात! प्रसूतीच्या समयीं क्वचित्प्रसंगीं दुष्परिणाम घडलेला पाहून त्यांनांहि मनामध्यें वाटूं लागतें कीं, आपलीहि अवस्था अशीच होणार नाहीं कशावरून? परंतु त्यांनां हें माहीत नसतें कीं, हे जे एवढे दुष्परिणाम घडत असतात ते बव्हांशीं त्यांच्या अज्ञान-जनक दोषांमुळेंच घडतात. गर्भावस्थेमध्यें शरीरावर कोणत्याहि प्रकारें अत्याचार झाला नाहीं, नैसर्गिक नियमांचा कोणत्याहि प्रकारें भंग झाला नाहीं, स्वास्थ्यरक्षणार्थ सदैव तत्पर असलें, गर्भिणी प्रत्येक बाबतींत सुविचारपूर्वक सावधानतेनें वागत असली, तर प्रसवकालीं कधींहि कष्ट किंवा दुष्परिणाम होणार नाहींत, हें अगदीं निश्चित आहे.

स्वास्थ्यरक्षणासंबंधीं आज आणखी एकवार थोडेंसें सांगितलें पाहिजे. या विषयाकडे तुझें मुळींच लक्ष्य जात नाहीं ह्मणून मला पुनःपुनः या गोष्टीचा निर्देश करावा लागतो. आपल्या स्त्रिया स्वास्थ्यरक्षणाचा भार साधारणतः परमेश्वराच्या डोक्यावर टाकून निश्चित असतात; परंतु जानकी! हें योग्य नाहीं. जगदीश्वर स्वर्गराज्यांतील आपल्या सिंहासनाचा परित्याग करून या मर्त्यलोकीं येऊन आमचीं गात्रें प्रक्षालन करील, दुधांत पडलेल्या माशा काढून टाकील, रोग्याच्या मुखांत औषध आणून घालील, क्षतस्थानीं मलमपट्टी लावील अथवा आमच्यासाठीं

स्वयंपाक करून आह्मांला स्वास्थ्यकर भोजन वाढील, अशी आशा नितांत मूर्खहि करणार नाहीं! असें असतांहि, स्वास्थ्यरक्षणाची कांहीं गोष्ट निघाली, कीं, अनेक—विशेषतः आपला स्त्रीसमाज—ह्मणत असतात 'भगवंत जसें करील तसें होईल! आपल्याच्यानें काय होणार आहे?' परंतु परमेश्वरावर असा सर्व भार टाकून स्वस्थ बसणें योग्य नव्हे! त्यानें आह्मांला विवेकबुद्धि आणि विवेचनाशक्ति दिली आहे. त्यांचा उपयोग करून आह्मांला संसारधर्म पालन केला पाहिजे. त्यानें क्षेत्र आणि बीज दिलें आहे. आह्मीं त्या क्षेत्रांत बीज पेरून धान्य उत्पन्न करून खाद्यद्रव्यें तयार करून घेतलीं पाहिजेत. त्यानें कापशीच्या झाडांमध्यें कापूस दिला आहे, तो कापूस घेऊन त्याचें सूत कांतून वस्त्रें विणून त्या वस्त्रांनीं आह्मीं आपली लज्जा निवारण केली पाहिजे. त्यानें या सृष्टीमध्यें वृक्ष, लोखंड, नदी, समुद्र निर्माण केलीं आहेत. आह्मीं आपल्या बुद्धिकौशल्यानें लांकूड आणि लोखंड यांच्या सहाय्यानें नौका अथवा जहाज निर्माण करून नदी, समुद्र तरून गेलें पाहिजे. याचप्रमाणें सर्व गोष्टी! आह्मी यत्न, उद्योग करणार नाहीं, खुशाल हातपाय ताणून निजून रहाणार आणि ह्मणणार ईश्वर येऊन आमच्या मुखांत घांस देईल! हें कधीं संभवेल तरी! त्याचप्रमाणें, आह्मीं कांहींएक यत्न केला नाहीं, शरीराची हेळसांड केली, अथवा नैसर्गिक नियमांचा भंग केला, तर भगवान् स्वर्गावरून खालीं उतरून आमच्या स्वास्थ्याचें रक्षण करणार नाहीं. आह्मीं मच्छरदाणी तयार करून घेतली नाहीं, तर रात्रीं परमेश्वर आमच्या शयनगृहांत येऊन मच्छरें हांकित बसून मच्छरदंशापासून आमचें कधींहि रक्षण करणार नाहीं. निसर्गदेवतेच्या नियमांचा भंग केला कीं मनुष्य पीडित झालाच! रोगमुक्त होण्याकरितां भगवंतानें औषधें निर्माण करून ठेविलीं आहेत. योग्य दिशेनें प्रयत्न चालविला, तीं औषधें मिळविलीं, त्यांचा उपयोग केला, तर आह्मी पुनरपि आरोग्यलाभ करूं—नाहीं तर नाहीं! भगवंताच्या

शिरावर अथवा आपल्या अदृष्टावर स्वास्थ्यरक्षणाचा भार टाकून आपण स्वस्थ राहाणें, हें सुबुद्धिसंपन्न मनुष्याचें कर्तव्य नव्हे—आणि याचा तादृश उपयोगहि होणें नाहीं!

ही गोष्ट मनामध्यें योग्य रीतीनें ठसण्याकरितांच एवढें लांबलचक चऱ्हाट लावावें लागलें, शक्य असल्यास या वरील लिहिण्यांतील मर्म आपल्या परिचित रमणीगणास समजावून देण्याचा यत्न करशीलच!

स्वास्थ्यरक्षणाचें प्रथम अंग—पुष्टिकर खाद्य. द्वितीय अंग—शुद्ध वायु-सेवन. तृतीय अंग—वस्त्र आणि देहशुद्धि, स्वच्छता. चतुर्थ अंग—यथायोग्य व्यायाम. पंचम अंग—सुनिद्रा आणि षष्ठांग मानसिक सुख. या मुख्य मुख्य सहा गोष्टींविषयीं योग्य खबरदारी घेतली, तर मनुष्य निरोगी, स्वस्थकाय आणि दीर्घायुषी होऊन परम सुखानें संसारयात्रा करूं शकेल. शिवाय, हे नियम पाळायला ह्मणजे कांहीं द्रव्याची अपेक्षा आहे, असेंहि नाहीं. अर्थात्, सर्वांनां हे पाळतां येण्याजोगे आहेत. परंतु सांप्रत कितीजण बरें शरीरस्वास्थ्य अनुभवित आहेत? आहार हा प्राण्याचें जीवन आहे. आहाराशिवाय मनुष्यप्राणी अधिक काल वांचूं शकणार नाहीं. दैनिक श्रम आणि इतर स्वाभाविक क्रिया, यांच्या योगें प्रतिदिनीं आमचें शरीर थोडेंथोडें झिजत असतें—सुखाद्यद्वारा हा क्षय भरून काढणें अत्यंत आवश्यक आहे. तसें जर केलें नाहीं, तर जीवनशक्तीचा दररोज थोडाथोडा क्षय होतां होतां शेवटीं अकाल मृत्यु उपस्थित व्हावयाचा. आह्मी जें कांहीं भक्षण करित असतों, तें जगन्नियंत्याच्या अपूर्व कौशल्यानें पक्काशयांत पोहोंचतें. पक्काशयामध्यें त्याचें संशोधन होऊन त्यांतील सरस भागांचें रक्त बनलें जातें—आणि याच रक्तापासून आमच्या शरीराचें पोषण होत असतें. आहारामधील नीरस भाग मलरूपानें उत्सर्ग पावत असतो. आणि ह्मणून आपण आपल्या पचनशक्तीप्रमाणें सात्विक आणि पुष्टिकर पदार्थ जितके अधिक प्रमाणानें सेवन करूं, तितकें आपलें शरीर पुष्ट आणि सुस्थ होईल. उलटपक्षीं, निःसत्व अन्न सेवन करित गेलें तर शरीरहि क्रमाक्रमानें

आपल्या लक्ष्यांत न येतां—दुर्बल आणि अशक्त होत जाईल. पक्काशयाचा व्यापार नेहमीं सुरू असतो, कधींहि बंद असत नाहीं. आह्मीं जरी कांहींहि सेवन केलें नाहीं, तरी देखील शरीरांतलि रक्त पक्काशयामध्यें ओढलें जाऊन त्यावरच त्याचा व्यापार चालू होतो. आणि त्याप्रमाणें आह्मी जितके अधिक दिवस निराहारी राहूं, तितकें तितकें शरीरांतील रक्त क्रमाक्रमानें क्षय पावेल—अर्थात् आह्मी दुर्बल होऊन जाऊं व मग मृत्यु येण्याला फारसा विलंब लागणार नाहीं. यावरून हें उघड आहे कीं, शरीर आणि स्वास्थ्य यांच्या रक्षणाला सात्विक आणि पुष्टिकर अन्न अत्यंत आवश्यक आहे. परंतु दुःखाची गोष्ट ही कीं, आपला रमणीगण या बाबतींत अगदीं उदासीन असतो. भुकेनें पोटांत काहूर मांडलें आहे, शरीरांतील रक्त पक्काशयांत जाऊन तेथें त्याचें जळून भस्म होत आहे, दिवसेंदिवस शरीर क्षीण होत चाललें आहे, तरी देखील अनेक स्त्रिया तिकडे लक्ष्यहि पुरवित नाहींत! कित्येक स्त्रियांनां तर असेंहि वाटत असतें कीं, अल्प आहार असणें हें एक गुणवतीचेंच लक्षण आहे! 'अहा! कशी पण अगदीं लक्ष्मीच! खायला नको, प्यायला नको, रात्रंदिवस आपली कामांत गर्क!' अनेक मूर्ख स्त्रियांच्या तोंडून असे उद्गार निघतात, व या योगें हिताऐवजीं अहित होतें. अशा प्रकारची मिथ्या प्रशंसा श्रवण करण्याकरितां अनेक अज्ञ स्त्रिया अर्धपोटीं राहून शरीर सुकवून घेतात. कित्येकांनां तर सासूजवळ अथवा वडील माणसांच्या देखत पोटभर खायाला मागण्याची लज्जा वाटत असते! परंतु ही लज्जा प्रशंसनीय नव्हे—उलटपक्षीं अत्यंत तिरस्कारार्ह समजली पाहिजे. क्षुधा लागली कीं तिची शांति केलीच पाहिजे; नाहीं तर शरीर नष्ट होईल. क्षुधा प्रदीप्त होतांच समजावें कीं, शरीरपोषणास्तव पक्काशय अन्न मागतो आहे; आणि तें जर त्याला त्यानें मागतांच मिळालें नाहीं, तर तो आपल्या शांतीस्तव शरीरांतीलच रक्तपान करित राहणार आणि याचा परिणाम किती भयंकर घडतो त्याचा पूर्वींच उल्लेख केला आहे. तुह्मां स्त्रियांनां आग्रहपूर्वक इतकेंच सांगतों कीं, तुह्मी

खाण्यापिण्याच्या बाबतींत बिलकुल उदासीन राहूं नका. पोटभर अन्न सेवन करावें व शक्य असेल तेवढें पुष्टिकर अन्न सेवन करावें. अस्वास्थ्यकर, नासलेलें, शिळें अन्न टाकून द्यावें लागतें म्हणून मूर्खपणाच्या लोभानें तें खाणें अत्यंत हानिकारक आहे, ही गोष्ट नेहमीं पक्की लक्ष्यांत असावी. गर्भिणी आणि मुलांबाळांच्या आईनें तर हे नियम पाळणें अत्यंत आवश्यक आहे. त्यांनीं जर का या नियमांचें उल्लंघन केलें, तर त्यांच्याबरोबरच त्यांच्या बिचाऱ्या निर्दोष, निरपराध शिशुसंतानाला-लाहि नानाप्रकारचे कष्ट भोगावे लागणार हें अगदीं निश्चित आहे.

पत्र बरेंच लांबलें. स्वास्थ्यरक्षणासंबंधीं इतर गोष्टी येत्या पत्रांत लिहीन. आई खुशाल आहेना? तुझी प्रकृति आतां कशी आहे? उत्तर त्वरित पाठवून सर्व हकीगत सविस्तर लिहून कळीव.

आणखी एक गोष्ट सांगतों. निरर्थक चिंता करित बसूं नये. सदोदित अंतःकरण प्रसन्न राखावें. संतानाच्या मंगलासाठीं गर्भिणीचें मन प्रफुल्ल आणि शांतिपूर्ण असणें अत्यंत आवश्यक आहे. ही गोष्ट लक्ष्यांआतून जाऊं देऊं नको.

आज इतक्यावरच रजा घेतों, हे आशीर्वाद,

सर्वस्वी तुझाच,

**सदाशिव.**

**श्री.**

उत्तर.

सावंतवाडी, ता० २९ जून, १८—

सेवेशीं विज्ञापना विशेष.—

काल आपलें उपदेशपूर्ण सुंदर पत्र, आणि आज बुकपोष्टानें पाठविलेलें ‘स्त्रियांचीं कर्तव्यें’ हें पुस्तकहि पोंचलें. पत्र वाचून झालेला परमाल्हाद पत्रीं लिहितां येत नाहीं. आजच्या डांकेमधून जर ‘स्त्रियांचीं कर्तव्यें’ हें पुस्तक आलें नसतें, तर काय पाहिजे तशी व्यवस्था करून त्याच्या किंमतीचे पैसे आपणाकडे पाठविण्याचें

अगदीं निश्चित केलें होतें ! त्याबद्दल एवढी मेली भीति ती काय ह्मणून दाखवावयाची ? आणि असल्या भीतीला का मी भिणार आहें असें आपल्याला वाटतें ! काय बाई तरी ! मी गरीबाची मुलगी असलें तरी आतां कांहीं गरीब नाहीं बरें ! माझे पति तसलीं एक सोडून शंभर पुस्तकें मला विकत घेऊन देण्यास समर्थ आहेत ! ! आपण इथें असतां, तर आपण केलेल्या माझ्या या अपमानाबद्दल आपल्याला योग्य शासन करण्यांत आलें असतें !

आपले परम स्नेही बळवंतराव यांची पत्नी आनंदीबाई त्या दिवशीं सासूबाईजवळ बोलत होती कीं, आपण लौकरच एकवार घरीं येऊन जाणार आहां. खरीच गोष्ट कीं काय ? आनंदीबाईला सत्यवादिनी करण्याकरितां तरी आपण घरीं येऊन जावें, हें आपलें कर्तव्य आहे ! समक्ष भेटीचा सुयोग आल्यास मला कितीतरी महत्त्वाच्या गोष्टींचा खुलासा करून घेतां येईल. पत्रांत कांहीं सर्वच गोष्टी लिहितां येत नाहींत आणि ह्मणून आनंदीबाईच्या तोंडांत साखर पडो, अशी माझी मनापासून इच्छा आहे.

आपल्या अमूल्य उपदेशाचें मर्म माझ्या मैत्रिणींनां समजावून देण्याविषयीं आज्ञा झाली आहे; परंतु यांत एक मोठी अडचण आहे. माझ्या स्वतःच्या संपत्तीचा भाग मीं याला त्याला काय ह्मणून देत सुटावें? मला जर एखादी सवत असती, तर आपण पाठविलेल्या प्रत्येक वस्तूचा समान भाग मीं तिला दिला असता—नव्हे, जरूरच पडल्यास मोठा भाग देण्यासहि कांकूं केलें नसतें ! खरोखरच सांगतें, मला जर एखादी सवत असती, तर आह्मीं दोघींनीं एकत्र बसून आपलें पत्र वाचलें असतें, आणि ज्या कांहीं हांसलों असतों—विनोद केला असता—पुरुषवर्गावर सपाटून टीका केली असती, विचारूं नका ! इतकेंच करून आह्मी स्वस्थ बसलों नसतों बरें ! अंगावरचें किडूकमिडूक विकून त्या पैशानें

ती सारी टीका मुबंईतल्या एखाद्या छापन्यांत पुस्तकरूपानें छापवून तीं पुस्तकें तुह्मां पुरुषवर्गाला फुकट वांटलीं असतीं! आणखी काय केलें असतें, कळलें का? मीं स्वतः प्रतिदिनीं स्वहस्तानें साबण लावून त्या सवतीला स्नान घातलें असतें; सुवर्णपुष्पें, रौप्यपुष्पें आणि नूतन प्रस्फुटित कोमल गुलाबकलिका तिच्या वेणीमध्यें गुंफिल्या असत्या; गुलाबपाणी आणि 'लव्हेंडर वाटर' यांनीं तिचीं गात्रें आणि वस्त्रें आर्द्र करून टाकिलीं असती; त्या सुगंधाच्या घमघमाटानें आपण विमोहित झालां असतां आणि मग मीं आपल्या केशांस, मस्तकास चमेलीचें तेल लावलें असतें—हें काम मात्र त्या सवतीला मीं कधींहि करूं दिलें नसतें! आपण मनांत समजूं नका, सवत असली ह्मणजे हिंदुस्थानांतील सर्वच स्त्रिया मनामध्यें रात्रंदिवस जळफळत असतील. निदान मी तरी तसें करणार नाहीं हे पक्कें समजून रहा! इतकेंच नव्हे, मला सवत असती तर आणखीहि एक मोठी सोय झाली असती—जेव्हां जेव्हां आपण पुण्याला असतां, तेव्हां तेव्हां घरीं यावें ह्मणून आह्मीं दोघींनींहि सही करून आपल्याला पत्र पाठविलें असतें. हल्लींप्रमाणें ती नोटीस अमान्य करण्याचें धाडस मग मात्र आपल्याच्यानें कधींसुद्धां करवलें नसतें! एवढ्याचसाठीं मी ह्मणतें, सवतीवांचून माझी फार अडचण झाली आहे! कसेंहि करून मला गडे एक सवत आणून द्यायचें होईल का? परंतु ती पुण्यामुंबईकडची असावी बरें! आपण या गोष्टीस कबूल न झाल्यास नाइलाजास्तव 'सुधारकां'त जाहिरात देऊन मीं सवत मिळवून घेईन!

सासूबाई खुशाल आहेत. आपल्या आशीर्वादानें मीहि पूर्वीपेक्षां हल्लीं बरी आहें. आमच्याकरितां मुळींच काळजी करूं नये. पुढील पत्राची मार्गप्रतिक्षा करित आहें, हे विज्ञापना.

आपली नम्र दासी,

जानकी.

---

पत्र ८ वें,

**श्री.**

फर्ग्युसन कालेज, पुणें,
ता० १२ जुलई, १८

अनेक आशीर्वाद विशेष.——

मी चार दिवसांकारितां येथून जवळच एका मित्राच्या गांवीं गेलों होतों, त्यामुळें तुझें पत्र किंचित् उशिरां मिळालें व ह्मणून पत्राचें उत्तर पाठविण्यासहि थोडासा विलंब झाला. वास्तविक प्रकार असा असतां, तूं मनांत कल्पना करून बसली असशील कीं, केवळ हयगयीनेंच माझेकडून पत्र रवाना झालें नाहीं ! हो, बोलूनचालून बायकांची जात ! अभिमान अगदीं नाकावर ! ह्मणून एवढा खुलासा करावा लागला !

तुझ्या या पत्रांत सगळ्या नव्याच नव्या गोष्टी दिसत आहेत ! सवतीची तुला एवढी हांवशी सुटली आहे ! सवतीशीं कशा रीतीनें वागणार याबद्दल तूं जे तुझे स्वतःचे विचार प्रदर्शित केले आहेस, मला वाटतें, कोणाहि स्त्रीला ते सम्मत होणार नाहींत ! नव्हे, सवतीसंबंधीं नुसते विचारच सहन होणार नाहींत, मग तिला नांदविणें दूरच राहिलें ! परंतु तूं तर ह्मणे तिला न्हाऊंधुऊं घालणार, तिची वेणीफणी करणार, अन् तिला सजवणार नटवणार ! आणि मी काय करणार सांगूं ? मी त्या तुझ्या सवतीच्या तोंडाला छानदार काजळ सारवणार, तिच्या अंगावर केरोसिन तेल ओतणार—आणखीहि काय करणार सांगूं—बरें असो ! पुण्यामुंबईकडच्या मुली सुरेख असें का तुला वाटतें ? सवतीवांचून तुझें अगदीं अडलेंच असेल तर तुझ्या धाकट्या बहिणीकडून तें काम नाहीं का व्हायचें ?

तुझी प्रकृति पूर्वींपेक्षां हल्लीं बरीच स्वस्थ आहे हें ऐकून फार संतोष होतो. स्वास्थ्यरक्षणासंबंधीं विशेष काळजी बाळगशील तर तुला पूर्ण आराम वाटल्याखेरीज कधींहि राहणार नाहीं. आहाराचा स्वास्थ्यरक्षणाशीं किती निकट संबंध आहे, आणि त्याचप्रमाणें पुष्टिकर

अन्नसेवन केलें नाहीं तर स्वास्थ्यभंग कसा होत असतो, व शरीर दुर्बल आणि रुग्ण कसें होतें, यासंबंधीं गेल्या पत्रीं थोडेंसें लिहिलेंच आहे. स्वास्थ्यरक्षणाच्या इतर अंगांविषयीं आज थोडेंसें विवेचन करण्याचा मानस आहे.

स्वास्थ्यरक्षणाचें द्वितीय अंग निर्दोष वायुसेवन होय. मनुष्य अन्नाविना एखादेवेळीं कांहीं काल वांचूं शकेल, परंतु वायुसेवनाविना तो अगदीं अल्पकालहि जगूं शकणार नाहीं. दोनचार मिनिटेंच श्वास कोंडला गेला, तर तो खात्रीनें मरेल. यावरून जीवनरक्षणाच्या कामीं वायूची केवढी आवश्यकता आहे, हें उघड समजण्याजोगें आहे; परंतु हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे कीं, पवित्र–निर्मल वायु ज्याप्रमाणें हितकर आहे, अपवित्र–दुर्गंधमय वायु, त्याप्रमाणेंच नुकसान करणारा आहे. यास्तव, आपल्या रहात्या घराच्या सभोंवार आणि त्याचप्रमाणें बसण्या उठण्याच्या आणि निजण्याच्या वगैरे जागीं कसलाच दुर्गंधमय पदार्थ ठेवणें घातुक आहे. घराचीं आणि खिडक्यांचीं दारें सदासर्वकाळ बंद ठेवणेंहि फार अनिष्टकारक होय. यामुळें बाहेरील पवित्र आणि निर्मळ वायूचा आंत प्रवेश न झाल्याकारणानें आंतली हवा अगदीं दूषित होऊन जाते व सूर्यकिरणांच्या अभावामुळें एकंदर वस्तुहि बिघडत असतात. यास्तव, ज्या वेळीं अति प्रखर ऊन असेल तेवढाच अवकाश खेरीजकरून बाकी दिवसाचा सारा वेळ, घराचीं आणि खिडक्यांचीं वगैरे दारें भेहमीं उघडींच राखलीं पाहिजेत. यानें स्वास्थ्यरक्षण होतें आणि घरांतील वस्तुहि सुस्थितींत राहतात.

तोंडावरून गुरफटून पांघरूण घेऊन निजण्याची वाईट खोड बहुतेकांस जडलेली असते; परंतु ह्यानें शरीरप्रकृतीला केवढा अपाय होत असतो, हें कोणालाच ठाऊक नाहीं. नाक आणि तोंड बंद राहिल्यानें श्वासोच्छ्वासाची क्रिया बरोबर चालत नाहीं व बाहेरील शुद्ध हवा नाकावाटे आंत जाऊन आंतली घाणेरडी हवा बाहेर न जातां तीच तीच घाणेरडी हवा पुनःपुनः आंत जाते व याचा परिणाम अर्थातच

घातुक होतो. अनेक मूर्ख आया आपापल्या निद्रित बालकांना नाक तोंड झांकून जाईल असें पांघरूण घालून निजवितात! परंतु या योगें त्या बिचाऱ्या बालकांना केवढे कष्ट होतात, आणि त्यांची प्रकृतिहि कशी बिघडत असते, याची त्यांना कल्पनाहि नसते. बालकांना पूर्णपणें श्वासोच्छ्वास करतां आला नाहीं तर तीं वयाप्रमाणें न वाढतां खुजीं आणि रोगट होतात. यास्तव या गोष्टीला फार जपलें पाहिजे. शुद्ध हवेचें महत्त्व फारच आहे.

स्वास्थ्यरक्षणाचें तृतीय अंग स्वच्छता—निर्मळपणा. शरीर, घर, जागा, सामानसुमान, भांडीकुंडीं, वस्त्रेंप्रावरणें, अन्न व इतर वस्तु ह्या नेहमीं अत्यंत स्वच्छ आणि निर्मळ राखण्याची किती आवश्यकता आहे, व ह्या नियमाचा जर यत्किंचित्‌हि भंग झाला तर आपल्याला कसकसे नानाप्रकारचे कष्ट सोसावे लागतात, हें मला वाटतें, आजकाल तुझ्यासारख्या विचारी स्त्रियांस विशेष समजावून सांगण्याची फारशी आवश्यकता नाहीं. यास्तव या बाबतींत विशेष लिहिण्याचें प्रयोजन नाहीं.

स्वास्थ्यरक्षणाचें चतुर्थ अंग नियमित आणि यथायोग्य व्यायाम होय. ज्याप्रमाणें वापरांत नसलेल्या कुलुपाची किल्ली तांबीनें गंजून गंजून शेवटीं नष्ट होऊन जाते, त्याप्रमाणेंच आळशी आणि निरुद्योगी मनुष्याच्या जीवनशक्तीचा उत्तरोत्तर ऱ्हास होत जातो; परंतु उलटपक्षीं वापरांत असलेली किल्ली ज्याप्रमाणें चकचकीत आणि सुस्थितींत राहते, कार्यतत्पर आणि सततोद्योगी मनुष्यहि तद्वतच सबळ आणि निरोगी राहतो. यास्तव धनवान असो वा निर्धन असो, पुरुष असो वा स्त्री असो, सर्वांनीं नेहमीं कांहीं ना कांहींतरी शारीरिक परिश्रम हा केलाच पाहिजे. साधारण सुखवस्तु आणि श्रीमान् लोक आणि त्यांतहि विशेषतः शहरांतील खोटी मिजास बाळगणाऱ्या मूर्ख स्त्रिया, घरांतील व इतर सर्व कामकाजाचा भार नोकरचाकरांवर सोंपवून आपण अगदीं स्वस्थ बसत असतात. परंतु हें फार वाईट आहे! शरीर निरोगी रहावें अशी ज्याची इच्छा असेल त्यानें दिवसांतून कांहीं वेळ तरी यथाशक्ति

शारीरिक श्रम हे केलेच पाहिजेत. श्रीमंत लोकांमध्यें जी अग्निमांद्याची आणि स्थूल शरीराची वारंवार कुरकुर ऐकूं येत असते, याचें वास्तविक कारण हेंच आहे. जे लोक प्रत्यहीं शारीरिक श्रम करित असतात, ते साधारणपणें इतरांपेक्षां निरोगी राहून अधिक काळ वांचतात. परंतु शारीरिक परिश्रम हितकर ह्मणून ते शक्तीच्या बाहेर करणें मात्र चांगलें नव्हे! सर्व गोष्टींत मितपणा हा असलाच पाहिजे. मुळींच व्यायाम न केला तर ज्याप्रमाणें शरीराला अपाय होतो, त्याप्रमाणेंच तो वाजवीहून फाजील केला असतांहि नुकसान होतें. बायकांनीं शारीरिक परिश्रम केले पाहिजेत असें सांगितलें, यावरून असें मात्र कोणीं समजूं नये, कीं, सुखवस्तु आणि श्रीमान् स्त्रियांनींसुद्धां हातांत फुंकणी घेऊन चुलीच्या धगापाशीं बसलेंच पाहिजे, किंवा कडेवरून पाण्याच्या कळशांच्या कळशा आणल्याच पाहिजेत, अथवा असेंच दुसरें कांहीं तरी केलें पाहिजे! पुष्कळ ठिकाणीं मीं पाहिलें आहे, कित्येक लहानलहान कोंवळ्या पोरी आईकडून किंवा सासूकडून प्रशंसा संपादण्याकरितां पाण्यानें भरलेल्या मोठमोठ्या कळशा कुंथत कुंथत कडेवरून वाहत नेतात; परंतु हें फारच घातुक आहे. अति कष्टकर, अति परिश्रमाचें कोणतेंच काम करणें चांगलें नव्हे. यापासून उपकाराच्या ऐवजीं अपकारच होतो. जें काम केल्यानें अत्यंत श्रम होतील तें काम कोणीहि कधींहि करूं नये! अनेक मूर्ख स्त्रिया शक्तीपलीकडे श्रम करून प्रकृति बिघडवून घेऊन यावज्जीव दुःख भोगित असतात. गर्भिणी स्त्रियांनीं तर पाण्यानें भरलेली जड कळशी किंवा असेंच दुसरें कसलेंहि शक्तीपलीकडे काम करणें महत् पातक आहे! सारांश, अगदींच व्यायाम न करणें किंवा तो अति करणें हें घातुक आहे.

स्वास्थ्यरक्षणाचें पंचमांग सुनिद्रा होय. रात्रीं झोंप बरोबर लागली नाहीं तर दुसरे दिवशीं कसेंसेंच वाटत असतें, अंग सारें गळल्यासारखें होऊन जातें, याचा अनुभव प्रत्येकाला असेलच. निद्रा, दिवसामधील साऱ्या श्रमांचा परिहार करून मनुष्याला नवोत्साह आणि नवशक्ति

प्राप्त करून देते. यास्तव प्रत्येकानें रात्रीमध्यें कमींत कमी सहापासून आठनऊ तास झोंप घेणें अवश्य आहे. कित्येकांनां दिवसा झोंप घेण्याची संवय जडलेली असते, परंतु ती बरी नव्हे. दिवसा निजल्यानें शरीरांत आलस्य उत्पन्न होतें. यावरून कोणीहि दिवसा निजतांच कामा नये, असें मात्र समजूं नको. कांहीं विशेष प्रसंगामुळें रात्रीं जागरण झालें असेल, किंवा परिश्रम झाले असतील, अथवा शरीर दुर्बल झालें असेल, तर, आणि अशाच दुसऱ्या कित्येक प्रसंगीं, दिवानिद्रा अवश्य पाहिजे. ती न घेतली तर उलट नुकसान आहे. घरामध्यें किंवा शेजारींपाजारीं लग्नकार्य अथवा अशाचसारखा दुसरा कांहीं उत्सवप्रसंग असला, ह्मणजे कित्येक मूर्ख स्त्रिया आनंदानें मत्त होऊन अहारनिद्रा पार विसरून जातात; परंतु यापासून त्यांच्या शरीराची जी दुर्दशा उडत असते तिकडे कोणी एकीचेंहि लक्ष्य नसतें. जानकी! तूं ही गोष्ट पक्की लक्ष्यांत ठेव कीं, जीवन धारणास ज्याप्रमाणें सु-खाद्य पुष्टिकर अन्न, निर्मल वायुसेवन, व्यायाम इत्यादिकांची आवश्यकता आहे, सुनिद्रेचें महत्त्व त्याहून यत्किंचितूहि कमी नाहीं! पुरुषानें उजव्या कुशीवर आणि स्त्रीनें डाव्या कुशीवर निजणें चांगलें, असें आपल्या वैद्यकशास्त्राचें मत आहे.

स्वास्थ्यरक्षणाचें षष्ठांग मानसिक सुख होय. मन स्वस्थ नसलें तर शरीर स्वस्थ असणार नाहीं आणि शरीर स्वस्थ नसलें तर मनालाहि आराम वाटणार नाहीं. शरीर आणि मन या उभयतांचा निकट संबंध आहे. यांतील एकाला व्यथा झाली कीं दुसरें व्यथित व्हावयाचेंच! अनेक निरोगी, बलिष्ठ मनुष्यांनां आकस्मिक एखादी मानसिक व्यथा जडतांच अल्पावधींत त्यांची शरीरप्रकृति कशी निकृष्ट होऊन जाते, तें आपण पहातोंच. अर्थातच, शरीर सुस्थ रहावें अशी इच्छा असल्यास, मनाहि सुस्थ राखलें पाहिजे. मानसिक स्वास्थ्य कसें संपादावें हें या अल्पशा पत्रांत सविस्तर लिहिणें कठीण आहे. पण थोडक्यांत लिहावयाचें ह्मणजे एवढेंच कीं, देवानें आपणांस जी स्थिति दिली असेल तींतच संतुष्ट

राहिल्यानें सुख लाधतें. असंतुष्ट व्यक्तीला इहलोकीं वा परलोकीं कधींहि शांतिसुख मिळण्याची आशा नाहीं ! कित्येक स्त्रियांचा असा निंद्य स्वभाव असतो कीं, त्या गतदुःखाच्या गोष्टींचें पुनःपुनः स्मरण करून, अथवा पुढें येणाऱ्या दुःखाविषयींच्या भयंकर कल्पनांनीं विव्हल होऊन अनर्थक मर्मांतिक-यातना भोगून शारीरिकस्वास्थ्याचा भंग करून घेत असतात. हा निंद्य स्वभाव प्रत्येकीनें सोडण्याचा यत्न केला पाहिजे.

तात्पर्य, वर दर्शविलेल्या उपदेशानुसार वागण्याचा प्रयत्न केल्यानें सर्वांहि सुस्थशरीर आणि दीर्घायु होऊन परम सुखानें कालक्रमणा करूं शकतील, हें निश्चित आहे. या उपदेशानुसार वागण्यांत तुझ्याकडून यत्किंचितहि हयगय होणार नाहीं, अशी आशा करितों. हे आशीर्वाद—

सर्वस्वी तुझाच,

**सदाशिव.**

उत्तर.

**श्री.**

सावंतवाडी, ता० १५ जुलई, १८—

सेवेशीं विज्ञापना विशेष.—

आपलें स्वास्थ्यरक्षणासंबंधींचें उत्कृष्ट उपदेशानें भरलेलें सुंदर पत्र वाचून मनाला जो हर्ष झाला तो पत्रीं व्यक्त करण्याचें लेखणीला सामर्थ्य नाहीं याबद्दल दिलगिरी वाटते ! आपण आपल्या एका मित्राच्या घरीं कांहीं दिवस रहावयाला गेला होतां, आणि त्यामुळें माझ्या पत्राचें उत्तर पाठविण्यास विलंब झाला ह्मणून लिहितां; परंतु मी इकडे सवतीचा तलास करण्यामध्यें व तत्संबंधीं विचारांत रात्रंदिवस चौविस कलाक गुंतून गेलें होतें.एक घडीचाहि अवकाश नव्हता. तथापिहि आपल्या पत्राचें उत्तर पाठविण्यास मजकडून एका क्षणाचाहि विलंब लागला नाहीं ! पहा बरें मी केवढी दक्ष ती ! 'स्त्रिया वेळाचा सदुपयोग करण्यास अजून शिकल्या नाहींत ' असा दोषारोप इत्त्युत्तर तरी ऐकूं येणार नाहीं, अशी बळकट उमेद आहे !

माझ्या धाकट्या बहिणीस सवत करून घेण्याला माझी हरकत आहे! कारण, ती तर माझ्यासारखीच मूर्ख, अडाणी, वेडगळ, गांवढळ मुलगी! ती माझ्यासारखीच खुळचटपणा करील! सवतीपासून मला जो लाभ व्हावयाचा तो माझ्या धाकट्या बहिणीकडून होण्याचा मुळींच संभव नाहीं! ह्मणूनच ह्मणतें, सवत जी आणायची, ती गडे मुंबई पुण्याकडीलच आणायची! पुण्या-मुंबईच्या मुली मोठ्या सुंदर, हुषार, विद्वान् आणि पतीला तळहाताच्या फोडासारख्या जपणाऱ्या, ह्मणून दिगंत ख्याति आहे! यास्तव मला त्यांतलीच सवत पाहिजे आहे! आणखीहि एक आहे. पुष्कळांच्या तोंडून मीं ऐकिलें आहे कीं, पुण्या मुंबईकडच्या मुली मोठ्या मधुरभाषिणी असतात! त्यांच्या मिष्ट कथांनीं प्राण तुष्ट होतो! त्या रुदन करूं लागल्या असतांहि जणूं त्या गातच आहेत असा ऐकणाराला भास होतो! इतकेंच नव्हे, तर त्या जरी एखाद्याला शिवीगळ करूं लागल्या तरीहि त्यांच्या त्या शिव्या गोडच लागतात! पहा बरें ही किती मजेची गोष्ट आहे! सवतीबरोबर कधींकाळीं कलह झाल्यास ती तर मला शिव्या देईलच, परंतु मला त्या मिष्ट लागतील—माझ्या कर्णामध्यें मधुवर्षण होईल! तिचेंहि काम होईल, मलाहि दुःख वाटणार नाहीं! आणि यदाकदाचित् त्या मधुरभाषिणीनें एखादे वेळीं संतप्त होऊन आपल्याशीं रागानें भाषण केलें तरीहि त्या वेळीं आपण विरक्त न होतां तिच्या त्या मिष्ट कथांनीं तुष्टच होऊन जाल! आणि ह्मणूनच मला पुण्या-मुंबईकडचीच सवत हवी आहे!

कळविण्यास अत्यंत वाईट वाटतें कीं, आपल्या शेजारच्या लक्ष्मीबाईंची सून साविञीबाई, त्या दिवशीं एकाएकीं आजारी पडून हल्लीं अत्यावस्थ आहे. बळवंतराव भावोजी कालच मुंबईहून आले. पत्नीची ही आसन्नमरणावस्था पाहून ते फारच दुःखांत आहेत! औषधोपचार चालले आहेत. वैद्यानें काल उघड सांगितलें कीं, व्याधि आजकालची नसून कैक दिवसांची आहे. प्रथमच औषधयोजना झाली

नाहीं व हवेंतसें आचरण घडलें, यामुळें क्रमाक्रमानें रोग वाढून सांप्रत असाध्य होऊन बसला आहे. इतक्यावर स्थिति आली असूनहि आश्चर्याची गोष्ट ही कीं, रोगी बेपर्वाईनें वागत आहे! औषध घेत नाहीं, पथ्य करित नाहीं आणि वैद्याच्या सांगण्याप्रमाणें वागत नाहीं. उठून बसण्याची अंगांत शक्ति नाहीं तरीदिखील उघड्या अंगानेंच वाऱ्यामध्यें जाते व स्नान वगैरे करते. आणखीहि बरींच कुपथ्यें करित असते. व्याधि दिवसोंदिवस बळावत आहे, भावोजी फार कष्टी झाले आहेत, परंतु पत्नीपुढें त्यांचा कांहींएक इलाज चालत नाहीं! आपण कधीं याल? अवश्य लिहावें. आह्मी सर्व मंडळी खुशाल आहों, हे विज्ञापना,

आपली नम्र दासी,

जानकी.

पत्र ९ वं.

**श्री.**

फर्ग्युसन कालेज, पुणें,
ता० २५ जुलई १८—

अनेक आशीर्वाद, विशेष.

तुझें ता. १५ जुलईचें पत्र योग्य वेळीं पोंचलें. या खेपेलाहि कित्येक अडचणींमुळें उत्तर पाठविण्यास किंचित् विलंब लागला, रोष नसावा. बळवंतरावांच्या पत्नीच्या आजाराबद्दल हकीगत लिहितेस. बळवंतरावां-प्रमाणेंच इकडेहि माझा एक स्नेही पत्नीच्या घातकी हट्टी स्वभावामुळें आणि भयंकर अज्ञानामुळें अगदीं वैतागून गेला आहे. अरेरे! बिचाऱ्याची आठवण होतांच अंतःकरण फाटूनच जातें! तो सोशित असलेले हाल तूं प्रत्यक्ष पहाशील तर तूंहि डोळ्यांतून टपटप आसवें गाळशील! बिचाऱ्याला मिळतात सारे दरमहा चाळीस रुपये. मुलांलेंकरांचें घर आणि तशांत पुण्यासारख्या शहरची वस्ती. गृहस्थी बाण्यानें राहावें लागत असल्यामुळें जमेला आणि खर्चाला मेळ

बसण्याची पंचाईत—त्यांत बायकोचें हें आणखी वर दुखणें ! इकडचें तिकडे तिकडचें इकडे कसें तरी करून वैद्याला पैसे देऊन औषध आणतो, परंतु काय उपयोग ! ती दुष्ट, चांडाळीण कांहीं केल्या औषध ह्मणून घेतच नाहीं! वारंवार तोंड सुकतें, घशाला कोरड पडते, तोंडाला रुची नाहीं, ह्मणून वैद्याच्या सांगण्यावरून नवरा कंकोळ, खडीसाखर, द्राक्षें वगैरे वस्तु आणून देतो, परंतु पहावें तर ती आपली त्या वस्तु मुलांलेंकरांस देऊन टाकते, स्वतः एक दाणाहि तोंडांत धरित नाहीं! नवऱ्याला नकळत औषध फेकू देते, नवरा किंवा दुसरें कोणी अतिशय रागें भरलें तर ह्मणते ‘ जळलं तें औषध ! जात बाटायला मेले कांहींतरी देतात. मी नाहीं करणार असला भ्रष्टाकार ! कपाळांत जें असेल तें होईल ! ’ वैद्याचें सांगणें न ऐकतां विस्तवापाशीं जाते, उघड्या अंगानें हिंडते फिरते व सारा दिवस पाण्यामध्यें वावरते ! आज किती दिवसांपासून—नव्हे किती वर्षांपासून—तरी ती आजारी आहे; परंतु कोणा एकाला—खुद्द नवऱ्यालाहि—तिनें आपली व्याधि आज दिवसपावेतों कळविली नाहीं ! दिवसेंदिवस विकार अधिकाधिक वाढतो आहे, द्रव्याचा, वेळाचा किती तरी नाश होत आहे, परंतु अद्यापिहि तिचा घातकी हट्ट सुटत नाहीं ! बायकोच्या या अशा प्राणघातक हट्टामुळें बिचारा नवरा अगदीं हताश होऊन संसारास आणि खुद्द आपल्या जीवासहि कंटाळून गेला आहे! वैतागून त्यानें औषधपाणी बंद केलें होतें, परंतु मीं नानाप्रकारें सांगून पुनः औषध चालू केलें आहे; परंतु नुस्त्या औषधानें काय होणार आहे ? रोगी बुद्ध्या जर कुपथ्यच करूं लागला, तर वैद्य तरी काय करील आणि औषध तरी काय करील! बिचाऱ्या बळवंतरावांची मला फार करुणा येते. पत्नीच्या अविचारी स्वभावामुळें त्यांनां अत्यंत कष्ट होत असतील! आपल्या देशांतील अज्ञान स्त्रियांचा किती विलक्षण स्वभाव हा ! त्या स्वतःला होत असलेली व्याधि खुद्द आपल्या पतीलाहि कळवित नाहींत, मग दुसऱ्यांनां कळविण्याची गोष्ट दूरच राहिली ! रोगाची

पीडा अगदींच दुःसह झाल्याशिवाय अमुक एक स्त्री अमुक एक व्याधीनें पीडित आहे हें बहुतकरून दुसऱ्याला कळायचेंच नाहीं ! परंतु याचा परिणाम शेवटीं अशा भयंकर थरावर जाऊन पोहोंचतो कीं, रोग असाध्य होऊन सर्व उपाय निष्फळ होऊन बसतात. जी व्यथा प्रारंभीं अगदीं सामान्य उपायानें आणि अल्पावकाशांत व अल्प खर्चांत निखालस बरी व्हावयाजोगी असते, ती गुप्त राखून वाढूं दिल्यामुळें मागाहून किती जरी द्रव्य खर्चिलें आणि उत्तमोत्तम औषधें, दिव्य रसायनें घेतलीं. तरीहि बरी होत नाहीं. मी ही फक्त एकीदोघींचीच गोष्ट सांगतों असें समजूं नकोस. कितीतरी अल्पमति स्त्रिया आपली व्याधि गुप्त राखून आजन्म रोगी बनून स्वतः दुःसह यातना भोगतात त्या भोगतातच, आणि आपल्याबरोबर आपल्या नवऱ्याला, मुलांबाळांनां आणि इतर संबंधी-जनांनां नानाप्रकारें मानसिक आणि शारीरिक कष्ट देतात. हा अनिष्ट प्रकार थोड्याबहुत प्रमाणानें सर्वत्र आढळून येतो. गाढ अज्ञानतिमिरांत घोरत असलेल्या आपल्या स्त्रीसमाजामध्यें सुशिक्षणाचा जारीनें प्रसार झाल्याशिवाय ह्या व अशाच प्रकारच्या ज्या दुसऱ्या कित्येक भयंकर खोडी आपल्या स्त्रियांच्या अगदीं हाडींमासीं खिळून राहिल्या आहेत त्या नष्ट होणें शक्य नाहीं!

बळवंतरावांची हकीगत ऐकून फार वाईट वाटतें. बिचाऱ्याची मुलगी अवघी एक वर्षाची आहे. अशा अवस्थेमध्यें दुर्दैवानें पत्नी-वियोग झाल्यास त्या बिचाऱ्याला आणखी काय काय विपत्ति भोगाव्या लागतील, भगवान् जाणे ! शिवाय, गरीबीमध्यें पुनः लग्न करणें म्हणजे कांहीं अशातशांतली गोष्ट नाहीं. त्यांच्या मूर्ख पत्नीला ही गोष्ट कळण्यापुरती अक्कल असती व तिनें जरा विचार करून दूरवर नजर पुरविली असती, तर आज नवराहि विपत्तींत पडताना आणि तिलाहि एवढे हाल सोसावे लागते ना ! आपल्या पश्चात् आपल्या बालकाचे आणि आपल्या पतीचे केवढे हाल होतील ही गोष्ट जर त्या ज्ञानशून्य स्त्रीच्या डोळ्यांपुढें उभी राहिली असती, तर वैद्याच्या आज्ञेविरुद्ध

वागण्यास आणि कुपथ्य करण्यास ती कधींहि धजली नसती. आपली व्याधि अगदीं गुप्त राखून रुग्णावस्थेमध्यें कुपथ्यानें वागून औषधाच्या कामीं पूर्ण अनास्था दाखविण्यांत भूषण मानणाऱ्या दुष्ट—आत्मघातकी स्त्रियांचा मी अगदीं मनापासून तिरस्कार करितों! अशा गुणवती (?) पत्नीशीं संबंध जडून डोक्यांत राख घालून घेण्याचा कुप्रसंग दुर्दैवानें केव्हांहि कोणाहि पतीच्या वांट्यास न येवो, एवढीच परमेश्वरापाशीं अनन्यभावानें माझी प्रार्थना आहे! अशा गुणवती स्त्रिया आपल्या समाजांत जेवढया कमी निघतील तेवढें उत्तम! आत्महत्या करणें हें महत्पाप आहे हें सगळयाजणी जाणत असतात; परंतु रोग झांकून ठेविल्यानें, किंवा स्वतःच्या हव्या तशा वागणुकीनें प्रकृतीची माती करून घेतल्यानें जें आत्मघाताचें भयंकर पाप शिरीं येतें, त्याचा कोणी यत्किंचित्‌हि विचार करित नाहीं! आपल्या स्त्रीवर्गांत सुशिक्षणाचा झपाट्यानें प्रसार झाल्याशिवाय ह्या घातकांचा अंत होणें नाहीं!

या विषयासंबंधीं जेवढा जेवढा विचार करावा तेवढें तेवढें मन अगदीं उदास होऊन जातें. स्वःतस होत असलेला विकार झांकून ठेवण्याचा रोग आपल्या स्त्रीसमाजाच्या अगदीं हाडींमासीं खिळून गेला आहे ह्मटलें तरी चिंता नाहीं! मला वाटतें, आपल्या महाराष्ट्रीय—फक्त महाराष्ट्रीयच कां—अखिल भारतवासी कुलस्त्रिया कसल्या ना कसल्या व्याधीनें जर्जर होऊन अनावर कष्ट पावत आहेत, व कोणी मिथ्या धर्माच्या भीतीनें तर कोणी अदृष्टावर भरिभार टाकून रोगाच्या नाशाचा कांहीं एक उपाय न करितां दिवसेंदिवस अधिकाधिक हैराण होतं आहेत. साधारणपणें स्त्रियांची धर्माविषयींची समजूत मोठी विचित्र असते. सुशिक्षण आणि खऱ्या ज्ञानाच्या अभावामुळें स्त्रिया वास्तविक धर्माला अधर्म आणि अधर्माला धर्म मानून तद्‌नुसार आचरण करित असतात. ज्या कित्येक घातकी आणि भयंकर अहित करणाऱ्या दुष्ट चालीरीती आहेत त्यांविषयीं यत्किंचित्‌हि विचार न करितां त्या धर्माचेंच एक अंग आहे असें समजून स्त्रिया बेलाशक त्याची चालीरीतीनें वागतात. त्यांच्याविरुद्ध कोणी गेलें तर त्याला धर्मभ्रष्ट मानून त्याची निंदा आणि

तिरस्कार करितात. आज आतां बराच वेळ झाला असल्या कारणानें मनांत मोठी इच्छा असूनहि विशेष लिहितां येत नाहीं. सवडीनुसार पुढें एखादे वेळीं विस्तारपूर्वक लिहीन. आज तुला एक प्रश्न विचारतों. धर्म कशाला ह्मणतात? कसें वागल्यानें धार्मिक होतां येईल? सांग पाहूं!

तुला सवतीचा इतका निदिध्यास कां लागला आहे? तुझ्यासारखी गुणवती, रूपवती, बुद्धिमती, सुशिक्षित पत्नी हयात असतांना नितांत पापरत, नीच पतीहि अन्य पत्नीग्रहणाची कधींहि इच्छा करणार नाहीं! एक भार्या असतां दुसरी भार्या वरणें हे नीतिविरुद्ध, धर्मविरुद्ध आणि अत्यंत भयंकर पाप आहे! थट्टेमध्येंसुद्धां अशा पापकर्थांचें मुखांतून उच्चारण करणें युक्त नाहीं! तुझ्यासारख्या पतिभक्तिपरायण साध्वीच्या तोंडून तर असली अमंगळ–अभद्र वाणी निघणें अगदींच अनुचित होय! तूं जशी पुनःपुनः थट्टेनें सपत्नीसंबंधीं मला लिहित असतेस, जानकी! विचार कर, मीं जर त्याचप्रमाणें थट्टेनें तुलाहि तसाच दुसरा एखादा पति करण्याविषयीं लिहिलें तर तुला तें कधीं तरी रुचेल काय? तुझ्या अंतःकरणाची काय बरें अवस्था होईल? गंगायमुनांचा संगम होऊन अनंत कालपावेतों तुझें अंतकरण व्यथित झाल्यावांचून राहील काय? जानकी! कांचेच्या घरामध्यें राहणारांनीं दुसऱ्यांवर दगड फेंकणें, किंवा गवताच्या गंजीखालीं राहणारांनीं दुसऱ्यांच्या अंगावर विस्तव टाकणें, कधींहि हितप्रद होणार नाहीं ही गोष्ट तुझ्या चांगली ध्यानांत यावी, ह्मणून हें असें उघड लिहिणें भाग पडलें! या माझ्या स्पष्ट लिहिण्यानें तूं दुःखी होणार नाहींस, अशी दृढ आशा आहे.

मी आणखी पंधरा दिवसांनीं घरीं येईन असें ह्मणतों आहें. या खेपेला घरीं आल्याबरोबर आपली परीक्षा घेण्यांत येईल. पुस्तकेंबिस्तकें वाचून योग्य तयारी करावी. पास झाल्यास ठीक, नाहींतर मग काय होईल तें सांगतां येत नाहीं!

मी खुशाल आहें. घरची खुशाली कळवावी, हे आशीर्वाद,.

सर्वस्वी तुझाच,

सदाशिव.

श्री.

उत्तर.

सावंतवाडी, ता० ३० जुलई, १८—

सेवेशीं विज्ञापना विशेष.—

आपलें आशीर्वादपत्र पावलें. परमानंद झाला. बळवंतराव भावोजीं-प्रमाणेंच आपले तिकडीलहि एक स्नेही पत्नीच्या आजारीपणामुळें कष्टी झाले आहेत, हें ऐकून फारच वाईट वाटत आहे. जगदीश्वर आपल्या या हतभागी भारतस्त्रीसमाजाला सुबुद्धि देवो ! आपणास माझी एवढीच विनंति आहे कीं, पत्नीच्या या अनिष्ट वर्तनामुळें हताश होऊन जाऊं नये असें आपण आपल्या त्या स्नेह्यांस अवश्य सांगावें. आह्मी अशिक्षित, अल्पबुद्धि स्त्रिया; बरेंवाईट, हिताहित कांहींएक आह्मांला कळत नाहीं! नाहीं तर, मुद्दाम जाणूनबुजून का कोणी स्त्री आपल्या पतीच्या मनाला कष्ट देईल ? ह्या सर्व गोष्टी मनांत आणून पत्नीचे अपराध त्यांनां क्षमा करण्यास सांगा. हळुहळू, सहज बोलतां बोलतां, पत्नीला बरेंवाईट हिताहित समजावून देण्यास सांगा, ह्मणजेच तिची समजूत क्रमाक्रमानें बदलत जाईल. आह्मी पडलों स्त्रिया—सगळ्याच गोष्टी का आह्मांला तुम्हां पुरुषांप्रमाणें समजताहेत ? सगळाच उपदेश का आह्मांला रुचतो आहे ? सहज सांगून समजत नाहीं, ह्मणून जर तुह्मी पुरुष आमचा राग करूं लागलां, किंवा वैतागूं लागलां, तर त्याचा परिणाम तुम्हांलाच जास्त भोगावा लागेल ! आमचा तिरस्कार करून आह्मांला शिकविण्याचें किंवा उपदेश करण्याचें जर तुह्मीं सोडून दिलें, तर मग तुम्हांलाच त्यापासून त्रास सोसावा लागेल. तेव्हां, हा विचार मनांत बाळगून, आपापल्या पत्नीला सुशिक्षण देण्यास, सदुपदेश करण्यास सदैव झटणें, हें तुह्मा पुरुषवर्गाचें अत्याव-श्यक—अत्यंत पवित्र कर्तव्य आहे. आपले ते स्नेही पत्नीच्या या नादान वर्तणुकीला कंटाळून जर तिला औषधोपचार बंद करतील, तर पुढें हें त्यांनांच पश्चात्तापाला कारण होईल. बायकोला त्याचें कांहींएक वाटणार नाहीं. कारण, तिला मुळीं आपल्या हिताहिताचें ज्ञानच नाहीं!

या आर्यावर्तातील बहुतेक सर्व स्त्रिया, आपल्याला दुखणेंबहाणें आलें असतां होतां होईल तों तें कोणाच्याहि दृष्टोत्पत्तीस येऊं देत नाहींत, तोलेल तोंवर अंगावरच तें तोलित असतात, ही गोष्ट तर खरीच; आणि कुटुंबांतील इतर कोणाच्याहि समजण्यांत येऊं न देतां अनेक स्त्रिया कांहीं रोगांपासून कष्ट पावत असतात, हीहि गोष्ट खोटी नव्हे. 'अं:, त्यांत काय मोठंसं आहे ! जाईल मेलं आपल्याआप ! ' असा भरंवसा धरून आपल्या दुखण्याची गोष्ट त्या कोणालाहि सांगूं इच्छित नाहींत; परंतु पतीपाशीं देखील त्या ही गोष्ट सांगत नाहींत याचें मला वाटतें, पतीचें त्यांच्याविषयीं औदासिन्य हेंच कारण होय! कारण, मला वाटतें, बहुतेक पतीहि या बाबतींत आपल्या पत्नीपाशीं कधीं चौकशी करण्याच्या भानगडींत पडत नाहींत ! आपल्या दुखण्याची गोष्ट ऐकून पतीचें मन उदास होईल, त्याला दुःख होईल—किंवा औषधोपचार करण्यांत तो बऱ्याच खर्चांत येईल, अशा निराधार कुशंका घेऊन स्त्रिया घाबरून जातात, आणि यामुळेंच कोणालाच कांहींएक सांगण्याचें साहस त्यांना होत नाहीं. आजपर्यंत मीं ज्या स्त्रियांजवळ या बाबतींत चौकशी केली त्यांपैकीं बहुतेकींनीं आपलें दुखणें लपवून ठेवण्याचें कारण असेंच कांहीं तरी सांगितलें. मी ह्मणजे स्त्रीजातीच्या या कृतीचें समर्थन करित आहें, असें मुळींच नाहीं ! आमच्या मूर्खपणामुळेंच असल्या निराधार कुशंका आमच्या मनांत उद्भवतात, याविषयीं मला बिलकुल संशयच नाहीं: परंतु माझें ह्मणणें इतकेंच कीं, आमचा हा मूर्खपणा दूर करण्याचा अगदीं थोड्याच पुरुषांनीं यत्न केला असेल !

ज्या रीतीनें सांगितलें असतां आम्ही समजूं शकूं, ज्या रीतीनें उपदेश केला असतां आमच्या तो मनांत ठसेल, अशा रीतीनें आपल्या पत्नीला कांहींहि समजावून देण्यास अगदीं थोडेच पति झटत असतात, किंवा अशा रीतीनें सरळ सुबोध उपदेश करित असतात. सर्वच मनुष्यांना सर्वच खाण्याचे पदार्थ जिरवितां येत नाहींत, ही गोष्ट कितीएकांच्या तरी ध्यानांत येत नाहीं ! स्त्रिया साधारण ज्ञानांध तर

खऱ्याच, त्याचें कारण फारकरून पतीकडून सरळ उपदेशाचा अभाव किंवा त्यांच्यासंबंधीं पतीचें पूर्ण औदासिन्य हेंच होय ! पतीकडून सुशिक्षण आणि सदुपदेश मिळत असतांहि स्त्रीच्या अंगीं हिताहितज्ञान उपजत नाहीं, असें मला वाटतें, स्त्रीजातीच्या कट्टया दुस्मानलाहि ह्मणतां येणार नाहीं! मोठ्या दुःखाची गोष्ट ही कीं, या बाबतींत माझ्यासारख्या भाग्यवान् स्त्रिया अगदींच थोड्या. मी जी अद्यापिहि अशी ‘ अडाणी ’ राहिलें आहें, हा सर्वस्वी माझाच दोष आहे. उपदेशाच्या किंवा सुशिक्षणाच्या अभावामुळें मला मुळींच कष्ट भोगावे लागत नाहींत, हें मी एकदा सोडून हजारदा सांगेन !

‘धर्म कशाला ह्मणतात? कशा रीतीनें वागलें असतां धार्मिक होतां येईल? ’ काय बरें मी या प्रश्नाचें उत्तर देऊं ? मला न विचारतां हा प्रश्न जर आपण एखाद्या झाडाला विचारला असता, तर त्याला देखील माझ्यापेक्षां चांगलें उत्तर देतां आलें असतें! मला आपलें एवढेंच समजतें कीं, स्त्रियांचा धर्म ह्मणजे पतिसेवा ! पतिसेवेनेंच त्यांनां पुण्यसंचय लाधत असतो. पतिसेवा ह्मणजे पतीची केवळ पदसेवा नव्हे, तर पतीच्या सुखाची वृद्धि करणें, त्याचें दुःख दूर करण्यास झटणें, पतीच्या हृदयाला नेहमीं शांति मिळेल असें करणें, सर्वप्रकारें पतीची सन्मानवृद्धि करणें, गृहसंबंधीं व परिवारसंबंधीं सुखाची वृद्धि करणें, सारांश, सर्वप्रकारें पतीचें जेणेंकरून मंगल होईल अशा गोष्टी करणें. अर्थात्, आपलें अस्तित्व विसरून जाऊन केवळ पतीचें मंगल साधण्यांत सदैव तत्पर राहणें. यापेक्षां स्त्रियांनां अन्य धर्म तो कोणता ? परंतु हें उडवाउडवीचें उत्तर लिहिण्याला मला लाजच वाटत आहे— विचारलेल्या प्रश्नाचें हें कांहीं योग्य उत्तर नव्हे, असें वाटून पत्र वाचतां वाचतां आपणास हंसूंहि लोटेल. तरी मला कांहीं या सगळ्या प्रश्नाचें उत्तर देतां येत नाहीं. कृपा करून मला क्षमा करावी. आपल्याच तोंडून या प्रश्नाचें उत्तर ऐकण्यासाठीं मी अगदीं अधीर झाल्यें आहे.

घरीं आल्यावर माझी परीक्षा घेण्याबद्दल लिहिलें आहे. फारच उत्तम! परंतु परीक्षेंत नापास झाल्यास मला काय बक्षिस देणार तें अगोदरच सांगायचें होईल तर बरें! कारण, पास होऊन बक्षिस मिळविणें हे निदान माझे बाबतींत तरी असंभवनीयच आहे! परंतु कांहीं तरी बक्षीस घेतल्यावांचून मात्र मी सोडायची नाहीं, हें अगदीं पक्कें समजून असायचें! त्या पुढच्या गोष्टी पुढें. आपण लवकर घरीं येण्याला आतां मुळींच विसरूं नये. मला कांहीं महत्त्वाच्या गोष्टी विचारून घ्यावयाच्या आहेत.

आपलें हें पत्र वाचून बरीक माझी सवतीबद्दलची हौस अगदीं पूर्ण झाली, पुनः ह्मणून कांहीं ही गोष्ट तोंडांतून काढण्याची इच्छा राहिली नाहीं! आपल्या चरणीं शतसहस्र—कोट्यानकोटी नमस्कार करितें—आपणहि आतां ह्या गोष्टीचें स्मरण देऊन मला अगदीं फजित करूं नये! पुनः ह्मणून ही गोष्ट ऐकण्याची मला इच्छा देखील राहिली नाहीं. झालें तेवढें पुष्कळ झालें! आतां मला क्षमा असावी. या गंभीर विषया-संबंधीं थट्टेनें देखील कांहीं बोलतां कामा नये, हें आज मला अगदीं उत्तम रीतीनें समजून आलें. ज्यांच्या कृपेनें मला हें संपूर्ण ज्ञान लाभलें, त्यांच्या परमपूज्य चरणीं मी लक्ष लक्ष नमस्कार करितें. स्त्रीचें सर्वस्व धन ह्मणजे पति. जी स्त्री माझ्याप्रमाणेंच या धनाचा गौरव करण्यास समर्थ होते, पतीच्या गौरवानें आपणहि गौरवान्वित होते, आणि पतीनें दिलेल्या सुशिक्षणानें सुशिक्षित होते, त्याच स्त्रीचें जीवन धन्य होय! तीच स्त्री खरी सुखी होय!! आपली नम्र दासी, **जानकी.**

